# त्रिमंत्र







नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो ऊवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद



## दादा भगवान कोण?

जून 1958 संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्भुत आश्चर्य! एका तासात त्यांना विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवित आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षूनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्भुत ज्ञान प्रयोगाद्वारे! त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोकाचे' नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: भगवान नाही. माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

परम पूज्य दादा भगवान (दादाश्री) यांना 1958 मध्ये आत्मज्ञान प्रकट झाले. त्यानंतर 1962 ते 1988 पर्यंत देश-विदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत.

दादाश्रींनी आपल्या हयातीतच आत्मज्ञानी पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत.

आत्मज्ञानी पूज्य दीपकभाई देसाई यांना सुद्धा दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. वर्तमानात पूज्य नीरूमांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात निमित्तभावाने आत्मज्ञान प्राप्ती करवित आहेत.

या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा आतून मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञाना संबंधीत जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषायांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये विशेष लक्ष ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रूटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानर्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण दिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.



## समर्पण

अतिक्रमणांचा सतत होतो वर्षाव;
विषमकाळी पदोपदी कषायी व्यवहार.

पती-पत्नी, आई-वडील-मुलांमध्ये वाणीचा गोळीबार;
वर्तनाने आणि मनाने सतत दु:खांचा उपहार.

तरीही दादांनी दिले प्रतिक्रमणांचे हत्यार;
नरकातूनी होते स्वर्ग स्थापना, घरात अन् बाहेर.

लाखो लोकांनी अंगीकृत केले, बदलले मुळापासूनी संस्कार;
मोक्षासाठी लायक बनवितो अक्रमचा हा उपहार.

वीतरागींच्या प्रतिक्रमणांचे, दादांनी केले पुन्हा प्रसार;
जगास समर्पण, जो झेलील तो पावेल मुक्तीचा हार.

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
10. भावना सुधारे जन्मोजन्म
11. कर्माचे विज्ञान
12. पाप-पुण्य
13. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
14. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
15. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
16. मानव धर्म
17. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
18. सेवा-परोपकार
19. दान
20. त्रिमंत्र
21. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
22. चमत्कार
23. सत्य-असत्याचे रहस्य
24. वाणी, व्यवहारात (सं)
25. पैशांचा व्यवहार (सं)
26. क्लेश रहित जीवन
27. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
28. प्रेम
29. गुरू-शिष्य
30. अहिंसा
31. आप्तवाणी-1 ते 3
34. आत्मसाक्षात्कार
35. जगत कर्ता कोण ?
36. कर्माचा सिद्धांत

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)
57. आप्तवाणी - 12 (पू)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

★ **दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

★ **प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

# संपादकीय

अगदी मनापासून मोक्षमार्गावर जाणाऱ्या व्यक्तींना पदोपदी सतावणाऱ्या कषायांना मुळापासून नष्ट करण्यासाठी, व मोक्षमार्गावर प्रगती करण्यासाठी काही अचूक साधन हवे की नको? स्थूलतमपासून सूक्ष्मतमपर्यंतच्या संघर्षानां कसे टाळता येतील? आपल्याला किंवा आपल्याकडून अन्य व्यक्तीला दु:ख झाले तर त्याचे निवारण कसे करता येईल? कषायांची बॉम्बार्डिंग थांबविण्यासाठी किंवा ते पुन्हा होऊ नयेत यासाठी कोणते उपाय करता येतील? इतके धर्माने वागलो, जप, तप, उपवास, ध्यान, योग, इत्यादि सर्व केले, तरीही मन-वचन-कायेने होणारे दोष का थांबत नाहीत? अंतरशांती का लाभत नाही? कधीतरी स्वत:चे दोष दिसतात, तर त्यासाठी काय करावे? त्या दोषांना कसे दूर करावे? मोक्षमार्गावर पुढे जाण्यासाठी आणि संसारमार्गात सुख-शांती, मंद-कषाय व प्रेमभावाने जगण्यासाठी काही योग्य साधन तर पाहिजे ना? वीतराग भगवंतांनी धर्मसारामध्ये जगाला काय बोध दिला आहे? खरे धर्मध्यान कोणते? पापापासून परतण्यासाठी एखादा अचूक मार्ग आहे का? असेल तर तो दिसत का नाही?

धर्मशास्त्रात लिहिलेले बरेच काही वाचले जाते, तरीही ते जीवनात का उतरत नाही? साधू, संत, आचार्य, कथाकार वगैरे इतका उपदेश देतात परंतु ते जीवनात परिणमित होण्यासाठी काय कमी पडते? प्रत्येक धर्मात ब-याच प्रकारच्या क्रिया केल्या जातात, अनेक प्रकारचे जप, तप, नियम, अस्तित्वात आहेत, तरीही ते का फलदायी ठरत नाहीत? कषाय का कमी होत नाहीत? दोषांचे निवारण का होत नाही? याची जबाबदारी आसनस्थ उपदेशकांची नाही का? हे असे जे लिहिले जात आहे ते द्वेष किंवा वैरभावाने नसून करुणा भावाने आहे, तरीही त्यातून मुक्त होण्यासाठी काही उपाय आहे की नाही? अज्ञान दशेपासून ज्ञान दशा आणि थेट केवलज्ञान स्वरूप दशेपर्यंत पोहोचण्यासाठी ज्ञानींनी, तीर्थंकरानी कोणते निर्देश दिले असेल? ऋणानुबंध व्यक्तींकरिता असलेल्या राग किंवा द्वेषाच्या बंधनातून मुक्त होऊन वीतरागता कशी प्राप्त करावी?

'मोक्ष मार्ग शूरांचा आहे, तिथे भित्र्यांचे काम नाही', परंतु शौर्याचा

उपयोग कुठे करावा की ज्यामुळे शीघ्रतिशीघ्र मोक्षप्राप्ती होईल? भिन्नेपणा कशास म्हणावे? पापी पुण्यशाली बनू शकतात का? कशा प्रकारे बनू शकतात?

सारे जीवन या RDX च्या अग्निमध्ये जळत आहे, तो अग्नि कसा विझवावा? रात्रंदिवस पत्नीचा जाच, मुला-मुलींचा संताप, आणि पैसे मिळवण्यासाठी उपद्व्याप, या सर्व त्रासांपासून शांती मिळवून जीवन नौका कशी पार करता येईल?

गुरु आणि शिष्यांमध्ये, गुरुमाता आणि शिष्यांमध्ये, निरंतर होणाऱ्या कषायात अडकलेले उपदेशक परत कसे फिरू शकतील? बिनहक्काची लक्ष्मी आणि बिनहक्काच्या स्त्रीयांबाबत वाणी-वर्तन किंवा मनाने किंवा दृष्टीने दोष झाले असतील तर त्याला तिर्यंच अथवा नरकगतीशिवाय दुसरे कोणते स्थान मिळू शकेल? यातून कशी सुटका होऊ शकेल? यासाठी सावध कसे राहावे? आणि मुक्त कसे व्हावे? पेचात टाकणाऱ्या अशा अनेक प्रश्नांची उकल कशी होईल?

प्रत्येक मनुष्य स्वत:च्या जीवन काळात कधी कधी संयोगांच्या दबावामुळे अशा परिस्थितीत फसतो की संसार-व्यवहारात चुका करायची इच्छा नसतातही चुका होतच राहतात, आणि त्या चुकांपासून मुक्त होता येत नाही. अशा परिस्थितीत मनाने स्वच्छ असणारी माणसे सतत गोंधळाचा अनुभव करतात. अशा लोकांना चुकांपासून मुक्त होऊन जीवन जगण्यासाठी अचूक मार्ग मिळावा की जेणे करून त्यांना आंतरिक सुख-शांती लाभेल आणि त्यांची प्रगती होईल. या हेतूने यापूर्वी कधीही प्राप्त न झालेले अध्यात्म विज्ञानाचे एकमेव आणि अचूक 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' रूपी हत्यार तीर्थंकरांनी, ज्ञानींनी जगाला अर्पण केले आहे. त्या हत्याराद्वारे दोष रूपी विशाल वृक्षाचे मुळासकट निर्मूलन करून अनंत जीवांनी मोक्ष लक्ष्मी प्राप्त केली आहे. अशा ह्या मुक्ती देणाऱ्या प्रतिक्रमणरूपी विज्ञानाचे, त्यातील रहस्यांचे, यथार्थ स्पष्टीकरण प्रकट ज्ञानी पुरुष श्री दादा भगवान यांनी केवलज्ञान स्वरूपात पाहून बोललेल्या वाणीद्वारे व्यक्त केले आहे. ते सर्व प्रस्तुत ग्रंथात संकलित करण्यात आले आहे, जे सूज्ञ वाचकांना आत्यंतिक कल्याणासाठी उपयोगी सिद्ध होईल.

ज्ञानी पुरुषांची वाणी द्रव्य-क्षेत्र-काळ तसेच भिन्न-भिन्न निमित्तांच्या आधीन निघाली आहे, त्या वाणीच्या संकलनात आढळणाऱ्या त्रुटींना क्षम्य मानून ज्ञानी पुरुषांच्या वाणीचा अंतर आशय प्राप्त करावा, हीच नम्र विनंती.

ज्ञानी पुरुषांकडून जी वाणी बोलली जाते ती नैमित्तिक रूपाने जे कोणी मुमुक्षु-महात्मा प्रश्न विचारतात, त्यांच्या समाधानासाठी बोलली गेली असते आणि ती वाणी जेव्हा ग्रंथरूपात संकलित होते, तेव्हा काही ठिकाणी विरोधाभास भासू शकतो. उदाहरणार्थ, एका प्रश्नकर्त्याच्या आंतरिक दशेच्या समाधानासाठी ज्ञानी पुरुषांकडून 'प्रतिक्रमण ही जागृती आहे आणि अतिक्रमण हे डिस्चार्ज आहे', असे प्रत्युत्तर मिळते आणि सूक्ष्म जागृतीच्या दशेपर्यंत पोहोचलेल्या महात्म्यांना सूक्ष्मतेने समजावण्यासाठी 'ज्ञानी पुरुष' असा खुलासा करतात की 'अतिक्रमण हे डिस्चार्ज आहे आणि प्रतिक्रमण हे सुद्धा डिस्चार्ज आहे, म्हणून डिस्चार्जला डिस्चार्जने संपवायचे आहे'. हे दोन्ही खुलासे नैमित्तिकरूपाने यथार्थच आहेत, परंतु सापेक्ष रूपाने यात विरोधाभास वाटतो. तर अशा प्रकारे प्रश्नकर्त्याच्या दशेमध्ये फरक असल्यामुळे प्रत्युत्तरात विरोधाभास वाटतो. तरीही सैद्धांतिक दृष्ट्या यात विरोधाभास नाहीच. सूज्ञ वाचकांना ज्ञानवाणीची सूक्ष्मता आत्मसात करून गोष्ट समजून घ्यावी यासाठी सहजपणे हे सूचित केले आहे.

**-डॉ. नीरू बहन अमीन**

**नोट :** (1) प्रस्तुत ग्रंथात ज्यांनी स्वरूप ज्ञान प्राप्त केले नाही अशा लोकांचे प्रश्न आहेत तेथे **मुमुक्षु :** असे लिहिले आहे. त्या शीर्षकाखाली येणारे सर्व प्रश्न त्यांचेच आहेत, असे समजावे. आणि या व्यतिरिक्त जेथे **प्रश्नकर्ता :** असे लिहिले आहे, ते अक्रम मार्गाचे ज्ञान प्राप्त केलेल्या महात्म्यांचे प्रश्न आहेत, असे सूक्ष वाचकांनी समजावे.

(2) जिथे जिथे 'चंदुभाई' या नावाचा प्रयोग केला आहे त्या ठिकाणी सूज्ञ वाचकांनी स्वत:चे नाव समजावे.



# उपोद्घात

## ( राग : वळतरनी इच्छा विना, लुंटावे मोक्षज लक्ष्मी )

### खंड-1 : प्रतिक्रमण

जीवनात करण्यायोग्य, त्रिकरणाचे एकात्मयोग;
तो तुटता त्वरित प्रतिक्रमण, अक्रम ज्ञानाचा हा शोध!

यथार्थ रूपे प्रतिक्रमण, विधी 'दादा' दाखवी;
'दादा भगवान' साक्षीने, समोरच्याच्या आत्म्याशी!

हृदयी जाहीर करूनी स्वदोष, क्षमा, पश्चात्ताप 'हार्टिली';
परत न करण्याचा निश्चयाने, दोष धुतले जातात 'सिम्पली'!

सत्कर्माने होते धर्म, दुष्कर्म तोची अधर्म;
धर्म-अधर्माच्या पैलतीरी स्थित आहे आत्मधर्म!

चांगल्या कर्माने 'क्रेडिट', त्याने मिळे सुखभोग;
वाईट कर्माने' डेबिट', त्याने मिळे दुःखभोग!

'क्रेडिट-डेबिट' शून्य झाल्याने आत्मसुखाचा उपभोग;
पहिले दोन करी संसार वृद्धी, तिसरा मार्गावर मोक्ष खरा!

इष्टदेव- दादांच्या साक्षीने, 'हार्टिली' पश्चात्ताप करूनी;
हे विज्ञान क्रियाकारी, औषधाचा आविष्कार रोगावरी!

खाणे-पिणे, स्नान करणे, बोलणे वा भोजन करणे;
समोरच्यास न दुखावता, सहज व्यवहार आहे क्रमण!

राग-द्वेष, समोरच्याला दुःख देणे, ते सर्व आहे अतिक्रमण;
अतिक्रमणातून परतणे, तो विधी आहे प्रतिक्रमण!

क्रोध-मान-माया-लोभ, ते सर्व मात्र अतिक्रमण;
जातील ते सर्व त्वरित, केल्याने त्यांचे प्रतिक्रमण!

अतिक्रमणाने राग-द्वेष, परिणाम होतसे दोघांवरी;
प्रतिक्रमण त्याचे होताच परिणाममुक्त दोघेही!

डाग पडला तर कपडा व धुणारा, श्रम पडे दोघांना,
क्रमणाचा परिणाम नाही कुणावर, सहजता वर्तते सर्वांना!

जीवमात्र करी 'प्रोजेक्ट', हिंडता-फिरता अनंत वेळ;
कोमी-हुल्लड ऐकताच, विचार करतो थर्ड वर्ल्ड वॉरचा!

एका सेकंदाचे समय असंख्य, अतिक्रमण करी अपार;
अतिक्रमणाने उत्पन्न झाला, प्रतिक्रमणाने विराम संसार!

अपमान करणारा वाटे दोषी, ते ही आहे अतिक्रमण;
कठोर बोलणे, वा उलट वागणे, हे ही आहे अतिक्रमण!

मुलांना मारणे, हे ही आहे अतिक्रमण;
का मला शिवी दिली? असे वाटणे हे ही अतिक्रमण!

आपल्याकडून कोणाला दु:ख झाले, तर होईल ते अतिक्रमण;
तेव्हा दादांना आठवून, करा त्वरित प्रतिक्रमण!

आपल्या हृदयी तिळभरही नाही, दु:ख देण्याचा भाव;
तरीही दु:ख दिले, दादा म्हणे, तो नैमित्तिक भाव!

कळत-नकळत दुखाविले कुणास, तर तेही अतिक्रमण;
न बोलता मन बिघडले, तरीही ते आहे अतिक्रमण!

मन-वचन-काया योगे, जीव मात्र होई दु:खी;
आवश्यक त्वरित तयाचे, हृदयपूर्वक प्रतिक्रमण!

कर्म कमी करतो तो आहे धर्म, वाढवितो तो अधर्म;
प्रतिक्रमणाने नाही नवीन कर्मबंधन, सार आहे हे सर्वोच्च धर्म!

शक्ती मागा पुढे जाण्यास्तव, हृदयी करूनी प्रार्थना;
ज्ञानी वा स्वातमकडूनी, गुरु-इष्टदेव-मूर्ती!

क्षमा मागा पुकारूनी, चुकांच्या शुद्धीसाठी;
नष्ट होतील छोट्या चुका, सामायिक विरघळविते गाठी!

अनंत काळच्या पाप कर्मांपासून होईल कशी निवृत्ती?
ज्ञानीचे निश्चय ज्ञान, जेव्हा करील हृदयांकित!

ते न मिळाले, तर मिळेल श्रुतज्ञान सरळ ग्रंथातूनी;
श्रुतज्ञानातून मतिज्ञानात परिवर्तीत, करी पापकर्म निवृत्ती!

किंवा पापमुक्त होण्याची, दृढ भावना आणि प्रतिक्रमण;
निश्चित सोडवी अनंत जन्माचे, पापकर्मांचे गाठोडे!

व्यवहार वा व्यापारातील अन्याय, काय आहे त्यांचे प्रायश्चित्त?
प्रभूचरणी करा निश्चय, पुन्हा करणार नाही असे कधी!

पूर्व जन्मीच्या प्रकृती दोषाने आज दिले जाते दु:ख;
भोगावे ते समता भावाने, तर मिळे मुक्तीचा आनंद!

सहन करावे उपकारी भावाने, मिळणारे सर्व दु:ख;
दादांच्या प्रतिक्रमणाने, सोडा सर्व संसार जंजाळ!

वैज्ञानिक तत्व हे जैनांचे, आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान;
अन्य धर्मातही आहे, प्रायश्चित्ताचे प्रमुख स्थान!

पूर्णता अन सूक्ष्मता, प्राप्त करवी वीतरागी विज्ञान;
व्यवहार धर्माला टॉपवर नेऊन, प्राप्त करविते धर्मध्यान!

क्षपक श्रेणी चढवून, प्रतिक्रमणाने लाभे शुक्लध्यान;
निश्चय-व्यवहार संपूर्ण धर्म, बोधितात तीर्थंकर भगवान!

दादाश्री समजावितात, आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान सार;
निजदोषांचे ज्ञानी वा सद्गुरुंपाशी करा स्वीकार!

निर्भय होऊनी निश्चित मनाने, सोपवा गुरुवर सर्व भार;
गुरु करवतील प्रतिक्रमण, सहज जागृती राहील वारंवार!

प्रतिक्रमण आहे कर्म मुक्तीचे, सर्वश्रेठ हत्यार;
दादांचे प्रतिक्रमण पकडले, तर प्रगती विना गुरु आधार!

विना जप-तप-उपवास, ध्यान-योगाचे कष्ट अपार;
निश्चित पोहोचेल मोक्षाला, प्रतिक्रमण एकमात्र तारी संसार!

पश्चात्तापाने पापांपासून पावन होऊन मुक्त होशील;
पुन्हा पुन्हा पश्चात्ताप करूनी, क्षमा माग प्रभूचरणी!

पश्चात्ताप तर सदैव, हार्टिलीच असतो स्वयं;
प्रतिक्रमणाने सुटतील कर्म, हाच आहे कर्म नियम!

चुकीसाठी माग माफी खऱ्या मनाने, हीच मुक्तीची रीत;
खोट्या मनाने मागितली, तरीही घडेल तुझे आत्महित!

मद्यपान करीत असेल तर, माफी माग निश्चय करूनी;
कधी तरी सुटेल अवश्य, ही वैज्ञानिक गोष्ट खरी!

हे आहे'अक्रम विज्ञान', अवश्य आहे फलदायी;
दोन तासात मोक्ष मिळे, मात्र 'ज्ञानी' ज्ञान-आज्ञा ऐक!

कुणाला झाले गर्भित दु:ख, तेही आहे अतिक्रमण;
कळो वा न कळो, पण करा त्वरित प्रतिक्रमण!

स्वेच्छेने केले ते स्वैच्छिक, अवश्य कर तिथे पुरुषार्थ;
दबावामुळे केले ते अनिवार्य, त्याला म्हणतात प्रारब्ध!

क्रिया आहे अनिवार्य आणि भाव-कुभाव हे स्वैच्छिक;
अपमान आहे अनिवार्य, आणि प्रतिक्रमण आहे स्वैच्छिक!

अज्ञान दशेत आहे भावसत्ता, प्रतिक्रमण-प्रत्याख्यानाची;
खून, चोरी करून होतो खुश, तर पडेल गाठ फार पक्की!

विषयविकारांचे केले प्रतिक्रमण, तर वाट धरेल हनुमंताची;
मनापासून केले प्रतिक्रमण तर, दोष-शुद्धी जबाबदारी दादांची!

कनफेशन करतात ख्रिश्चन, पण तोंड लपवून अंधारात;
अक्रमात ज्ञानींजवळ, आलोचना करतो अश्रुधारांनी!

प्रतिक्रमण अन त्रिमंत्र, एकत्र केल्याने निश्चित फलदायी;
महान पुरुषांच्या भक्तीने, होतसे पूर्ण पापमुक्ती!

अनंत वेळा केली प्रतिक्रमणे, का न मिळे फळ कधी?
समजून 'शूट ऑन साइट', केले होते का एकदा तरी?

सकाळ-संध्याकाळ प्रतिक्रमण, पण होतात ते 'मेकॅनिकल';
विना पश्चात्तापाचे प्रतिक्रमण, ते नाही खरे प्रतिक्रमण?

घोकंमपट्टी करूनी बोलतो रोज, अशी तर रेकॉर्डही बोलते,
खरा अपराधी सापडत नाही, जो समोर तोच मारला जातो!

आयुष्यभर केले तरीही, संपला नाही एकही दोष;
पोपटपंचीचे प्रतिक्रमण, अहो, नाही हा महावीरांचा मार्ग!

मागधी भाषेत प्रतिक्रमण, कसे समजेल कोणाला?;
समजे न साधू, श्रावकांना, 'मी केले' म्हणून वाढविले अहंकार!

महावीरांचे शिष्य वक्र व जड, होतील विना एक अपवाद;
क्रियेला मानतात आत्मा, कोठे करू याची फिर्याद?

मधल्या बावीस तीर्थंकरांचे, शिष्य होते कसले विचक्षण?
प्रतिक्षण होते जागृत, दोष होताच करीत प्रतिक्रमण!

रोजच करतात प्रतिक्रमण, पण अर्थ जाणल्याशिवायच;
संवत्सरी एका प्रतिक्रमणाने, धुतले जात नाही वर्षभराचे पाप!

वर्षभराचे पाप पर्युषण वेळी, पाहताच स्वदोष हृदय द्रवते;
मरावेसे वाटे तेव्हा, अरेरे! किती दुखावले लोकांना?

असे भाव झाले का कधी? उलट सुंदर कपडे घालून?
लग्न कराया निघाले जणू, दागीण्याने सजून धजून!

आवडत्यांना 'मिच्छामि दुक्कडं', नावडत्यांकडे जात नाही,
वीतरागांची अब्रू काढली, नाही हा महावीरांचा धर्म!

खऱ्या वीतराग धर्मात, करतात रोज पाचसे प्रतिक्रमण;
'पाहताक्षणी संपविणे', दोषांचा पश्चात्ताप दिवस-रात्र!

शासन तर खरे महावीरांचेच, 'ज्ञानी' आहेत शासन श्रृंगार;
क्रमिक अडकला कलियुगात, 'आमच्या' द्वारे उघडला 'अक्रम' मोक्षद्वार!

नकद प्रतिक्रमण केल्याने, संपतात रौद्र-आर्त ध्यान;
'भगवत् पद' प्राप्ती सहज, अक्रमज्ञानी प्रकटतात तिथे!

हेतूनुसार फळ प्रतिक्रमणाचा, पुण्य वा संसार मुक्ती;
ज्ञान वा अज्ञान दशेत, फळ प्राप्तीचा आहे तो मूळ आधार!

आत्मज्ञानच आहे मोक्षमार्ग, नव्हे मात्र प्रतिक्रमण;
स्वभान झाल्यानंतरचे प्रतिक्रमण, उघडतात मोक्षाचे द्वार!

दर्शन मोह गेल्यानंतर, थांबते कर्मबंधन;
दर्शनमोह असेपर्यंत, प्रतिक्रमण मात्र गज-स्नानावत्!

प्रतिक्रमण करण्यास सांगितले, 'शूट ऑन साइट' करा;
ते जर जमले नाही तर, 'रायशी-देवशी' करा!

तेही झाले नाही तर पाक्षिक, पाक्षिक नाही तर चारमासी;
काहीच जमले नाही तर संवत्सरी, शेवटी आई नाही तर मावशी!

मावशीही सख्खी मिळाली नाही, भाड्याची जणू कळीकाळी;
कुठूनी मोक्ष? कुठूनी धर्म? रमतात केवळ बुद्धीत!

करणारा वा करविणाऱ्याचे यथार्थ असावेत प्रतिक्रमण;
शब्दांचे श्रृंगार सजविले, भाव विसरलेत अज्ञानात!

पावलोपावली अतिक्रमण, तरीही उपाय आहे प्रतिक्रमण;
पण चोरी-लाच चालणार नाही, येथे तर केवळ वीतराग चलन!

प्रतिक्रमण करतात मृतांचे, जीवितांचे कधी केले नाही;
खरे आहेत भाव प्रतिक्रमण, क्रियावाले तर निव्वळ खोटे!

त्याचे फळ नाही यथार्थ, खोटी किंमत लावून मिरवतात;
मानली कमाई आत्म्याची, जिंकले नाही अहो, हरून बसलात!

शब्दन् शब्द बोलणे, ते तर आहे द्रव्य प्रतिक्रमण;
भावामध्ये 'असे न होवो', तो आहे भाव प्रतिक्रमण!

तोडली नाही दोष श्रृंखला तर, ती नाही महावीर 'संवत्सरी';
वांझ प्रतिक्रमण करूनी, बिघडवले नाव वीर महावीरांचे!

माफ करा वाचक हो, हृदय आता भरून आले;
करतो त्याचे मी प्रतिक्रमण, कडक शब्द जे लिहिले गेले!

क्रियामात्र आणते आवरण, मार्ग चुकविते मोक्षाचा;
'रायशी-देवशी' गात राहतात, चोपडण्याचे औषध पितात!

क्रमिक मार्गात घेतात पच्चखाण, कंदमूळ वा रात्रीभोजन;
समज नसलेले हे पच्चखाण, मोक्षासाठी नाहीत उपयोगी!

ज्या दोषांचे प्रतिक्रमण, त्यांचेच करावे प्रत्याख्यान;
अक्रम विज्ञानाने उघड केले, यथार्थतेने प्रतिक्रमण!

त्यागासाठी घेतात पच्चखाण, हळूहळू ते सुटतात;
त्याग केलेल्याचेच घेतात पच्चखाण, काय करावे या समजुतीचे?

इर्यापथिकिचे प्रतिक्रमण, क्रमिक मार्गात करावे लागे;
अक्रमात देहापासून वेगळे, त्याला क्रिया स्पर्शत नाही!

प्रतिक्रमणाने स्वच्छ होतात, पुण्य आणि पाप कर्म;
मोक्षासाठी तर दोन्ही हेय, उपादेय हा आत्मधर्म!

दोष होताच प्रतिक्रमण, जागृती विना शक्य नाही;
'ज्ञानी' आत्मा जागृत करतात, मग पतंग दोरी सुटत नाही!

अज्ञान दशेच्या प्रतिक्रमणाने पाप बंधन कमी होते;
आत्मदृष्टी झाल्यानंतर, जागृतीसह खरे प्रतिक्रमण!

कपडे रोजच धुऊन घालतात, रोज लिहितात हिशोब;
प्रतिक्रमण करतात वर्षाने, मग कपडे का नाहीत धूत वर्षाने?

ज्ञानी देखील टोकल्यावर, लगेच करतात प्रतिक्रमण;
ही तर आहे नैसर्गिक रचना, मग यात दोषी कोण?

तरीही 'आहे' त्याला 'आहे' म्हणतात, 'नाही' त्याला 'नाही';
'आहे' ला 'नाही' म्हणणे, असे खरे ज्ञानी कसे म्हणतील?

दृष्टीत आहे संपूर्ण जग निर्दोष, तरीही चुका काढते वाणी;
सत्य बोलल्याने दुःख झाले, तर प्रतिक्रमण करतात स्वयं ज्ञानी!

आपले दोषच दोषी दाखवितात, तेव्हा दृष्टी धुवावी लागेल;
नाही तर कषाय उत्पन्न होतील, सापेक्ष सत्यासाठी लढत!

प्रतिवादी स्वीकारतात, तीच वाणी वीतराग;
प्रत्यक्ष सरस्वती म्हटली जाते, देशना आणि स्याद्वाद!

शुद्धात्मा शिवायची गोष्ट खोटी, असे तू निश्चित जाण;
'मी चंदू' चेही प्रतिक्रमण, हाच खरा समज प्रमाण!

डॉक्टर वाटतो कठोर, करतो जेव्हा रोग्याचा उपचार;
रोग निवारण हो न हो, पण प्रतिक्रमण हा त्याचा उपाय!

'दादा' डॉक्टर धर्माचे, बोलतात साधूंना बोल;
'ज्ञानी' शोभे मौन पण वाहते करुणा पाहुनी खोटे!

स्याद्वाद वाणी चुकताच ज्ञानी करतात प्रतिक्रमण;
वाणीने दोषी म्हटले तरी, प्रतीतीत आहे निर्दोष!

तीर्थंकरी वाणी सदैव, स्याद्वाद संपूर्ण;
अक्रम ज्ञानी चतुर्दशी, म्हणून वाणी अभिप्राय भिन्न!

दोषी दृष्टी असे जेव्हा, वाणी दादांनी अशी भरली;
दृष्टी आज निर्दोष झाली, तरीही वाणी अशी निघाली!

गुरु म्हणे, 'मी जलकमलवत्', 'मूर्ख' म्हणताच होतो भांडाफोड;
उडून जाती जल व कमल, हा धर्म आहे की आखाडा?

व्रत-जप-तप आणि नियम, देतात सांसारिक फळ;
मोक्षासाठी गरजेचे नाही, गरज मात्र प्रतिक्रमणाची!

साधू-साध्वी क्षमा मागण्यासाठी, करा एक तासाचा नित्यक्रम;
प्रत्यक्ष नाही, पण मनोमनी, तरीही आहे हा खरा धर्म!

प्रतिक्रमण आणि अकषाय, दोन्ही आहेत मूळ धर्म;
अन्य धर्माची गरज नाही, पण सोडला जगाने 'हा' मूळ धर्म!

पाळ तू ज्ञानी वचन, थेट पोहोचशील मोक्षद्वारे;
दादा घेतात जबाबदारी, हवी मात्र तुझी तयारी!

मताग्रह हेच मोठे अतिक्रमण, करी देश बरबाद;
विष कालवी आतल्याआत, ह्या द्रोहाचा करा निकाल!

क्रमिक मार्गी आदेश देतात, करू नकोस चोरी, लबाडी;
पाळ अहिंसा-सत्य-अचौर्य, शास्त्रे वदतात ओरडूनी!

तोंड बिघडवून लोकांनी, त्यजिले सारे ते शास्त्र;
जीवन तर सुधारत नाही, मग का हवी ही झंझट!

'करायचे आहे, पण होत नाही', असे म्हणू नये कधी;
'का होणार नाही' दृढतेने म्हणून, निश्चय करा वारंवार!

चोरी-लबाडीचे दोष झाले, पण कर त्यांचे प्रतिक्रमण;
आचरण न बदले कधी, म्हणून बदल तुझी समज!

जगातील हे सारे धर्म, आहेत देहाध्यासाचे मार्ग;
केवळ अक्रम विज्ञान असे, देहाध्यास रहित मार्ग!

त्याग करायचा आहे वा होत नाही, दोन्ही आहेत कर्तापद;
शौचाला जाण्याची शक्ती नाही! मग अन्य कोणती ते सांग?

कर्ताभावाने करायचे तर माग शक्ती जरूर;
दादांनी दिली 'नऊ कलमे', कारणे बदलतील, पण कार्य नाही!

अनंत शक्तीचा मालक स्वतः, मग 'शक्ती नाही' असे का बोलावे;
प्रतिक्रमण पण आहे पुरुषार्थ, होतो तो भ्रांत दशेत!

अध्यात्म वाणी गातात देशात, संत-भक्तही त्यात अभान;
'इट हेपन्स'ला म्हणे 'मी केले', भोवऱ्याला म्हणे 'माझे ऐक'!

जर झाली तुझी चूक, तर प्रतिक्रमाणाने ती सुधार;
भ्रांत पुरुषार्थ त्यास म्हणे, सत् प्राप्तीसाठी हो तू अकरतार!

कर्ता नाही तू कशाचाच, केवळ आहेस जाणणारा;
क्रिया नाही बदलणार, भिन्न आहेत कर्ता आणि जाणणारा!

चुकीला तू चूकच जाण, बदल तुझे अभिप्राय;
हाच आहे पुरुषार्थ धर्म, 'पहा' 'जाण' आणि कर निश्चय!

'होत नाही, अहो, होत नाही', असे बोलू नये कधीही;
चिंतवन करशील तसे घडेल, आहे आत्म्याचा स्वभाव!

गोष्ट आहे सूक्ष्म पण, समजल्याशिवाय सुटे न कोडे;
'स्वसत्ता-परसत्ता'चे भेद, मात्र ज्ञानीच पाडू शकतात!

चोर मुलाला सुधारण्यास, मारू नये कोणी;
बांधेल तो उलटी गाठ, होईल चोरीचा दृढ अभिप्राय!

माग शक्ती दादांकडे, 'या जन्मी न होवो चोरी कधी';
दादा समजावतात प्रेमाने, हृदय पलटेल शुद्ध प्रेमाने!

शक्ती मागूनही चोरी केली, तरीही पुन्हा शक्ती माग,
औषध हे अभिप्राय बदलण्याचे, परम विनय प्रभूपाशी!

'ज्ञानीं'जवळ सर्व औषधी, अवश्य होईल रोगाचे निदान;
रोग उघडकर मोकळ्या मनाने, वैज्ञानिक दादा भगवान!

मागितली तर अवश्य मिळेल शक्ती, करू नकोस शंका;
'नऊ कलमे' दिली याच करिता, वैज्ञानिक रहस्याने भरपूर!

अक्रमात पाहत नाही आचरण, केले त्यास ज्ञानाने निकाली;
नवे आर्त-रौद्र होत नाही, आणि जुने संपवा 'पाहूनी'!

अध्यात्म म्हणजे चित्त शुद्धी, चित्त अशुद्धीने कर्मबंधन;
कोणत्याही जीवाला दु:ख न होवो, तोच व्यवहार शुद्धी धर्म!

अक्रमच्या महात्म्यांना होत नाही नवे कर्मबंधन;
जुनी कर्मे संपवतात, नित्य पाळतात जे पाच आज्ञा!

चिकट कर्मे उदयास आले तर प्रतिक्रमणाने संपतात;
एकवतारी ज्ञान हे, गॅरंटी नवीन कर्मबंधन न होण्याची!

अतिक्रमण आणि आक्रमण, होताच कर तू प्रतिक्रमण;
पराक्रमाची तर गोष्टच निराळी, तेथे केवळ आत्म-रमण!

क्रमणाने बनली प्रकृती, पसरली ती अतिक्रमणाने;
प्रतिक्रमणाने घटत जाते, अक्रम ज्ञानाने समजली!

चोर असो की वेश्या, एकही भाव बिघडवू नये;
इच्छा नसते वाईटाची, पण ते संयोगात अडकतात!

मुढात्मा पाहतो दोष इतरांचे, स्वत:चे दोष दिसत नाहीत;
कसे करील न्याय, स्वत:च जिथे वकील-आरोपी-जज!

अज्ञानीही करतो प्रतिक्रमण, काही अंशापर्यंत;
पश्चात्तापाने दोष संपवतो, कोणी जागृत विचक्षण!

शुद्धात्मा झाल्यावरही, का करावे प्रतिक्रमण?
दु:ख दिले जर कुणाला, तर करावे लागे अक्रमात!

प्रतिक्रमण करूनही, जर दिली नाही त्याने माफी,
आपण ते पाहू नये, निश्चित होईल दोष मुक्ती!

अतिक्रमणाच्या विरोधाचा, पत्ता लागे प्रतिक्रमणाने;
असहमती दोषांशी तर, मुक्त होतो दोषी स्वभावापासून!

दोष सर्व आहेत निकाली, 'माझे' हे भाव नाहीत;
अशी जागृती राहिली तर जरूर नाही प्रतिक्रमणाची!

अतिक्रमण रहित असलेला सर्व, निकाली आहे व्यवहार;
अतिक्रमणाचे प्रतिक्रमण, तर निकाल होईल आत आणि बाहेर!

खरे प्रतिक्रमण तर तेच, ज्याने घटतात दोष,
घटले नाहीत दोष तर, कसे होईल कल्याण?

प्रतिक्रमणाने धुतले सारे, तर राहे न कुणाला दु:ख;
कधी न होतील मतभेद, संबंध राहतील सुरेख!

पाप धुण्याची प्रतीती, मन होते स्वच्छ;
मुखावर येते आनंद, लगेच होऊनी हलके फूल!

'चंदू, तुझी आहे चूक', कोणी म्हटले तुला तर;
सांग, 'चंदू, तुझी असेल चूक', म्हणून तुला रागावला!

अंडरहँडचे दोष, पाहू नयेत शेठने कधीही;
पोलिस, जज व पत्नीसमोर, का बोलत नाहीस कधी?

प्रतिक्रमणास झाला उशीर, तर कर त्याचेही प्रतिक्रमण;
आरती, विधीत चित्त भटकले, तर कर अजागृतीचे प्रतिक्रमण!

दोष होणे आहे स्वाभाविक, म्हणून आहे विमुक्तिचा मार्ग;
फक्त ज्ञानीच दाखवी, प्रतिक्रमण कर हे सुभाग्य!

दोष होतसे स्व–हस्तक्षेपाने, समोरच्याचा यात संबंध नाही;
सावधान, त्याची पोस्ट आहे बंद, आपली तर आहे जागी!

अक्रमज्ञानने प्रज्ञा प्रकट, प्रतिक्रमण होतात स्वयं;
वीतद्वेष तर झाला, तोच आहे खुदा, ज्याचा संपला अहं!

'अ–मारी' शब्द हा महावीरांचा, 'मार'चा कर प्रतिक्रमण;
समाधान किंवा निकाल करा, लढण्यासाठी नाही हा जन्म!

क्रमिकच्या ज्ञानींना नसे, दोषांचे असे सुदर्शन;
अक्रमाची जागृती पाहा, प्रतिक्षण आहे प्रतिक्रमण!

सद्‌गुण ज्याचे दिसतात, त्याचे नसे प्रतिक्रमण;
भावपूर्वकच आपले होत असे त्यांच्याशी सुवर्तन!

अहं झाकतो स्वदोषाला, स्वतःचीच बाजू घेतो;
मोठमोठे साधूही करतात, लग्न अहंकाराशी!

व्यापारात वाढविले भाव, तर ग्राहकालाही होते दुःख;
तेथे कर्ता 'व्यवस्थित', समकितला नाही जोखीम!

दादांनी आम्हा कसे बनविले, कर्म करता अकर्म स्थिती;
हा जन्म 'व्यवस्थित'च्या ताब्यात, तरीही प्रतिक्रमणाने मुक्ती!

अक्रम सिद्धांत पाहा, बुद्धीलाही जुमानत नाही;
चारी बाजुंनी बसतो मेळ, बुद्धू बनवून त्याला आणतो मार्गी!

काळा बाजारीचा हा काळ, 'व्यवस्थित' जर समजले;
प्रतिक्रमण त्यावर उपाय, प्रकृती मग विरघळेल!

अज्ञानीने खाल्ले व्याज तर, बनतो तो कसाई;
समकिती करूनी प्रतिक्रमण, करतो दोषाची धुलाई!

कर्जदाराच्या प्रतिक्रमणाने, सरळ होतो परिणाम;
राग–द्वेष वा शिवीगाळ, 'एक्स्ट्रा आयटम' करार!

चिडणे वा चोरी करणे, अप्रामाणिक अनीति;
रागावणे वा रोखणे, प्रतिक्रमणाने स्वच्छ पाटी!

साहेबांने डिसमिस केले, अन शुद्धात्म्यात जर राहिले;
नाही बंधन फाशीचेही, जज तर करी कर्तव्य!

विंचवाला चावू देतो तो, मूढ स्वत:च्या अहंकाराने,
ज्ञानी त्याला बाजूला सारून, करून घेतात प्रतिक्रमण!

पाहणेही न वाटे चांगले, पूर्व जन्माचे वैर कळते;
तिरस्कार वा अभाव, प्रतिक्रमणाने जाईल सुटून!

पती-पत्नी, सासू-सून, आहेत हिशोबवाले संघर्ष;
रिलेटिव्ह हे सारे संबंध, कर त्यांचे ही प्रतिक्रमण!

संसार म्हणजे हिशोब चुकविण्याचे आहे स्थान;
प्रतिक्रमण करून सुटा, म्हणते अक्रम विज्ञान!

प्रतिक्रमणाने सुधारतात संबंध; दुसरे नुकसान ओढवू नये;
पोहोचतात त्याचे प्रतीस्पंदन, नाही तर हिंदू-पाक लढाई!

अपमान होतो, विश्वास उठतो, दोष धुतल्याने जाई;
वारंवार धुवावे लागे, जर काढले मीठ दुधातून!

समोरच्यास दु:ख झाले, तर येते कळून त्वरित;
टोचणारे शब्द निघताच, चेहरा उतरतो, हास्य होते गायब!

दु:ख दिल्याने निघते दिवाळे, रुबाबाने घाबरविले;
मन दु:खविले, झिडकारले, तर सर्प होऊनी घेतील सूड!

सासू-सूनेच्या भांडणात, ठेच, आघात वा आत्मघात;
खोल प्रतिक्रमण, स्वत:ला रागावून, करा पश्चात्ताप बेसुमार!

ज्ञानी म्हणे, झालेच कधी इच्छा नसून कोणास दु:ख;
अपवाद रूपे घडले तरीही, होतात प्रतिक्रमण विशेष!

'तो पडू नये' असे रक्षण, त्याच्या विचारांना पकडून;
घर बसल्याच थांबवितो, 'व्यवस्थित' त्याचा हातात घेवून!

चूक केली, माफी मागितली, तो चुका करतो वारंवार;
तेथे समजावून प्रेमाने, माफ कर चांगले विचार!

समोरचा चुका करत राहतो, होत नाही कधी त्याला भान;
ना पश्चात्ताप, ना माफी, तर उरत नाही प्रेम आणि मान!

अशांचा करा विरोध, अर्थ नाही त्याला निभावण्यात;
करावे त्यास त्याचे भान, पण माफ करा आतून!

तरीही सुधारला नाही, तर शेवटी त्याला निभावून घ्यावे;
अन्यथा मनोभाव बिघडतील, 'असेच असते' म्हणूनी चालवावे!

कोणी दुखावला वा चिडला, पुन्हा कधी येणार नाही आपल्याकडे;
प्रतिक्रमण करून संपवला, पूर्ण केला मी हिशोब!

अहंकार करूनी सोडला, त्यात कुठे काय वाईट?
ज्ञानी म्हणे ही तर आहे चूक, निमित्त बनण्याचा हिशोब!

तरी समोरचा भडकला, तर सोडा त्याला नका मारू;
करत रहा प्रतिक्रमण, कधीतरी विझेल अंतर दाह!

दीर्घ वादावादीचा करा शेवटी एकत्र प्रतिक्रमण;
'दादा भगवान' मी तर याचे करतो एकत्र प्रतिक्रमण!

संसारातील संघर्ष, तो आहे हिशोबी व्यवहार;
प्रतिक्रमणाने जोडा मन, तोडू नये हे ज्ञान सार!

संघर्ष पुद्गलाचा, प्रतिक्रमणाने होतो समूळ नष्ट;
संघर्ष ज्याचा बंद झाला, त्याचा मोक्ष तीन जन्मात!

समोरच्याने केले गुणाकार त्या रकमेने तू कर भागाकार;
घर्षण वा संघर्ष टाळे, अक्रमाचा घे तू हा लाभ!

वाणी-कायेचा संघर्ष, तो आहे 'स्थूल' स्वरुप;
समोरच्यास जे न कळे, ते आहे मनाचे 'सूक्ष्म'!

पाहतो कुणाला मारताना, तेथे हजर ज्ञान 'व्यवस्थित';
तरीही दोष त्याचा दिसला, तर ते झाले 'सूक्ष्मतर'!

स्वत: करतो दृढ निश्चय, यात नाही दोष कुणाचा;
तरीही यात दिसले दोष, तर तो झाला सूक्ष्मतम संघर्ष!

फाइल नंबर 'एक' शी, तन्मयता हे 'सूक्ष्मतम';
जागृत होऊन कर प्रतिक्रमण, मुक्त होण्याचे हे श्रेष्ठ साधन!

प्रतिक्रमणाची स्पंदने, पोहोचतात त्वरीत समोरच्यास;
अहंकार आणि बुद्धी मिळूनी, अतिक्रमणाने बांधती कर्म!

राग वा द्वेष बीजाने, पसंत-नापसंत ही फळे;
प्रतिक्रमण उपाय एकमेव, उपटते राग-द्वेषाचे मूळ!

मान, ईर्षा वा शंकेमुळे येतात, उलट-सुलट विचार;
करा त्वरित प्रतिक्रमण, नाही तर लगेच पोहोचतील समोरच्यास!

'लूटारू लुटतील' ही शंका, सुखीला करी दुःखी दुःखी;
ब्रह्मांडाचा मालक तू, दवबिंदू विझवते ज्वालामुखी!

भय का तुजला वाटे? टेम्पररी मानतो स्वतःला;
नित्य आहे माझे स्वरूप, समजल्याने भय न प्रकटे!

पश्चात्तापने दोष बनतात, जळलेल्या सुंभासारखे;
पुढच्या जन्मी स्पर्श करताच, मुळासकट दोषांची मुक्ती!

ज्ञानानंतर प्रतिक्रमणही, इफेक्ट स्वरूपी होई;
इफेक्टला इफेक्टने छेदून, स्वतः शुद्ध राहून स्वच्छ होई!

खाण्या-पिण्यातील अतिक्रमण, ओढवितात शारीरिक दर्द;
अतिक्रमण आहे स्वाभाविक, प्रतिक्रमणाने होतो पुरुषार्थ!

खाण्यात नियम भंग, माग माफी ज्ञानींजवळ;
व्यसनांचे समर्थन नाही, नक्की सुटतील कधीतरी!

प्रतिक्रमण झाले नाही तर परत चिकटतील परमाणू;
पुढल्या जन्मी पुन्हा व्यसन अभिप्राय राहिल्याने चिकटतील!

डिस्चार्जला 'पाहत-जाणत' नाही, होत नाहीत प्रतिक्रमण;
मन बांधणे चालू राहते, राहिले जर अभिप्राय!

पुरुष बनून पुरुषार्थ केल्याने, होईल त्याचा अवश्य मोक्ष;
परंतु स्वतःची राहते कमी, आज्ञा, प्रतिक्रमण करण्याची!

दादा चहा कधीतरी पिता, प्रथम करी प्रत्याख्यान;
अन्यथा तो चिकटेल, ज्ञानी मात्र जागृत कायम!

होता शारीरिक वेदना, केवळ वेगळे 'पाहा' आणि 'जाण';
अहिंसक भाव, वेगळेपण, न आर्त आणि रौद्रध्यान!

अतिक्रमणाने होते कर्मबंधन, न होते बंधन अतिचाराने;
नाही स्पर्शले 'अंबालाल'नां, वेदनीय क्षण 'विज्ञानाने'!

आर्त अन रौद्रध्यान, क्षणोक्षणी देतात त्रास;
आर्तध्यानचे फळ तिर्यंचगती, रौद्र नेई नरकास!

स्वत: स्वत:लाच दु:खी करतो, अग्रशोच असे आर्तध्यान;
गोळी न लागे अन्य कोणास, पत्नीलाही कळत नाही!

गोळी सोडतो दुसऱ्यांवर, कुणाला दु:ख विचारानेही;
रौद्रध्यान त्यास म्हणावे, जर परिणाम झाला कोणावरही!

आर्तध्यान अन रौद्रध्यानाचे, विचार येताच त्यांना बदला;
माझ्याच कर्माचा उदय हा, पाहा समोरचा तर निमित्त मात्र!

जगाला निर्दोष पाहतो, त्याला म्हटले धर्मध्यान;
प्रतिक्रमण करून दोष धुतो, ज्ञानी म्हणतात धर्मध्यान त्यास!

एकदा केला पश्चात्ताप, तर रौद्र बनेल आर्तध्यान;
पुन्हा त्याचेच प्रतिक्रमण, तर आर्ताचे होईल धर्मध्यान!

तुम्ही झालात शुद्धात्मा, पुद्‌गल करतो आर्त-रौद्र;
पुद्‌गल करते प्रतिक्रमण, होते तेव्हा धर्मध्यान!

शुद्धात्म्याचे शुक्लध्यान, धर्मध्यान हे पुद्‌गलाचे;
असे घडते जेव्हा अंती, शुद्ध विश्रसा परमाणू!

अक्रम ज्ञानात कधी, होत नाहीत आर्त-रौद्र ध्यान;
आत 'शुक्ल', बाहेर 'धर्म', कारण मृत आहे अहंकार!

अप्रतिक्रमण दोषांनी, दोष आता जे होतात;
यथार्थ प्रतिक्रमण केल्याने, त्या दोषांपासून सुटाल!

दोषांना जाणले, ते धर्मध्यान, आत्मध्यान आहे शुक्लध्यान;
आत 'शुक्ल', बाहेर 'धर्म', एकावतारी पद तू जाण!

अक्रम मार्गाने शक्य आहे, एकावतार या काळात;
आत, बाहेर 'शुक्ल', तर मोक्ष होईल त्याच जन्मात!

'रात्री उशिरा पाहुणे आले', पाहताच मनोभाव बिघडले;
'आता कुठून टपकले', सहज शब्द येतात मनात!

समोर बोले, 'या या, चहा घेणार का थोडा थोडा?';
पाहुणे मागतात खिचडी-भाजी, त्यावर असुदे कढी जरा!

चिडते पत्नी, जेव्हा पती विचारतो 'केव्हा जातील हे?';
पत्नी म्हणे, 'मला काय माहीत? मित्र तुमचे, तुमचीच लावली सवय!

अतिथि देवो भव, तरीही होई आर्त-रौद्र ध्यान;
त्याचे करावे प्रतिक्रमण, अन्यथा नुकसानची खणली खाण!

भाव न बिघडे समकितीचे, प्रतिक्रमण केल्याने;
दोष सुटतो कायमचा, प्रतिक्रमण-प्रत्याख्यानने!

झाले नाही प्रतिक्रमण तर, दोष राहतो पेंडिंग;
एक-दोन जन्म वाढतील, कॅश केल्याने मोक्षात-लँडिंग!

समोरासमोर भांडतो, तो तर सुटतो आजच;
मनाने भांडला तर, बांधेल पुढील जन्माचे कर्म!

द्वेषाचे कर प्रतिक्रमण, कारण होत असे ॲटॅक;
राग तर आहे डिस्चार्ज, ज्ञानी समजावतात अंतिम अर्थ!

जर जागृती राहीली नाही, नाही झाले आज्ञा पालनही;
तर रागाचेही कर प्रतिक्रमण, नाही तर घसरून पडशील!

तंत आणि हिंसकभाव दोन्ही, असतील तर आहे कषाय;
ते नाही तर कषाय नाही, तेव्हा होई मात्र डिस्चार्ज!

पण डिस्चार्ज कषायाने, समोरच्यास जर झाले दु:ख;
त्याचे करावे प्रतिक्रमण, वदे वाणी तीर्थंकराची!

कितीही भारी कषाय, अंती तर तो प्राकृतिक माल;
'पाहणारा' भाजत नाही, ज्ञान बनते तिथे ढाल!

डिस्चार्ज गुन्ह्यांना मान मृत, ज्ञानानंतरच्या दशेत;
त्याचे कर्म न भारी, ज्ञानी हसवी गुन्ह्यांमध्येही!

मनापासून प्रतिक्रमण केल्याने, त्वरीत संपतील दोष;
प्रतिक्रमण करता करता, जंजाळ सुटते नियमानेच!

चालेल सामूहिक प्रतिक्रमणे, जेथे असेल दोषांचा तांडा;
'दादा', करीत आहे एकत्र, करावा याचा पूर्ण स्वीकार!

हिम्मत नसेल समोरासमोर, तर माग माफी मनात;
नोबल असेल तर प्रत्यक्ष जाऊन, अन्यथा करील तो दुरुपयोग!

मोक्षाला जाण्यापूर्वी, माग माफी सूक्ष्म काय जीवांची;
कर सामूहिक प्रतिक्रमण, शेवटी सुटशील सर्वांपासून!

पुरुषार्थ म्हणावे त्याला, जो करतो दोषांचे प्रतिक्रमण;
जाणणाऱ्यालाही जाणत राहतो, दशा ती पराक्रम!

'अनंतानुबंधी' क्रोध, जशी पर्वतात पडली खोल दरी;
प्रतिक्रमण केले नाही तर, होतील जन्मोजन्मीचे करार!

अप्रत्याख्यानी क्रोध तर, जशी शेतात पडली फट;
प्रत्याख्यान वा प्रतिक्रमण, झाले नाहीत म्हणून घडले असे!

पांचव्या गुणस्थानकात आहेत, सामूहिक प्रतिक्रमण-प्रत्याख्यान;
म्हणून येतो सहाव्यात, 'प्रत्याख्यानी' गुणस्थान!

दोषांचे आवरण आहेत लाखों, लाखों वेळा प्रतिक्रमण;
सामूहिक केले पूर्वी, म्हणून राहिले आवरण आवृत्त करणारे!

'प्रत्याख्यानी' आवरण आहेत, जशा वाळूत ओढल्या रेषा;
'संज्वलन' कषायात जशा, पाण्यात ओढल्या रेषा!

उदयात असतील कषाय, तर होतात कार्यकारी आत;
दु:ख भोगावे लागते, 'प्रत्याखाणी' त्याला म्हणतात!

उदयात असतील कषाय, पण कार्यकारी होत नाहीत;
आत वर्तते समाधी सुख, 'संज्वलन' त्याला म्हणतात!

समकित झाले तर चौथा, पाचवा 'अप्रत्याख्यानी';
सहाव्या 'प्रत्याख्यानी'मध्ये, व्यवहारात भारी फाइल!

सहाव्या गुणस्थानकात, बाह्य चारित्र्य मानत नाही;
सातव्यात उदय 'अप्रमत्त'चा, 'अपूर्व' आठव्या गुणस्थानकात!

विषयात निग्रंथ झाल्यावर, स्त्री परिग्रहही सुटे;
तेव्हा नववा पार करूनी, दहाव्यावर मग चढे!

क्रोध-मान-माया-लोभाचा राही न परमाणूमात्र;
झाली कषायांची शून्यता, तर भगवान पद मात्र!

डिस्चार्जमध्ये न दिसे, कषाय परमाणू एकही;
दादांनी पाहिला केवल आत्मा, अनुभव पदाची प्राप्ती!

कषायसहितची प्ररूपणा, जाईल अवश्य नरकास रे;
वकील होऊन केला गुन्हा, तर शिक्षेत मोठा फरक रे!

मिथ्यात्वीने सिंहासनी बसून, देऊ नये उपदेश;
'स्वाध्याय करत आहे' म्हटले तर घेता येईल सर्वांना लाभ!

स्वत: शुद्धात्मा झाला, 'व्यवस्थित'ला मानतो कर्ता;
प्रतिक्रमण त्वरित करतो, वीतद्वेष झाला मात्र ज्ञाता!

दोष कुणाचे दिसत नाहीत, वर्तते दशा सर्व विरति;
संसारात सर्वकाही करूनी, अशी ही अक्रमची रीती!

क्रोधाचा अभाव जेथे, ती क्षमा महावीरांची;
द्यायची गोष्ट नव्हे ही, सहज क्षमा शूरवीराची!

ज्ञाता-द्रष्टा राहतो तेथे, कषाय आहेत संपूर्ण बंद;
ज्ञाता-द्रष्टापण चुकला तर, कषायांचेच चलन!

करत राहिला प्रतिक्रमण तर, गाढ कर्म होतील हलके;
शिसे ओतले कानात, म्हणून महावीराला आले भोगणे!

जेथे जेथे हिंसा केली, डास, ढेकूण मारले;
त्या जिवांना आठवून कर, पश्चात्ताप तर होईल सुटका!

भाव सदा असे राख, सर्व जीवांना वाचविण्याचे;
मग वाचतील किंवा न वाचतील, पण जोखीमेपासून सुटका!

शेतात औषध फवारणी, कापे गवत व कोंब;
करा त्याचा पश्चात्ताप, मग जरी तसे करावे लागे!

रोज दहा मिनिटे, हृदयापासून प्रभूला पुकारा;
कुठून नशिबी आला, हिंसक धंदा मज पदरी!

भावात संपूर्ण अहिंसक, म्हणून बांधत नाही हिशोब;
वैर, हिंसा, राग-द्वेषाची, प्रतिक्रमणाने होते सुटका!

कसलेही असो वैर, तरी सुटतील नक्की प्रतिक्रमणाने;
समोरचा सोडे न सोडे, आता जोखीम त्याच्या माथी!

मागील दोषांच्या प्रतिक्रमणाने, दोषांचा होतो निकाल;
नवीन चित्रित केले नाही, तर बंधनचा प्रश्नच नाही!

भूतकाल गेला निघून, भविष्य 'व्यवस्थित'च्या हाती;
वर्तमानात वर्ततात सदैव, ऐक ज्ञानी पुरुषांचे म्हणणे!

माळ पेटली, काय करावे, फटाके फुटत जात;
केले प्रतिक्रमण बॉम्बचे, तर तो होईल फुस्स!

प्रतिक्रमण करता-करता, अतिक्रमण होते सुरू;
धूत राहा धीराने, कमी पडणार नाही कधी हा साबण!

वैरीसाठीही करू नये एकही उलटा विचार;
तो तर आहे उदयाधीन, जागृत आहे तो सुटणार!

पारसनाथांनाही फेडावे लागले, दहा जन्मांचे वैर;
अक्रमात जागृती सोडविते, समतेने हे वैर!

आत्मा प्रकट झाला आता, पुरुषार्थाने पराक्रम;
अटकण व अभिप्राय उपटून, कर मग त्यांचे प्रतिक्रमण!

प्रकृती बनविते अभिप्राय, प्रज्ञा त्यांना सोडत जाते;
अभिप्रायांना खोटा म्हणून, नष्ट करी मुळापासून!

अभिप्रायाचा होतो परिणाम, समोरच्याला होतो अभाव;
फळ त्याचे मिळते अचूक, चुके आत्म्याचा स्वभाव!

आवडते-नावडते मिळे, पुण्य आणि पापाधीन;
पाह तू निमित्तास आत्मरूप, पुद्‌गल आहे पर-पराधीन!

प्रतिक्रमणाने अभिप्राय मुक्त, नाही सहमत क्रियांमध्ये;
संयोगाधीन बनला चोर, नको ठेवू दोष हृदयात!

अभिप्राय बदलताच सुटले, दोष आपोआप समूळ;
पूर्वी केले चुकीचे समर्थन, म्हणून बसली डोक्यावरी!

अभिप्राय सुटले तर, होतील परमाणू विश्रसा;
बंध पडल्याविना झाले शुद्ध, फलित झाले तर मिश्रसा!

पुद्‌गल परमाणू म्हणे, 'तुम्ही' झालेले आम्हावर लुब्ध;
आता झालात शुद्धात्मा तुम्ही, तर करा आम्हासही शुद्ध!

प्रतिक्रमण करताच व्हाल, अभिप्रायांचे विरोधी;
रिलेटिव्हमध्ये निर्दोष पाहा, रियलमध्ये पाहा शुद्ध!

सकाळी बोला पाच वेळा, 'पडायचे नाही आता विषयात';
उपयोग राहतो रुपये मोजण्यात, तसे हे बोलावे!

या काळी झाले कर्मबंधन तर, मनुष्यातून तिर्यंच;
पाचातून एकेन्द्रियात, अजून सावध हो, जा मोक्षाला!

अक्रम ज्ञान मिळाले आता, अटकण सारी उपटून टाक;
प्रतिक्षण जागृत हो, आता तरी सूट या विषयापासून!

निज दोष दिसत नाहीत, कैफ विषयाचा दिवसभर;
विषय बाधक महा-महा सुटू देत नाही कधी!

पाहताच आला विषय विचार, याचे रहस्य तू जाण;
भरलेला हा मोह म्हणून, संयोग आले जुळूनी!

तेव्हा मन पर्याय दाखवी, भरलेल्या मोहानुसार;
प्रतिक्रमण करत तू वारंवार, विरघळवून टाक विषयाची गाठ!

मळ धुवत रहा, कर तू खेद शेवटपर्यंत;
होईल स्वच्छ धुतल्याने अवश्य, मग येईल स्पष्ट वेदन!

विषय बीज पडल्यावर, येईल अवश्य ते रुपकात;
परंतु बंधनापूर्वी धूत राहिले, तर होईल ते हलके!

आला ताप दोघांनाही, तरच प्यावे औषध;
दबाव किंवा याचना, ही तर आहे फोर्जरी!

विषयाची अटकण हेच तर परिभ्रमणाचे कारण;
बदल सुखाचे अभिप्राय, प्रतिक्रमण आहे उपाय!

एक पत्नीव्रत या काळात, आहे ब्रह्मचर्याचे वरदान,
परस्त्रीसाठी कधीही जर बिघडले नाही तुझे मनोभाव!

स्त्रीचे मुख न पाहे साधू, त्यात कोण आहे गुन्हेगार?
तुला जन्म कोणी दिला, पकड चुकीला अन् मिटवून टाक!

मनाची चंचलता संपते, ब्रह्मचर्याने मन बांधले जाते;
किंवा मग आत्मज्ञानाने, मनच काय, जग जिंकता येते!

ज्ञानींचे वचनबळ, आणि तुझा दृढ निश्चय;
विवाहित वा कुमार, पाळू शकतात ब्रह्मचर्य!

अक्रम ज्ञानासह, ब्रह्मचर्याने होशील तू पार;
राजांचा राजा होशील, जग करी त्याला नमस्कार!

विषय जिंकण्यास हवी, जागृती व क्षणोक्षणी प्रतिक्रमण;
सामायिक, व्रताचा विधी, त्याने होते शुद्ध त्रिकरण!

बिनहक्काच्या विषयाने होते जनावर गती;
दिवसभर प्रतिक्रमण व दृढ निश्चयाने, यातून सुटता येते!

लोभ-हव्यासात फसलेला, जर करीत राहीला प्रतिक्रमण;
दृढ आज्ञापालन केले, तरच तुटेल हे आवरण!

दादांची प्रत्येक क्रिया, ज्ञानात प्रगती करविण्यासाठी;
छेदून प्रकृती पूर्णपणे, रममाण हो आता आत्मज्ञानात!

अतिक्रमणाच्या अंतिम हद्दीवर, वासुदेव-प्रतिवासुदेव;
सातवे नरक भोगतात, इतर न कोणी पोहोचू शके!

बिघडलेली बाजी अशी सुधार, बिघडवू नको भाव कधी;
बिघडल्याचे कर प्रतिक्रमण, या प्रमाणे कर 'वस्तू' सिद्ध!

खोटे बोलणे ते कर्मफळ, त्यात भाव ते कर्मबंध;
म्हणून पश्चात्ताप करून, बदल सारे अभिप्राय!

खोट्याचे अभिप्राय संपल्यावर, उरत नाही जबाबदारी;
खोटे बोलणे हे कर्मफळ, त्याचेही येईल फळ, ठेव लक्षात!

रिलेटिव्ह धर्मात चुकीबद्दल, 'करावे लागते' प्रतिक्रमण;
रियल धर्मात 'ज्ञाता-द्रष्टा', 'होतात' त्याचे प्रतिक्रमण!

आयुष्यभर करायचे हेच, 'चंदू करतो' ते पाहत राहा;
चांगल्या-वाईटाचे करा निकाल, दुकान रिकामे, भरू नका नवे!

वाणीने दुखविल्यास, कर त्याचे त्वरित प्रतिक्रमण;
आज्ञेत राहण्याचा निश्चय, वाणी जाणा पर अन् पराधीन!

आपल्याकडून टोकले जाते, अभिप्राय दाखविते भिन्न;
आत्मार्थे खोटे बोलणे, हे तर आहे महा सत्य तू जाण!

जगाला दादांनी सांगितले, व्यवहार आहे अनिवार्य;
व्यवहार व्यवस्थिताच्या आधीन, प्रतिक्रमण ऐच्छिक!

सर्व तऱ्हेने मागितली माफी, प्रत्यक्ष वा अश्रुनयन;
तरीही टपली मारली तर, झुकणे कर तू बंद!

टोकण्याचा हेतू सोन्याचा, पण समोरच्याला दुःख;
सांगता आले नाही, म्हणून कर असे तू प्रतिक्रमण!

समोरच्याला दुःख न होवो, अशी निघावी वाणी;
नाटकी व्यवहार करा, नाही तर ते लागेल धुवावे!

मस्करी, विनोद, ‘जोक’चे, करावे लागे प्रतिक्रमण;
नाही तर ज्ञानींची वाणी, टेप-रेकार्ड मंद निघे!

तेज बुद्धीवाला करतो मस्करी, कमी बुद्धीवाल्याची;
प्रकाशाचा हा गैरवापर, शेवटी मस्करी आत असलेल्याची!

वाणी किंवा भावात, निघाले जर उलट;
समोरचा करी टेप त्वरित, जरूर तेथे प्रतिक्रमण!

प्रतिक्रमण केल्याने वाणी सुधरे या जन्मात;
स्याद्‌वाद वाणी दादांची, व्यवहार शुद्ध झाल्याने!

खेद करण्याऐवजी, राखा जागृती विशेष;
अंतराय आले तर त्यांना, धुवून करा निःशेष!

‘या’ सत्संगाचे विषही चांगले, बाहेरचे अमृत वाईट;
येथे भांडलास, तरीही मोक्ष, कर प्रतिक्रमण मोठे!

दादांजवळ येता आले नाही, तर खेद व प्रतिक्रमण;
चिंता, राग-द्वेष धुऊन, कर दादांचे नित्य स्मरण!

लघवीत मुंगी वाहिल्याने, दादा करतात प्रतिक्रमण;
विधी विना पुस्तक वाचले, ती झाली चूक!

हित सर्वांचे असले तरी, वेगळे केले दोघांना;
अज्ञानीचे भले केले, तरीही करावे लागे प्रतिक्रमण!

प्रतिक्रमण होत नाही, हा आहे प्रकृतीचा दोष;
अंतराय कर्म नाही, ठेव भावात ‘पाहण्या’चा जोश!

निकाचित कर्म धुण्यासाठी, चिकटपणानुसार वापरा साबण;
जोर अधिक लावावा लागेल, मग व्हाल ज्ञाता-द्रष्टा पक्के!

राहते जुन्या चुकांचे ओझे, धुण्यावाचून गत्यंतर नाही;
प्रकृती धुवा ‘प्रतिक्रमणाने’, हाच तो दादाई गुटका!

चिकट फाइलींचे प्रतिक्रमण, करा तासभर बसून;
होईल नरम, परत फिरेल, होईल जरूर परिवर्तन!

प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान, उत्तम होईल शुद्धीकरण;
'परत नाही करणार' तो निश्चय, महावीरांचे पच्चखाण!

तू तर कर मात्र भाव, की करायचे आहे समभावी निकाल;
निकाल हो न हो, तो मग निसर्गाचा प्रश्न!

चीकट फाइल नंबर एक, तिला 'पाहिल्यानेच' जाईल;
तेथे गरज नसे प्रतिक्रमणाची, अक्रम ज्ञान सरळ उपाय!

गुन्हा करतो आरोपीच, जज ने घेऊ नये स्वत:वर;
चुका करतो चंदुलाल, तर प्रतिक्रमणही त्याच्याच शिरावर!

अक्रम ज्ञान मिळाल्यावर, कधी होईल टाकी रिकामी?
अकरा वा चौदा वर्षाने, मग उरणार नाही काही बाकी!

कधी तरीच होतो वाद, कधी तरीच मरण;
जे 'घडणार' आहे ते नाही, पण 'घडले' तेच व्यवस्थित!

भयंकर उदयामध्येही जर, राहिले 'व्यवस्थित'चे ज्ञान;
'पाहत' रहा जे घडते ते, मग गरज नाही प्रतिक्रमणाची!

खरे प्रतिक्रमण त्यास म्हणावे, जे 'बोलते' तिसऱ्या दिवसी;
आकर्षण स्वत: दादांचा, होतो आपल्यावर!

मृतांचे प्रतिक्रमण केल्याने, अमर आत्म्यास पोहोचते;
गुंता सुटतो आपला, 'मरत नाहीत' या विचाराने!

वाणी-देहाचे प्रतिकार, आहेत जोवरी व्यवहारात;
प्रकट होत नाही संपूर्ण शक्ती, जरी मनानेही झाले प्रतिकार!

मनातील विचारांना पाहून, वेगळे ठेवल्यावर उडतात;
झाले जर कुणास दु:ख, तर त्याचे करावे प्रतिक्रमण!

बिघडले आपले भाव, किंवा समोरच्याचे आपल्यासाठी;
का बिघडले ते पाहू नये, चालावे प्रतिक्रमणाच्या मार्गी!

नावडते जेव्हा स्वच्छ मनाने, सहन करील तेव्हा वीतराग;
बिघडले तर कर प्रतिक्रमण, शक्ती त्यासाठी तू माग!

रात्री शुद्धात्म्याचे वहीखाते, तपासून कर स्वच्छ;
पाहूनी जगाला निर्दोष, प्रतिक्रमण कर मग झोप!

ज्ञानी किंवा तीर्थंकराबद्दल उलटे भाव, त्वरितच धुवावे;
वारंवार माफी माग, नखरे मनाचे तू 'पाहत' जा!

देवस्थानच्या अशाताना, प्रतिक्रमणाने धुवाव्या;
नंतर होईल अभ्युदय, नसे अन्य कोणते निवारण!

मागील दोष दिसल्यावर, उपयोगाने छेदा आवरण;
आठवतात ते धुण्यासाठी, कर तात्काळ तू प्रतिक्रमण!

केले नाहीत प्रतिक्रमण, म्हणून आठवतात;
प्रत्याख्यान केले नाही, म्हणून होते इच्छा!

वारंवार दोष आठवले तर, वारंवार त्यांना धुवावे;
कांद्याची पाकळी निघते जशी, अंती नष्ट होतील समूळ!

आठवणीचे तू कर प्रतिक्रमण, इच्छांचे कर प्रत्याख्यान;
पूर्वी मानले सुख त्या गोष्टींची इच्छा, अर्पण कर मिथ्या जाण!

त्याच्या शुद्धात्म्याच्या उपस्थितीत, फोन करून पाहिल्या चुका;
पश्चात्ताप सह माफी मागितली, शॉर्ट प्रतिक्रमण अक्रमी!

होतात जे दोष पूर्व जन्मी, प्रकटतात ते या जन्मी;
प्रतिक्रमण यथार्थ झाल्याने, प्रकटे आनंद अपार!

रोज एक तास जरी, घालवला प्रतिक्रमणासाठी;
नातेवाईक, शेजाऱ्यांचे, दोष धुण्याची उत्तम संधी!

त्याने होतील दोष भस्मीभूत, फिल्म दिसेल आपोआप;
असे करूनी निवारण, सुटता येईल जग संबंधातून!

दादा म्हणे, आम्ही असे केले, एकेकाचे धूतले दोष;
कुणी जर झाले मनात दु:खी, तोवर मला पडे ना चैन!

काम साधून घ्या अक्रमाने, परत नसेल असा सरळ मार्ग;
सोडा शौक खुशामतीचा, जागा हो, राहीला अर्धा जन्म!

ज्ञानी दाखवी तेच करावे, नका घालू निज छंद रंग;
परिणाम वाहे कोठून कुठे, त्यास म्हणती स्वछंद!

प्रतिक्रमणाने सुटतात, याच जन्मी सर्व वैर;
सिद्धांत हा महावीरांचा, नाही अन्य उपाय!

दोघे समोरासमोर करतील, तर त्वरित होईल सुटका;
अर्ध्यातच होईल काम, अन्य गुंतेही सुटतील!

एक दोषामागे परत, सुरू होते दोषांची परंपरा;
भेसळ, भ्रष्टाचार, आहेत सर्व पशुगतीत नेणारे!

प्रतिक्रमण यथार्थ तेच, जे होत राहते प्रतिक्षण;
आयुष्यभराचे दोष 'पाहून', 'जाणून', धुतले जातील!

अपूर्व प्रतिक्रमण अक्रमाचे, सैद्धांतिक परिणामिक;
बालपणापासून आजपर्यंतचे व्हिडियोसारखी दिसते लिंक!

हलके फूल, मुक्त होता येते, स्थूल ते सूक्ष्म धुतले जाते;
शेवटी मूळ चूक समजल्याने अपूर्व आनंद उसळतो!

झाले सुरू एकदा प्रतिक्रमण, मग थांबत नाही कधीही;
बंद करण्यास सांगितले, तरी फिरत राहतो चरखा!

जीवनाचे प्रतिक्रमण करताना, न दशा, मोक्ष, वा संसार;
प्रकट होते आत्मशक्ती, प्रज्ञा दाखवी फोडून पाताळ!

अंतःकरण संपूर्ण बंद, प्रज्ञा मात्र क्रियावंत;
एक एक थर तोडतो, सार जन्म-मरणचा अंत!

प्रतिक्रमण करता, होत नाही आत्म्यावर परिणाम;
राग-द्वेषाची सही झाल्याने, दोष बांधले जातात आत!

प्रतिक्रमणाची लागे लिंक, आणि होतो आत्मानुभव;
संपूर्ण ज्ञाता-द्रष्टा पद, अन् आनंदाचा उद्‌भव!

दोषांचा झाला स्वीकार, तर त्वरित ते जातात निघून;
घरातील सर्व निर्दोष दिसतील, तेव्हा होई खरे प्रतिक्रमण!

समोरचा खरोखर दोषी केव्हा? जर आत्मा करील तेव्हाच;
परंतु आत्मा तर आहे अकर्ता, क्रिया मात्र डिस्चार्ज रे!

कोणी जीव दिसला दोषी, तर झाली नाही अजूनी शुद्धी;
इंद्रिय ज्ञान असेपर्यंत, धुऊन टाक प्रतिक्रमणे अशुद्धी!

प्रतीतीत दिसे जग निर्दोष, अनुभवात येईल केव्हा?
डास, साप, जेव्हा घेरतील, निर्दोष दिसतील तेव्हा!

ज्ञानींना प्रतीती अन् वर्तनात, जग दिसे निर्दोष;
उपयोग चुकल्याचे प्रतिक्रमणाने, जागृत दशा कायम राहते!

औरंगाबादमध्ये विधी करवित, दादा वर्षातून एकदा;
समोरासमोर माफी मागून, धुतले वैर अनंत अवतारचे!

खूप मोठा विधी करती, स्वच्छ सर्वांचे करण्यासाठी;
एकमेकांच्या पाय पडूनी, रडून होई सर्व हलके!

धर्मबंधूंशीच बांधतो जन्मोजन्मीचे वैर;
प्रतिक्रमण करून मुक्त हो, ज्ञानी आज्ञा हृदयी ठेव!

ज्ञानींजवळ आलोचना, केली प्रत्यक्ष किंवा कागदावरी;
ज्ञानींना सोडवावे लागे, झाला अभेद अंतरी!

जाहीर करतो गुप्त दोष, ज्ञानी धुतात ते विधी करून;
प्रतिक्रमण-पश्चात्ताप करवितात, पढवून आलोचना महिनाभर!

जेथे प्युरिटी हृदयाची, एकता लागे सर्वांसंगे;
मोठे दोष प्रत्यक्ष उघडल्याने, मन रंगते ज्ञानी रंगी!

भगवंताची कृपा बरसते, मिळे आलोचनाचे फल;
आलोचना राहते सदा गुप्त, ज्ञानी न करती त्यात छल!

ज्ञानींजवळ जर झाकले दोष, तर होतील दोष डबल;
सुटका होईल अवघड, जागृती होईल आवृत!

आलोचना करावी गुरुंजवळ वा आतील 'दादां'जवळ;
प्रत्यक्ष झाले नाहीत आतील, तोवर भज 'या' दादांना खास!

विषय दोष विचित्र या काळी, पुत्री-भाऊ-बहीणीशी;
सत्संगात, सहाध्यायीत आता सावध हो, धुऊन टाक!

जसे पत्नी पतीला, न विसरे एकही क्षण;
तसे झाले जर प्रतिक्रमणाशी, तर अनंत दोष होतील नष्ट!

छोटा प्रतिक्रमण बॉम्बार्डिंगने, शुद्धात्म्याजवळ माफी;
पश्चात्ताप करून 'पुन्हा करणार नाही', इतकेच आहे पुरेसे!

तिव्र वैर असल्यावर कर प्रतिक्रमण पद्धतशीरपणे;
तरच सुटेल वैर, थांबेल नवीन अतिक्रमण!

खोल उतरले प्रतिक्रमणात, तर पूर्वजन्म पण दिसेल;
कुण्या सरळ परिणामीची, आवरणे तुटतात आरपार!

होलसेलमध्ये दोष असती त्याचे, एका बरोबर शत-शत दोष;
एकत्र प्रतिक्रमणे करून, मग कर तू प्रत्याख्यान!

जाणतेपणी झालेल्या दोषांना, धुवावे लागेल व्यक्तिगत;
अजाणतेपणीचे सामुहिक कर, प्रतिक्रमणाने मार्ग मिळे!

कुणा विषयाचे असंख्य, दोष धुवावेत एकत्रीपणे;
तेव्हा होईल ध्येय सिद्ध, अन्यथा भटकत राहशील!

लग्न करताना बाशिंग बांधून, रुबाब दाखविला अपार;
प्रतिक्रमणे करावी लागतील, जर आले नसतील तेव्हा विचार!

निज भावातून पर भावात, परद्रव्यात तन्मयाकार;
पाच आज्ञा पाळणारा जाऊ शकत नाही परमध्ये!

आत्मा कधीही होत नाही, परभावात तन्मयाकार;
'जाणतो', आत्मा तन्मयतेला, तन्मय झाला तो अहंकार!

स्वप्नातही होऊ शकते, प्रतिक्रमण यथार्थ;
जाग आल्यावरही होऊ शकतो, गुन्हा कबूल कधीही!

'सॉरी' हे नाही प्रतिक्रमण, तरीही आहे ते चांगले;
मनात ॲटॅक राहत नाही, समोरच्याचाही संपतो नाही द्वेष!

शुक्ल ध्यान झाल्यावर, प्रतिक्रमण आहे पॉइजन 'क्रमात';
प्रतिक्रमण असे अक्रमाचे औषध, स्वतः पीत नाही, पाजवतो!

'स्वतः' न करता, करवून घ्यावे, 'फाइल एक'कडून;
प्रकट आहे प्रज्ञा शक्ती, दोष दाखवून करे आम्हा सावधान!

अक्रम ज्ञान प्राप्तीनंतर, 'स्वतः' होतो शुद्धात्मा;
बाकी राहिले ते 'व्यवस्थित', केवळ 'पाहा' फाइलला!

'चंदू करतो' ते पाहत राहा, अन्य न करणे काही;
'पाहणे' जर चुकले तर, करा त्याचे प्रतिक्रमण!

निज विपरिणामाने, एकत्र होतात सर्व संयोग;
प्रतिक्रमणाने शुद्धी होवून, होतो त्यांचा वियोग!

खऱ्या सायंटिस्टला, गरज नसे प्रतिक्रमणाची;
बोट घालत नाही प्रयोगात, भाजलेल्याच गरज मलमाची!

ज्ञानीवाणी भासते विरोधाभासी, वास्तवात तर आहे निमित्ताधीन;
ताप दिसे एकसारखा, एकाला क्वीनाईन, दुसऱ्याला मेटासीन!

पुद्‌गल करते अतिक्रमण, पुद्‌गल चालवी जगत;
चेतन भाव प्राप्त केलेले, परमाणू आहेत पूरण-गलन!

स्वपरिणीती कर्ताभावाने, तर त्याला म्हणती पूरण;
परपरिणीती अकर्ताभावाने, तर त्याला म्हणती गलन!

प्रतिक्रमण करते पुद्‌गल, माफी मागे शुद्धात्म्याकडे;
पुद्‌गलास फोन करतो आत्मा, होतात प्रतिक्रमण पुद्‌गलाचे!

स्वतःच्या पुद्‌गलाचे प्रतिक्रमण, प्रज्ञा करविते स्वतःकडून;
समोरच्या पुद्‌गलाचे प्रतिक्रमण, झाले नुकसान तरच!

माफी मागतो शुद्धात्म्याकडे चूक झाली निज पुद्‌गलाने;
प्रतिष्ठित आत्म्यापाशी, चुका धूतो प्रतिक्रमणाने!

दोषांना जाणणारा स्वतः, आणि करणारा तर वेगळाच;
ज्ञायकभाव टिकत नाही, म्हणूनच करा प्रतिक्रमण!

पॅकिंग आहे 'चंदू'चे आज, त्याला बनवा भगवंत;
आत्म्याचे प्रतिबिंब दिसे, तोपर्यंतचा आहे चढ!

अतिक्रमण करतो अहंकार, प्रतिक्रमण करतो अहंकार;
दोष होता प्रज्ञा करते सावध, शक्ती सरळ आत्म्याची!

दु:ख त्याच्या अहंकाराला, डाग आपल्या रिलेटिव्ह वर;
ते धुण्याकरीता कर प्रतिक्रमण, परसत्ता आहे अतिक्रमण!

समजा म्हणणे वीतरागाचे, करणे नाही काही ही;
काही 'केल्याने'च आहे बंधन, मग धर्म करा किंवा नाही!

निर्दोष जग जाणले स्थूलात, म्हणून येत नाही वर्तनात;
जाणले जर सूक्ष्मतमपर्यंतचे, तर ते येईल वर्तनात!

दोष होण्याआधीच, होतात ज्ञानींचे प्रतिक्रमण;
लिहिल्यावर त्वरित मिटतात, ज्ञानींची अशी चरम जागृती!

सूक्ष्मतर अन् सूक्ष्मतमच, असतात चुका ज्ञानींच्या;
जग ऐकून आफरीन होते, तरीही आहेत दोष नियमाने!

दादा पाहतात दोष सर्वांचे, तरीही दृष्टी शुद्धात्म्याकडे;
म्हणून रागावले नाही कधीही, दोषांना मानून उदयकर्म!

यात्रेमध्ये महात्मा भांडतात, मग करतात प्रतिक्रमण संध्याकाळी;
समोरासमोर पाया पडून, पाहा कसे हे अद्‌भुत अक्रम!

आज्ञांमध्ये निश्चित राहावे, तरीही त्यात चुकल्यावर;
लगेच त्याचे प्रतिक्रमण करून, मिळवतो शंभर गुण पुरे!

आज्ञांमध्ये राहतो तो परमात्मा, चुकल्यावर प्रतिक्रमण;
करू नये आज्ञेत स्वच्छंद, नरकास जाण्याचे ते कारण!

शिव्या मिळतात तेव्हा पाहतो, शुद्धात्मा आणि उदयकर्म;
शुद्ध राहून शुद्धलाच पाहतो, शुद्ध उपयोग आत्मधर्म!

अनिवार्य आहे आत्मज्ञान, मोक्षासाठी, नाही अन्य काही;
प्रतिक्रमण आहे उपाय, सर्वांसाठी ते जरूरी नाही!

अक्रमात करण्यास सांगितले, जेव्हा वर्तते जागृती डिम;
मोक्षाला जाण्यासाठी अक्रमने दिली, आज्ञा–प्रतिक्रमण याची टीम!

नुकसान केले तर ते परिणाम, हेतू आहे त्यात कारण;
कारणाला निर्मूल करते, अक्रमचे हे प्रतिक्रमण!

दादा म्हणती बेअक्कल, अशा अतिक्रमणाने आनंद;
अपवाद आहे हे अतिक्रमण, सर्वांना आहे अति पसंद!

'चंदू' जे करतो तो चारित्रमोह, त्याला 'पाहिल्या'ने अनुभव;
तेथे प्रतिक्रमणाची गरज नाही, आत्म दृष्टीनेच होतो नष्ट!

पूर्वी बिघडलेले परमाणू, प्रतिक्रमणाने शुद्ध होत नाहीत;
प्रतिक्रमणाने समोरच्याला झालेले दुःख, तेवढेच धुतले जाते!

ज्ञाता–द्रष्टा राहिल्याने, परमाणू होतात शुद्ध;
कर्तापदाने अतिक्रमण, अकर्ता पदाने होतो मुक्त!

'काहीच करत नाही मी' ध्यानात राहिलेच निरंतर;
तेथे नाही गरज प्रतिक्रमणाची, पण राहत नाही सर्वांना निरंतर!

अक्रमाने सरळ उडी मारली, 'के.जी.' ते 'पी.एच.डी.';
मधली क्लासेस 'मेकअप' करण्यास, प्रतिक्रमण आहे अदृश्य सिडी!

अक्रम विज्ञान संपूर्ण, सैद्धांतिक क्रियाकारी;
जेथे करायचे नसते काहीही, अहा, अहा, कसे उपकारी!

आत्मज्ञान देऊन, दादांनी दिले हे संपूर्ण विज्ञान;
भिन्न भिन्न मार्ग दाखविले, मध्यभागी आत्म संधान!

कदाचित भासे विरोधी गोष्ट, पण नसे कधी ज्ञानींची;
गरजेनुसार वितरण 'ए.सी.', 'हीटर', 'जनरेटर'चे!

म्हणून नाही त्यात विरोधाभास, विजेचीही असली रिती;
लक्षात ठेवून वाचा, सूज्ञ वाचकांना ही नम्र विनंती!

## खंड-2 : सामायिकची परिभाषा

अक्रमाच्या सामायिक आणि प्रतिक्रमणात आहे फरक;
अतिक्रणाचे प्रतिक्रमण, कचरा साफ करतो स्व-घरी!

'मी शुद्धात्मा आहे' याचे भान, पंचाज्ञेत राहणाऱ्याला;
सहज, स्वाभाविक दशा, तीच आहे सामायिक निरंतर!

'सामायिक'मध्ये 'जाणणे' वर्तते, वर्तमान प्रतिक्षणाचा;
उपयोग सतत राहिला नाही, तर दिसते ते सामायिकमध्ये!

अक्रम सामायिकाने, विरघळते मन-वचन-काया याचा स्वभाव;
महात्म्यांना राहतो दिवसभर 'सामायिकसारखा प्रभाव'!

दोन घडी करण्यास सांगितले, भरला सारा माल भंगार;
निकालाचा नाही अन्य मार्ग, शिवाय पात्रतेतही नाही सार!

लौकिक सामायिकात, हाकलत राहतात विचारांना;
मन स्थिर करू इच्छितात, पाचशेरी बेडकांनी!

मन राहील कसे स्थिर, बघत राहतात वाळूचे घडयाळ;
मग गप्पागोष्टी करत करत, ऐकतात व्याख्यान!

सामायिकेत बसल्यावर, दोन घडीची मिळाली सूट;
मनमानी करतात त्यात, निंदा, चुगली, आणि कपट!

उपाश्रयात सामायिक, बघण्यासारखी होईल;
गादीपती जागे व्हा आता, मेढ्यांसारखे वागू नका!

मन सैल झाल्यावर, कसे बांधावे वर्तुळात;
ठरवितो दुकान आठवायचे नाही, दुकान दिसे सर्वाधी!

सामायिकेत पुस्तक वाचतो, तो तर आहे स्वाध्याय;
उपयोग गुंतवला अन्य ठिकाणी, वास्तवात हे नाही खरे!

कोठे ते पुनियाचे सामायिक, एकही होणार नाही कुणाकडून;
साधू, आचार्य, मुनिवर, गच्छाधिपतीही कमी पडतात त्यात!

द्रव्य सामायिक करीत राहिले, कधी न केले भाव सामायिक;
भावांना तर पळवून लावले, राहिले मात्र द्रव्य क्रमिक!

अशी सामायिक करण्यापेक्षा, राखा समता संसारात;
घरी पती, मुले, सासू, जावा व नातेवाईकांमध्ये!

बेढब ओढाताणीची सामायिक, लागे ना कामी;
मन राहे ना स्थिर जिथे, किंमत आहे कौडीची!

येथे तर आहे महावीरांचा तराजू, वीरगत स्वीकार्य;
नाही ही अंधेर नगरी, चालणार नाही गडबड जराशी!

आर्त-रौद्र ध्यान संपतात, हेच आहे जैन धर्माचे सार;
संपले नाहीत ते जर, तर व्यर्थ आहे तुज जन्म!

मन वशरहित सामायिकने, आत्म्याचे होत नाही काही;
मात्र हाकलतात कुत्री-मांजरी, ही सामायिक आहे की सोंग?

समरंभ म्हणजे मनाने कर्म, समारंभ म्हणजे वचनाने;
नियम कर्मबंधनाचे, आरंभ होतो वर्तनाने!

सामायिक करता शेठ विचारतो, काय फुटले आज घरी?
'आत्मा तुझा फुटला', घालवली महावीरांची लाज!

ज्याचे झाले बंद पूर्णतः, आर्त अन् रौद्र ध्यान;
तो मग निरंतर सामायिकेत, मोहर लावी भगवंत!

शेठ करतात सामायिक, गेलेले असतात उकीरड्यावर;
किंवा धंद्याचा हिशोब, पाहा गेले उलट्या रस्त्याने!

आत-बाहेर वेगळे राहते, ती सामायिक तर बेढब;
महावीर त्यास न स्वीकारी, न चालेल तेथे द्वि-रंगी!

ज्ञानविधी अशी सामायिक, होऊ शकत नाही स्वतःने;
म्हणून त्यात वारंवार बसणे, दादा सांगे नेहमी!

‘मी शुद्धात्मा आहे’ हे लक्ष, याला म्हणतात सामायिक;
पाच आज्ञेत राहिल्याने होते, पूर्ण दिवस आत्म्याचे काम!

शुद्धात्मा जर पाहिला सर्वांमध्ये, एक तास अविरत;
पुनिया श्रावकाची सामायिक सर्वोच्च शुद्ध उपयोग!

जग विस्मृत शुभ उपयोगाने, ती म्हणावी सामायिक;
अशुभ उपयोगाने अधोगती, ती नाही खरी!

सामायिकचा खरा अर्थ, होऊ न देणे विषमभाव;
कोणी शिवी दिली, मारले, तरीही बदलत नाही भाव!

सार, सामायिकाने बनतो, श्रमणसारखा श्रावक;
समताधारी दशेत राहतो, तो खरा महावीरांचा चाहक!

अक्रमात महात्म्यांना, सामायिक शिकवतात;
गरज नाही त्यात पद्मासनाची, जाम होतील गुढगे!

प्रथम आत्मविधी करूनी, आत्म स्वरूपात होऊन स्थिर;
अंत:करणाच्या प्रत्येक भागाचा, ज्ञाता-द्रष्टा राहून!

आत्म्याला वेगळा ठेवून, पाहायचे सगळे आतील;
पाहाव्यास मिळे दोन घडीची फिल्म, प्रकटे आनंद अपार!

अक्रम मार्गात सामायिक गरजेची, जागृती व उपयोगासाठी खास;
निरंतर शुद्ध उपयोगीचे, संपत जातात सारे दोष!

विचार आले, दृष्टी बिघडली, ‘ते नाही माझे’ म्हणून सूट;
सामायिकात ‘विषया’ची गाठ, विरघळता येते पटकन!

सामायिक वा प्रतिक्रमण, अक्रमात नसे क्रिया स्थूल;
ही ज्ञानक्रिया आहे प्रज्ञेची, आत्म्याची ती शक्ती मूळ!

सामायिकमध्ये बनते मन मजबूत, वाढे संयमाच्या शक्ती;
कसल्याही गाठी विरघळतात, स्पष्ट अनुभव आत्मसुखाचा!

विषय, कषाय, मोह ग्रंथी, दोष पाहून सामायिकमध्ये;
आत्मदृष्टीने ग्रंथी विरघळे, नष्ट होतो कचरा सारा!

पूर्वीच्या दोषांचे पर्याय, दिसू लागतात उकरून उकरून;
हजर होतो आत्मा तेथे, उघड होतात केलेल्या चुका!

असेच आठवल्यावर, काहीच आठवत नाही;
सामायिकमध्ये आत्मपदी, दोष दिसतात पटकन!

सामायिकमध्ये दिसतील दोष, पाहावे वारंवार थेटपर्यंत;
प्रकटते आत्मचारित्र्य त्यात, राजलक्ष्मी दलालीत!

सुरू सामायिक आठ मीनिटांने, पूर्ण होत अठ्ठेचाळीसने;
त्याहून जास्त टिके न ध्यान, क्षणभरासाठीही ते तुटते!

सामायिकमध्ये मन इतरत्र, म्हणून तू का घाबरतोस?
ते ज्ञेय, आणि 'स्वतः' ज्ञाता, बाहेर हुल्लड, तरी घरात काय?

'व्यवहार' सामायिक मनाने होते, 'निश्चय'ची होते आत्म्याने;
'व्यवहार' ने पुण्यानुबंधी, 'निश्चया'ने होतो निग्रंथ!

सामायिक आणि प्रतिक्रमण, अक्रमात असतात सोबतच;
पाहणे-जाणणे आणि धुणे, तेव्हा होतात प्रयोग पूर्ण!

या काळी विषय अधिक, त्यांचे शुद्धीकरण प्रयोग;
हिंसा, मान, लोभ, कपट, क्रोधाचे निघून जातात रोग!

वेगळेपणाच्या जागृतीसाठी, दादा सुचवितात सामायिक;
हा प्रयोग स्वतः केल्यावर, होतो ज्ञानीसारखा अनुभव!

हे शुद्धात्मा भगवान, तुम्ही वेगळे आणि चंदू वेगळा;
हे शुद्धात्मा तुम्ही रियल, आणि चंदू आहे रिलेटिव्ह!

शुद्धात्मा तुम्ही आहात पर्मनन्ट आणि चंदू आहे टेम्पररी;
कमतरता असल्यास शक्ती मागा, जेथे जेथे असे जरूरी!

‘आरसा’ सामायिक बेजोड, अद्‌भुत ज्ञानींचा हा शोध;
पूर्णपणे वेगळे पाहून, खडसावण्याचा लावा जोर!

‘असे असे दोष केलेस तू’, खूप रागवावे स्वतःवर;
भाडोत्री यात चालणार नाही, त्याची तर करील भाजी!

ठपका सामायिकमध्ये तर, स्वतःलाच दे तू ठपका जोरदार;
गच्चीवर जाऊन रागव, स्वतःच शेठ व स्वतःच नोकर!

पुद्‌गल स्वभाव जुना होत जातो, बिघडत जातो तसा तसा;
कर नव्याने सामायिक, उरलेल्या उणीवां तू काढ!

‘होत नाही, होत नाही’... त्यासाठीही सामायिक कर;
‘होत आहे, होत आहे’ अशा सामायिकने तुटतील अंतराय!

‘पाहणाऱ्या’ला ‘पाहतो’ वेगळा, घडते असे अक्रम सामायिकेत;
‘शुद्धात्मा’ स्व-पर प्रकाशक, ‘मूळ आत्मा’ प्रकाशित करतो दोघांना!

आत्माच आहे सामायिक, निरंतर तीच राहे;
मागील दोष धुण्यासाठी, ज्ञानी सांगे खास सामायिक!

शुद्धात्म्याच्या लक्षानंतर, देतात आज्ञा पाच तू पाळ;
प्रतिक्रमण-सामायिक कर आज्ञा जर चुकल्या पाच!

दादा भगवान प्ररूपित, सामायिक-प्रतिक्रमण;
यथार्थ महावीरांचा आज, दादांनी वाढले भोजन!

**- डॉ. नीरू बहन अमीन**

# अनुक्रमणिका
## [ खंड : 1 ]
### [ 1 ] प्रतिक्रमणचे यथार्थ स्वरूप



### [ 2 ] प्रत्येक धर्माने सांगितले आहे प्रतिक्रमण



### [ 3 ] ती प्रतिक्रमणे महावीरांची नाहीत

## [ 4 ] धन्य! धन्य! ते जागृत दादा!



## [ 5 ] अक्रम विज्ञानाची पद्धत



## [ 6 ] राहतील फुले, जातील काटे

## [ 7 ] होतो चोख व्यापार



## [ 8 ] अशी तुटते श्रृंखला ऋणानुबंधांची



## [ 9 ] निर्लेपता, अभावापासून फाशीपर्यंत



## [ 10 ] संघर्षाच्या विरोधात



## [ 11 ] पुरुषार्थ, प्राकृत दुर्गुणांच्या समोर

## [ 12 ] सुटतात व्यसने, ज्ञानींच्या पद्धतीने



## [ 13 ] विमुक्ती, आर्त-रौद्रध्यानापासून



## [ 14 ] बाहेर काढते कषायांच्या कोठडीतून...

## [ 15 ] भाव अहिंसेच्या मार्गावर



## [ 16 ] दु:खदायी वैराची वसूली



## [ 17 ] कार्याच्या कारण स्वरुप अभिप्रायाचे वारण



## [ 18 ] विषय विकार जिंकतो तो राजांचा राजा



## [ 19 ] खोटे बोलण्याची सवय असणाऱ्यांना

## [ 20 ] जागृती, वाणी बोलताना



## [ 21 ] अशा प्रकारे प्रकृती दोष सुटतात



## [ 22 ] चिकट फाइलींचा निकाल



## [ 23 ] मन शोक करते तेव्हा

## [ 24 ] जीवनप्रवाहात बुडणाऱ्यांना तारते हे ज्ञान

## [ 25 ] प्रतिक्रमणाची सैद्धांतिक समज

## [ खंड : 2 ] सामायिकची परिभाषा





# प्रतिक्रमण

## [ खंड : 1 ]

## [ 1 ]
## प्रतिक्रमणचे यथार्थ स्वरूप

### जीवनात करण्या योग्य

**मुमुक्षु :** माणसाने जीवनात मुख्यत: काय केले पाहिजे?

**दादाश्री :** मनात जसे असेल तसेच बोलले पाहिजे, आणि वर्तनसुद्धा तसेच केले पाहिजे. आपल्याला जे काही बोलायचे असेल पण ते बोलतानाच जर मनात वाईट विचार आले तर त्यासाठी प्रतिक्रमण केले पाहिजे. प्रतिक्रमण कशाचे करावे? कोणाच्या साक्षीने कराल? तर, 'दादा भगवानां'च्या साक्षीने प्रतिक्रमण करायचे. हे जे दिसतात, ते 'दादा भगवान' नाहीत, हे तर भादरणचे ए.एम. पटेल आहेत. 'दादा भगवान' तर आत प्रकट झालेले 'चौदालोकां'चे नाथ आहेत. म्हणून त्यांच्या नावाने प्रतिक्रमण करायचे की 'हे दादा भगवान! माझे मनोभाव बिघडले म्हणून मी माफी मागतो, मला माफ करा.' मी सुद्धा त्यांच्या नावाने प्रतिक्रमण करतो.

**मुमुक्षु :** मग या संसारात आपले काय कर्तव्य आहे?

**दादाश्री :** या संसारात जे काही चालले आहे, ते साक्षी भावाने पाहायचे, आणि अहंकार झाला तर भगवंताजवळ माफी मागायची. 'मी करत आहे' असा जर अहंकार झाला तर माफी मागायची. तुम्ही माफी मागता का कधी?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** कुणाजवळ माफी मागता? भगवंताजवळ?

**प्रश्नकर्ता :** होय.

**दादाश्री :** भगवंताजवळ माफी मागा, तोच उपाय आहे. कारण माफी मागितली तर माफ केले जाते.

कधी चूक झाली तर म्हणा, 'हे देवा, माझी चूक करण्याची इच्छा नाही, तरी पण चूक होऊन जाते, म्हणून मला क्षमा कर.'

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा असा प्रश्न पडतो, की आम्ही भगवंताकडे माफी मागतो, पूजा करतो, तर हे सर्व कशासाठी?

**दादाश्री :** या जगाशी जे काही गुन्हे झाले आहेत, त्यासाठी माफी मागायची आहे; ज्याच्याकडून गुन्हे झाले नाहीत, त्याला माफी मागायची गरज नाही.

## कर्मांच्या पलीकडे परमात्मा

**मुमुक्षु :** परमात्म्यापर्यंत पोहोचण्यासाठी धर्माला बाजूला सारून फक्त चांगली कर्मेच करत राहिलो तर परमात्म्यापर्यंत पोहोचता येईल की नाही?

**दादाश्री :** नाही, याचे कर्मांशी काही देणेघेणे नाही, चांगली कर्मे केल्याने धर्म होतो, दुसरे काही नाही. आणि वाईट कर्मे केली तर अधर्म होतो. तुम्ही चांगली कर्मे केलीत तर लोक म्हणतील की, 'फार चांगला माणूस आहे.'

चांगली कर्मे करणे याला धर्म म्हणतात आणि वाईट कर्मे करणे याला अधर्म म्हणतात. आणि धर्म-अधर्माच्या पलीकडे जाणे याला आत्मधर्म असे म्हणतात. चांगली कर्मे केल्याने 'क्रेडिट' (पुण्य) जमा होते आणि ते क्रेडिट भोगण्यासाठी पुन्हा जन्म घ्यावा लागतो. वाईट कर्मे केली तर 'डेबिट' (पाप) उत्पन्न होते आणि ते डेबिट भोगण्यासाठी पण पुन्हा जन्म घ्यावा लागतो. ज्याच्या वही-खात्यात क्रेडिट-डेबिट

उरले नाहीत, त्याला आत्मा प्राप्त होतो. बिलकुल, एकही डॉलर क्रेडिट नसेल आणि एकही डॉलर डेबिट नसेल तेव्हा आत्मा प्राप्त होतो.

## पश्चात्तापाने प्युरिटी

**मुमुक्षु :** आम्ही या संसारात आलो आहोत म्हणून कर्मे तर करावीच लागतील ना? कळत-नकळत वाईट कर्मे झाली तर काय करावे?

**दादाश्री :** जर असे घडले तर त्यावर उपाय पण असतोच ना. वाईट कर्म झाल्यानंतर लगेच पश्चात्ताप होतो, आणि अगदी मनापासून, सिन्सियारिटीने पश्चात्ताप केला पाहिजे. पश्चात्ताप केल्यानंतर सुद्धा पुन्हा चूक झाली तर त्याची काळजी करू नये, पुन्हा पश्चात्ताप करायचा. यामागे कोणते विज्ञान आहे हे तुम्हाला कळणार नाही त्यामुळे तुम्हाला असे वाटते की 'पश्चात्ताप केल्यानंतरही हे बंद होत नाही.' का बंद होत नाही? यामागेही विज्ञान आहे. म्हणून तुम्ही सतत पश्चात्ताप करतच राहावे. जो अगदी मनापासून पश्चात्ताप करतो त्याची सर्व कर्मे धुतली जातात. तुमच्यामुळे जर कोणाला वाईट वाटले असेल तर तुम्ही त्यासाठी पश्चात्ताप करायलाच हवा.

**मुमुक्षु :** शरीरधर्म पाळतो तर काय त्याचेही प्रायश्चित्त करावे लागेल?

**दादाश्री :** होय तर, जोपर्यंत 'मी आत्मा आहे', असे भान होत नाही तोपर्यंत प्रायश्चित्त केले नाही तर कर्मे जास्त चिकटतात. प्रायश्चित्त केल्याने कर्मांच्या गाठी सैल होतात. नाही तर त्या पापाचे फळ फार वाईट येते. मनुष्यपणही निघून जाते, आणि जरी मनुष्य जन्म मिळाला तरी त्याला अनेक प्रकारच्या अडचणी येतात. खाण्याच्या, पिण्याच्या, अशा अनेक अडचणी येतात. आणि मान-सन्मान तर कधी मिळतच नाही, सदैव अपमानच होत राहतो. म्हणूनच हे प्रायश्चित्त व अन्य सर्व क्रिया कराव्या लागतात. याला परोक्ष भक्ती म्हणतात. जोपर्यंत आत्मज्ञान होत नाही, तोपर्यंत परोक्ष भक्ती करणे आवश्यक आहे.

आता पश्चात्ताप कोणाच्या हजेरीत केला पाहिजे? कुणाच्या साक्षीने केला पाहिजे? तर ज्या देवाला तुम्ही मानता, श्रीकृष्णाला मानत असाल किंवा दादा भगवानांना मानत असाल, तुम्ही ज्या कोणाला मानत असाल त्याच्या साक्षीने पश्चात्ताप केला पाहिजे. या जगात कुठल्याही गोष्टीवर उपाय नाही असे नाहीच. प्रथम उपाय जन्म घेतो त्यानंतर रोग उत्पन्न होतो.

हे जे रोग उत्पन्न झाले आहेत त्यांच्या उपायांचा जन्म त्याआधीच झालेला असतो. म्हणजे प्रथम (औषधाचे) रोपटे उगवते आणि त्यानंतर रोग उत्पन्न होतात. म्हणजे हे जग फार एक्झॅक्ट आहे. तुम्हाला केवळ उपाय करण्याचीच गरज आहे. आणि उपाय असतोच!

## क्रमण-अतिक्रमण-प्रतिक्रमण

हे जग कसे निर्माण झाले? तर अतिक्रमणाने. क्रमणाने कसलाच त्रास नाही. तुम्ही हॉटलमध्ये गेल्यावर काही वस्तू मागवून खाल्ल्या, तिथे तुमच्या हातून दोन बशा फुटल्या म्हणून तुम्ही त्याचे पैसे देऊन बाहेर पडलात, म्हणजे तुम्ही अतिक्रमण केले नाही, त्यामुळे त्याचे प्रतिक्रमण करण्याचीही गरज नाही. परंतु बशा फुटल्या आणि तुम्ही म्हणालात 'तुमच्या नोकराने फोडल्या' की मग वाद सुरू होतो. हे झाले अतिक्रमण, त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल. आणि अतिक्रमण झाल्याशिवाय राहतच नाही, म्हणून प्रतिक्रमण करा. बाकी सारे क्रमण तर आहेच. सहजपणे बोलणे झाले तर ते क्रमण आहे, त्यात काही गैर नाही. पण अतिक्रमण झाल्याशिवाय राहत नाही, म्हणून त्याचे प्रतिक्रमण करा.

**मुमुक्षु :** हे जे अतिक्रमण झाले ते स्वत:ला कसे समजेल?

**दादाश्री :** ते स्वत:लाही समजते आणि समोरच्यालाही समजते. अतिक्रमण झाले हे समोरच्यालाही समजते. त्याच्या चेहऱ्यावर झालेला परिणाम तुम्हाला समजतो. आणि तुमच्यावरही त्याचा परिणाम होतो. दोघांवर परिणाम होतो. म्हणून त्याचे प्रतिक्रमण करावेच लागते.

पोलिसांनी रोखले, आणि तू गाडी थांबवली नाहीस, तर त्याला अतिक्रमण म्हणायचे, त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल, नाही तर कोर्टात जावे लागेल.

आपण जेवण करतो ते अतिक्रमण नाही, मग काय केस कापून घेतो ते अतिक्रमण आहे?

**मुमुक्षु :** नाही.

**दादाश्री :** तर दाढी करतो, ते अतिक्रमण आहे का?

**मुमुक्षु :** नाही.

**दादाश्री :** मग सकाळी ब्रश करतो ते अतिक्रमण आहे?

**मुमुक्षु :** नाही, तेसुद्धा नाही.

**दादाश्री :** क्रोध-मान-माया-लोभ, या सर्व गोष्टी म्हणजे अतिक्रमण. त्यांचे प्रतिक्रमण केले म्हणजे क्रोध-मान-माया-लोभ गेले. जर अतिक्रमण झाले आणि प्रतिक्रमण केले, की क्रोध-मान-माया-लोभ निघून जातात.

## अज्ञानाच्या धक्क्याने, अनंत प्रोजेक्शन्स

असे आहे, सर्व जीव प्रोजेक्टस् (योजना-भाव) करत राहतात. सहजपणे नाही, परंतु धक्का लागल्याने प्रोजेक्टस् करत राहतात, आणि आपण प्रतिक्रमण करत राहायचे. म्हणजे अज्ञानतेच्या धक्क्याने, संयोगवश प्रोजेक्टस् करत राहतात. म्हणून आपण प्रतिक्रमण करावे.

आणि एकच प्रकारचा प्रोजेक्ट नसतो, तर अनंत प्रकारचे प्रोजेक्टस् असतात. जिथे जे काही दिसेल त्यावर काही विचार केल्याशिवाय राहत नाहीत. मग जरी एखाद्या पुलाविषयीही बोलणे निघाले तर म्हणेल, 'हा पूल एवढा उंच का बनवला असेल?' असेही मनात येते. अरे, पण तुझे यात काय देणेघेणे आहे? त्या पुलाने काय तुझ्याशी लग्न केले आहे? तो पुलावर आला म्हणून त्याला असे विचार आले! नाही तर

पुलावरून चालून दुसरीकडे उतरायचे. म्हणजे काहीच देणेघेणे नाही, तरीही तिथे म्हणतात, 'हा पूल एवढा उंच का बरे बांधला गेला असेल? लोक असे बोलतात की नाही?

**मुमुक्षु :** हो बोलतात, पण तेव्हा तर पाच मिनिटात पाच हजार पर्याय उत्पन्न होतात.

**दादाश्री :** तू पाच हजार म्हणतोस, पण पाच मिनिटांचे तीनशे सेकंद झाले आणि त्या प्रत्येक सेकंदाचे *समय* अपार असतात! म्हणजे एका सेकंदात सुद्धा किती तरी पर्याय निर्माण होतात! असे अपार अतिक्रमण करतच राहतात.

अतिक्रमणाने हा संसार उत्पन्न झाला आहे, आणि प्रतिक्रमणाने तो संपुष्टात येतो.

## प्रतिक्रमणाची व्याख्या

**मुमुक्षु :** आपल्याला आवडत नाही असे काही घडत असेल, तर ते सहन करणे, यालाच तुम्ही प्रतिक्रमण म्हणता का?

**दादाश्री :** नाही, सहन करू नये, प्रतिक्रमण केले पाहिजे.

**मुमुक्षु :** मग प्रतिक्रमण म्हणजे नक्की काय?

**दादाश्री :** प्रतिक्रमण म्हणजे समोरची व्यक्ती जेव्हा आपला अपमान करते, तेव्हा आपल्याला हे समजले पाहिजे की 'या अपमानाचा खरा गुन्हेगार कोण आहे?' आपण आधी हे ठरवले पाहिजे की 'अपमान करणारा गुन्हेगार आहे की भोगणारा गुन्हेगार आहे?' अपमान करणारा अजिबात गुन्हेगार नसतो, एक टक्काही गुन्हेगार नसतो. तो केवळ निमित्तच असतो आणि आपल्याच कर्मांच्या उदयामुळे तो निमित्त आपल्याला भेटतो. म्हणून हा आपलाच गुन्हा आहे. आता अशावेळी जर समोरच्या व्यक्तीबद्दल आपले भाव बिघडले तर मात्र प्रतिक्रमण करावे. त्याच्यासाठी जर 'हा नालायक आहे, लुच्चा आहे' असे विचार मनात आले तर मात्र प्रतिक्रमण करावे. जर असे विचार आले नसतील

आणि तुम्ही त्याचे उपकार मानले असेल तर प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. कोणी आपल्याला शिवी देतो तर तो आपलाच हिशोब आहे, आणि ती व्यक्ती तर निमित्त आहे. आपला खिसा कापला गेला तर तो कापणारा निमित्त आहे आणि तो आपलाच हिशोब आहे. लोक तर निमित्ताचाच चावा घेतात (दोष देतात). त्यामुळेच ही सर्व भांडणे आहेत.

## चुकीचे वागलो ते अतिक्रमण

आपण दिवसभरात जो व्यवहार करतो, त्यामध्ये काही चुकीचे झाले तर आपल्याला कळते की याच्याशी चुकीचा व्यवहार झाला. कळते की नाही? आपण जो व्यवहार करतो, तो सारा क्रमण आहे. क्रमण म्हणजे व्यवहार. आता जेव्हा कधी उलटा (वाईट) व्यवहार होतो तेव्हा आपल्याला कळते की याच्याशी मी कठोर शब्दात बोललो, किंवा चुकीचे वागलो. हे कळते की नाही? तर याला अतिक्रमण झाले असे म्हणतात.

अतिक्रमण अर्थात 'उलटे चालणे.' जेवढे उलटे चालले असाल तेवढेच सरळ परत फिरणे, याला प्रतिक्रमण म्हणतात. उलटे चाललो याला अतिक्रमण म्हणतात आणि परत फिरलो याला प्रतिक्रमण म्हणतात.

## अशा प्रकारे त्वरित धुतले जाते

जिथे भांडणे आहेत, तिथे प्रतिक्रमण नाहीत, आणि जिथे प्रतिक्रमण आहेत तिथे भांडणे नाहीत.

जे तुम्हाला आवडते, ते तुम्ही दुसऱ्यांना द्या, त्यामुळे पुण्य मिळेल. स्वत:ला शिवीगाळ सहन होत नाही आणि दुसऱ्याला पाच शिव्या देतो, हा भयंकर गुन्हा आहे. असे होऊ नये. कोणी आपल्याला शिव्या देतो ते नियमानुसार आहे. 'तू का देत आहेस?' असे त्याला विचारू नका. त्या (शिव्या) जमाच करून टाका.

**मुमुक्षु :** वसूली करण्यास गेलो तर काय होईल?

**दादाश्री :** आणखी दोन शिव्या देईल. आणि जर त्याला विचारले

की 'दोनच शिव्या का दिल्या, तीन, चार किंवा एक का नाही?' तर तो म्हणेल, 'मी काय रिकामटेकडा आहे?' म्हणजे हे सर्व नियमानुसार घडत आहे. म्हणून जमा करून टाका. तुम्ही देऊ नका, आणि जर दिली गेली तर प्रतिक्रमण करा.

मुलाला मारण्याचा तुम्हाला अधिकार नाही, समजावण्याचा अधिकार आहे. तरीसुद्धा मुलाला मारले गेले आणि प्रतिक्रमण केले नाही, तर कर्मे चिकटच राहतील ना! प्रतिक्रमण तर करावेच लागेल ना! मुलाला मारले ते तर प्रकृतीच्या कमकुवतपणामुळे, क्रोध-मान-माया-लोभामुळे, कषायांमुळे मारले. कषाय उत्पन्न झाल्यामुळे मारले. परंतु मारल्यानंतर माझे शब्द आठवतात की, 'दादांनी सांगितले आहे, अतिक्रमण झाले तर या प्रकारे प्रतिक्रमण करावे.' म्हणून प्रतिक्रमण केल्याने (दोष) धुतला जाईल, लगेचच धुतला जाईल.

## प्रतिक्रमण करण्याची गरज कुणाला नाही?

**दादाश्री :** तुम्ही किती प्रतिक्रमण करता?

**प्रश्नकर्ता :** एकसुद्धा नाही.

**दादाश्री :** मग अतिक्रमण किती करता? जिथे अतिक्रमण होत असेल तिथे प्रतिक्रमण तर केलेच पाहिजे. अतिक्रमण होत नसेल तर प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. 'मी चंदुभाई आहे' हेच अतिक्रमण आहे. तरी पण आम्ही व्यवहारात त्याला 'लेट गो' करतो (चालवून घेतो). पण तुमच्यामुळे कुणाला दुःख होते का? जर दुःख होत नसेल तर ते अतिक्रमण नाही. साऱ्या दिवसात तुमच्याकडून एखाद्याला दुःख झाले तर ते अतिक्रमण होय. त्याचे प्रतिक्रमण करा. हे वीतरागींचे विज्ञान आहे. अतिक्रमण अधोगतीत घेऊन जाते आणि प्रतिक्रमण ऊर्ध्वगतीत घेऊन जाते. थेट मोक्षाला जाईपर्यंत प्रतिक्रमण मदत करते.

प्रतिक्रमण कुणी करू नये? तर ज्याने कधी अतिक्रमण केले नाही त्याने.

## अतिक्रमणाची ओळख

**प्रश्नकर्ता :** कुणाला दु:ख देण्याचा आपला भाव नाही, तरी पण निमित्त रूपाने दु:ख दिले जाते तर असा अभिप्राय ठेवण्याची गरज आहे का की 'अतिक्रमण झाले तर त्याचे प्रतिक्रमण करायला हवे?'

**दादाश्री :** कुणाला वाईट वाटेल असे जर तुम्ही बोलले असाल, कुणाला दु:ख होईल असे बोलले असाल, कुणाला दु:ख होईल असा धक्का तुमच्याकडून लागला तर त्याला अतिक्रमण केले असे म्हणायचे. म्हणून त्याचे प्रतिक्रमण केले पाहिजे. अतिक्रमण केले म्हणजे चूक झाली, म्हणून कर्मबंधन होईल.

**प्रश्नकर्ता :** जर समोरची व्यक्ती (फक्त) निमित्तच आहे, तर त्याला दु:ख का वाटेल? मग प्रतिक्रमण करण्याची काय गरज आहे?

**दादाश्री :** समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले असेल तर प्रतिक्रमण करावे लागते. दु:ख झाले नसेल तर त्याला अतिक्रमण म्हणत नाहीत. अर्थात अतिक्रमण झाले तर प्रतिक्रमण करायचे.

असे आहे की हे सर्व खाणे-पिणे, बोलणे, ते सर्व क्रमण आहे. सर्व दिवस क्रमणच होत असते. लवकर उठणे, उशीरा उठणे, ते सर्व क्रमणच आहे.

समजा आता इथे एखादा माणूस कुणाला शिवी देऊ लागला तर तुम्ही समजून जाल की, 'गाडी सरळ जात होती, मग आता हा असे अतिक्रमण का बरे करत आहे?' याला अतिक्रमण म्हणतात. कुणाचे मन दुखावले असेल, काही केले असेल, मग जरी ते अतिक्रमण सहजभावाने झाले असेल, तरीही प्रतिक्रमण करावे लागेल. तसे तोंडावर बोलला नसाल, पण मनोभाव बिघडले तरी प्रतिक्रमण करावे लागेल. प्रतिक्रमण म्हणजे तुम्हाला समजेल त्याप्रमाणे त्याची माफी मागायची आहे. असे ठरवायचे की 'हा दोष झाला, तो मला समजला, आणि असे दोष मी पुन्हा करणार नाही. हे जे केले ते चुकीचे झाले, असे व्हायला नको होते, आणि पुन्हा असे करणार नाही', अशी प्रतिज्ञा

करायची. असे केल्यानंतरही जर पुन्हा तोच दोष झाला तर पुन्हा पश्चात्ताप करायचा, पण दोष दिसल्याबरोबर लगेच त्याचा पश्चात्ताप केला तर दोष तेवढा कमी होईल, आणि शेवटी अशा प्रकारे हळूहळू सर्व समाप्त होईल.

ज्या धर्माने कर्माचा नाश होत नाही, त्याला धर्म कसे म्हणता येईल? नवीन कर्मे बांधायची कशी थांबतील? तर प्रतिक्रमणाने.

## शक्ती मागण्याची पद्धत

**प्रश्नकर्ता :** पुढच्या प्रगतीसीठी शक्ती कशा मागाव्यात आणि कुणाकडून मागाव्या?

**दादाश्री :** स्वतःच्या शुद्धात्म्याकडे, 'ज्ञानी पुरुषां'कडे शक्ती मागू शकता, आणि ज्याला स्वरूपाचे ज्ञान झाले नसेल, त्याने आपल्या गुरु, मूर्ती, देव, ज्यांना तो मानत असेल त्यांच्याकडे शक्ती मागाव्या. स्वतःमध्ये ज्या ज्या चुका दिसतात, त्यांची लिस्ट (यादी) बनवून त्यासाठी शक्ती मागाव्या. श्रद्धेने, ज्ञानाने जे चुकीचे वाटते, 'ते चुकीचेच आहे' हे पक्के करून त्याचे प्रतिक्रमण करावे. असे पुन्हा होऊ नये यासाठी ज्ञानींजवळ शक्ती मागायच्या तर मग त्या चुका निघून जातील. ज्या मोठ्या गाठी आहेत, त्या सामायिकमध्ये विरघळतात, आणि दुसरे छोटे छोटे दोष तर प्रार्थनेनेच समाप्त होतात. विना प्रार्थनेने जे उत्पन्न झालेले असते ते प्रार्थनेने संपून जाते. हे सारे अज्ञानाने उत्पन्न झाले आहे. पौद्‌गलिक शक्ती प्रार्थनेने संपतात. घसरणे सरळ आहे, पण चढणे कठीण आहे, कारण घसरण्यात पौद्‌गलिक शक्ती असतात.

## ज्ञानींच्या ज्ञानाने, निकाल कर्मांचा

**मुमुक्षु :** कित्येकदा व्यवहारात वेगवेगळ्या प्रकारची कर्मे करावी लागतात, ज्यांना वाईट कर्मे किंवा पाप कर्मे असे म्हणतात, तर या पाप कर्मांपासून कसे वाचू शकतो?

**दादाश्री :** त्याच्यांजवळ पाप कर्मांचे जेवढे ज्ञान असेल, ते ज्ञान

त्यांना मदत करते. तुम्हाला येथून स्टेशनला जायचे असेल आणि तुम्हाला जर स्टेशनपर्यंत जायचे ज्ञान असेल, तर ते तुम्हाला पोहोचवेल. पाप कर्मांपासून कसे वाचता येईल? तर जेवढे ज्ञान आहे, ते या पुस्तकात किंवा दुसऱ्या कोणाजवळ नसते, ते व्यावहारिक ज्ञान आहे. निश्चयज्ञान फक्त ज्ञानींजवळ असते. पुस्तकात हे निश्चयज्ञान नसते. ते तर ज्ञानींच्या हृदयात दडलेले असते. जेव्हा आपण ते निश्चय ज्ञान ऐकतो, वाणी रूपात ऐकतो तेव्हा आपण मुक्त होऊ शकतो. पुस्तकात तर व्यावहारिक ज्ञान असते, तेसुद्धा काही प्रमाणात खुलासे देऊ शकते. त्याने बुद्धी वाढते, मतिज्ञान वाढत जाते. श्रुतज्ञानाने मतिज्ञान वाढते, आणि मतिज्ञानाने पापापासून सुटता येते. बाकी, अन्य कोणताही उपाय नाही. आणि दुसरा उपाय म्हणजे स्वत:ची भावना असेल आणि प्रतिक्रमण कराल तर सुटता येईल, परंतु प्रतिक्रमण कसे असायला हवे? तर, 'शूट ऑन साइट' असायला हवे. दोष उत्पन्न झाल्याबरोबर लगेच प्रतिक्रमण केले तर सुटका होईल.

## अन्यायपूर्ण व्यवहाराचे प्रायश्चित्त

**मुमुक्षु :** व्यवहार, व्यापार, व अन्य प्रवृत्तीमध्ये अन्याय होताना दिसल्यावर मनात ग्लानी येते, आणि त्यामुळे जर व्यवहार चुकीचा होऊ लागला तर काय करावे? आमच्याकडून जर असा अन्याय होत असेल तर त्याचे प्रायश्चित्त कसे करावे?

**दादाश्री :** प्रायश्चित्तासाठी आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान केले पाहिजेत. जिथे जिथे कोणावर अन्याय केला असेल तिथे तिथे आलोचना, प्रतिक्रमण करावे लागते आणि असा अन्याय मी पुन्हा करणार नाही, असे ठरवावे लागते. ज्या देवाला मानत असाल, कोणत्या देवाला मानता?

**मुमुक्षु :** शंकराला.

**दादाश्री :** ठीक! तर मग शंकराजवळ पश्चात्ताप केला पाहिजे. आलोचना केली पाहिजे की, 'माझ्याकडून या या व्यक्तींबरोबर अशा अशा चुका झाल्या आहेत, आता पुन्हा कधी मी असे करणार नाही.

वारंवार पश्चात्ताप केला पाहिजे. पुन्हा दोष झाले तर पुन्हा पश्चात्ताप करावा. असे केल्याने दोष कमी होत जातील. तुमची इच्छा नसेल तरी पण तुमच्याकडून अन्याय होईल. तो तुमचा पूर्व जन्माचा प्रकृती दोष आहे, या जन्माचा दोष नाही. आज तर तुम्हाला सुधारायचे आहे, पण तरीही दोष होतात. असे घडते ते तुमचे पूर्वीचे दोष आहेत. ते तुम्हाला त्रास दिल्याशिवाय राहणार नाहीत. म्हणून सतत आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान करावे लागेल.

**मुमुक्षु :** आम्हाला जे सहन करावे लागते, त्यावर काय उपाय आहे?

**दादाश्री :** तुम्हाला ते सहन करावेच लागेल, उगाच आरडाओरडा करता कामा नये. सहन करायचे आणि तेही अगदी समतापूर्वक सहन करायचे. समोरच्या व्यक्तीला मनात शिवी देऊन नाही, पण समतापूर्वक, की 'भाऊ, तू मला माझ्या कर्मातून मुक्त केलेस. माझे जे कर्म होते, ते तू मला भोगायला लावलेस, आणि मला मुक्त केलेस', त्यासाठी त्याचे उपकार मानावेत. विनाकारण काहीही सहन करावे लागत नाही. आपल्याच दोषांचा तो परिणाम आहे.

**मुमुक्षु :** मला हे आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान लिहून द्या ना! 'ज्ञानी पुरुषां'कडून कन्फॉर्मेशन घेऊन द्या, म्हणजे मी हे आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान करायचे सुरू करेन.

**दादाश्री :** हो, ते तर करावेच लागेल ना! ते आम्ही तुम्हाला येथे शिकवू.

## ओहो! त्याचेही प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण तर दुसऱ्यांचे दोष पाहतो त्यासाठीच करायचे ना?

**दादाश्री :** फक्त दुसऱ्यांचे दोषच नाही, तर प्रत्येक गोष्टीसाठी, खोटे बोलला असाल, काही चुकीचे कृत्य झाले असेल, हिंसा झाली

असेल, पाच महाव्रतांपैकी कुठल्याही व्रताचा भंग झाला असेल, तर अशा सर्व गोष्टींसाठी प्रतिक्रमण करावे लागेल.

**मुमुक्षु :** चूक करणारा तर वेगळा आहे, तर मग मी प्रतिक्रमण का करावे?

**दादाश्री :** वेगळा आहे असे नाही, प्रतिक्रमण स्वतः करत नाही. चूक करणाऱ्याकडून प्रतिक्रमण करवून घेतो, शुद्धात्मा स्वतः प्रतिक्रमण करत नाही.



# [ 2 ]
# प्रत्येक धर्माने सांगितले आहे प्रतिक्रमण

## सर्वोत्तम व्यवहार धर्म

जैन धर्मात सर्वोच्च गूढ तत्व जर कोणते असेल, तर ते आहे 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान'! ते सर्वोपरी आहे. तसे तर अन्य धर्मातही हे आहे, पण कसे आहे? तर तिथे सामूहिक क्षमा मागितली जाते. मुस्लिम धर्मात आहे, ख्रिश्चन धर्मातही आहे. क्षमा मागण्याचा रिवाज तर सर्व धर्मात आहे, परंतु जे वीतराग भगवंतांनी सांगितलेले आहे, 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान', अर्थात गुरुंच्या उपस्थितीत करण्याचे आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान, ही अत्यंत सायंटिफिक (वैज्ञानिक) वस्तू आहे, आणि त्वरित फळ देणारी आहे.

इतर धर्मांमध्ये तर क्षमा मागितल्याने पापे कमी होतात इतकेच, आणि ह्या प्रतिक्रमणाने तर पापे नष्टच होतात.

भगवंतानी सांगितले आहे, की 'आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान' या शिवाय दुसरा कोणताच व्यवहार धर्म नाही. पण ते कॅश (रोख) असेल तरच, उधार चालणार नाही. जर कोणाला शिवीगाळ केली, तर ते लक्षात (जागृतीत) ठेवा की कोणाबरोबर काय झाले होते? आणि त्यानंतर आलोचना करून, कॅश प्रतिक्रमण, प्रत्याख्यान करा. याला भगवंतांनी व्यवहार आणि निश्चय, दोन्हीही म्हटले आहे. परंतु हे कोण

करू शकतो? तर समकित प्राप्त झाल्यानंतर तो करू शकतो, तोपर्यंत करायचे असेल तरी होणार नाही. आणि समकित होतही नाही ना! तरीही कोणी आपल्या येथे आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान शिकून गेला तरी त्याचे काम होऊन जाईल. असेच जरी शिकून गेला तरी हरकत नाही. त्याला मग समकित होऊनच जाईल!!!

ज्याचे आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान खरे असतील त्याला आत्मा प्राप्त झाल्याशिवाय राहतच नाही.

**मुमुक्षु :** स्वत:कडून काही पाप घडले तर त्याचे प्रायश्चित्त करण्यासाठी व्रत किंवा असे दुसरे काही करतात की जेणेकरून आत्म्याचे शुद्धीकरण होते, तर असा काही उपाय दाखवा.

**दादाश्री :** ते सर्व 'आम्ही' येथे सोबतच देतो. सर्व औषधी देतो. सर्व प्रकारच्या औषधी, त्याचे आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान सर्व प्रकारचे.

## प्रतिक्रमण म्हणजे पापांपासून परत फिरणे

**दादाश्री :** प्रतिक्रमणाचा अर्थ काय हे तुम्हाला माहीत आहे का?

**मुमुक्षु :** नाही.

**दादाश्री :** तुम्हाला जे माहीत असेल ते सांगा.

**मुमुक्षु :** पापांपासून परत फिरणे.

**दादाश्री :** पापांपासून परत फिरणे. भगवंतांने किती सुंदर न्याय केला आहे की, 'भाऊ, पापांपासून परत फिरणे, याला म्हणतात प्रतिक्रमण.' परंतु अजूनही पापे तर होतच आहेत. त्याचे काय कारण?

**मुमुक्षु :** ते तर तुम्हीच समजवा, एक आहे आलोचना, दुसरे प्रतिक्रमण आणि तिसरे प्रत्याख्यान. हे तीन शब्द अजून मला पूर्णपणे नीट समजले नाहीत.

**दादाश्री :** प्रत्याख्यान म्हणजे 'मी त्या वस्तूला आज सोडत आहे,

त्याग करत आहे, असा त्याचा भावार्थ आहे. 'वस्तू सोडायची आहे म्हणजे प्रत्याख्यान करतो.'

**मुमुक्षु :** म्हणजे 'पश्चात्ताप करतो' ते प्रतिक्रमण आहे, आणि 'पुन्हा असे करणार नाही', असे म्हटले तर काय ते प्रत्याख्यान आहे?

**दादाश्री :** हो, पश्चात्तापाला प्रतिक्रमण म्हणतात. आता प्रतिक्रमण केले तर पुन्हा असे अतिक्रमण होणार नाही, 'पुन्हा असे करणार नाही' याला प्रत्याख्यान म्हणतात. मनात असा निश्चय करायचा की, 'मी पुन्हा असे करणार नाही, असे वचन देतो', आणि नंतर पुन्हा असे घडले तर एक थर तरी गेला, त्यानंतर दुसरा थर समोर येईल, तरी घाबरायचे नाही, वारंवार असे करतच राहायचे.

**मुमुक्षु :** मनात माफी मागायची?

**दादाश्री :** हो, माफी मागायची.

## आलोचना

**मुमुक्षु :** आलोचना म्हणजे काय?

**दादाश्री :** हो, आलोचना म्हणजे 'आपल्याकडून जर काही वाईट काम झाले असेल, तर जे आपले गुरु असतील किंवा ज्ञानी असतील त्यांच्याकडे कबूल करायचे. जसे घडले असेल तसेच कबूल करायचे. कोर्टात काय म्हणतात?

**मुमुक्षु :** कन्फेशन करणे (कबूल करणे).

**दादाश्री :** हो, म्हणजे गुरुंजवळ किंवा ज्ञानींजवळ जे काही घडले असेल ते जसेच्या तसे, भीती न बाळगता सांगणे. गुरु महाराज काय म्हणतील अशी भीती बाळगायची नाही. भीती म्हणजे कदाचित मारतीलसुद्धा. पण आपण निर्भय होऊन सांगावे की 'असे सर्व घडले आहे.' नंतर गुरु महाराज सांगतील, 'प्रतिक्रमण करा.' मग ते आपल्याला शिकवतील की अशा प्रकारे प्रतिक्रमण करा. आता आपण प्रतिक्रमण कशाचे करायचे? तर जितके अतिक्रमण केले असेल, जी कृत्ये लोकांना

स्वीकार्य नसतील, लोक निंदा करतील अशी कर्मे, आपल्यामुळे समोरच्या व्यक्तीला दु:ख होते, त्याला अतिक्रमण म्हणतात. जर असे झाले असेल तर प्रतिक्रमण करणे आवश्यक आहे.

**मुमुक्षु :** आलोचना, प्रतिक्रमण केल्यानंतर असा दोष पुन्हा होऊ नये यासाठी जागृत तर राहावे लागेल ना?

**दादाश्री :** तो दोष पुन्हा होतच नाही. यथार्थ प्रतिक्रमण त्यालाच म्हणतात की तो दोष पुन्हा होतच नाही. किंवा मग तो दोष हळूहळू कमी होऊन संपून जातो.

तुम्ही म्हणता की प्रतिक्रमण केल्यानंतरही पुन्हा तो दोष होतो. ते तर आता जे बाजारात चालले आहे, सध्या जे व्यवहारात चालले आहे त्या लौकिक प्रतिक्रमणाबद्दल आहे, लौकिक म्हणजे संसार फळ देणारे. फक्त तुमचा तेवढा वेळ अधर्मात गेला नाही आणि पुण्य बांधले गेले.

प्रतिक्रमण कशाला म्हणतात? तर ते 'शूट ऑन साइट' (पाहताक्षणीच संपविणे) असले पाहिजे. आपल्याकडे 'शूट ऑन साइट'चाच नियम आहे ना! असे प्रतिक्रमण असावे.

गुरु महाराजांनी सांगितले होते की प्रतिक्रमण करा, पण प्रतिक्रमण केल्यानंतर प्रत्याख्यान हे सुद्धा करायलाच हवे ना? गुरु महाराजांच्या मूर्तीचे स्मरण करून प्रत्याख्यान करायलाच हवे. जो दोष झाला त्याचे प्रत्याख्यान, म्हणजे 'पुन्हा (तो दोष) करणार नाही.' म्हणजे ह्या तीनही गोष्टी एकाच वेळी झाल्या पाहिजेत.

**मुमुक्षु :** आणि जागृत राहायला हवे की परत असे न होवो.

**दादाश्री :** निरंतर जागृत, जागृत म्हणजे अर्धा तास नव्हे, चोवीस तास, निरंतर. जेव्हापासून मी लोकांना ज्ञान दिले आहे तेव्हापासून ते सर्व निरंतर जागृत असतात. क्षणभरही झोपले नाहीत.

संसारी लोकांमध्ये जो कोणी जागृत असेल आणि त्याने जर

प्रतिक्रमण केले तर त्याचे तेवढे दोष कमी होतील, शिवाय नवीन शुभ कर्मे बांधली जातील. जोपर्यंत दर्शन मोहनीय आहे तोपर्यंत कर्मबंधन होतच राहते.

आलोचना नेहमी प्रतिक्रमणासहितच असते. आणि प्रतिक्रमण हे तर सर्वात मोठे हत्यार आहे. म्हणून जर प्रतिक्रमणाचा धर्म स्वीकारला तर तुमच्या माथी कुणी गुरु नसतील तरी चालेल. दादांकडून एवढे जरी शिकून घेतले तरी खूप झाले. यात सर्व काही आले. जिथे कुठे काही चूक झाली, तिथे दादांकडून माफी मागून घ्यावी. तर तेवढ्या गुन्ह्यापासून मुक्त व्हाल. ह्यात काय कठीण आहे? दादा काय उपवास करायला सांगतात की 'का चूक केलीस?' दादांनी जर उपवास करण्यास सांगितले तर लोकांना वाटेल की दादांनी आम्हाला उपाशी ठेवले. पण दादा असे उपाशी ठेवतच नाही ना! एखाद्याने शिवी दिली आणि स्वत:वर त्याचा परिणाम झाला तर तेव्हा ही तर माझीच चूक आहे असे समजून स्वत:च त्यासाठी प्रतिक्रमण करत राहिला तर ते भगवंतांचे सर्वश्रेष्ठ ज्ञान आहे. हेच ज्ञान मोक्षाला घेऊन जाईल! इतकाच शब्द, आमचे एकच वाक्य जरी पाळले ना, तरी तो मोक्षाला जाईल! मग आणखी काय पाहिजे?

## जोपर्यंत कर्ताभाव तोपर्यंत अतिक्रमण

कर्म कोण बांधतो? हे आपण जाणून घेतले पाहिजे, तुमचे नाव काय आहे?

**मुमुक्षु :** चंदुलाल.

**दादाश्री :** तर 'मी चंदुलाल आहे' तोच कर्म बांधणारा आहे. मग तो जरी रात्री झोपला तरीही रात्रभर कर्मे बांधली जातात. 'मी चंदुलाल आहे' यामुळे झोपेतही कर्मे बांधली जातात. याचे काय कारण? कारण हा आरोपित भाव आहे म्हणून गुन्हा लागू होतो. वास्तवात 'स्वत:' चंदुलाल नाही, आणि जिथे तुम्ही नाही तिथे 'मी आहे' असे आरोपण करता. तो कल्पित भाव आहे, आणि म्हणून निरंतर त्याचा गुन्हा लागू होतो. मग 'मी चंदुलाल, याचा सासरा, याचा मामा, काका,' हे सर्व

पण आरोपित भाव आहेत, त्यामुळे निरंतर कर्मबंधन होत राहते. रात्री झोपेतही कर्मबंधन सुरूच राहते. त्यातून तर सुटकाच नाही, पण जर 'मी चंदुलाल आहे' या अहंकाराला जर तुम्ही निर्मळ केले तर तुमची कर्मे कमी बांधली जातील.

अहंकाराला निर्मळ केल्यानंतरही आणखी काही क्रिया कराव्या लागतील. कोणत्या क्रिया? समजा सकाळी तुमच्या सुनेच्या हातून कप-बशी फुटली यावर तुम्ही बोललात, 'तुला अक्कल नाही?' यामुळे तिला दु:ख झाले, त्यावेळी तुम्हाला असे वाटले पाहिजे की, असे बोलून 'मी तिला दुखावले.' म्हणून त्याचे प्रतिक्रमण झाले पाहिजे. दु:ख दिले म्हणजे अतिक्रमण झाले, मग लगेच प्रतिक्रमण केले तर ते धुतले जाईल. ते कर्म हलके होईल.

कुणालाही दु:ख होईल असे आचरण झाले तर त्याला अतिक्रमण झाले असे म्हणतात. आणि अतिक्रमण झाले की प्रतिक्रमण केले पाहिजे, पण ते बारा महिन्यानंतर करतात तसे नाही, तर 'शूट ऑन साइट', केले पाहिजे, तर ही दु:खे काही तरी कमी होतील. वीतरागींच्या मतानुसार चाललो तर दु:खे संपतील. नाही तर दु:खे जात नाहीत.

## असे करावे प्रतिक्रमण

आपले आपणच (शिकल्याशिवाय) जे करता येते त्याला म्हणतात अतिक्रमण आणि प्रतिक्रमण तर शिकावे लागते. अतिक्रमण करण्याचे आपसुकच जमते. एखाद्याला चापट मारायची असेल तर शिकावे लागत नाही, कुणाला चापट मारताना पाहिल्यावर तोही शिकतो. पण अतिक्रमण केले तर प्रतिक्रमण केले पाहिजे. तसे तर व्यवहारात हे सर्वजण इथे बसले आहेत, त्यात काय प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. जेव्हा कुणाला ठोसा मारला असेल किंवा कुणाची थट्टा-मस्करी केली असेल, म्हणजे अतिक्रमण केले तर त्याचे प्रतिक्रमण करावे लागते.

**मुमुक्षु :** ते प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** तुम्ही जर ज्ञान घेतले असेल तर तुम्हाला समोरच्या

व्यक्तीचा आत्मा दिसेल. म्हणून त्या आत्म्याला उद्देशून करावे, किंवा भगवंताला उद्देशून करावे, 'हे भगवंत! मी पश्चात्ताप करीत आहे, माफी मागत आहे, आणि पुन्हा कधी असे करणार नाही.' बस, हे झाले प्रतिक्रमण! चूक झाली की लगेच समजते ना?

**मुमुक्षु :** हो.

**दादाश्री :** त्याचे प्रतिक्रमण केले, म्हणजे धुतले गेले.

**मुमुक्षु :** असे केल्याने दोष खरेच धुतले जातील का?

**दादाश्री :** हो, हो, निश्चितच धुतले जातील! प्रतिक्रमण केले की दोष राहणारच नाहीत ना! खूप मोठे (भारी) कर्म असेल तर ते जळलेल्या दोरीसारखे दिसेल, पण जरासा हात लावल्याबरोबर राख विखुरली जाईल.

**मुमुक्षु :** पश्चात्ताप कसा करू? सर्वांच्या समक्ष करू की मनातल्या मनात करू?

**दादाश्री :** मनातल्या मनात. मनात दादांना आठवून म्हणायचे 'माझ्याकडून ही चूक झाली, आणि अशी चूक मी पुन्हा करणार नाही', असे मनात आठवून करावे. असे करता करता ही सर्व दुःखे विसरली जातात. ती चूक संपून जाते. परंतु जर असे केले नाही तर मात्र चुका वाढत जातील. मी तुम्हाला प्रतिक्रमणाचे हत्यार दिले आहे, प्रतिक्रमण हे एक मोठे हत्यार आहे, कारण साऱ्या संसाराचा अंत आणण्यासाठी (संसारसागर पार करण्यासाठी) हेच एक सर्वात मोठे हत्यार आहे. अतिक्रमणामुळे हे जग उभे झाले आहे, आणि प्रतिक्रमणाने त्याचा विलय होतो. बस, इतकेच आहे. अतिक्रमण झाले म्हणजे दोष झाला. हे कळल्यावर तुम्ही 'शूट ऑन साइट' केले पाहिजे. दोष दिसल्याबरोबर शूट करा.

हा एकच मार्ग असा आहे की स्वतःचे दोष दिसू लागतात आणि शूट होत जातात. असे करत करत दोष संपतात.

## पश्चात्ताप कधीही खोटा असू शकत नाही

**दादाश्री :** तुम्ही असे किती प्रतिक्रमण करता?

**मुमुक्षु :** कुणाला दु:ख झाले तर लगेच पश्चात्ताप करतो.

**दादाश्री :** ही जी वेदना होते, तो पश्चात्ताप आहे, पश्चात्तापाला प्रतिक्रमण म्हणत नाहीत. तरी पण ते चांगलेच आहे.

**मुमुक्षु :** पाप केल्यावर आपण पश्चात्ताप केले तर त्या पापापासून मुक्ती कशी काय मिळेल? मग तर तो (पाप) करतच राहील ना?

**दादाश्री :** त्यासाठी मी तुम्हाला उपाय सांगेन.

**मुमुक्षु :** एका बाजूने पाप करत राहतो आणि दुसऱ्या बाजूने पश्चात्ताप करत राहतो. असे तर चालतच राहते.

**दादाश्री :** नाही, असे करायचे नाही. जो मनुष्य पाप करतो ना, त्याने जर पश्चात्ताप केला तर तो खोटा पश्चात्ताप करूच शकत नाही. खरा पश्चात्तापच होत असतो. आणि खरा पश्चात्ताप झाला की कांद्याची एक पाकळी दूर होते. तरीही कांदा अख्ख्याचा अख्खाच दिसतो. नंतर दुसरी पाकळी दूर होते. पश्चात्ताप कधीही वाया जात नाही. प्रत्येक धर्माने पश्चात्ताप करा असेच सांगितले आहे. ख्रिश्चन धर्मातही पश्चात्ताप करण्यासच सांगितले आहे.

## शंभर टक्के खरा रस्ता

**मुमुक्षु :** म्हणजे माफी मागितल्यामुळे आपल्या पापांचे निवारण होते का?

**दादाश्री :** त्यामुळेच पापांचे निवारण होते. दुसरा कोणताच उपाय नाही.

**मुमुक्षु :** तर मग वारंवार माफी मागत राहणार आणि वारंवार पाप करत राहणार.

**दादाश्री :** वारंवार माफी मागायची सूट आहे. वारंवार माफी मागावी लागते. हो! शंभर टक्के हाच रस्ता आहे! या जगात माफी मागितल्याशिवाय अन्य कोणत्याही रस्त्याने सुटू शकणार नाही. प्रतिक्रमण केल्याने सर्व पापे धुतली जातात.

**मुमुक्षु :** प्रतिक्रमण केल्याने पापांचा नाश होतो. या मागे कोणते विज्ञान आहे?

**दादाश्री :** अतिक्रमणाने पाप होते आणि प्रतिक्रमणाने पापांचा नाश होतो, परत फिरल्यामुळे पापांचा नाश होतो.

**मुमुक्षु :** तर मग कर्माचा नियम इथे कुठे लागू होतो? आपण माफी मागतो आणि त्या कर्मापासून सुटका करून घेतो, तर यात कर्माचा नियम राहिलाच नाही ना?

**दादाश्री :** हाच तर कर्माचा नियम आहे! माफी मागणे हाच कर्माचा नियम आहे.

**मुमुक्षु :** मग तर सर्वजण पाप करत राहतील आणि माफी मागत राहतील.

**दादाश्री :** हो, पाप करत राहायचे आणि माफी मागत राहायची, हेच भगवंतांनी सांगितले आहे.

**मुमुक्षु :** परंतु अगदी खऱ्या मनाने माफी मागायची ना?

**दादाश्री :** अर्थातच, माफी मागणारा खऱ्या मनानेच माफी मागत असतो, आणि जरी खोट्या मनाने माफी मागितली तरी चालवून घेऊ, पण माफी मागा.

**मुमुक्षु :** मग तर त्याला तशी सवयच लागेल!

**दादाश्री :** सवय लागली तर खुशाल लागू द्या, पण माफी मागा. माफी मागितली नाही तर मात्र संकटात सापडाल. माफी म्हणजे काय? तर प्रतिक्रमण. दोष म्हणजे काय? तर अतिक्रमण.

कर्माचा नियम काय आहे ? अतिक्रमण केले तर त्याचे प्रतिक्रमण करा. समजले का तुम्हाला ?

**मुमुक्षु :** हो.

**दादाश्री :** म्हणून माफी अवश्य मागा आणि दीडशहाण्यांची गोष्ट सोडून द्या. कोणी चुकीचे करत असेल आणि माफी मागत असेल तर त्याला करू द्या ना! 'दिस इज कम्प्लीट लॉ.'

कोणी ब्रँडी पितो आणि म्हणतो, 'मी माफी मागतो', तर मी म्हणेन 'तू माफी माग. माफी मागत रहा आणि पीत रहा.' परंतु मनात ठाम निश्चय कर की 'मला आता ब्रँडी सोडून द्यायची आहे.' अगदी मनापासून निश्चय कर. मग पीत रहा, आणि माफी मागत रहा. अखेर एक दिवस या गोष्टीचा शेवट होईल (ब्रँडीचे व्यसन सुटेल). माझे हे विज्ञान शंभर टक्क्यांचे आहे.

हे तर विज्ञान आहे. परिणाम झाल्याशिवाय राहणार नाही. त्वरित फळ देणारे आहे. 'दिस इज द कॅश बँक ऑफ डिव्हाइन सोल्यूशन.' हीच आहे 'कॅश बँक!' दहा लाख वर्षात कधी निघालीच नाही! दोन तासात मोक्ष घेऊन जा!! येथे तुम्ही जे मागाल ते द्यायला मी तयार आहे, मागता आले पाहिजे.

## आम्ही सुख द्यायलाच आलो आहोत

अतिक्रमण म्हणजे एखाद्याला थोडेसेही दु:ख होणे. बहुतेक तर तसे दु:ख होत नसते, परंतु गर्भित दु:ख होत असते. गर्भित दु:ख होणे म्हणजे आतल्या आत दु:ख होणे. परंतु याचा अर्थ असा करू नये की समोरच्याला काही समजत नाही, किंवा पोहोचत नाही. गर्भित दु:ख देखील नसावे. आम्ही जीवनात कोणाला किंचितमात्रही दु:ख दिले नाही, परंतु असे गर्भित दु:ख जरी दिले गेले असेल तरी आम्ही त्याची माफी मागतो. आम्ही दु:ख द्यायला आलेलो नाहीत. सुख द्यायला आलेलो आहोत.

## काय अनिवार्य आणि काय ऐच्छिक ?

**दादाश्री :** आम्ही येथे आलो, हे अनिवार्य की ऐच्छिक ?

**मुमुक्षु :** ऐच्छिक.

**दादाश्री :** नाही, हे तर कपाळावर (नशिबात) लिहिलेले अनिवार्य होते. आणि ऐच्छिक काय आहे ? या भाऊने ठोसा मारला ते अनिवार्य आहे, पण त्याने त्याचे प्रतिक्रमण करायचे की नाही ते मात्र ऐच्छिक आहे.

पाच हजार रुपये (दानात) दिले, ते मेयरच्या दबावामुळे दिले. त्याबद्दल 'येथे' यश मिळेल. परंतु 'तेथे' काही मिळणार नाही. आणि स्वत:च्या मर्जीने दिले तर त्याचे फळ 'तेथे' मिळेल, ते ऐच्छिक आहे.

ऐच्छिक काय आहे ? हे सारे अनिवार्यच आहे. बाहेर जी क्रिया केली ती अनिवार्य आहे आणि आत कोणत्या भावाने ती क्रिया केली ते ऐच्छिक आहे. बाहेर कोणी दोन थोबाडीत मारल्या, ते अनिवार्य होते परंतु आत पश्चात्ताप केला म्हणजे ऐच्छिक सुधारले, आणि जर आतील भाव बिघडले, तर ऐच्छिक बिघडले.

जर काही दोष झाला असेल आणि त्याचा पश्चात्ताप केला, खूपच पश्चात्ताप केला तर तो दोष निघून जातो, परंतु त्याला 'सोडविणारा' पाहिजे.

## भावसत्ता, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करण्याची

तुम्ही आता कुणाच्या तरी शेतातली भाजी चोरण्याची इच्छा करू नका. हवी असेल तर मागून घ्या. बालपणी जेव्हा आम्ही बारा-तेरा वर्षाचे होतो, तेव्हा लोकांच्या शेतातून बडीशेप चोरून आणत असू. नंतर जेव्हा त्याचा खूप पश्चात्ताप केला तेव्हा सर्व स्वच्छ झाले.

क्रमिक मार्गात प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करण्याचीच भावसत्ता आहे.

द्रव्य कोणाच्याही ताब्यात नाही. केवळ भावच आपल्या ताब्यात

आहेत. म्हणून चूक झाली तर पश्चात्ताप करा. आमचे द्रव्यही चांगले आहे आणि भावही चांगले आहेत. तुमचे द्रव्य स्वच्छंदसहित आहे म्हणून तुम्हाला पश्चात्ताप करावा लागेल.

भगवंत काय अशा गोष्टीत हस्तक्षेप करतात? ते तर ज्ञाता, द्रष्टा, परमानंदी आहेत, सर्व काही पाहतात आणि जाणतात. मग काय ते कुणाला प्रेरणा देतात? अरे, जेव्हा आत चोरी करण्याची गाठ फुटते, तेव्हा त्याला चोरी करण्याचा विचार येतो. गाठ जर मोठी असेल तर त्याला जास्त विचार येतात आणि तो चोरी करतो सुद्धा. आणि शिवाय म्हणतो, 'मी किती चलाखीने चोरी केली!' असे म्हटल्याने चोरीच्या गाठीला पोषण मिळतो. पोषण मिळाल्याने नवीन बीजे पडतात आणि चोरीची गाठ आणखी मोठी होत जाते. या उलट दुसरा एखादा चोर चोरी तर करतो, परंतु त्याच वेळी आत त्याच्या मनात खटकत राहते की 'मी चोरी करतो, ते फार चुकीचे आहे, पण काय करू, पोटासाठी मला असे करावे लागते आहे.' म्हणजे तो हृदयपूर्वक पश्चात्ताप करत राहतो, त्यामुळे चोरीच्या गाठीला पोषण मिळत नाही. आणि पुढील जन्मासाठी 'चोरी करायची नाही' अशी बीजे पेरतो, त्यामुळे मग पुढील जन्मात तो चोरी करीत नाही.

## हार्टिली पश्चात्ताप

एका व्यक्तीला चोरी केल्यावर पश्चात्ताप होतो, त्याला निसर्ग सोडून देतो. पश्चात्ताप केला म्हणून देव त्याला गुन्हेगार मानत नाही, परंतु या जगातील लोक त्याला जी शिक्षा देतात ती मात्र त्याला या जन्मातच भोगावी लागते.

**प्रश्नकर्ता :** खरे तर सगळेजण असेच मानतात की खोटे बोलणे हे पाप आहे, मांसाहार करणे, असत्य बोलणे, चुकीचे वागणे हे सर्व वाईट आहे. तरीही लोक अशा चुका करतच राहतात, असे का?

**दादाश्री :** लोक तर हे सर्व चुकीचे आहे, असे करू नये, असे वरवर बोलतात. 'सुपरफ्लुअस' बोलतात. 'हार्टिली' (हृदयपूर्वक) बोलत

नाहीत. जर 'हार्टिली' बोलले ना, तर तो दोष काही काळानंतर निघूनच जातो! तुमच्याकडून जरी कितीही वाईट दोष झाला असेल परंतु तुम्हाला त्याचा खूप 'हार्टिली' पश्चात्ताप होत असेल तर तो दोष पुन्हा होणार नाही. आणि जरी पुन्हा झाला तरीही हरकत नाही, पण तुम्ही खूप पश्चात्ताप करत राहा.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे माणूस सुधारण्याची शक्यता आहे?

**दादाश्री :** हो, खूप शक्यता आहे, परंतु सुधारणारा असला पाहिजे. यासाठी एम.डी., एफ.आर.सी.एस. असे डॉक्टर्स चालणार नाहीत, घोटाळेवाले चालणार नाहीत, यात तर 'सुधारणारा' पाहिजे.

आता काही लोकांना असे वाटते की खूप पश्चात्ताप करूनही पुन्हा तोच दोष होत राहतो. त्यांना वाटते की 'इतका पश्चात्ताप केला तरी पण पुन्हा असे का होते? खरे तर हार्टिली पश्चात्ताप केला असेल तर त्याने दोष नक्कीच निघून जातो. ज्ञान घेतले तर संस्कार बदलतात.

प्रतिक्रमणाने हलकेपणा वाटतो. आणि पुन्हा तो दोष झाल्यावर त्याला पश्चात्ताप होत राहतो.

संस्कार केव्हा बदलतात? तर रात्रंदिवस पश्चात्ताप करू तेव्हा. किंवा मग आपले ज्ञान मिळाले तरी संस्कार बदलतात.

पश्चात्ताप ही काही साधीसुधी गोष्ट नाही, पश्चात्ताप व्हायलाच हवा.

**प्रश्नकर्ता :** दिवसभर उलट-सुलट, असे-तसे केले आणि मग रात्री पश्चात्ताप केला तर?

**दादाश्री :** हो, मनापासून पश्चात्ताप केला तर.

**प्रश्नकर्ता :** पश्चात्ताप केला आणि दुसऱ्या दिवशी परत तसेच वागत राहिला तर?

**दादाश्री :** हो, तरी पण मनापासून केला तर त्याचे काम होईल.

**प्रश्नकर्ता :** हा जो पश्चात्ताप होतो, तो पूर्व जन्माच्या आयोजनामुळे होतो का?

**दादाश्री :** नाही, या जन्माच्या ज्ञानामुळे पश्चात्ताप होतो.

**प्रश्नकर्ता :** जीवनात आम्ही काही चुकीची कामे केली असतील त्याबद्दल दु:ख वाटते, परंतु पश्चात्ताप होत नाही, तर काय करावे?

**दादाश्री :** त्याबद्दल जे दु:ख वाटते तोच तर पश्चात्ताप आहे ना! तापाशिवाय दु:ख होत नाही. थंडावा असेल तर दु:ख होईल का? हा ताप म्हणजेच दु:ख. दु:ख झाले तरी खूप झाले. पण 'पुन्हा असे करणार नाही' असे तुम्ही म्हणता की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** तुम्हा सर्वांना कोणकोणत्या गोष्टींसाठी पश्चात्ताप होतो ते लिहून आणा. तुमची गाडी कोणत्या स्टेशनवर अडली आहे, ते कळले तर आम्ही तेथे गाडी पाठवून देऊ. पश्चात्ताप झाला की समजावे परत फिरणे सुरू झाले.

कोणतीही क्रिया केल्यावर जो पश्चात्ताप करतो तो एक ना एक दिवस शुद्ध होईलच, हे निश्चित आहे.

## पश्चात्तापापासून प्रतिक्रमणापर्यंत

जगातील लोक माफी मागतात, पण त्याने काही 'प्रतिक्रमण' होत नाही. ही तर येता-जाता 'सॉरी', 'थँक यू' म्हणतात अशी गोष्ट आहे. याचे फारसे महत्व नाही. महत्व तर 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' याचेच आहे.

संसारात आणि मोक्षमार्गात आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान याची आवश्यकता आहे.

**प्रश्नकर्ता :** आमच्याकडून जी पापे झाली आहेत ती भगवंतांच्या मंदिरात जाऊन दर रविवारी कबूल केली तर ती पापे माफ होतील का?

**दादाश्री :** अशा प्रकारे जर पापे धुतली जात असती, तर कोणी आजारी पडलाच नसता ना! मग तर कुठले दु:खच नसणार! परंतु येथे तर अपार दु:खे आहेत. माफी मागण्याचा अर्थ हा आहे की तुम्ही जेव्हा माफी मागता तेव्हा पापाचे मूळ जळून जाते, म्हणून ते परत उगवत नाही. पण त्याचे फळ तर भोगावेच लागेल ना!

**प्रश्नकर्ता :** काही काही मुळे तर परत उगवतात.

**दादाश्री :** हो, नीट जळली नसतील तर परत उगवतील. बाकी, मुळे कितीही जळली तरीही फळ तर भोगावेच लागते. श्रीकृष्ण भगवंतांनाही भोगावे लागले. श्रीकृष्णालाही बाण लागला होता. त्यात कुणाचे काही चालत नाही. मलाही भोगावे लागते.

प्रत्येक धर्मात माफी मागण्याची पद्धत आहे. ख्रिश्चन, मुस्लिम, हिंदू, सर्वात आहे, पण ती वेगवेगळ्या प्रकारे आहे. प्रत्येक धर्मात पश्चात्तापाने सुरुवात होते, ख्रिश्चन, मुस्लिम, सर्वात! आणि आपल्या येथे प्रतिक्रमण असते.

हे सर्व जग तर एक विकल्प आहे. काही धर्मात लोक कानात बोटे घालून 'हो, हल्ला' करतात, तेही बरोबर आहे. आणि ख्रिश्चनांमध्ये काय करतात? कधी चर्चमध्ये गेला आहात का? का बरे? त्यात काय अडचण आहे? तुम्ही काळा कोट घालून आत गेलात तर कोणी विचारणारही नाही. ते लोक दर रविवारी चर्चमध्ये जातात, आणि सहा दिवसात जे काही दोष झाले असतील, त्याबद्दल वारंवार माफी मागतात, पश्चात्ताप करतात.

आपले लोकच पश्चात्ताप करत नाहीत. ते करतात पण बारा महिन्याने एकदाच करतात. त्या दिवशी तर फर्स्ट क्लास नवनवीन कपडे आणून घालतात.

**मुमुक्षु :** मानसिक पश्चात्ताप करणे, हेच प्रतिक्रमण आहे का?

**दादाश्री :** जसे सांगितले आहे त्याप्रमाणे करा. त्याला थोबाडीत

मारल्याने दु:ख झाले तर 'आता पुन्हा असे मारणार नाही, माझी चूक झाली' अशा प्रकारे पश्चात्ताप करा. किंवा कुणावर रागावले, दु:ख दिले तर, 'पुन्हा रागावणार नाही' असे म्हणून क्षमा मागा.

## हे आहे धर्मध्यान

**मुमुक्षु :** हे जे 'प्रतिक्रमण, पापाचे प्रायश्चित्त' आहे, ते जरा सविस्तर समजवा ना.

**दादाश्री :** प्रतिक्रमण म्हणजे काय? दोष झाल्यावर त्वरित तो दोष 'शूट ऑन साइट' करून टाका. त्याला प्रतिक्रमण म्हणतात. तुम्ही तर बारा महिन्यानंतर करता ना?

**मुमुक्षु :** मला नीट प्रतिक्रमण करता येत नाही, पण मी भाव प्रतिक्रमण करतो.

**दादाश्री :** भाव प्रतिक्रमणामध्ये तुम्ही काय करता?

**मुमुक्षु :** असे वाटले की हा दोष झाला आहे, तर आत्म्याच्या साक्षीने प्रायश्चित्त करतो.

**दादाश्री :** असे होय? दिवसभरात किती वेळा करता?

**मुमुक्षु :** रात्री झोपताना करतो, चार पाच वेळा करतो.

**दादाश्री :** एवढे तुमच्या धर्मध्यानात मोडते. फक्त तुमचे तेवढे सेकंद धर्मध्यानात मोडतात. तुम्ही सांगत आहात तसे जर करत असाल तर ते धर्मध्यानात मोडते.

**मुमुक्षु :** पापाचे प्रायश्चित्त कसे करावे? मी ज्याप्रकारे करतो, ते योग्य आहे काय?

**दादाश्री :** ते कसेही असले तरी कच्चे आहे. तरी पण त्यामुळे थोडेसे धर्मध्यान होते. तुमची दानत काय आहे, हे पाहिले जाते.

**मुमुक्षु :** परंतु मी करू की नको?

**दादाश्री :** आता तुम्ही जे करत आहात ते बरोबर आहे, परंतु आम्ही शिकवल्यानंतर, आम्ही जे नवीन शिकवू, तसे करा, सध्या तुम्ही जे करत आहात ते बरोबर आहे.

**मुमुक्षु :** कवी कलापीने म्हटले आहे:

*''हा, पस्तावो विपुल झरणूं, स्वर्गथी उतर्युं छे,*
*पापी तेमां डूबकी दईने पुण्यशाली बने छे!''*

(हा पश्चात्तापाचा विपुल धबधबा स्वर्गातून उतरला आहे; पापी त्यात डुबकी मारून पुण्यशाली होतो!)

यावर आपले काय म्हणणे आहे?

**दादाश्री :** हे तर स्थूल पापी लोकांसाठी आहे. त्यांची सर्व स्थूल पापे झाली आहेत, म्हणून त्याचे प्रायश्चित्त करत आहेत.

**मुमुक्षु :** त्यात आत्म्याचे लक्ष (जागृती) आहे का?

**दादाश्री :** नाही, त्यात आत्म्याचे लक्ष राहत नाही, यात तर व्यावहारिक लक्ष आहे. जे लोक सरळ आहेत, त्यांना हे सर्व आवडत नाही म्हणून ते पश्चात्ताप करतात. जसे प्रत्येक धर्माचे लोक प्रायश्चित्त करतात तसेच तुम्हीही करता.

**मुमुक्षु :** परंतु व्यवहारशुद्धी तर होते ना?

**दादाश्री :** नाही, खरे तर प्रतिक्रमणच झाले पाहिजे.

## 'नऊ कलमां'द्वारे सर्वश्रेष्ठ प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** पापे दूर करण्यासाठी प्रायश्चित्ताशिवाय दुसरा कोणता उपाय आहे?

**दादाश्री :** पापे दूर करण्यासाठी प्रायश्चित्ताशिवाय दुसरा कोणताही उपाय नाही. ही सर्व पापे म्हणजे काय? आपण पाप कशाला म्हणतो? तर तुम्ही जे काही करत आहात त्यात गैर काही नाही. हे सर्वजण येथे

बसले आहेत, तर त्याला आता कुणाची काहीच हरकत नाही. मात्र जर यातील एखादी व्यक्ती आपल्याला म्हणाली, 'तुम्ही असे उशिरा का येता?' तर त्या व्यक्तीने अतिक्रमण केले असे म्हणावे लागेल. 'लोकांना हे आवडत नाही, त्यांना वाटते 'हे असे का बोलले?' याला अतिक्रमण केले असे म्हणतात.

लोक अतिक्रमण करतात म्हणूनच भगवंतांनी प्रतिक्रमण करायला सांगितले आहे. अर्थात प्रायश्चित्त कोणत्या गोष्टीचे करावे? तर लोकांना जे आवडत नाही, ज्यामुळे त्यांना दुःख होते, अशा गोष्टींसाठी प्रायश्चित्त करावे. जे आवडत असेल त्यासाठी नाही.

म्हणजे प्रायश्चित्त करावे लागते. तू करतोस का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** दादा भगवानांच्या नावाने प्रतिक्रमण करतोस की नाही?

**प्रश्नकर्ता :** तुम्ही जे पुस्तक दिले आहे, त्यात सांगितल्या प्रमाणे करतो, नऊ कलमे करतो.

**दादाश्री :** करतोस ना? ते प्रतिक्रमणच आहे. सर्वात मोठे प्रतिक्रमण आहे, दादा भगवानांची जी नऊ कलमे दिली आहेत, ती संपूर्ण जगासाठी कल्याणकारी प्रतिक्रमण आहेत.

**प्रश्नकर्ता :** हे खरे आहे का की, पश्चात्तापाच्या घड्यात कसलेही पाप असले तरी...

**दादाश्री :** ते हलके होऊन जाते. पश्चात्ताप केल्यामुळे.

**प्रश्नकर्ता :** पूर्णपणे जळून खाक होत नाही का?

**दादाश्री :** पूर्णपणेही जळतात. अशी कितीतरी पापे तर जळून नष्टही होतात. पश्चात्तापाचा साबण असा आहे की तो बहुतेक सगळ्या कपड्यांवर काम करतो.

**प्रश्नकर्ता :** आणि त्यातही दादाजी आपल्यासमोर (पश्चात्ताप) केला तर मग काय उरेल?

**दादाश्री :** कल्याणच होईल. तात्पर्य, जगात पश्चात्तापाच्या साबणासारखा दुसरा कुठलाही साबण नाही.

## पश्चात्तापाने शिक्षा घटते

**प्रश्नकर्ता :** पापांना निर्मूळ करण्यासाठी प्रायश्चित्त हाच उत्तम मार्ग आहे. ही फार सुंदर गोष्ट आहे, असे पुराणात संतांनी म्हटले आहे. एखाद्या माणसाने खून केल्यानंतर पश्चात्ताप केल्यावर त्याला माफी मिळू शकते का?

**दादाश्री :** खुनी माणूस जर खून केल्यावर खुश होत असेल, तर त्याची शिक्षा जी बारा महिन्यांची असेल ती तिप्पट, म्हणजे तीन वर्षांची होईल, आणि जर खून केल्यानंतर त्याने पश्चात्ताप केला तर त्याची बारा महिन्यांची शिक्षा कमी होऊन सहा महिन्यांची होईल. कोणतेही चुकीचे कार्य केल्यानंतर जर खुश होत असाल तर ते कार्य तीन पटीने वाढून फळ देईल. आणि चुकीचे कार्य केल्यानंतर पश्चात्ताप करत असाल की, 'हे मी चुकीचे काम केले' तर शिक्षा कमी होते. आणि चांगले काम करून खुश होत असाल तर सर्वांनाच अधिक लाभ होतो.

## मंत्र आहेत वैज्ञानिक

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्यामुळे कदाचित नवीन पापे बांधली जाणार नाहीत, परंतु जुनी पापे तर भोगावीच लागतील ना?

**दादाश्री :** तुमचे म्हणणे बरोबर आहे की, 'प्रतिक्रमण केल्यामुळे नवीन कर्मबंधन होत नाही, आणि जुनी पापे भोगल्यानंतरच सुटका होते.' पण हे भोगणे निश्चितच कमी होते, त्यासाठी आम्ही उपाय दाखवला आहे की तिन्ही 'मंत्र एकत्र म्हणा', त्यामुळेही भोगवट्याचे फळ कमी होईल. एखाद्याच्या डोक्यावर दीड मणांचे ओझे असेल,

आणि तो बिचारा कंटाळून गेला असेल, पण तेवढ्यातच त्याला अशी एखादी वस्तू दिसली आणि त्याची नजर तिथे गेली की तो आपले दु:ख विसरून जातो. ओझे असूनही त्याला दु:ख जाणवणार नाही. तसेच या त्रिमंत्रांचे आहे, ते म्हटल्यामुळे ओझे (दु:ख) जाणवतच नाही. म्हणजे हे मंत्र सहाय्य करणारे आहेत. तुम्ही कधी त्रिमंत्र म्हटले होते का? एकदाच त्रिमंत्र म्हटले होते? आता जरा जास्त वेळा म्हणाल ना, तर हलकेही वाटेल आणि भीती वाटत असेल तर तीही निघून जाईल.

**प्रश्नकर्ता :** विज्ञानाच्या दृष्टीने पाहिले तर माणूस जेव्हा एखादे पाप करतो, किंवा चूक करतो, तेव्हा त्याला त्याची शिक्षा मिळाली पाहिजे, मग मंत्रामुळे त्याचे पाप कसे नष्ट होईल?

**दादाश्री :** मंत्र म्हणजे काय आहे, तर आपण त्या पुरुषांची भक्ती करतो. कुठल्या पुरुषांची? जगातील सर्वश्रेष्ठ पुरुषांची भक्ती करतो, त्यावेळी आत खूप शक्ती उत्पन्न होतात.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही त्यांची खूप भक्ती केली, स्तुती केली, त्यांची व्हायब्रेशन्स् (स्पंदने) घेतली, हे बरोबर आहे पण शेवटी पाप तर तसेच राहिले ना?

**दादाश्री :** त्यांची भक्ती केल्याने, त्यांची कीर्तन भक्ती केल्याने सर्व पापे भस्मीभूत होऊन जातात. तुम्हाला पापे नष्ट करायची आहेत का? मी ते एका तासातच करून देईन 'विदिन वन अवर.'

पाप सुरीने कापायचे नसते, त्याची स्लाइस (फोड) करायची नसते. ते तर भस्मीभूत होऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** पाद्री सुद्धा म्हणतात, 'आमच्या समोर कन्फेशन केले तर सर्व पापे नष्ट होतात.

**दादाश्री :** कन्फेशन करणे हे काय सोपे आहे? तुम्ही कन्फेशन करू शकाल का? तो तर रात्रीच्या अंधारात कन्फेशन करत असतो, उजेडात चेहरा दाखवत नाही. म्हणेल, 'मी रात्रीच्या अंधारात कन्फेशन करीन.'

आणि माझ्या समक्ष तर चाळीस हजार लोकांनी त्यांचे सर्व कन्फेशन केले आहे, बऱ्याच मुलींनीसुद्धा! एकूण एक गोष्टींचे कन्फेशन केले आहे! असे लिहूनही दिले आहे सर्व. उघडपणे कन्फेशन केले तर मग पापांचा नाश होणारच ना! कन्फेशन करणे सोपे नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हे प्रतिक्रमण आणि कन्फेशन, या दोन्ही गोष्टी सारख्याच झाल्या ना?

**दादाश्री :** नाही, दोन्ही सारख्या नाहीत. प्रतिक्रमण तर जेव्हा अतिक्रमण होते तेव्हा वारंवार करायचे, डाग (दोष) धूत राहायचे. पुन्हा डाग पडला तर पुन्हा धुवायचे आणि पाप कन्फेस करणे म्हणजे पाप जाहीर करणे, या दोन्ही गोष्टी वेगळ्या आहेत.

**प्रश्नकर्ता :** मग प्रतिक्रमण आणि पश्चात्ताप यात काय फरक आहे?

**दादाश्री :** पश्चात्ताप म्हणजे सामान्यपणे खेद करणे. ख्रिश्चन लोक रविवारी चर्चमध्ये जाऊन पश्चात्ताप करतात. जी पापे झाली त्यासाठी सामूहिक पश्चात्ताप करतात. आणि प्रतिक्रमण तर, ज्याने गोळी मारली, ज्याने अतिक्रमण केले, त्याने करावे. अगदी त्याच क्षणी, 'शूट ऑन साइट' दोष धुऊन टाकावे.

**प्रश्नकर्ता :** 'आत्म्याची निंदणी' करायची, असे जे म्हणतात म्हणजे नक्की काय?

**दादाश्री :** निंदणी म्हणजे स्वत:ची चूक स्वीकारणे, माफी मागणे, पश्चात्ताप करणे, त्याला 'निंदणी करणे' असे म्हणतात. (मूळ) आत्म्याची निंदणी करायची नाही, प्रतिष्ठित आत्म्याची करायची आहे.

## चर्तुगतीच्या दोषांची साखळी प्रतिक्रमणाने तुटते

प्रतिक्रमण केल्याशिवाय मोक्ष मार्गच नाही, प्रतिक्रमण नसेल तर तो मार्गच चुकीचा आहे. जैन लोकांनी जर यथार्थ प्रतिक्रमणे केली आणि कषायांची बांधलेली गाठ सैल केली, तर पुढील जन्मात ती गाठ

त्वरित निघून जाईल. आम्ही जैन कुणाला म्हणतो, की जो क्रोध-मान-माया-लोभ होताच त्यांचे त्वरित प्रतिक्रमण करतो, भगवंतांच्या आज्ञेचे पालन करतो त्याला. तीर्थंकर हे दाखवून गेले आहेत. कारण मनुष्य जात दोष केल्याशिवाय राहत नाही (आत्मज्ञानी सोडून). देवी-देवतादेखील दोष करतात, मनुष्य दोष करतात, चारही गतीतील जीव दोष करतात, दोषी झाल्याशिवाय राहत नाहीत. त्यांचे दोष संपविण्याचा उपाय काय? तर 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान'!

जग कोणत्या आधारावर उभे आहे? अतिक्रमण दोषामुळे हे जग उभे आहे. जे दररोज प्रतिक्रमण-प्रत्याख्यान करतात त्यांना साधू, उपाध्याय, आचार्य म्हणतात. हे जग कोणाला मोक्षाला जाऊ देईल असे नाही. सर्व बाजूने जखडूनच ठेवते. पण प्रतिक्रमण केल्याने त्याची पकड सुटून जाते. म्हणून महावीर भगवंतांनी 'आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान' या तीन गोष्टी एकाच वाक्यात दिल्या आहेत. दुसरा कोणताच रस्ता नाही. आता स्वतः प्रतिक्रमण केव्हा करू शकतो? तर जेव्हा स्वतःला जागृती असेल तेव्हा. 'ज्ञानी पुरुषां'कडून ज्ञान प्राप्त झाल्यावर जागृती उत्पन्न होते.

'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' हे महावीर भगवंतांच्या सिद्धांताचे सार आहे, आणि अक्रममध्ये 'ज्ञानी पुरुष' हेच सार आहे, एवढेच समजायचे आहे. आज्ञा तोच धर्म, आणि आज्ञा तेच तप आहे, पण मनुष्य ढवळाढवळ केल्याशिवाय राहतच नाही ना! अनादि काळापासून वाईट सवय लागली आहे.



# [ 3 ]
# ती प्रतिक्रमणे महावीरांची नाहीत

## हे आहे धर्माचे सार

जर खरी प्रतिक्रमणे असतील तर साऱ्या जैन धर्माचे सारच प्रतिक्रमण-प्रत्याख्यान आहे.

**मुमुक्षु :** ही फार मोठी वैज्ञानिक गोष्ट आहे.

**दादाश्री :** हो, फार वैज्ञानिक गोष्ट आहे. प्रतिक्रमण तर सर्व धर्मांमध्ये आहे. परंतु जे वैज्ञानिक आहे ते प्रतिक्रमण-प्रत्याख्यान आहे! ही एक वैज्ञानिक पद्धत आहे आणि यामुळे 'क्रोध-मान-माया-लोभ' कमी होतात. 'क्रोध, मान, माया, लोभ' हे स्वतःच्याच ताब्यात आहेत, परंतु लोक त्यांना कमी करू इच्छित नाहीत.

प्रत्येक ठिकाणी पश्चात्तापाने सुरुवात होते. इंग्रजांची सुरुवात पश्चात्तापाने होते. मुस्लिम लोक पण पश्चात्ताप करतात. लोक काय म्हणतात, जे जे काही आम्ही केले, त्या सगळ्यांबद्दल आम्ही पस्तावा करीत आहोत, पश्चात्ताप करीत आहोत, आणि आपण येथे प्रतिक्रमणाच्या रूपाने हे दिले आहे. यात आम्ही सांगतो की, 'अतिक्रमण झाले म्हणून प्रतिक्रमण करा.' अतिक्रमण म्हणजे व्यवहारात जितके हवे त्यापेक्षा जास्त झाले म्हणून त्याचे प्रतिक्रमण करा.

**मुमुक्षु :** आमच्याकडून कधी कधी हस्तक्षेप केला जातो किंवा

आम्ही सेन्सिटिव (संवेदनशील) होऊन जातो, तर ते थांबविण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण आणि पश्चात्ताप करावे, आणि भावना करावी की 'असे होता कामा नये, आणि असे व्हायला हवे.' आपल्या त्या पुस्तकातील 'नऊ कलमें' ज्यांना समजली त्यांचे कल्याणच झाले!

## प्रतिक्रमण तर रोखच असावे

नाहीतर मग भगवंतांनी तर सांगितले आहे, की 'असे प्रतिक्रमण करत राहावे.'

**मुमुक्षु :** अनादि काळापासून प्रतिक्रमण तर करत आलो आहोत, तरी ही सुटका कशी काय झाली नाही?

**दादाश्री :** कारण खरी प्रतिक्रमणे केली नाहीत. जर खरे 'प्रतिक्रमण आणि खरे प्रत्याख्यान' केले तर त्याची सुटका होतेच. प्रतिक्रमणे 'शूट ऑन साइट' व्हायला हवीत. समजा माझ्याकडून एखादा शब्द जरा चुकीचा बोलला गेला, तर आत माझे प्रतिक्रमण होऊनच जायला हवे, लगेचच, 'ऑन दी मोमेंट.' यात उधारी चालत नाही. शिळे (पेंडिंग) ठेवायचेच नाही. हे प्रतिक्रमण शिळे ठेवायचे नसते. म्हणजे 'शूट ऑन साइट'च प्रतिक्रमण व्हायला हवे. तुम्ही कसे प्रतिक्रमण करता? रोख, 'शूट ऑन साइट' करता की शिळे ठेवता?

**मुमुक्षु :** रोख प्रतिक्रमण कोणत्या संयोगासाठी करायचे आणि कसे करायचे?

**दादाश्री :** एक तरी रोख प्रतिक्रमण केले होते का?

**मुमुक्षु :** नाही, अजूनपर्यंत तरी केले नाही. मी दररोज प्रतिक्रमण वाचतो.

## पश्चात्ताप नसलेले प्रतिक्रमण

तुम्ही नवकार मंत्र म्हणता का?

**मुमुक्षु :** हो, नवकार मंत्र म्हणतो, पूर्णपणे स्मरण करतो, सर्वच करतो.

**दादाश्री :** तरी पण काळजी वाटते?

**मुमुक्षु :** रोजच चार-पाच तरी सामायिक करतो.

**दादाश्री :** वा, वा, वा! चार, पाच सामायिक करता?

**मुमुक्षु :** आणि सकाळचे आणि संध्याकाळचे दोन्ही वेळचे प्रतिक्रमण करतो.

**दादाश्री :** प्रतिक्रमण म्हणजे तर पश्चात्ताप करायचा असतो, पश्चात्ताप कशाबद्दल करता?

**मुमुक्षु :** पश्चात्ताप करायला जमत नाही, सर्व क्रिया करत राहतो.

**दादाश्री :** प्रतिक्रमण म्हणजे परत फिरणे. जी पापे केली असतील, क्रोध केला असेल, त्याबद्दल पश्चात्ताप करणे याला प्रतिक्रमण म्हणतात.

**मुमुक्षु :** जे काही पुस्तकात लिहिलेले असते, सूत्र वगैरे ते सर्व आम्ही पाठ करतो.

**दादाश्री :** ते सर्व पाठ करून काय उपयोग? तसे तर रेडियो देखील पाठ करतो ना? रोज दिवसभर रेडियो बोलतच असतो.

## 'याला' खरे म्हणत नाहीत

**मुमुक्षु :** या साऱ्या प्रवृत्ती...

**दादाश्री :** मग कुणाला काठीने का मारता? मूळ गुन्हेगाराला तर मारतच नाही आणि तिसऱ्यालाच मारता. मग जो सापडेल त्याला मारता. मूळ गुन्हेगाराला पकडा ना?

**मुमुक्षु :** मूळ गुन्हेगार बाहेर नाहीच ना? स्वत:च आहे ना?

**दादाश्री :** याला प्रतिक्रमण म्हणतच नाहीत. या प्रतिक्रमणाला

तर क्रूड फॉर्म (कच्चे, अपरिपक्व) म्हणतात, शिवाय बारा महिन्यांचे सर्व एकत्र करून म्हणतात की 'आम्ही प्रतिक्रमण केले, ते तर अजूनच जास्त क्रूड!'

प्रतिक्रमण कशाला म्हणतात? बाराही महिने जर (खरे) प्रतिक्रमण केले तर सर्व दोष कमी होतात. इथे तर आयुष्यभर प्रतिक्रमण करता करता साधू-संन्यासी ऐंशी वर्षांचे, साठ वर्षांचे, सत्तर वर्षांचे झाले आहेत, तरी पण एकही दोष कमी झाला नाही, उलट वाढले आहेत.

## पोपटासारखे प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** सांप्रदायिक प्रतिक्रमण आणि सामायिक, यात किती तथ्य आहे?

**दादाश्री :** काहीच नाही, मागधी भाषेत 'प्रतिक्रमण' केले तर जसे पोपट 'राम-राम' करतो तसे हे आहे. पोपट 'राम-राम' बोलतो म्हणून काय तो मोक्षाला जाईल? अर्थात, जे मागधी भाषेत प्रतिक्रमण करतात त्यांची दशा पोपटासारखी झाली आहे!

**प्रश्नकर्ता :** सांप्रदायिकमध्ये तर करावे लागते ना दादा?

**दादाश्री :** नाही, नाही, ते चुकीच्या रस्त्यावर चालत आहेत, पण आपण चुकीच्या रस्त्यावर का चालावे? आपण काय पोपट आहोत? आपण मनुष्य आहोत. समजल्याशिवायच जे काही करतात त्यांना पोपट म्हणतात. इथे मी तुम्हाला काय सांगू इच्छितो की तुम्ही समजून उमजून माझ्या बरोबर गा. हा (मनुष्य) जन्म समजण्यासाठी आहे. महाराज मागधी भाषेत गातच राहतात. त्यात स्वतः महाराजांनाही समजत नाही आणि त्यांच्याबरोबर गाणाऱ्या लोकांनाही समजत नाही. सारे पोपटच पोपट! राम-राम! आयाराम! गयाराम!

ते प्रतिक्रमण करतात, पण त्यांची प्रतिक्रमणे कशी असतात की करणाराही जाणत नाही, आणि करविणाराही जाणत नाही, की हे आहे तरी काय? तुम्ही केले होते का? केले होते? पण समजलेच नाही ना?

प्रतिक्रमण कशाला म्हणतात, तर जे केल्याने दोष कमी होतात. जे केल्याने दोष वाढत असतील, त्याला प्रतिक्रमण कसे म्हणता येईल? भगवंतांनी असे (प्रतिक्रमण) सांगितले नव्हते. भगवंत म्हणतात, 'तुम्हाला समजेल अशा भाषेत प्रतिक्रमण करा.' आपापल्या भाषेत प्रतिक्रमण करा. नाही तर लोकांना प्रतिक्रमण पावणार नाही. हे सर्व मागधी भाषेत ठेवले आहे. आता ज्यांना (स्वत:ची) गुजराती भाषाही नीट समजत नाही, ते जर मागधी भाषेत प्रतिक्रमण करतील तर त्यांना काय फायदा होईल? आणि साधू, आचार्यांनाही हे समजत नाही, त्यांचे दोषही कमी झाले नाहीत. तर ही अशी परिस्थिती आहे.

भगवंतांनी फक्त नवकार मंत्रच मागधी भाषेत बोलण्यास सांगितले होते, आणि तोसुद्धा समजून बोला. कारण ते भगवंतांचे शब्द आहेत. तेव्हा फक्त त्या नवकार मंत्राचा अर्थ समजून घेतला, एवढेच. पण प्रतिक्रमण करण्यासाठी तर प्रथम त्याचा अर्थ समजून घ्यावाच लागेल की 'मी हे प्रतिक्रमण करत आहे, पण कशाचे? चंदुभाईने माझा अपमान केला, किंवा मी कोणाचा अपमान केला, त्यासाठी मी प्रतिक्रमण करत आहे.'

प्रतिक्रमण म्हणजे कषायांना (क्रोध, मान, माया, लोभ) समाप्त करून टाकणे.

## हा धर्म आहे की अधर्म?

**प्रश्नकर्ता :** क्रमिक मार्गात अहंकाराचे शुद्धीकरण कसे करतात?

**दादाश्री :** तिथे तर जसे साबणाने मळ काढतात, तसे मळाने मळ काढतात. म्हणजे प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान दोन्हींचा आश्रय घ्यावा लागतो. निरंतर दिवसभर, आश्रय घ्यावा लागतो. जेव्हा दोन्हींचा निरंतर आश्रय घेतला जातो तेव्हा अहंकाराचे शुद्धीकरण होते. तोपर्यंत शुद्धीकरण होत नाही.

म्हणूनच क्रोध-मान-माया-लोभ वाढले आहेत. मधल्या बावीस तीर्थंकरांचे शिष्य तर असे विचक्षण होते की ते प्रतिक्षण प्रतिक्रमण-

प्रत्याख्यान करत असत. या महावीर भगवंतांचे शिष्य मात्र जड आणि वक्र आहेत. ते बारा महिन्यानंतरही नीट प्रतिक्रमण करत नाहीत. बारा महिन्यानंतरही 'मिच्छामि दोकडो' बोलून येतात.

याला काय धर्म म्हणणार? तुम्ही जर याला धर्म म्हणाल तर मग अधर्म कशाला म्हणाल? इथे तर अधर्मालाच धर्म म्हणत आहात आणि त्यालाच धर्म समजत आहात. दुसऱ्यांच्या चुका शोधून सांगतात की तुम्ही हे सर्व चुकीचे करत आहात. त्यांच्याबरोबर कुणी कपट केले तर म्हणतील, 'तुम्ही अधर्म करत आहात.' लबाडी केली तर म्हणतील 'तुम्ही अधर्म करत आहात.' तेव्हा आपण म्हणायचे, 'मग तूच लिही ना, की याला धर्म म्हणतात.' पण नाही, भानच नाही ना! बाकी, आत आत्मा आहे, म्हणून दुसऱ्यांच्या चुका ताबडतोब दिसून येतात. समजा आपण सगळेजण उपाश्रयात गेलो असू, मी पण तिथे बसलो असेन, तर महाराज माझे चार पाच दोष तरी पाहतीलच, की डोक्यावर केस ठेवायची काय गरज आहे? केस विंचरायची काय गरज? बोटात अंगठी का घालता? हा हार कशाला घालता? असे सर्व दोष ते शोधून काढतील. कारण दृष्टीच बिघडली आहे. करुणा बाळगण्यासारखी ही स्थिती आहे. ते तर त्यांना डिवचल्यावर लगेच समजते. डिवचल्यावर आपले महात्मा जरासे अस्वस्थ होतात, परंतु ज्ञान लगेच त्यांना ठिकाणावर आणते. पण ते (ज्ञान घेतलेले नाही ते लोक) ठिकाणावर येत नाहीत. त्यांना तोंडावर बोलण्याची भीती वाटत असेल तर ते मनातून मारतील. म्हणजे त्यांना डिवचल्यावर समजते.

## वंक जडाय पच्छिमा

शास्त्रकारांनी लिहिले आहे की 'महावीर भगवंतांचे शिष्य वक्र आणि जड म्हणवतात, आणि ऋषभदेव भगवंतांचे शिष्य भोळे आणि जड', बस, एवढाच फरक आहे. त्यांच्यात एक-दोनसुद्धा अपवाद नाहीत, सर्वच एकसारखे. या दोन्ही तीर्थंकरांच्या शिष्यांना प्रतिक्रमण समजत नव्हते, म्हणून भगवंतांनी त्यांना प्रतिक्रमण करायला सांगितले होते. ही तर शास्त्रामध्ये लिहिलेली गोष्ट आहे, ही काय नुसती थाप नाही.

पहिल्या तीर्थंकरांच्या (ऋषभदेव भगवंतांच्या) शिष्यांना जर सांगितले की तुम्ही नमस्कार करत राहा, तर ते सकाळपर्यंत नमस्कार करतच राहत असत. ते सर्व पाच-पाच हजार फूट, दहा-दहा हजार फूट उंच असत, आणि त्यांचे नाक तर दोनशे-दोनशे फूट लांब असायचे. आणि त्यांना सांगितल्याप्रमाणे ते सकाळपासून संध्याकाळपर्यंत नमस्कार करतच राहायचे. भगवंत जर बंद करण्याचे सांगायला विसरले, तर ते थांबत नसत.

आणि जर महावीर भगवंत आपल्या शिष्यांना सांगून गेले की एक तास सामायिक करा, तर भगवंत बाहेर पडताच तीन मिनिटात ते वाळूच्या घड्याळाकडे बघत राहत!

महावीर भगवंतांनी ओळखले होते की माझ्यामागे जे माझे अनुयायी आहेत, ते सर्व कसे आहेत? विचक्षण नाहीत, मधल्या बावीस तीर्थंकरांचे शिष्य विचक्षण होते. गुजराती भाषेत विचक्षणचा अर्थ काय होतो?

**प्रश्नकर्ता :** खूप चलाख, कोल्ह्यासारखे?

**दादाश्री :** अरे नाही, कोल्ह्यासारखे असा चुकीचा अर्थ कसा केला? विचक्षण म्हणजे जे प्रतिक्षण विचार करतात की 'हे काय झाले, हे काय झाले?' दोष झाला की त्वरित प्रतिक्रमण करतात. त्यांना प्रतिक्रमण करण्यासाठी सांगावे लागत नसे. आपोआपच त्यांचे प्रतिक्रमण होत असे. दोष होताक्षणीच त्यांचे प्रतिक्रमण त्वरित होत असे. विचक्षण म्हणजे त्यांना त्वरित समजे की यांच्याशी बोलताना हा शब्द जरा कडक बोलला गेला. आणि म्हणून ते त्वरित प्रतिक्रमण करत. समजा, आता तुमचे आणि माझे भांडण झाले, तुमच्याबद्दल माझ्या मनात काही खराब विचार आला, तर तिथल्या तिथे, त्याच क्षणी 'ऑन दी मोमेंट' मी त्याचे प्रतिक्रमण करतो. असे 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण केले तर तो दोष संपतो, त्याशिवाय हे दोष कधी संपतील का? जर आपण येथे बारा महिन्यांचे (दोष) गोळा करून प्रतिक्रमण केले तर तेव्हा त्यातला एक तरी दोष आठवेल का?

म्हणजे मधल्या बावीस तीर्थंकरांचे शिष्य खूप समंजस होते. जर

काही कमी-जास्त वाईट बोलले गेले तर लगेच 'ऑन दी मोमेंट' प्रतिक्रमण होऊनच जात असे. फक्त हेच उधारी ठेवतात. म्हणतात जेव्हा पर्युषण येईल ना, तेव्हा मी 'पडकमणुं' करेन. आणि मग तेव्हा तिथे जाऊन 'मिच्छामि दुक्कडम्' करतात.

आता याचा अर्थ कुणाला बरे समजेल? 'पडकमणुं' याचा अर्थच समजत नाहीत ना! यांचे कसे होईल? एक 76 वर्षाचे वृद्ध गृहस्थ होते, आम्ही चार-पाच जण बसलो होतो आणि त्या लोकांना मला दाखवायचे होते. मी म्हणालो, हे लोक पडकमणुं म्हणजे काय ते समजत नाहीत, आणि पडकमणुं करतात. मी त्या वृद्धांना जवळ बोलावून विचारले, 'शेठजी तुम्ही कुठे गेला होता?' 'ते म्हणाले पडकमणुं करून आलो', म्हणून मी त्यांना विचारले, 'पडकमणुं' म्हणजे काय? त्यावर ते म्हणाले, 'मी तर ते चाळीस वर्षांपासून करत आहे, पण मला त्याचा अर्थ माहीत नाही. उद्या महाराजांना विचारून तुम्हाला सांगतो.' तेव्हा मला वाटले की 'धन्य भाग्य माझे! महावीरांना धन्य म्हणावे की कोणाला धन्य म्हणावे! हे जे चालले आहे तेही धन्यच आहे! महाराजांना विचारून सांगतो! आता यांना काय म्हणावे?

तुम्ही 'पडकमणुं' करता की नाही?

**मुमुक्षु :** हो, बारा महिन्यातून एकदा करतो. त्या दिवशी वर्षभराची माफी मागून घेतो.

**दादाश्री :** बस, एवढ्यावरच सर्व काही संपले? एका दिवसातच?

चाळीस वर्षांपासून करत आहात, मग विचारायला नको का? आपण जे करत आहोत, त्याबद्दल विचारले तर कोणी रागवेल का? हे काय आहे? कशासाठी आहे? असे सर्व विचारायला नको का? विचारले तर कोणी रागवेल का तुम्हाला? हे लोक जेव्हा वर्षातून एकदाच प्रतिक्रमण करतात, तेव्हा नवीन कपडे घालून तिथे जातात. अहो, प्रतिक्रमण म्हणजे काय लग्न समारंभ आहे का? प्रतिक्रमण करायचे म्हणजे तर खूप खूप पश्चात्ताप करायचा! तिथे नव्या कपडयांचे काय

काम? हा काय लग्न समारंभ आहे? आणि तेसुद्धा रायशी व देवशी? अहो, सकाळी खाल्लेले संध्याकाळी आठवत नाही, मग प्रतिक्रमण कसे करणार?

वीतराग धर्म कशाला म्हणायचे? तर 'रोज पाचशे-पाचशे प्रतिक्रमण होतात त्याला.' जैन धर्म तर सर्वत्र आहे, पण वीतराग धर्म नाही. वर्षभरातून एकदाच प्रतिक्रमण करणार, त्याला जैन कसे म्हणायचे? तरीही संवत्सरी प्रतिक्रमण करता त्यात काही गैर नाही.

## मिच्छामि दुक्कडम्

**प्रश्नकर्ता :** 'मिच्छामि दुक्कडम्' म्हणजे काय?

**दादाश्री :**'मिच्छामि दुक्कडम्' हा अर्धमागधी भाषेतला शब्द आहे, 'मिच्छामि दुक्कडम्' म्हणजे त्यांना असे म्हणायचे आहे की 'मिथ्या मे दुष्कृतम्', अर्थात माझ्याकडून जी दुष्कृत्ये झाली आहेत, ती मिथ्या होवोत.

परंतु एवढ्याने काही होत नाही. तुम्हाला प्रतिक्रमण तर करावेच लागते. समजल्याशिवायच 'मिच्छामि दुक्कडम्' करत राहतात म्हणून सर्व वाया जाते. मेहनत वाया जाते. 'मिच्छामि दुक्कडम्' म्हणजे जेवढी दुष्कृत्ये झाली आहेत, ती सर्व प्रकारची दुष्कृत्ये मिथ्या होवोत.

**प्रश्नकर्ता :** आम्ही जे काम करत असतो, त्याचे प्रतिक्रमण करण्याची गरज आहे का?

**दादाश्री :** नाही, कोणतेही काम करण्यात घाबरण्याची गरज नाही. हे प्रतिक्रमण सर्व गोष्टींसाठी आहे, हे फक्त दुष्कृत्यासाठी नाही. म्हणून घाबरण्याचे काहीच कारण नाही. दुष्कृत्य कशाला म्हणतात की ज्यामध्ये प्रत्यक्ष हिंसेचा व्यापार होत असतो. उदा. धान्य-किराणाच्या धंद्यात धान्यामध्ये किडे उत्पन्न होतात, असा धंदा जैन लोकांना शोभेल असा नाही. परंतु जर अनिवार्यपणे करावाच लागत असेल तर पश्चात्ताप करावाच लागेल ना, की 'हे देवा, असा धंदा माझ्या वाट्याला का

आला!' म्हणजे त्यात खुशी वाटायला नकोच ना? आपला अभिप्राय तर वेगळा असला पाहिजे ना?

## ज्ञानी समजावतात वीतराग धर्म

आता येथे तर (अंगाला) चोपडण्याचे औषध पिऊन टाकले आणि मग म्हणतात, डॉक्टर वाईट आहे, डॉक्टराने असे केले, त्याने औषधच बरोबर दिले नाही, म्हणून माझा मुलगा बरा झाला नाही. अहो, पण जर असे अंगाला लावण्याचे औषध पिऊन टाकले तर रोग कसा बरा होईल? चोपडण्याचे औषध पिऊन टाकले तर रोगी मरेलच ना? चोपडण्याचे औषध तर विष असते ना! तसेच ह्या लोकांनी चोपडण्याचे औषध पिऊन टाकले आहे आणि आता जैन धर्माला बदनाम करतात.

कुठे तो वीतराग मार्ग! आणि आज त्याचे किती तरी गट झाले आहेत. जो जो अक्कलवंत उपजला तो त्याला वेगळा घेऊन बसला. अरे, तू असे वेगळा घेऊन बसलास तर कदाचित कोणी तुला 'बापजी, बापजी' म्हणणारे भेटतील, पण वेगळे केल्यावर त्याची जबाबदारी कोणाच्या डोक्यावर येईल?

ही चूल वेगळी का केलीस? हे स्वयंपाक घर एकाच चुलीचे होते मग वेगळी चूल का मांडलीस? सर्व अहंकारी लोक विभाजनच करत राहतात.

आपल्या येथे सुद्धा ही दादांची जी वंशावळ आहे ती, दोन-पाच पिढ्यानंतर तिचेसुद्धा वेगवेगळ्या प्रकारे विभाजन करून ठेवतील. 'रिविजनिस्ट होऊन जातील. म्हणून मी आतापासूनच इशारा दिला आहे, बघा हं, नंतर तुम्ही रिविजनिस्ट बनू नका, हे विज्ञान आहे, त्याला जिवंत राहू द्या. हे विज्ञान तुमचे (मोक्षाचे) कार्य सिद्ध करेल.

महावीर भगवंत स्वत:च सांगून गेले आहेत की आमचे सर्व शिष्य वक्र आणि जड होतील, कारण असा नियमच असतो. फक्त या चोवीशीचा नाही तर सर्व चोवीशीचा नियम असाच आहे.

यात जैन धर्माचा काय दोष? कारण हे कालचक्रच असे आहे

म्हणून. या कालचक्रात असेच असते. 'ज्ञानी पुरुष' तर क्वचितच कधी असतात. प्रत्येक पाचव्या आऱ्यात असतातच. नाही तर या जगाच्या अंतिम तीर्थंकरांच्या शासनाचे काय होईल? सारे जंगलच होऊन जाईल. म्हणजे अशी काही ना काही पुष्टी असतेच. पुष्टी असते म्हणून तर हे सर्व चालत राहते. शासन शोभून दिसेल. आता अधिक शोभून दिसेल.

हे शासन आमचे नाही, आम्हाला तर शासनाचा श्रृंगार म्हणतात. महावीर शासनाचा श्रृंगार! हो! आम्हाला त्या शासनाशी काहीच कर्तव्य नाही. हा त्रास आम्ही का ओढवून घेऊ? हे तर महावीर भगवंतांचे शासन आहे. आणि ते तीर्थंकरांना शोभून दिसते. आम्हाला नाही. आम्ही तर केवळ त्यामध्ये पुष्टी देणारे आहोत.

हे आमचे ज्ञान हुबेहूब तेच विज्ञान आहे, परंतु हे गल्लीबोळवाले आहे. लोक सध्या गल्लीबोळात घुसले आहेत. आणि तेही फक्त आडवी गल्लीच नाही, तर आडव्यामध्ये परत सरळ आणि सरळमध्ये मग तिरकी. एकदा हरवला तर पुन्हा सापडणारच नाही. आता तिथपर्यंत हे ज्ञान पोहोचवणे हे काय सोपे नाही.

हे भगवंतांचे ज्ञान किती स्ट्रेटफॉरवर्ड (साधे सरळ) आहे! ही स्ट्रेट लाइन आणि ती स्ट्रेट लाइन. नॉर्थ, नॉर्थ-वेस्ट, साऊथ-वेस्ट असे सगळेच, पण एक्झॅक्ट फिगरवाले. आणि आता कसे आहे? तर गल्लीत-गल्ली आणि त्यातही गल्ली. गोल चकरा मारून पुन्हा तिथल्या तेथेच येतात. म्हणून हे असे अक्रम विज्ञान निघाले आहे.

अक्रम म्हणजे क्रम वगैरे काहीच नाही. काहीच करायचे नाही. ज्ञानीं पुरुषांच्या हजेरीत सर्व पापे भस्मीभूत करू शकतो, एवढी प्रचंड पॉवर असते, एवढी सारी शक्ती असते. अनेक प्रकारच्या शक्ती असतात, तरी पण स्वतः शासनाचे मालक बनायचे नाही. मालक कशाला बनायचे? मालकाला तर किती दु:ख असते. तीर्थंकराव्यतिरिक्त दुसरा कोणीच मालक बनू शकत नाही. आणि तीर्थंकरांना मालकीपणा नसतो, तीर्थंकर तर स्वभावानेच मालक आहेत. तीर्थंकर स्वभावच तसा आहे, आम्हाला

याच्याशी काय करायचे आहे? आम्ही त्याचे निमित्त आहोत. ते पूर्ण करून आम्ही निघून जाऊ.

मधल्या बावीस तीर्थंकरांच्या वेळी जशी जागृती होती, तशी जर कोणाच्या वर्तनात आली तर त्याला भगवंत म्हणायचे. कारण वास्तवात चंदुलालकडून आर्त-रौद्रध्यान तर होत असतात पण तो त्याचे प्रतिक्रमण करतो, म्हणून तो पुन्हा धर्मध्यानात आला असे आपण म्हणू शकतो.

ज्यांचे सर्व प्रकारे असे रोख प्रतिक्रमण होत असते, तेव्हापासून त्यांचे पद भगवंत पदच मानले जाते. ज्यांना आर्तध्यान आणि रौद्रध्यान जास्त प्रमाणात होत नाही, त्यांच्या वही-खात्यात काही लिहिले जात नाही. आणि जरी झाले तरी हरकत नाही, परंतु जर प्रतिक्रमण केले तर त्यांच्या वही-खात्यात ते लिहिले जाणार नाही. असे 'पद' आम्ही दिलेले आहे. भगवंत पद तुमच्या हाती दिले आहे. आता तुम्हाला त्याचा जसा उपयोग करून घ्यायचा असेल तसा करा. आम्ही तर ते देऊन मोकळे झालो.

## कारुण्यभावाने निघालेले शब्द

बावीस तीर्थंकरांचे जे शिष्य होते ते सर्व 'शूट ऑन साइट' करणारे होते. इतके अधिक जागृत होते की दोष होताच त्यांना कळत होते. आता चोवीसावे तीर्थंकर महावीर आणि पहिले तीर्थंकर ऋषभदेव, या दोघांचे शिष्य वेगळ्या प्रकारचे होते. ऋषभदेवांचे शिष्य जड आणि सरळ, तर महावीरांचे जड आणि वक्र. 'वंक जडाय पच्छिमा' असे महावीर भगवंतांनीच सांगितले आहे ना! आता जर आम्ही साधूंना विचारले की 'हे महावीरांनी सांगितले आहे का?' तर तेही सांगतात 'हो, सांगितलेच आहे ना!' पण ही गोष्ट ते स्वत:वर लागू करत नाहीत, ते म्हणतात की 'लोक असे झाले आहेत.' पण सगळेच असे म्हणतात ना!' म्हणून तर त्यांच्या वाट्याला किंवा अन्य कोणाच्याही वाट्याला ते आलेच नाही! मग जा परत महावीरांच्या घरी, पुन्हा जिथे होता तिथेच!

'आम्ही' असे बोलतो, पण बोलण्याआधीच आम्ही प्रतिक्रमण

केलेले असते. तुम्ही मात्र असे बोलू नका. आम्ही असे कडक बोलतो, चुका काढतो, तरी पण आम्ही सर्वांना निर्दोषच पाहतो. पण जगाला समजावावे तर लागेलच ना? यथार्थ, खरी गोष्ट तर समजावावी लागेलच ना?

परंतु एवढे मात्र खरे आहे की मधल्या तीर्थंकरांच्या वेळी लोक प्रतिक्रमणाच्या बाबतीत फार समजूतदार होते, म्हणून ते फारसे उलटे चालत नव्हते. त्यांची प्रगती खूप चांगली होत असे. खूप चांगले असायचे.

**प्रश्नकर्ता :** आम्ही जसे 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करतो, तर ते लोकसुद्धा असेच प्रतिक्रमण करत असत का? ते जरा स्पष्ट करा ना!

**दादाश्री :** हो, असे 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण. पण तो काही मोक्षाचा मार्ग नव्हता. ते तर संसारात 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण झाले, त्यामुळे चांगली गती मिळते, फर्स्ट क्लास गती मिळते, दु:ख येत नाही, अडचण येत नाही, वैर बांधले जात नाही. म्हणजेच तो संसारी सुखाचा मार्ग होता. आणि ज्यांना मोक्षाला जायचे असेल त्यांना मोक्षमार्गातही उपयोगी होता. दोन्ही प्रकारे उपयोगी होता.

आणि बघा तरी, असे प्रतिक्रमण, 'पडकमणुं, पडकमणुं' बोलतात. महाराज बोलतात आणि लोक ऐकतात. आणि मग ते मनात बोलतात. आपण त्यांना विचारले 'पडकमणुं' म्हणजे काय?, तर ते म्हणतात खरे की 'प्रतिक्रमण करणे.' पण त्यांचा एकही दोष धुतला जात नाही. कपड्याला साबण लावूनसुद्धा, स्वच्छ पाण्याने धुऊनसुद्धा जर दोष जात नसेल तर काय साबण चुकीचा होता की धुणारा चुकीचा होता? की मग पाणी चुकीचे होते? एकही दोष कमी झालेला नाही. का कमी झाला नाही? रोज एवढे सारे प्रतिक्रमण करतात हे तर तुम्हाला माहीतच आहे. तुम्ही महाराजांकडे गेला होता ना प्रतिक्रमण करण्यासाठी?

**प्रश्नकर्ता :** हो, गेलो होतो ना.

**दादाश्री :** 'पडकमणुं' केले तरीसुद्धा एकही दोष का कमी झाला नाही? कारण प्रतिक्रमण मागधी भाषेत बोलतात. तो पोपट बोलतो तसा,

'आयाराम गयाराम,' मोक्ष, असे सर्व बोलतात पण त्याचा काय उपयोग? पोपटासारखे नाव घ्यायचे. म्हणजे समजल्याशिवायच ते प्रतिक्रमण कशाचे करीत आहेत? त्यांना समजेल तर दोष धुतले जातील ना? म्हणून मी महाराजांना सांगितले, 'प्रतिक्रमण गुजराती भाषेत करा.' तर त्यांना समजेल त्यामुळे त्यांच्या मनात असा विचार येईल की 'आम्ही हे प्रतिक्रमण करत आहोत.' पण ते यथार्थ प्रतिक्रमण करतच नाहीत. प्रतिक्रमणाचे फळ तर मिळायला हवे ना?

## हेतूनुसार प्राप्ती

**प्रश्नकर्ता :** दादाजी तुम्ही म्हणालात की जे बावीस तीर्थंकर होते, त्यावेळी लोक 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करत होते, सर्व लोक विचक्षण होते आणि ते संसार सुख आणि मोक्ष, या दोन्ही गोष्टींसाठी प्रतिक्रमण करायचे.

**दादाश्री :** नाही, सुखासाठी नाही, कुणाचा मोक्षाचा हेतू, तर कुणाचा हा हेतू, कुणाचा सुखाचा हेतू. ज्यांचा जो हेतू होता त्यानुसार त्यांना प्रतिक्रमणाचा लाभ मिळायचा.

**प्रश्नकर्ता :** परंतु मी असे विचारतो की प्रतिक्रमण म्हणजे तर मोक्षाचाच मार्ग आहे ना? सुखाचा मार्ग प्रतिक्रमणात कसा असू शकतो?

**दादाश्री :** प्रतिक्रमण म्हणजे 'हे जे चुकीचे झाले त्या करिता मी क्षमा मागतो', म्हणजे ती चूक मिटली आणि पुण्य झाले. पुण्य झाले म्हणून पुण्य उपभोगण्यासाठी जावे लागते. (जन्म घ्यावा लागतो.)

**प्रश्नकर्ता :** परंतु मोक्षमार्गातही असेच आहे ना? मग तेही प्रतिक्रमण आहे, आणि हेही प्रतिक्रमण? असे कसे?

**दादाश्री :** तरी सर्वांचे हेतू वेगवेगळे असतात. प्रत्येकाचे हेतू आणि ध्येय वेगवेगळे असतात.

**प्रश्नकर्ता :** पण प्रतिक्रमण तर दोषांचे असते. कोणताही दोष झाला की प्रतिक्रमण करतात, आणि दोष संपणे म्हणजे मोक्ष मार्गावर जाणे?

**दादाश्री :** नाही, असे काही नाही.

**प्रश्नकर्ता :** मग कसे ? आम्हाला जरा समजवा की एका प्रकारच्या प्रतिक्रमणाने पुण्य मिळते आणि...

**दादाश्री :** आपल्या येथे प्रतिक्रमण आहे, ते मोक्षासाठी आहे. आणि संसाराचे प्रतिक्रमण तर संसाराचे काही दोष, किंवा संसाराच्या सुखासाठी असते, म्हणजे हेतूनुसार उपयोगी पडते.

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे, मी हेही समजू इच्छितो की तुम्ही दोन प्रकारचे प्रतिक्रमण सांगितले, त्यात एका प्रतिक्रमणाचा परिणाम...

**दादाश्री :** दोन प्रकारचे नाही, प्रतिक्रमण एकाच प्रकारचे असते.

**प्रश्नकर्ता :** हो, पण त्यात जे ध्येय आहे, ध्येय दोन प्रकारचे आहेत ना ? एक मोक्षाचे ध्येय...

**दादाश्री :** ध्येये दोन प्रकारचीच नाहीत तर किती तरी प्रकारची असतात, वेगवेगळ्या व्यक्तीनुसार वेगवेगळ्या प्रकारची ध्येये असतात.

**प्रश्नकर्ता :** आता, यात तर संसार सुखाचे ध्येय आहे. याचा अर्थ प्रतिक्रमणामुळे त्याला धर्मध्यान होते, शुक्लध्यान होत नाही ?

**दादाश्री :**प्रतिक्रमण आणि शुक्लध्यान यांचे काहीही देणेघेणे नाही. संसारात शुक्लध्यानाचे तर काहीच देणेघेणे नाही. हे तर आपल्या येथे अक्रम विज्ञान आहे म्हणून शुक्लध्यान आहे, अन्यथा शुक्लध्यान हा शब्दच बोलू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग ते प्रतिक्रमण कसे करायचे ? समजा मला प्रतिक्रमण करायचे आहे, मला संसारात सुख हवे आहे, तर त्यासाठी प्रतिक्रमण कसे करावे, कोणत्या ध्येयाने करावे ? म्हणजे ध्येयपूर्वक प्रतिक्रमण कसे करावे ?

**दादाश्री :** नाही, नाही, जेव्हा आपण प्रतिक्रमण करतो ना, तेव्हा आपल्याकडून जो दोष झाला होता तो संपून जातो.

**प्रश्नकर्ता :** संपला तर संपला, पण मग काय?

**दादाश्री :** त्यामुळे पुण्य होते ना!

**प्रश्नकर्ता :** हो, तर तसेच या मोक्षमार्गात पण त्याला पुण्य होतेच ना?

**दादाश्री :** नाही.

**प्रश्नकर्ता :** तर त्याला काय समजायचे?

**दादाश्री :** मोक्षमार्गात सुटण्यासाठी प्रतिक्रमण करत असतो.

**प्रश्नकर्ता :** जर हे प्रतिक्रमण सुटण्यासाठी आहे, तर ते प्रतिक्रमण?

**दादाश्री :** त्याचा सुटण्याशी काही संबंध नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मनात त्यांनी असे निर्धारित केलेले असते का की भाऊ, आम्हाला हे...

**दादाश्री :** नाही, ते तर 'चंदुलाल' होऊन प्रतिक्रमण करत असतात ना?

**प्रश्नकर्ता :** अज्ञानी आणि ज्ञानी?

**दादाश्री :** बस.

**प्रश्नकर्ता :** हो, तर हा फरक आहे. मग ठीक आहे. अज्ञानीने जर प्रतिक्रमण केले तर त्याला पुण्य मिळते?

**दादाश्री :** अज्ञानी जे करतात, त्यात पुण्य किंवा पापच असते, याशिवाय दुसरे काही नाही. तो तर मोक्षाचा मार्गच नाही.

**प्रश्नकर्ता :** हो, बरोबर आहे.

## प्रतिक्रमणाचे फळ काय?

**प्रश्नकर्ता :** अक्रम विज्ञानसुद्धा त्या बावीस तीर्थंकरासारख्या स्थितीत आणते ना?

**दादाश्री :** एवढ्या अधिक स्थितीत आणत नाही, परंतु हे तर अक्रम विज्ञान आहे! अक्रम विज्ञान मोक्ष फळ देते! आणि ते मोक्ष देत नाही. एवढा फरक आहे.

**प्रश्नकर्ता :** कोणता?

**दादाश्री :** हा आपला अक्रम मोक्ष देणारा आहे, आणि तो तर फक्त जागृतीच देतो, म्हणून त्यामुळे मोक्षाचे पुण्य बांधले जाते. तो फक्त जागृती देतो.

**प्रश्नकर्ता :** परंतु ते तीर्थंकरांचे आश्रित होते ना?

**दादाश्री :** तीर्थंकरांच्या आश्रयात गेले म्हणून तर मोक्षाला जातात. आणि इतर सारे लोक पुण्य बांधत असतात.

**प्रश्नकर्ता :** परंतु प्रतिक्रमण केल्यामुळे त्यांच्यासाठी मोक्ष मार्ग खुला होत नाही का?

**दादाश्री :** नाही.

**प्रश्नकर्ता :** असे का? त्या काळी पण नाही?

**दादाश्री :** प्रतिक्रमण हा मोक्षमार्ग नाही.

**प्रश्नकर्ता :** परंतु त्यांचा हेतू पूर्णपणे तोच आहे, तर तो हेतू त्यांना या मार्गावर आणतो ना?

**दादाश्री :** आत्मज्ञान, हा मोक्ष मार्ग आहे. आत्मज्ञान झाल्यानंतरची प्रतिक्रमणे मोक्षमार्ग देतात, त्यानंतर मग सर्व साधना मोक्षमार्गच देतात.

**प्रश्नकर्ता :** तर हे प्रतिक्रमण त्यांना आत्मज्ञान प्राप्त होण्याचे कारण बनू शकते का?

**दादाश्री :** नाही, ते जुन्या दोषांचे प्रतिक्रमण करतात, आणि पुन्हा मोहामुळे नवीन अतिक्रमणे होत राहतात. मोह बंद झालेला नाही ना? मोह अजून चालूच आहे. दर्शनमोह म्हणजे जुने सर्व दोष प्रतिक्रमण

केल्याने विलय होतात आणि (दर्शनमोहामुळे) नवीन दोष उत्पन्न होतात. प्रतिक्रमण करतात तेव्हा पुण्य बांधले जाते.

**प्रश्नकर्ता :** अर्थात, दोषांचे थर, आवरणे कमी होत जातात?

**दादाश्री :** दोष संपतच जातात.

**प्रश्नकर्ता :** तर मग त्यांना पुन्हा कोणते दोष निर्माण होतात?

**दादाश्री :** सर्व प्रकारचे दोष. दर्शनमोह आहे म्हणून दोष तर उत्पन्न होतच राहतात, आणि प्रतिक्रमण त्या दोषांना संपवत राहते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे प्रतिक्रमण त्यांना धर्मध्यानात ठेवते का?

**दादाश्री :** पूर्ण धर्मध्यान कसे शक्य आहे? शुक्लध्यान तर तिथे नसतेच पण धर्मध्यानही कसे असू शकते?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण हे धर्मध्यानात मोडत नाही का?

**दादाश्री :** ते प्रतिक्रमण वेगळ्या प्रकारचे आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे कसे?

**दादाश्री :** ते प्रतिक्रमण तर, जो मोह असतो त्याचा नाश करते. तिथे मग पुन: मोह उत्पन्न होत नाही. आणि दर्शन मोहनीय दुसरा मोह उत्पन्न होऊ देते आणि प्रतिक्रमण पुन्हा त्याला नष्ट करते. दर्शन मोहनीयमुळे पुन्हा मोह उत्पन्न होतो. प्रतिक्रमण पुन्हा त्याला नष्ट करते. असे होतच राहते.

**प्रश्नकर्ता :** कमी करते असे का? मोह कमी करण्याची प्रकिया म्हणजेच दोष कमी करणे, असे म्हणायचे आहे का तुम्हाला?

**दादाश्री :** पूर्ण जगात जेवढे परमाणू आहेत, तेवढे सारे दोष आहेत. ते सर्व दोष या प्रतिक्रमणाने संपून जातात.

संसारातील लोक प्रतिक्रमण करतात, कोणी जागृत असेल तर तो रायशी-देवशी दोन्ही प्रतिक्रमण करतो, त्यामुळे तेवढे दोष कमी होतात,

परंतु जोपर्यंत दर्शन मोहनीय आहे, तोपर्यंत मोक्ष होऊ शकत नाही, दोष उत्पन्न होतच राहतात. जेवढे प्रतिक्रमण कराल तेवढे दोष निघून जातील.

**प्रश्नकर्ता :** तर त्याचे एखादे उदाहरण द्या ना, की बावीस तीर्थंकरांच्या वेळी कोणता दोष झाला आणि त्याचे प्रतिक्रमण त्यांनी कसे केले?

**दादाश्री :** आपल्याकडे करतात त्याचप्रकारे. जसे आता आपल्याला दोष दिसतात ना त्याचप्रमाणे तेही करत असत.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे त्याने कधी चोरी केली, किंवा तो काही उलट बोलला तर त्याला वाटते की 'हे चुकीचे झाले, असे होता कामा नये.'

**दादाश्री :** हो, मग परत असे उलट बोलणे होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे 'सरळ बोलले पाहिजे', असे त्याचे नवीन (कर्म) बंधन झाले?

**दादाश्री :** मग तसे होईल.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे, या प्रकारे सारी प्रोसीजर (कार्यवाही) बदलत असते?

**दादाश्री :** हो, दर्शनमोहनीय आहे ना! म्हणून या वेळी पुन्हा (चार्ज) झाले. मग पुढील जन्मी पुन्हा तसेच चिकटते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे असे सर्व चुकीचे बोलण्याचे थांबले आणि 'सरळ बोलले पाहिजे', असे चार्ज झाले?

**दादाश्री :** सरळ तर या जन्मीच होते, पण पुढील जन्मी जर एखादा कुसंग मिळाला तर तो पुन्हा चुकीचे बोलणे शिकतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे प्रतिक्रमण केले त्यामुळे जुना दोष गेला?

**दादाश्री :** हो, गेला, बस.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही असेही म्हणालात की जोपर्यंत दर्शनमोहनीय आहे तोपर्यंत नवीन कर्मे बांधतच राहतो. नवीन दोष उत्पन्न करीतच राहतो?

**दादाश्री :** नवीन दोष होणे तर चालूच राहते.

**प्रश्नकर्ता :** त्याचे फळ त्याला पुढील जन्मात मिळते. जेवढे उलट बोलले गेले होते, तेवढा दोष तर त्याने संपवला, पण मग पुन्हा नवीन दोष तर होतच राहतात.

**दादाश्री :** हो, परंतु या जन्मी त्याचा उलट बोलण्याचा जो दोष होता, तो निघून गेला. या जन्मी तो उलट बोलत नाही. परंतु पुढील जन्मात जर असे ओळखीचे कोणी भेटले, तर पुन्हा ती सवय लागते. दर्शनमोह आहे म्हणून सर्व उगवतच राहते ना!

**प्रश्नकर्ता :** पण त्याने तो दोष कसा संपवला? त्यासाठी त्याने प्रतिक्रमण केले असेल का?

**दादाश्री :** शास्त्राच्या आधाराने तो बोलतो की 'हे चुकीचे आहे, असे होता कामा नये. त्यासाठी मी प्रतिक्रमण करत आहे, प्रत्याख्यान करत आहे, पुन्हा असे बोलणार नाही, असा निश्चय करतो.' म्हणजे तो दोष संपतो आणि तेवढा वेळ त्याने आत्म्यासाठी घालवला. त्यामध्ये पुद्‌गल (जे पूरण-गलन होते) भागाचा हेतू नाही, म्हणून पुण्य बांधले जाते.

तू हत्तीला पाहिले नाहीस का? त्याला अंघोळ करताना बघावे, अंघोळ केल्यानंतर तो काय करतो, ते तू पाहिले आहेस का?

**प्रश्नकर्ता :** म्हणतात ना, 'गजस्नानवत्', तो परत अंगावर धूळ उडवून घेतो.

**दादाश्री :** आणि पुन्हा धुऊन टाकतो. अर्थात जोपर्यंत दर्शन मोहनीय आहे, तोपर्यंत 'गजस्नानवत्' चालतच राहते.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणालात, की दोष झाला त्याचे तो ह्या जन्मी

प्रतिक्रमण करतो, म्हणजे तो आता निर्दोष झाला. तर मग पुढील जन्मी तो पुन्हा दोष कसा काय करील?

**दादाश्री :** दोष तर तो करणारच. दर्शनमोहनीय आहे, म्हणून जसे संयोग मिळतात तसे तो करतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे मूळ गोष्ट ही आहे की आत्मज्ञान झाल्यानंतर प्रतिक्रमण केले तरच निर्दोष होता येईल. आणि नंतर पुन्हा कोणत्याही जन्मात असे होणार नाही.

**दादाश्री :** अनंत जन्मांपासून चोरी करणे सोडतच आला आहे, आणि पुढील जन्मी जर आई-वडील चोर मिळाले तर तो परत चोर बनून जातो. ज्याला दर्शनमोह आहे तो काहीही करू शकतो.

**प्रश्नकर्ता :** तर त्याने जे प्रत्याख्यान केले होते त्याचे फळ मिळत नाही?

**दादाश्री :** नाही, ते तर त्याला त्या एका जन्मापुरतेच टिकते, त्यानंतर नाही. नंतर जेव्हा दुसरे संयोग एकत्र येतात, तेव्हा वेगळे घडते.

इथे तर आपल्याला 'प्रतिक्रमण' उपयोगात आले आहेत की 'भाऊ, आता आवक बंद झाली आहे म्हणून जावकचा निकाल करा.' दर्शनमोह बंद झाला म्हणजे आवक बंद झाली आहे. परंतु जर आवक चालू राहिली तर? त्या लोकांना तर घाऊक आवक चालू आहे. जावकपेक्षा आवकच जास्त आहे. किती आवक असेल? जेवढी कल्पना करतील तेवढी कर्मे.

## असा रचला गेला त्याचा इतिहास

**प्रश्नकर्ता :** जैन धर्मात संवत्सरी करायला का सांगितले आहे? या सणाचा इतिहास काय आहे?

**दादाश्री :** कसेही करून प्रतिक्रमण करा. भगवंतानी सांगितले होते, रोजच कचरा (दोष) साफ करा. रात्री आणि दिवसा, असे दोन वेळा कचरा साफ करा. सर्व प्रथम सांगितले की 'शूट ऑन साइट'

करा, तर लोक म्हणाले, 'साहेब, प्रत्येक वेळी बंदूक जवळ थोडीच असते?' त्यावर म्हणाले, 'रात्रीच्या चुकांसाठी सकाळी बंदुकीचा उपयोग करा, आणि दिवसभरातील चुकांसाठी रात्री उपयोग करा.' त्या हजार माणसातून परत दोघांनी विचारले की 'साहेब, आम्हाला हे सकाळी आणि रात्री (प्रतिक्रमण) करणे जमत नाही.' तेव्हा म्हणाले, 'मग पाक्षिक करा.' जेव्हा पाक्षिक करण्यासाठीही कोणी तयार झाले नाही तेव्हा म्हणाले, 'चार महिन्यातून एकदा करा.' भगवंतांना काही तरी मार्ग दाखवावाच लागतो ना! शेवटी भगवंतांनी सांगितले, 'भाऊ निदान संवत्सरीच्या दिवशी तरी करा. आणि सर्व साधारणपणे म्हणा की मी सर्वांची माफी मागतो.'

म्हणजे आता या काळात 'शूट ऑन साइट'ची गोष्ट तर बाजूलाच राहिली, पण संध्याकाळी दिवसभराच्या दोषांचे प्रतिक्रमण करण्यास सांगितले होते, ती गोष्ट पण आता कोण पाळतो? आठवड्यातून एकदा करायची गोष्ट पण संपली आणि पाक्षिक पण नाहीशी झाली. आता फक्त बारा महिन्यातून एकदाच करतात. तेसुद्धा समजल्याशिवायच करतात. नवनवीन कपडे घालून मिरवतात. म्हणजे असे रियल (खरे) प्रतिक्रमण कोणी करत नाही, म्हणून तर त्यांचे दोष वाढत चालले आहेत. प्रतिक्रमण तर त्यालाच म्हणावे की ज्यामुळे सर्व दोष कमी होत जातात.

अतिक्रमणामुळे हे जग उभे झाले आहे, आणि प्रतिक्रमण केल्याने ते बंद होऊन जाते.

## मार्गदर्शन विचलित झाले, मग काय?

**मुमुक्षु :** दादा, तसे तर आम्ही प्रतिक्रमण करत असतो.

**दादाश्री :** तुम्हाला प्रतिक्रमण करता येत असेल का? ते सर्व तर ठीक आहे. हे तर लहान मुलाच्या हातात रत्न देण्यासारखे आहे. प्रतिक्रमण तर नीट समजून, निज-स्वरूपाची प्राप्ती झाल्यावरच करायचे असते. प्रतिक्रमण करविणाराही पाहिजे, आणि प्रतिक्रमण करणाराही पाहिजे, सर्व सोबतीने पाहिजेत. तुमच्याकडे प्रतिक्रमण करविणारा कोण आहे?

**मुमुक्षु :** महाराज आमच्याकडून प्रतिक्रमण करवून घेतात. प्रतिक्रमण म्हणजे काय, हे तर मला माहीत नाही, पण त्यामध्ये सांगतात की बाहुला-बाहुलीचे लग्न केले, असे सर्व केले ती सर्व पापे आहेत. त्याचे 'मिच्छामि दुक्कडम्' करवून घेतात.

**दादाश्री :** नाही, साधू महाराज जे सांगतात, 'त्यातल्या कोणत्याही गोष्टीत पाप नाही.' त्यांना समकित तर झाले नाही, रिकामे बसले आहेत, म्हणून त्यांचे डोके फिरले आहे आणि त्यांनी लोकांचे डोकेही फिरवले.

आता असे म्हणणे हा सुद्धा गुन्हाच आहे, कारण कृपाळू देवांनी म्हटले आहे की 'कोणी असे करत असेल आणि तुम्ही जर त्याला चुकीचे म्हटले तर तो तेही सोडून देईल, तेव्हा काही न बोलणेच बरे.'

अत: असे म्हटले तर चालेल की असे प्रतिक्रमण झाल्यामुळे सर्व काही बिघडले आहे. तरी पण ते काढून टाकायचे नसते. जे आहे ते चालवून घ्यायचे. यातूनच पुढे सुधारणा होईल, काळ आता सुधारतो आहे.

## ऑर्नामेंटलची यात गरज नाही

**मुमुक्षु :** प्रतिक्रमण करण्याची काही टेकनिक आहे का?

**दादाश्री :** जर काहीच येत नसेल तर माफी मागा की, 'हे दादा, आपल्या साक्षीने मी माफी मागतो, मला हे सर्व समजत नाही', एवढे केले तरी चालेल. यात टेकनिकची गरज नाही. तुमचा हेतू काय आहे?

म्हणून मग बुद्धिमान लोक हेतूलाच ऑर्नामेंटल बनवून टाकतात. ऑर्नामेंटल बनवल्यामुळे तो बिचारा घाबरत राहतो की 'मला तर काहीच समजत नाही, मला हे जमणारच नाही.' अरे, सोड ते सर्व आणि सरळ माफी माग. 'मला यातले काही समजत नाही. माझ्या या सर्व चुका झाल्या आहेत, म्हणून हे भगवंता! मी तुझ्या साक्षीने माफी मागत आहे.' मग त्यात ऑर्नामेंटलची गरज आहे का?

## पावलोपावली अतिक्रमण

तुम्ही जे प्रतिक्रमण करता, त्या प्रतिक्रमणाचे वर्षभरात दोन आणे

मिळतात. आणि जर खरे प्रतिक्रमण कराल ना, तर वर्षाच्या 365 दिवसाचे, चोवीसही तासाचे 16 आणे मिळतील.

खरे प्रतिक्रमण म्हणजे काय ते तुम्हाला समजले का? तसे तर व्यवहारात आपण क्रमण करत असतो. क्रमण म्हणजे आपण म्हणतो 'आई, मला जेवण दे', तर आई जेवण देते, त्यात काही गैर नाही. परंतु जर आपण म्हटले, की 'आई, ही कढी खूप खारट केली आहेस', तर त्याला अतिक्रमण म्हणतात. अतिक्रमण केले तर त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल. अतिक्रमण केले नसेल तर प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. लोक अतिक्रमण करतात का?

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमण तर आपोआपच होत असते.

**दादाश्री :** भगवंतांनी म्हटले आहे, 'अतिक्रमण केले तर प्रतिक्रमण करा', अतिक्रमण करत नसाल तर काही हरकत नाही. 'तुम्ही खारट कढी दिली आणि मी ती खाल्ली', असे झाले तर त्यात प्रतिक्रमण करण्याची गरज नाही.

**प्रश्नकर्ता :** पावलोपावली अतिक्रमण तर होतच असते.

**दादाश्री :** जोपर्यंत अतिक्रमण होत असेल तोपर्यंत पुन्हा असा मनुष्य जन्म मिळणार नाही, तेव्हा सावध राहा. ही काय अंधेर नगरी नाही, हे तर वीतरागींचे राज्य आहे. येथे लाचलुचपत मुळीच चालणार नाही. हो, सर्वांना माहीत आहे, इथे घोटाळे चालणार नाहीत.

**प्रश्नकर्ता :** मग त्यासाठी काही उपाय आहे का?

**दादाश्री :** समजा आता या ताईंना जर तुमच्याबद्दल किंचित चुकीचा विचार आला की, 'हे आता का आले, मला त्रास देण्यासाठी?' असा विचार त्यांच्या मनात येतो, पण त्या तुम्हाला कळू देणार नाहीत, चेहरा हसत ठेवतील, आणि त्याचवेळी मनात प्रतिक्रमण करतील. उलटा विचार आला म्हणजे अतिक्रमण झाले असे म्हणायचे. त्या रोज पाचशे-पाचशे प्रतिक्रमण करत असतात. नुसते दोषच भरलेले आहेत, भानच राहत नाही.

## हवे, रोख प्रतिक्रमण

**मुमुक्षु :** ही कर्मे जेव्हा डिस्चार्ज होतात, तेव्हा जे वाईट घडते त्यासाठी प्रतिक्रमण करतो तरी पण तेवढ्या कर्मांच्या फळांचा थोडा फार परिणाम तर भोगावाच लागेल ना?

**दादाश्री :** कुणाला?

**मुमुक्षु :** आम्हाला.

**दादाश्री :** दोष झाले की प्रतिक्रमण करतात, पण अशी प्रतिक्रमणे तुमच्याकडून होणार नाहीत. साधूंना सुद्धा हे जमत नाही. हे प्रतिक्रमण तर 'शूट ऑन साइट', दोष होताक्षणीच करायचे असते.

**मुमुक्षु :** आम्ही रायशी आणि देवशी, दोन्ही प्रतिक्रमण करतो.

**दादाश्री :** असे प्रतिक्रमण चालत नाही. प्रतिक्रमण तर कसे असावे? तर दोष झाला की लगेच दोष ओळखता आले पाहिजे. असे असेल तर चालेल. अनंत जन्मांपासून असे रायशी-देवशी केले म्हणून तर आजपर्यंत भटकत राहिला आहात.

पूर्वीच्या काळात 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करत असत, पण सध्या लोक असे करू शकत नाहीत, म्हणून दिवसभर जे दोष झाले असतील त्यांना रात्री आठवून दिवसभराचे प्रतिक्रमण करतात, याला देवशी प्रतिक्रमण म्हणतात, आणि रात्रभर जे दोष झाले असतील त्यांना आठवून सकाळी प्रतिक्रमण करतात, त्याला रायशी प्रतिक्रमण म्हणतात.

## क्रिया प्रतिक्रमण नसतेच कधी

या काळातल्या लोकांना धर्म जाणून घ्यायचा असेल तर आम्ही त्यांना काय शिकवतो की, तुझ्याकडून जर खोटे बोलले गेले तर हरकत नाही, मनात काही वेगळेच बोललास त्यालाही हरकत नाही, पण आता तू त्याचे प्रतिक्रमण कर की 'पुन्हा असे बोलणार नाही.' आम्ही असे प्रतिक्रमण करण्यास शिकवतो.

**मुमुक्षु :** तर मग आम्ही सकाळ-संध्याकाळ जे रायशी आणि देवशी प्रतिक्रमण करतो ते चुकीचे आहे का?

**दादाश्री :** ते तर तुम्ही मेलेल्या मुडद्यांसाठी करता, जिवंत लोकांचे प्रतिक्रमण करत नाहीत, जणू मुडदे आहेत, असे प्रतिक्रमण करतात. अशा प्रतिक्रमणामुळे पुण्य मिळते.

**मुमुक्षु :** याचा अर्थ असा झाला की जेव्हा काही चुकीचे करतो तेव्हा प्रतिक्रमण करायला हवे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण तर नेहमीच 'शूट ऑन साइट' करायचे असते. प्रतिक्रमण कधी उधार (पेंडिंग) ठेवायचे नाही.

**मुमुक्षु :** जीव तर सतत कर्म बंधनच करीत असतो, तर काय त्याने सतत प्रतिक्रमण करत राहावे?

**दादाश्री :** हो, नक्कीच करावे.

यापैकी कित्येक महात्मा दररोज पाचशे-पाचशे प्रतिक्रमण करत असतील! ह्या नीरू बहन किती करत असतील? आठ वर्षांपासून रोजच पाचशे-पाचशे, हजार, इतकी प्रतिक्रमणे करतात.

**प्रश्नकर्ता :** ते तर भाव प्रतिक्रमण आहे, क्रिया प्रतिक्रमण तर होतच नाहीत ना?

**दादाश्री :** नाही, क्रियेत प्रतिक्रमण होतच नाहीत, भाव प्रतिक्रमणाचीच गरज आहे, तेच उपयोगी ठरते. क्रिया प्रतिक्रमण नसते. क्रिया प्रतिक्रमण तर मढे आहे मढे. त्या प्रतिक्रमणात चुकीच्या ठिकाणी वेळ घालवत नाही आणि सामायिक केले जाते, आणि त्या सामायिकचे फळ मिळते त्याने मन चांगले राहते.

**प्रश्नकर्ता :** ती *निर्जरा* (आत्मप्रदेशापासून कर्मांचे वेगळे होणे) आहे की नाही?

**दादाश्री :** *निर्जरा* तर नेहमी होतच असते, *निर्जरा* तर प्रत्येक

जिवाला होतच राहिली आहे, पण हा तुमचा चांगला भाव आहे, की तुम्हाला प्रतिक्रमण करायचे आहे. चांगला भाव असल्यामुळे निर्जरा चांगली होते, अन्यथा प्रतिक्रमण तर 'शूट ऑन साइट' करायचे असते.

हे सगळे दिवसभरात पन्नास-शंभर वेळा प्रतिक्रमण करतात. प्रतिक्रमणाशिवाय तर कधी काहीही होऊ शकत नाही. आणि हे जे प्रतिक्रमण आहे ते द्रव्य प्रतिक्रमण आहे, भाव प्रतिक्रमण असले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** द्रव्यासोबत भावसुद्धा पाहिजे ना?

**दादाश्री :** हो, पण फक्त द्रव्यच होत असते, भाव नसतो. कारण दूषमकाळातील जीवांना भाव राखणे फार कठीण आहे. जेव्हा ज्ञानी पुरुषांची कृपा होते आणि ते डोक्यावर हात ठेवतात, त्यानंतरच असे भाव उत्पन्न होतात. त्याशिवाय भाव उत्पन्न होतच नाहीत.

**प्रश्नकर्ता :** द्रव्य प्रतिक्रमण आणि भाव प्रतिक्रमण म्हणजे काय ते जरा सविस्तर समजवा.

**दादाश्री :** भावपूर्वक बोलावे की 'असे होता कामा नये.' म्हणजे असा भाव असावा की 'असे होत कामा नये.' याला भाव प्रतिक्रमण म्हणतात. आणि द्रव्य प्रतिक्रमणामध्ये तर सर्व शब्दन् शब्द बोलावे लागतात. जितके शब्द लिहिलेले असतात ते सारे बोलावे लागतात, त्याला द्रव्य प्रतिक्रमण म्हणतात.

## खरे प्रतिक्रमण कोणते?

भगवंतांनी सांगितले होते की, 'ही प्रतिक्रमणाची भाषा जर समजली, तर त्यानुसार प्रतिक्रमण करावे.' भगवंतांनी यामध्ये हस्तक्षेप केला नाही, परंतु ती भाषा जर समजली नाही, तर तो जी भाषा समजत असेल त्या भाषेत त्याला प्रतिक्रमण समजवायचे.

**प्रश्नकर्ता :** महावीर स्वामींच्या सांगण्यात असे आले आहे की, 'शेवटी तू जरी संवत्सरी प्रतिक्रमण केलेस तरीही हरकत नाही.'

**दादाश्री :** नाही, असे काही सांगितलेले नाही. आणि तेव्हा हे

असे प्रतिक्रमण नव्हतेच. महावीर भगवंतांच्या काळात असे प्रतिक्रमण नव्हतेच. हे प्रतिक्रमण तर महावीर भगवंत गेल्यानंतरच्या काळात सुरू झाले आहे.

प्रतिक्रमण तर असायलाच हवे, आणि शिवाय ते प्रतिक्रमण स्वत:च्या भाषेत असायला हवे. आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान याशिवाय तर कोणाचाही मोक्ष होत नाही.

कोणी मनुष्य जर या प्रमाणे जेवायला शिकला की फक्त 'होईयां, होईयां, होईयां (ढेकर)' करायचे, तर काय त्याने त्याची भूक मिटेल?

**प्रश्नकर्ता :** नाही मिटणार. भूक तर जेव्हा जेवण पोटात जाईल तेव्हाच मिटेल.

**दादाश्री :** का? ताटात वाढून, हातात घास घेऊन ढेकर दिला ना?

**प्रश्नकर्ता :** पण ते पोटात तर गेलेच नाही, बाहेरच राहिले ना?

**दादाश्री :** आज जर येथे भगवंत असते ना, तर हे असे प्रतिक्रमण पाहून त्यांनी या सर्वांना जेलमध्येच टाकले असते. अरे मूर्खा, तू असे कसे केलेस? प्रतिक्रमण म्हणजे एका गुन्ह्याची माफी मागायची, तो स्वच्छ करून टाकायचा. एक डाग पडला असेल तर तो डाग धुऊन स्वच्छ करायचा. जागा जशी होती तशीच्या तशी स्वच्छ करून टाकायची, याला म्हणतात प्रतिक्रमण. पण आता तर नुसती डागाळलेली धोतरेच दिसत आहेत.

एकाही दोषाचे प्रतिक्रमण केलेले नाही आणि निव्वळ दोषांचे भांडारच बनून गेले आहेत.

ह्या नीरू बहन आहेत, त्यांचे सर्व आचार-विचार कशामुळे उच्च झाले आहेत? तर त्या रोजच पाचशे-पाचशे प्रतिक्रमण करीत होत्या आणि या लोकांनी तर एकसुद्धा केले नाही.

## रायशी-देवशी

असे आहे, प्रतिक्रमण म्हणजे दोष कमी होणे. दोष जर कमी

होत नसतील तर ते प्रतिक्रमण करत नाहीत, पण अतिक्रमण करत आहेत. उलट दोष वाढवित आहेत. यापेक्षा तर रायशी-देवशी, हे दोन कच्छी भाऊ चांगले म्हणायचे.

**प्रश्नकर्ता :** रायशी-देवशी कोणी जीव थोडेच आहेत, ती तर एक कल्पना आहे, असे कृपाळू देवांनी स्पष्ट लिहिले आहे.

**दादाश्री :** परंतु लोक तर असेच समजतात ना की हा 'रायशी' आहे आणि तो 'देवशी' आहे, तर हा 'देवशी'चा भाऊ आहे. कच्छमध्ये एक जण प्रतिक्रमण करण्यासाठी बसला. त्याने तर रायशी प्रतिक्रमण केले. आणि त्याला ऐकू आले की काही लोक देवशीचे प्रतिक्रमण करतात, काही लोक रायशीचे प्रतिक्रमण करतात. तर मग आमच्या खेतशी (भाऊ)चे का करत नाहीत? अशी नावेही असतात ना, देवशी आणि रायशी? म्हणजे ते लोक जे प्रतिक्रमण करतात, त्यात प्रतिक्रमणाचे बळच नसते. समजल्याशिवायच करतात.

आणि तेही कसे करतात? तर मागधी भाषेत. त्यातील एक अक्षरही समजत नाही, समजल्याशिवायच करतात. इंग्रजीमध्ये मी जर 'पारडन मी, पारडन मी', असे बोलत राहिलो, तर काय फायदा? इंग्रजी तर त्यांना समजत नाही.

इतकी प्रतिक्रमणे केली पण एकही खरे-यथार्थ प्रतिक्रमण केले नाही. त्याऐवजी जर गुजरातीत (स्वत:च्या भाषेत) शिकवले असते ना की, 'भाऊ, हे प्रतिक्रमण असे करत जा.' तर त्याला समजले असते की 'यांच्या बाबतीत माझे दोष झाले आहेत म्हणून मी त्यांचे प्रतिक्रमण करत आहे.' पण हे तर त्यांना समजत नाही, आणि वर्षभराचे एकत्र प्रतिक्रमण करतात. किंवा रायशी-देवशी प्रतिक्रमण करतात.

तेव्हा दुसरा एखादा म्हणतो, 'मी तर प्रेमशी प्रतिक्रमण केले.' त्याला वाटते 'तो आपल्या नावाचे गात आहे तर मी माझ्या नावाचे गाईन.'

म्हणजे यांनी (अंगाला) 'चोपडण्याचे' औषध 'पिऊन' टाकले

आहे. तेव्हा आता चोपडण्याचे औषध चोपडा आणि पिण्याचे औषध प्या. स्वत:ची चूक जर स्वत:ला समजली तर तो परमात्मा होईल.

नेहमीच 'केल्याचे' (कर्तेपणाचे) आवरण येते. आणि आवरणामुळे चुका दाबल्या जातात, मग त्या चुका दिसतच नाहीत. चुका तर जेव्हा आवरणे तुटतात तेव्हाच दिसू लागतात, आणि आवरणे फक्त ज्ञानी पुरुषांद्वारेच तुटतात. स्वत: स्वत:ची आवरणे तोडूच शकत नाही. ज्ञानी पुरुष आवरणे फ्रॅक्चर करून ती संपवून टाकतात! मग तर या लोकांना रायशी-देवशी हे जमणारच नाही. त्यांना दिवसभराचा हिशोब रात्री काढता येत नाही, विसरायला होते सर्व. कारण बेभान आहेत ना हे लोक!

असे आहे की जे रायशी आणि देवशी प्रतिक्रमणे करतात, त्यांना भगवंत चार आणे देतात. कारण त्यांनी मेहनत केली ना! यासाठी दोन तास तरी लागत असतील ना! म्हणून मेहनतीचे चार आणे देतात. एका सामायिकचे चार आणे तर दोन सामायिकचे आठ आणे झालेत ना! आणि आपले महात्मा तर दिवसातून शंभर-शंभर प्रतिक्रमणे करतात, आणि त्याचे तर भगवंत एक लाख रुपये देतात. (त्याची किंमत समजावण्यासाठी हे उदाहरण दिले आहे.)

## मृत प्रतिक्रमण

प्रतिक्रमण खरे तर कसे असले पाहिजे? पाचशे वर्षांपूर्वी कशी प्रतिक्रमणे होत असतील? जर या महाराज साहेबांना विचारले की, 'साहेब, मी 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण कसे करू? मी व्यवसाय करतो. त्यात सुपारी कमी तोलून देतो, कोणी चांगले मीठ घ्यायला आला तर त्याला वाईट मीठ देतो, तेल घ्यायला आला तर भेसळीचे तेल देतो. वजनमापात दोष करतो, या सर्वांचे प्रतिक्रमण मी कसे करू?' त्यावर महाराज म्हणतात 'तुम्ही देवशी प्रतिक्रमण करा.' दिवसभरातील चुका आठवून, लल्लूला सुपारी कमी दिली, त्याचे प्रतिक्रमण, याला वाईट मीठ दिले, त्याचे प्रतिक्रमण, मग त्याला भेसळयुक्त तेल दिले त्याचे वगैरे, दुकानात असे सतत घोटाळे केले त्याबद्दल प्रतिक्रमण

करायचे. अर्थात देवशी प्रतिक्रमण करा. वही-खात्यात उधारी आहे, रायशी-देवशी करत करत कच्छी लोकांनी नावे दिली. रायशी, करमशी, देवशी... !

रायशी म्हणजे रात्री केलेल्या दोषांचे प्रतिक्रमण, असे करत करत नावेच पडली. मग उरलेच काय? पाचशे वर्षांपूर्वी हे प्रतिक्रमण थोडेतरी जिवंत होते, आता तर ते प्रतिक्रमण मृत झाले आहे, त्याची पूजा होत आहे. अरे बाबा, सोड ना आता! असले मृत प्रतिक्रमण सोड! तर म्हणतो, 'नाही, त्याची अशी पूजा करायची. आज अमक्या ठिकाणी प्रतिक्रमण होणार आहे, तर सगळ्यांनी तिथे यावे.' अहो, या मृत प्रतिक्रमणाची पूजा कशासाठी करता?

असे कसे निपजलेत तुम्ही? भगवंतानी हे सर्व भाकीत केले होते. भगवंत सर्व काही जाणून होते, की (नंतर) 'कशी माणसे निपजतील!'

## मोक्षाच्या हेतूसाठी पच्चखाण

क्रमिक मार्गात प्रत्याख्यान करतात, पण प्रतिक्रमण करत नाहीत. महाराजांकडून पच्चखाण घेतात, पण प्रतिक्रमण तर त्यांना समजतच नाही. आणि प्रत्याख्यानही समजत नाही. ते लोक बटाटे, वगैरे खाणार नाही असे पच्चखाण घेतात, हिरव्या भाज्या खाणार नाही, असे प्रत्याख्यान घेतात. असले प्रत्याख्यान मोक्षाला जाण्यासाठी कामी येत नाही. मोक्षासाठी तर वेगळी पच्चखाण असतात. ज्याचे प्रतिक्रमण करतो त्याचेच पच्चखाण करायचे असते की, 'पुन्हा असे करणार नाही.' आपण इथे मोक्षाला जाण्यासाठी प्रतिक्रमण करतो. तशी प्रतिक्रमणे इतर कुठल्याही जागी होत नाहीत. अशी प्रतिक्रमणे कधीच उत्पन्न झाली नाहीत. क्रमिक मार्गात प्रतिक्रमण होतच नसते. आता एकही व्यक्ती अशी नाही, की जी यथार्थ प्रतिक्रमण करत असेल.

हे सर्व तर एकत्र प्रतिक्रमण करतात. त्यात जे मागधी भाषेत लिहिलेले आहे ते महाराज बोलतात आणि हे लोक ऐकतात. म्हणजे 'साबण लावा' असे सांगतात. अहो, पण साबण धोतराला लावायचा आहे की टेबलाला? असली प्रतिक्रमणे वाया जातात.

एकानेही प्रतिक्रमण केलेले नाही. पच्चखाण घेतले, पण कसले पच्चखाण? हिरव्या भाज्या खाणार नाही, बटाटे खाणार नाही, कंदमूळ खाणार नाही, रात्रीभोजन करणार नाही. रात्रीभोजन न करण्याचा निश्चय याला ते लोक पच्चखाण म्हणतात. याचे आणि मोक्षमार्गाचे काहीच देणेघेणे नाही. हे जे पच्चखाण आहेत, तो सारा संसार मार्ग आहे. त्याने पुढील जन्म चांगला आणि भौतिक सुखाचा मिळतो.

आपल्या येथे तर आपण ज्याचे प्रतिक्रमण करतो त्याचेच प्रत्याख्यान करायचे, की 'आता पुन्हा हा दोष करणार नाही.' तरी पण पुन्हा असे दोष होणे स्वाभाविक आहे. कांदा आहे म्हणून पाकळ्या निघतच राहतील. म्हणून हे सर्व चुकीचे होते असे तर आपण म्हणू शकत नाही ना! पच्चखाण घेतात, आणि पुन्हा तसेच होते, हे सर्व तुला कसे समजणार? तू कसा सहमत होशील? दोष होणे याचा पच्चखाणाशी काहीही संबंध नाही! त्याला असेच वाटते की पच्चखाण घेतले म्हणून दोष होणे बंद झाले पाहिजे. हे तर कांद्याच्या पाकळ्या, पाचशे-पाचशे, पंधराशे-पंधराशे, हजार, दोन हजार, पाच हजार अशा असतात, त्या पाकळ्या जोपर्यंत संपत नाहीत तोपर्यंत दोष होतच राहतात. हे सर्व त्या बिचाऱ्याला कसे समजणार?

या संसाराची गती आणि गत कशी आहे, ते त्याला कसे समजणार?

जो चूक करतो त्याने प्रत्याख्यान करायचे असते. जो चूक करतच नाही त्याने कशाला प्रत्याख्यान करायचे?

**प्रश्नकर्ता :** मग प्रतिक्रमण कशासाठी करायचे?

**दादाश्री :** चूक झाली तर प्रतिक्रमण, चूक झाली तर आलोचना आणि चूक झाली तर प्रत्याख्यान करायचे.

हे सर्व साधू-साध्वीजी आम्हाला सांगतात, की तुम्ही प्रत्याख्यान करत नाहीत, पच्चखाण घेत नाहीत. अरे, पच्चखाण म्हणजे तर जो ग्रहण करत असेल त्याने त्याचे पच्चखाण घ्यायचे असते, जो ग्रहणच करत नाही त्याने पच्चखाण का घ्यावे?

हे साधू, साध्वीजी पच्चखाण करतच नाहीत. ते त्यागाला पच्चखाण म्हणतात. त्यागाला पच्चखाण म्हणता येत नाही. पच्चखाण तर ज्याचा त्याग केला नसेल त्याचे करायचे असते. मग ते त्यागात परिणमित होते.

पच्चखाण कशाचे घ्यायचे ते तुम्हाला समजले की नाही?

**प्रश्नकर्ता :** जे ग्रहण केले आहे त्याचे?

**दादाश्री :** नाही, नाही, जे सोडायचे आहे त्याचे पच्चखाण घ्यायचे असते. ते लोक तर जे सोडून दिले आहेत त्याला पच्चखाण म्हणतात. 'आम्ही पच्चखाण घेतले आहे.' जे सोडले आहे, त्यालाच पच्चखाण म्हणतात.

व्रत तर वर्ततच असतात. 'आम्हाला' व्रत वर्ततच असतात. पाहा, आम्हाला अहिंसा महाव्रत असते, मग सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह, म्हणजे ही सारी व्रते आम्हाला वर्तत असतात. परिग्रह तर आमच्यात नावालाही नाही. आम्हाला या शरीराचाही परिग्रह नाही, अर्थात हे काय साधेसुधे व्रत नाही.

म्हणजे या अक्रम मार्गात अशी कुठलीही गोष्ट नाही. व्रत, नियम वगैरे काहीच नसते. हे सर्व संसारमार्गात असते. व्रत, जप, तप, उपधान, नियम, हे सर्व संसार मार्गात आहेत.

संसारमार्गात पुण्य गोळा करतात.

भगवंतांनी दोन मार्ग दाखवले आहेत. एक पुण्यमार्ग आणि दुसरा मोक्षमार्ग. मोक्षमार्ग म्हणजे 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान', जो ह्या तिन्ही गोष्टींसोबत चालतो त्याला मोक्ष प्राप्त झाल्याशिवाय राहत नाही.

**प्रश्नकर्ता :** जे पुण्य गोळा केले ते पुढील जन्मात चांगले संयोग मिळावे यासाठी उपयोगी पडते का?

**दादाश्री :** पुण्य गोळा केले ते पुढील जन्मी मदत करील, आणखी काय करणार?

## आता नसते इर्यापथिकी प्रतिक्रमण

क्रमिकमार्गात इर्यापथिकी क्रिया पहिल्या गुणस्थानकापासून बाराव्या गुणस्थानकापर्यंत असते. इर्यापथिकी क्रिया म्हणजे काय? तर जोपर्यंत अहंकार आहे तोपर्यंत इर्यापथिकी क्रिया असते. म्हणजे क्षायक समकित झाल्यानंतर, इर्यापथिकी क्रिया नसतेच. क्षायक समकित झाल्यानंतर, अहंकार संपल्यावर इर्यापथिकी क्रिया नसते.

इर्यापथिकी क्रिया म्हणजे, स्वतः बाहेर गेला, आणि परत आला, त्या दरम्यान जे जे दोष झाले असतील त्यांचे आलोचना, प्रतिक्रमण प्रत्याख्यान करायचे. अहंकार गेल्यानंतर मात्र त्याला क्रिया कराव्या लागत नाहीत. अहंकार असेपर्यंत थोड्याफार क्रिया असतात. क्रमिक मार्गात शेवटपर्यंत अहंकार असतो. पण यात (अक्रममध्ये) अहंकार नसतोच ना!

थोडेफार समजले का तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** हो, नंतर प्रतिक्रमण करावे लागते.

**दादाश्री :** तुम्हाला इर्यापथिकीचे प्रतिक्रमण करायचे नाही, ते क्रमिक मार्गात करावे लागते. आणि जर अक्रम मार्गात तुम्ही प्रतिक्रमण कराल तर मग तुम्ही शरीराचे मालक आहात असे सिद्ध होईल.

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे.

**दादाश्री :** 'तुम्ही कराल' तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** या शरीराचा मालक आहे असे मानूनच मग प्रतिक्रमण करावे लागेल.

**दादाश्री :** असे सिद्ध झाले.

**प्रश्नकर्ता :** सिद्ध झाले म्हणजे विरोधाभास झाला?

**दादाश्री :** म्हणून जर तुम्हाला करायचे असेल, तुमची इच्छा असेल तर तुम्ही 'चंदुभाई'ला सांगावे की तुम्ही प्रतिक्रमण करा. बस, एवढे म्हणा. आणि मोठ्या मोठ्या दोषांचे प्रतिक्रमण करा. अतिशय

सूक्ष्म गोष्टींमध्ये उतरू नका. कारण सूक्ष्म करायला गेलात तर मोठे दोष राहून जातील. राहतील की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, राहतील.

## ते आहे करुणाजनक

असे आहे की, अंत:करणाला जी भाषा समजत असेल त्याच भाषेत प्रतिक्रमण करण्यास सांगितले गेले आहे.

म्हणून आपल्याला त्याची निंदा करायची नाही, जे आहे ते चांगलेच आहे. पण तरी त्यांची नीयत मात्र चांगली आहे, नीयत खोटी नाही.

साधू-आचार्य किंवा कोणाचाही दोष आहे, असे मला म्हणायचे नाही. कारण त्यांना जर हे समजत नसेल तर कोण काय करणार?

त्या बिचाऱ्यांचा उद्देश फार चांगला आहे की 'आपल्याला महावीरांची आज्ञा पाळायची आहे.' आणि तीसुद्धा जेवढी पाळता येईल तेवढी, जेवढी समजेल तेवढी तरी पालन करण्याची तयारी आहे की नाही, एवढेच पाहण्याची आम्हाला गरज आहे. आणि जर समजली नाही तर मुख्य गोष्ट त्यांची नीयत काय आहे की यात 'शंभरातील अठ्याऐंशी लोक आज्ञांचे पालन करायला तयारच आहेत.' मग त्या मार्गाला आपण चुकीचा मार्ग कसे म्हणू शकतो? पण त्या अठ्याऐंशी लोकांना स्वत:चा एकही दोष दिसत नसतो. अशा तर मोठमोठ्या गोष्टी करतात. 'हो, थोडासा क्रोध आहे, आणि असे आहे!' असे बोलतात, पण दोष आहेत असे म्हणत नाहीत.

हिंदुस्तानात कोणीही असे बोलू शकत नाही की 'मला मोक्ष वर्तत आहे.' कारण त्याला जर कोणी डिवचले तर उपाधी. डिवचले की लगेच फणा काढेल. मग तिथे मोक्ष कसा असू शकतो? आणि आपल्या येथे तर कोणी दोन थोबाडीत जरी मारल्या, तरी कोणी फणा काढणार नाही, आणि कदाचित फणा काढला गेला तर लगेच त्याचे प्रतिक्रमण करतील. आणि इतर ठिकाणी कोणी प्रतिक्रमण वगैरे काहीच करत नाहीत.

## प्रतिक्रमणाने नि:शेषता

मोक्षाला तर जेव्हा क्रेडिट आणि डेबिट (जमा आणि उधार) ही दोन्ही खाती समाप्त होतात तेव्हाच जाता येते. क्रेडिट, शिल्लक असेल तरीही जन्म घ्यावा लागतो आणि डेबिट शिल्लक असेल तरीही जन्म घ्यावा लागतो.

**प्रश्नकर्ता :** कर्म शिल्लक राहतात, की भाव?

**दादाश्री :** कर्माची आई कोण आहे? तर भाव! आई आहे तर मूल आहे.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण हे क्रेडिट, डेबिट नि:शेष करण्यासाठी आहे का?

**दादाश्री :** हो, दोन्हींसाठी प्रतिक्रमण करायचे पण क्रेडिटचे तर आठवतच नाही ना? म्हणून डेबिटचे प्रतिक्रमण तर नेहमीच केले पाहिजे.

## त्याने प्राप्त केला महावीरांचा मार्ग

परंतु आता हे सर्व असे चालत आले आहे, आणि खूप वर्षांचे जुने आहे, 2500 वर्षे झालीत. फार जुने झाले की असेच होईल ना? असे बारा महिन्यांनी करतात तेही चांगलेच आहे ना! बारा महिन्यांनंतर प्रतिक्रमण करतात, त्यामुळे दोष काही कमी होत नाहीत. तू कसे प्रतिक्रमण करतोस?

**प्रश्नकर्ता :** 'शूट ऑन साइट.'

**दादाश्री :** असेच प्रतिक्रमण केले पाहिजे, आणि असे प्रतिक्रमण करण्यासाठी जागृती पाहिजे. जागृतीशिवाय कसे होईल? स्वत:ला समजतच नाही की इथे दोष झाला आहे. थोड्या वेळानंतर तो विसरून जातो ना! अशी जागृती नसते म्हणून प्रतिक्रमण होत नाहीत. 'आम्ही' जेव्हा त्याला जागृत अवस्थेत आणतो तेव्हा तो निरंतर जागृत होतो. मग तो 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करतो. एखाद्याच्या हातातून त्याच्या

पतंगाची दोरी सुटली आणि पतंग गटांगळ्या खाऊ लागला तर आरडाओरडा केल्याने काही निष्पन्न होईल का?

**प्रश्नकर्ता :** दोरी सुटल्यानंतर काहीही निष्पन्न होत नाही.

**दादाश्री :** लोकांची आज अशी परिस्थिती आहे. ती दोरी जर तुमच्या हातात दिली, आणि नंतर पतंगाने गटांगळ्या खाल्ल्या तर तुम्ही ती दोरी ओढल्यावर पतंग परत ठिकाणावर येईल. नाही तर तोपर्यंत कोणतीही परिस्थिती स्वतःच्या हातात नसते.

भगवान महावीरांचा मार्ग प्राप्त झाला असे कधी म्हणता येईल? जेव्हा रोज स्वतःचे शंभर-शंभर दोष दिसू लागतील, रोज शंभर-शंभर प्रतिक्रमण होऊ लागतील, त्यानंतरच महावीरांच्या मार्गावर आला असे म्हणता येईल. 'स्वरूपाचे ज्ञान' तर अजून याहून खूप दूर आहे! पण हा तर चार पुस्तके वाचून 'स्वरूप' प्राप्त झाल्याच्या नशेत फिरत राहतो. त्याने स्वरूपाचा एक थेंबही प्राप्त केला नाही असेच म्हणावे लागेल. जिथे 'ज्ञान' अडकले आहे तिथे नशाच वाढणार. या नशेमुळे ज्ञानावरण व दर्शनावरण दूर होण्याचे थांबले आहे.

## अज्ञान दशेत प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** यथार्थ प्रतिक्रमणे कशी करावीत?

**दादाश्री :** यथार्थ प्रतिक्रमणे तर मी तुम्हाला दृष्टी दिल्यानंतरच कामाला येतील. कारण जागृती आल्याशिवाय लोक प्रतिक्रमण करू शकत नाहीत. आणि ज्ञानाशिवाय जागृती येत नाही. आम्ही ज्ञान दिल्यानंतर निरंतर जागृती राहते. नाही तर मी जरी आज तुम्हाला प्रतिक्रमणाबद्दल सांगितले, समजावले तरी पण उद्या तुम्ही ते विसरून जाल.

आता जर तुम्हाला तात्काळच्या गोष्टीसुद्धा आठवत नसतील तर सायंकाळी कसे काय आठवणार? दिवसभर गोंधळलेला आणि घाबरलेलाच असतो, मग दोष कसे आठवतील? जागृती आहेच कुठे, बेभानपणा! बेभानपणातच फिरत राहतो. 'मी कोण आहे' याचे भान नाही, मग दोष कसे दिसतील? दोष दिसले तर कल्याण होईल.

**प्रश्नकर्ता :**परंतु ज्या लोकांनी ज्ञान घेतले नाही, ते प्रतिक्रमण करू शकतात का? ज्यांनी ज्ञान घेतलेले नसेल त्यांना जर आम्ही प्रतिक्रमण क्रिया समजावून सांगितली तर त्यांच्यावर त्याचा परिणाम होईल का?

**दादाश्री :** नाही होणार, होऊ शकणार नाही. जागृती नसतेच ना! ज्ञानाने सारी पापे भस्मीभूत होतात, आणि म्हणून जागृती उत्पन्न होते, आणि जागृती उत्पन्न झाली तरच हे सर्व ध्यानात राहते.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ प्रतिक्रमणाचा उपाय सगळ्यांसाठी नाही.

**दादाश्री :** असे होऊ शकत नाही ना! दुसऱ्यांना ते उपयोगी पडत नाही. परंतु आम्ही म्हणतो की थोडेफार, जेवढे होईल तेवढे तरी कर. थोडेफार केले तरी त्याला त्याचा लाभ मिळेल, पण त्याला जागृती राहत नाही ना! जागृती कशी राहील? तरी पण असे प्रतिक्रमण जाणत असेल तर थोडाफार लाभ होईलच! परंतु ज्यांना हा इलाज माहीतच नाही, त्यांना काय लाभ मिळेल?

तात्पर्य हे सारे जग जागृती नसल्यामुळे बारा महिन्यांनंतर पर्युषण करते. बिलकुल जागृती नाही ना!

**प्रश्नकर्ता :** तुम्ही कधी सामायिक वगैरे केले आहे का?

**दादाश्री :** आम्ही प्रतिक्रमणच करत होतो, नेहमी प्रतिक्रमण करीत होतो.

**प्रश्नकर्ता :** तुम्हाला ज्ञान होण्यापूर्वीचे मी विचारत आहे.

**दादाश्री :** तेव्हा असे काही नव्हते.

ज्ञान होण्यापूर्वीही आम्ही प्रतिक्रमण करत होतो, पण कसे? तर 'हे चुकीचे कर्मबंधन होत आहे', त्याचे पश्चात्तापपूर्वकचे प्रतिक्रमण करायचो, पण त्याला खरे प्रतिक्रमण म्हणता येणार नाही. ज्ञानानंतर मात्र खरे प्रतिक्रमण होतात.

## समकित द्वारा खरे प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण शुद्ध झाले हे कसे ओळखायचे? खरी-यथार्थ प्रतिक्रमणे कशा प्रकारे होतात?

**दादाश्री :** समकित झाल्यानंतर यथार्थ प्रतिक्रमण होतात. सम्यक्त्व प्राप्त झाल्यानंतर, दृष्टी सम्यक् झाल्यानंतर, आत्मदृष्टी झाल्यानंतर यथार्थ प्रतिक्रमण होऊ शकतात. परंतु तोपर्यंत जर प्रतिक्रमण कराल आणि पश्चात्ताप कराल तरीसुद्धा दोष कमी होऊन जातील. आत्मदृष्टी प्राप्त न झालेल्या संसारी लोकांनी चूक झाल्यावर पश्चात्ताप केला, प्रतिक्रमण केले, तरी त्यांची पापे कमी होतील. प्रतिक्रमण, पश्चात्ताप केल्याने कर्मे नष्टही होऊ शकतात!

कपड्यावर चहाचा डाग पडल्याबरोबर लगेचच तो धुऊन टाकतात, ते कशासाठी?

**प्रश्नकर्ता :** डाग निघून जावा म्हणून.

**दादाश्री :** त्याचप्रमाणे आपल्या आत डाग पडले की लगेचच धुऊन टाकले पाहिजेत. हे लोक (ज्ञानप्राप्त महात्मा) लगेच धुऊन टाकतात. काही कषाय उत्पन्न झाला, काही दोष झाला की त्वरितच धुऊन टाकले तर स्वच्छच स्वच्छ, सुंदरच सुंदर! तुम्ही तर बारा महिन्यांतून एक दिवस करता, त्या दिवशी सर्व कपडे भिजत घालतात.

आमचे प्रतिक्रमण 'शूट ऑन साइट' म्हटले जाते. म्हणजे तुम्ही जे करता त्याला खरे प्रतिक्रमण म्हणता येणार नाही. कारण तुमचा एकही कपडा (दोष) धुतला जात नाही आणि आमचे तर सर्व कपडे धुऊन स्वच्छ होऊन गेलेत. सर्व कपडे धुऊन स्वच्छ होतात त्यालाच प्रतिक्रमण म्हणायचे.

कपडे दररोज एक-एक करून धुवावे लागतात, पण हे तर बारा महिने झाल्यानंतर बारा महिन्यांचे सर्व कपडे एकत्र धुतात. भगवंतांकडे तर असे चालणारच नाही. हे लोक बारा महिन्यांनंतर कपडे एकदाच

उकळतात, नाही का? ते तर एक-एक करून धुवावे लागतात. दररोज पाचशे-पाचशे कपडे (दोष) धुतले जातील, तेव्हा काम होईल.

जेवढे दोष दिसतील, तेवढे कमी होतील. अजूनही दोष दिसत नाहीत याचे कारण काय? तर तेवढे अजून कच्चे आहे. दोष दिसत नाहीत, म्हणून काय बिनदोषांचे थोडेच झाले आहेत?

भगवंतानी दररोज वहीखाते (आपल्या दोषांची नोंद)लिहायला सांगितले होते, आणि हे तर आता बारा महिन्यांनी वहीखाते लिहितात, जेव्हा पर्युषण येते तेव्हा. भगवंतांनी म्हटले होते की जर खरा व्यापारी असशील तर वहीखाते रोजच्या रोज लिहित जा आणि संध्याकाळी हिशोब काढ. बारा महिन्यांनी वहीखाते लिहिले तर काय आठवणार? तेव्हा कोणती रक्कम आठवेल? भगवंत म्हणाले होते की खरा व्यापारी हो, आणि दररोजचे वहीखाते दररोज लिहित जा. आणि त्यात कुठे चूक झाली, अविनय झाला, तर लगेचच त्याचे प्रतिक्रमण करून ती चूक संपवून टाक.



[ 4 ]

# धन्य! धन्य! ते जागृत दादा!

## निर्दोष दृष्टी तरीही बोलले जाते दोषी

या जगात सर्व निर्दोष आहेत, तरी पण बघा ना, अशी (कडक) वाणी निघत आहे ना! आम्ही तर या सर्वांना निर्दोषच पाहिले आहे, कोणीही दोषी नाही. आम्हाला कोणी दोषी दिसतच नाही. फक्त दोषी बोलले जाते, आम्ही असे बोलू शकतो का? असे बोलणे अनिवार्य आहे का? कोणाबद्दलही असे बोलू शकत नाही. असे बोलल्यानंतर त्वरितच त्याची प्रतिक्रमणेही होतच असतात. तेवढी आमची चार डिग्री कमी आहे, त्याचा हा परिणाम आहे. पण तरी प्रतिक्रमण केल्याशिवाय चालणारच नाही.

आम्ही (समोरच्याचा दोष निघावा म्हणून) हस्तक्षेप करतो, कडक शब्द बोलतो, परंतु निसर्गाच्या दृष्टीने तर हा आमचा दोषच झाला ना! म्हणून आम्ही त्याचे प्रतिक्रमण (ए. एम पटेलकडून) करवून घेतो. प्रत्येक चुकीसाठी प्रतिक्रमण होत असते. समोरच्या व्यक्तीचे मन दुखावले जाणार नाही अशी आमची सतत भावना असते.

**प्रश्नकर्ता :** आपण शुभ हेतूने रागावलो, तरी पण प्रतिक्रमण करावे लागते का?

**दादाश्री :** शुभ हेतूने पुण्य बांधले जाते! ज्ञान नसेल आणि

ह्याच्यावर क्रोध केला तरी पण पुण्य बांधले जाते, कारण ते हेतूवर अवलंबून आहे. या जगात सारे काही हेतूने बांधले जाते.

माझ्याने 'आहे' त्याला 'नाही' असे म्हणता येणार नाही आणि 'नाही' त्याला 'आहे' असेही म्हणता येणार नाही. त्यामुळे माझ्याकडून काही लोक दुखावतात. जर 'नाही' त्याला 'आहे' असे मी म्हणालो तर तुमच्या मनात भ्रम निर्माण होईल, आणि असे बोलल्याने त्या (प्रतिपक्षीय) लोकांच्या मनात असे विचार येतील की, हे 'असे का बोलत आहेत?' म्हणून जेव्हा असे बोलले जाते तेव्हा त्या (प्रतिपक्षीय) लोकांचेही प्रतिक्रमण रोज करावे लागते. कारण त्यांना देखील दु:ख होता कामा नये. एखादा मानतो की, या पिंपळाच्या झाडावर भूत आहे, आणि मी म्हणतो की या पिंपळाच्या झाडावर भूत-बित वगैरे काहीच नाही. यामुळे त्याला दु:ख होते, म्हणून मग मला प्रतिक्रमण करावे लागते. असे तर नेहमीच करावे लागते ना! आम्ही कुणाला दु:खी करण्यासाठी आलो नाहीत, आम्ही तर सुख देण्यासाठी आलो आहोत, आणि ज्ञानी आणि अज्ञानी दोघांना एकाच वेळी सुख देता येत नाही, म्हणून या बाजूचे प्रतिक्रमण करावे लागते.

**प्रश्नकर्ता :** कित्येकदा अज्ञान असते, ते ज्ञानाचा पोषाख घालून प्रकट होते.

**दादाश्री :** अज्ञान प्रकट झाले तर ते टिकणार नाही. एक सेकंदसुद्धा टिकणार नाही, आणि आपल्या येथे तर ते बिलकुल टिकणार नाही. कारण आपले ज्ञान कसे आहे? डिमार्केशनवाले ज्ञान आहे. 'हे अज्ञान आणि हे ज्ञान', या दोन्हींच्या मध्ये डिमार्केशन (भेदरेषा) आहे, म्हणून येथे तर असे काही होणारच नाही ना!

मग त्याला दु:ख झाले असेल तर प्रतिक्रमण करावे लागते. जेवढे सुधारता येईल तेवढे सुधारून घेतो की, 'भाऊ, आमच्याकडून काही चूकभूल झाली असेल तर आम्ही प्रतिक्रमण करतो.'

लोकांना दु:ख देऊच नये. तुम्हाला त्याची समज चुकीची वाटते,

पण त्याच्या हिशोबाने तर त्याची समज योग्यच आहे ना! आपल्याला त्याची समज चुकीची वाटते पण त्याला तर त्याची समज बरोबर आहे असेच वाटते ना, मग आपण त्याला कसे दुखवायचे?

## तर प्रतिक्रमण नाही

**प्रश्नकर्ता :** आपला भाव जर असा असेल की 'समोरची व्यक्ती उदयकर्मांच्या आधीन व्यवहार करीत आहे', तर मग प्रतिक्रमण करायची गरज नाही ना?

**दादाश्री :** अशी स्थिती चांगली म्हटली जाते! परंतु प्रतिक्रमण तर, आपल्याला त्याच्या प्रति वाईट भाव झाले असतील तरच करायचे.

**प्रश्नकर्ता :** आणि जर वाईट भाव झाले नसतील तर नको ना?

**दादाश्री :** नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्ही त्याला चुकीचा मानतच नाही ना?

**दादाश्री :** तर मग नाही.

पूर्ण जग निर्दोष आहे, क्षणभर देखील कोणताही जीव दोषी झाला नाही. हे जे दोषी दिसतात, ते आपल्याच दोषामुळे दोषी दिसतात. दोषी दिसतात म्हणूनच कषाय करतात, नाही तर कषाय करणारच नाहीत.

म्हणजे दोषी दिसतात म्हणून चुकीचेच दिसते. आंधळा आंधळ्यावर आपटतो, अशी ही गोष्ट आहे. जर आंधळे लोक एकमेकांवर आपटत राहिले तर आपल्याला समजेलच ना की हे आंधळे आहेत, म्हणून इतके आपटतात. याचे कारण काय? तर त्यांना दिसत नाही.

अन्यथा या जगात कोणीही दोषी नाहीच. दोष दिसतात म्हणून कषाय होत राहतात.

## सत्य-असत्य, सापेक्ष

**प्रश्नकर्ता :** गोष्ट सत्य आहे, तर मग त्याचे प्रतिक्रमण का करावे?

**दादाश्री :** हे जे सत्य आहे, तेच असत्य आहे. जे जे सत्य आहे तेच सारे असत्य आहे. कोणती गोष्ट सत्य आहे, ते तुम्ही सांगा. तुम्हाला कोणती गोष्ट सत्य वाटते? मी तुम्हाला सांगू शकतो की ती असत्य आहे.

**प्रश्नकर्ता :** जर आपण खरे बोललो, तोंडावर सांगितले तर त्याला वाईट वाटते, तर मग त्याचे प्रतिक्रमण का करावे?

**दादाश्री :** कोणीही खरे सांगू शकत नाही. या हिंदुस्तानात एकही असा माणूस नाही की जो खरे बोलू शकेल. मनुष्य खरे कसे बोलू शकेल? ते तर आपापल्या समजेनुसार खरे असते. दुसऱ्यांच्या समजेनुसार ते खोटेच असते ना?

आम्हाला कोणी दोषी दिसतच नाही. ही जी वाणी निघते, त्याचबरोबर प्रतिक्रमण होत असतात, की 'असे होता कामा नये.' म्हणजे आमचा अभिप्राय वेगळा असतो की, हे असे नाही. आम्हाला तो कसा दिसतो? तर निर्दोषच दिसतो, मग ही वाणी अशी का निघते? अवर्णवाद होता कामा नये. आम्हाला मौनच राहिले पाहिजे. परंतु जर मौन राहिलो तर खरोखर काय झाले हे तुम्हाला कळणारच नाही, मग त्यालाही सत्य म्हणता येणार नाही. याला सत्य म्हणता येणार नाही.

## शुद्धात्म्याशिवाय सर्व खोटे

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्यांना त्यांच्या समजुतीनुसार ते चुकीचे वाटत असेल तर त्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** ह्या सगळ्या ज्या सत्य गोष्टी आहेत त्या सर्व प्रत्यक्षात खोट्याच आहेत. व्यवहारापुरत्या सत्य आहेत. मोक्षाला जायचे असेल तर ते सर्व खोटेच आहे. त्या सगळ्या गोष्टींसाठी प्रतिक्रमण करावे लागेल. 'मी आचार्य आहे' याचेही प्रतिक्रमण करावे लागेल.

म्हणजे हे सर्वच खोटे आहे, सर्व खोटे. हे तुझ्या लक्षात येत आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** येत आहे.

**दादाश्री :** सगळेच खोटे. लोक न समजल्यामुळे सांगतात की 'मी सत्य बोलत आहे.' अरे, सत्य बोलत असाल तर त्याचा विरोध होणारच नाही.

## त्याला सत्य म्हणतात का?

मी जेव्हा येथे बोलतो, तेव्हा काय कोणी माझ्यासमोर बोलायला तयार होतो? विवाद होतो का? मी जे काही बोलत राहतो ते सर्व ऐकतच राहतात ना! विवाद करत नाहीत ना! म्हणजे ते सत्य आहे, ही वाणी सत्य आहे, आणि सरस्वती आहे, आणि ज्या वाणीने वाद-विवाद होतात, ती वाणी चुकीची आहे, एक्झॅक्टली चुकीची आहे.

अन्य ठिकाणी तर (ऐकणारे लोक) विरुद्ध बोलतात की, 'बेअक्कल बोलू नकोस', म्हणजे तेही चुकीचे, हेही चुकीचे आणि ऐकणारेही चुकीचे. ऐकणारे काही बोलतच नाहीत, आणि ते सर्वच, पूर्ण समुदायच चुकीचा.

**प्रश्नकर्ता :** परंतु आपल्या कर्मांचा उदयच असा असेल की समोरच्याला आपण चुकीचे वाटतो. आमचे म्हणणे सत्य असेल, अगदी बरोबरच असेल, आम्ही म्हटले की 'हे मी केले नव्हते', तरीही म्हणतात, 'नाही, तुम्हीच असे केले', तर हा आमच्याच कर्मांचा उदय म्हणायचा ना? त्यामुळेच त्याला चुकीचे वाटते ना?

**दादाश्री :** सत्य नसतेच कधी. कोणीही सत्य बोलूच शकत नाही, खोटेच बोलतात. सत्य तर, जो समोरचा कबूल करील तेच सत्य, नाही तर ते स्वतःच्या समजुतीनुसार मानलेले सत्य आहे. तुम्ही स्वतः मानलेल्या सत्याचा लोक स्वीकार करत नाहीत.

म्हणून भगवंतानी सांगितले की सत्य कोणाचे? तर ज्यांची वीतराग वाणी असेल त्यांचे! वीतराग वाणी म्हणजे काय? तर ती वाणी वादी कबूल करेल, प्रतिवादी कबूल करेल, त्याला प्रमाण मानले जाईल. ही

सर्व तर राग-द्वेषवाली वाणी, खोटी-कपटी, त्याला जेलमध्ये टाकण्यासारखी, त्यात सत्य असू शकते का? रागयुक्त वाणीत सत्य नसतेच. त्यात सत्य असेल असे तुम्हाला वाटते का? आम्ही जेव्हा येथे रागावतो, तेव्हा समोरच्याचा आत्मा कबूल करतो, विवाद होतच नाहीत. आपल्या येथे कधी विवाद झाला आहे का? क्वचित एखादा माणूस जरा कच्चा पडला असेल, अन्यथा कोणताही विवाद झाला नाही. दादांच्या शब्दांवर कोणी उलट उत्तर दिले नाही. कारण ही आत्म्याची निर्मळ-प्युअर गोष्ट, प्रत्यक्ष सरस्वती! देशना!

आणि राग-द्वेषयुक्त वाणीला सत्य म्हणता येईल का?

**प्रश्नकर्ता :** नाही, म्हणता येणार नाही.

**दादाश्री :** पण तू तर त्याला सत्य म्हणतोस ना?

**प्रश्नकर्ता :** त्याला तर व्यवहार सत्य म्हणतात ना?

**दादाश्री :** व्यवहार सत्य, म्हणजेच 'निश्चयात असत्य' आहे.

व्यवहार सत्य म्हणजे समोरच्याला जर पटले तर ते सत्य आणि पटले नाही तर असत्य. व्यवहार सत्य म्हणजे वास्तवात ते सत्य नाहीच.

**प्रश्नकर्ता :** आम्ही ज्याला सत्य मानतो ते जर समोरच्याला पटले नाही...

**दादाश्री :** ते सर्व खोटे. पूर्णपणे खोटे. पटले नाही ते सर्व खोटे. आम्हीसुद्धा म्हणतो ना, कुणाला जर आमची गोष्ट समजली नाही, तर आम्ही त्याची चूक काढत नाही, आमचीच चूक आहे असेच मानतो. आमची अशी कोणती चूक झाली की त्याला आमचे म्हणणे समजले नाही. समजायलाच हवे. समोरच्याला समजले नाही, तर तो त्याचा दोष नाही, आम्ही आमचाच दोष पाहतो. मला त्याला समजावता आले पाहिजे. म्हणजे समोरच्याचा दोष नसतोच मुळी. समोरच्याचा दोष पाहणे ही तर भयंकर मोठी चूक आहे. आम्हाला समोरच्या व्यक्तीचा दोष आहे असे वाटतच नाही, कधीच वाटले नाही.

हे तर, आम्हाला विचारतात म्हणून उत्तर द्यावे लागते, आणि मग आम्हाला त्याचे प्रतिक्रमणही करावे लागते. सत्य तर नेहमी प्रतिक्रमणासहितच बोलले जाते. प्रतिक्रमण नसेल तर ते सत्य सत्यच नाही. या जगाचे सत्य निश्चयामध्ये असत्य आहे.

## असे बोल कारुण्यधारेतून...

आम्ही तर झटकन औषध (उपाय) करतो. आणि मग आम्ही वीतरागच असतो. आम्हाला राग-द्वेष होत नाहीत, औषधासाठी तयार. आणि चुकूनही त्याच्याबद्दल किंचित अभाव झाला, तसे तर कधी होत नाही, परंतु जर झालाच तर आमच्याजवळ प्रतिक्रमणरूपी औषध असते, म्हणून त्वरितच औषधोपचार करून टाकतो. प्रतिक्रमणरूपी औषध असते ना!

हे तर मी या जन्मात महाराजांबद्दल असे बोललो. जगातील सर्व धर्ममार्गात जे सर्व चुकीचे करत आहेत, त्या सर्वांसाठी बोललो. जणू मीच धर्माचा राजा आहे! लोकांबद्दल असे बोलतो की मलाच सारे देणेघेणे आहे! परंतु मला काय देणेघेणे? मी तर 'वन ऑफ धी मेन' (सगळ्यांपैकी एक आहे)! आणि असे बोलायला नको, पण लोक याच्यातून सुटलेच पाहिजेत! म्हणून असे बोलून पापे ओढवून घेतली आहेत. कदाचित मला ती पापे भोगावी लागतील. दुसरे कोणतेच पाप मी केले नाही, माझी अन्य कोणती स्वतंत्र पापे नाहीतच.

नियम असा आहे की तुम्ही कोणत्याही व्यक्तीबरोबर ज्ञानाची गोष्ट करू शकता, पण अशी व्यक्ती की जी ज्ञान घेऊ शकत नसेल, थंड असेल, तर तुम्ही जरा सैल सोडावे, वीतराग व्हायचे. परंतु याच्यामागे अशी करुणा आहे की, 'अहो! तुम्ही येथपर्यंत आला आहात, तर ज्ञान प्राप्त करा ना!' एवढा ताप आहे तरीही औषध का घेत नाही! औषध तयारच आहे. परंतु याला नियमानुसार मानले जात नाही. म्हणून मग प्रतिक्रमणे करावी लागतात. आपले काही देणेघेणे झाले असेल तर त्याचेही प्रतिक्रमण करावे लागते. याला भगवंतांनी 'करुणेचे प्रतिक्रमण' म्हटले आहे.

## निर्दोष दृष्टी तरीही सदोष वाणी

आता असे जे बोलावे लागते ना की 'हे योग्य नाही,' असे म्हणालो म्हणजे स्याद्वाद चुकलो. तरीही योग्य बनविण्यासाठी असे म्हणावे लागते. परंतु भगवंत तर काय म्हणतात की 'हेही योग्य आहे आणि तेही योग्य आहे. चोराने चोरी केली, तेही योग्य आहे. याचा खिसा कापला गेला, तेसुद्धा योग्यच आहे.' भगवंत तर वीतराग! ते हस्तक्षेप करतच नाहीत ना! खटपट करतच नाहीत! आणि आमची तर सर्व गोष्टींमध्ये खटपट. आमच्या वाट्याला अशी खटपट आली आहे.

**प्रश्नकर्ता :** परंतु ते आमचे रोग काढण्यासाठीच आहे ना?

**दादाश्री :** हो. लोकांना तयार करण्यासाठी. यात आमचा उद्देश चांगला आहे. आणि आमचा उद्देश आमच्या स्वतःसाठी नाही, तर सर्वांसाठी आहे.

शिवाय आमच्या प्रतीतीमध्ये तर असेच आहे की 'ते दोषी नाहीत. प्रतीतीमध्ये निर्दोषच आहेत.' प्रतीती पूर्णपणे बदलली आहे. अर्थात, निर्दोष आहे असे मानूनच मी हे बोलत असतो.

**प्रश्नकर्ता :** निर्दोष आहे असे समजूनच बोलता ना?

**दादाश्री :** हो.

**प्रश्नकर्ता :** तर मग तुम्हाला प्रतिक्रमणे का करावी लागतात?

**दादाश्री :** कारण असे बोलता कामा नये. एकही शब्द बोलू नये. असे चुकीचे शब्द का बोलावे? समोरची व्यक्ती तर येथे उपस्थित नाही. त्यामुळे समोरच्याला दुःख होत नाही. आणि तुम्हा सर्वांचीही हरकत नाही, कारण दादांच्या बिलीफमध्ये तर सर्व निर्दोषच आहेत. मग असे कडक शब्द का बोलले गेलेत? म्हणून प्रतिक्रमण करावे लागते. कडक शब्द असताच कामा नयेत.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही तर जेव्हा बोलता तेव्हाही तुम्ही वेगळेच असता, तर मग प्रतिक्रमण कशासाठी?

**दादाश्री :** वेगळे आहोत, म्हणून प्रतिक्रमण 'मला' करायचे नाही. आतल्या आत, जे करतात ना, जे बोलतात ना, त्यांनाच सांगायचे की 'तुम्ही प्रतिक्रमण करा.' तुमच्यासाठी सुद्धा हे असेच आहे. 'तुम्हाला' प्रतिक्रमण करायचे नाही, तर 'चंदुभाई'ला करायला सांगायचे. 'तुम्हाला' प्रतिक्रमण करायचे नसते. ज्याने अतिक्रमण केले त्यानेच प्रतिक्रमण करायचे असते.

**प्रश्नकर्ता :** तर चूक झाल्यावर प्रतिक्रमण कसे करता?

**दादाश्री :** नंतर प्रतिक्रमण करावे लागते ज्ञानासंबंधी चूक होत नसते. जेव्हा कोणी स्याद्वादाच्या विरोधात जात असेल, तेव्हा त्या व्यक्तीवर सक्ती होते. जिथे स्याद्वाद असतो, तिथे सक्ती नसते. बिलकुल, संपूर्ण स्याद्वाद! आणि याला स्याद्वाद म्हणतात, पण संपूर्ण स्याद्वाद म्हणू शकत नाही ना! जेव्हा केवलज्ञान होईल तेव्हा संपूर्ण स्याद्वाद!

## 'केवलदर्शन' दाखविते चूक

आमचे ज्ञान अविरोधाभासी आहे, पण वाणी स्याद्वाद नाही. यात कोणीतरी तावडीत सापडतो, पण तीर्थंकरांच्या वाणीमध्ये कोणी असा सापडत नाही. त्यांची तर संपूर्ण स्याद्वाद वाणी! ते कोणालाही तावडीत न घेता (न दुखवता) बोलतात! त्यांचे बोलणेही असेच असते, पण ते कोणाला तावडीत न घेता बोलतात.

**प्रश्नकर्ता :** कोणीतरी तावडीत सापडतो म्हणून तुमचा स्याद्वाद संपूर्ण म्हटला जात नाही, तरी पण स्याद्वादामध्ये चूक झाली हे तर तुमच्या दर्शनामध्ये पूर्णपणे असतेच ना?

**दादाश्री :** हो, दर्शन तर संपूर्ण, दर्शनामध्ये कसलीही उणीव नाही. ज्ञान पण आहे, पण ज्ञानात चार डिग्री कमी आहे, म्हणून ही वाणी स्याद्वाद नाही. आमचे दर्शन संपूर्ण असते. दर्शनामध्ये सर्व काही तात्काळ येऊन जाते, लगेच चूक समजते. अगदी सूक्ष्माहून सूक्ष्म चूक सुद्धा लगेच समजते. तुम्हाला तर अशा चुका समजायला अजून खूप

वेळ लागेल, तुम्ही फक्त स्थूल चुका पाहू शकता, दिसून येतात अशा मोठ्या चुकाच पाहता. म्हणूनच आम्ही म्हणतो ना की आमच्याकडून दोष होत असतो तरी पण कुणालाही आमचा दोष दिसत नाही, आम्हाला आमचा दोष दिसतो.

**प्रश्नकर्ता :** स्याद्वादमध्ये चूक झाली, असे सर्व दोष दिसतात का?

**दादाश्री :** स्याद्वाद-अनेकांतवाद यात चूक झाली, असे सर्व दोष आम्हाला दिसतात. आता आमचा स्याद्वाद पूर्णतेकडे जात आहे. स्याद्वाद संपूर्ण झाल्यावर केवलज्ञान पूर्ण होते. दर्शन आहे म्हणून तर समजते की 'ही चूक आहे.' दर्शन पूर्ण आहे, म्हणून तर सर्वांना सांगितले ना की, केवलदर्शन देत आहे (ज्ञान देतेवेळी).

आम्हाला प्रतिक्रमणे करावी लागतात, कारण कधी कधी आमच्याकडून अशा गोष्टी बोलल्या जातात. पाहा ना, आमच्यासाठी तेवढे अनिवार्य आहे. कधी कधी आचार्यांबद्दल बोलले जाते! पण, कोणाबद्दलही असे बोलू नये. आम्ही जाणतो, की 'या जगात सर्व निर्दोषच आहेत.' मग कोणाबद्दल असे बोलू शकतो का?

**प्रश्नकर्ता :** नाही बोलू शकत.

**दादाश्री :** अशीच वाणी निघत असते आणि त्याचक्षणी त्याची प्रतिक्रमणे पण होत राहतात. बघा ना, जग कसे आहे?

जी वाणी बोलतो त्यावरही वेगळा अभिप्राय! कसे हे जग? जी वाणी बोलतो त्यावर असा अभिप्राय आहे की 'हे असे नाही, हे चुकीचे आहे, असे होता कामा नये.' परंतु हे जग कसे चालले आहे, त्याबरोबर जागृतीत राहून चालतो.

आम्ही बोलतो आणि बोलतानाच अशी जागृती राहते की 'असे बोलायला नको होते,' कारण आम्ही संपूर्ण जगाला निर्दोष पाहिले आहे. फक्त ते अनुभवास आले नाही. अनुभवास का आले नाही? तर ही जी वाणी आहे ना, ती हस्तक्षेप करत असते.

**प्रश्नकर्ता :** हस्तक्षेप करते, पण तुमची जागृती तर सतत असते.

**दादाश्री :** नाही, जागृती असूनही जोपर्यंत अशी वाणी बंद होत नाही तोपर्यंत पूर्णपदाची प्राप्ती होतच नाही ना! ही वाणी कशी निघते? अगदी जोशपूर्ण!

ही अशी वाणी केव्हा भरली गेली होती? तर जेव्हा जग निर्दोष पाहिले नव्हते तेव्हा भरली गेली होती. तेव्हा वाटायचे की असे कसे हे दोषी लोक? हे असे का करतात? कशासाठी करतात? असे असता कामा नये. जैन धर्म असा का असावा? पूर्वी असे सर्व भरले होते, तेच आता बाहेर पडत आहे. त्यावेळी जे अभिप्राय होते ते आज (वाणीद्वारे) निघत आहेत. आणि आज मात्र आम्ही त्या अभिप्रायांशी सहमत नाही.

## ज्ञानींचे प्रतिक्रमण

सर्व प्रतिक्रमण करून झाले का? प्रतिक्रमण कर, नाही तर साफ होणार नाही. दररोज प्रतिक्रमण कर, दादांच्या हजेरीत आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान!

**प्रश्नकर्ता :** त्यांची विराधना करण्याची आपली भावना नसेल, तरीही प्रतिक्रमणे करावी लागतील का? आपण तर जे खरे आहे, तेच सांगत आहोत ना?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की, आम्ही ज्याक्षणी बोलतो, त्याचक्षणी आमचे जोरदार प्रतिक्रमण पण सुरूच असते, बोलता बोलताच.

**प्रश्नकर्ता :** पण जी गोष्ट खरी आहे, तीच तुम्ही सांगत होता, मग त्यासाठी प्रतिक्रमण का करावे?

**दादाश्री :** नाही, तरीसुद्धा प्रतिक्रमणे तर करावीच लागतात ना! तू कोणाचा दोष का बघितलास? निर्दोष आहे तरी पण दोष का बघितलास? त्याची बदनामी तर झालीच ना? कोणाची बदनामी होईल अशी खरी गोष्टसुद्धा बोलू नये. अशी खरी गोष्ट बोलणे हा सुद्धा गुन्हा

आहे. खरी गोष्ट हिंसक असता कामा नये, अशा गोष्टीला हिंसक गोष्ट असेच म्हटले जाईल.

आम्ही त्वरित प्रतिक्रमण करतो. आम्ही साधू-आचार्य, सर्वांनाच निर्दोष पाहिले आहे. आमच्यासाठी एकही व्यक्ती दोषी नाही आणि जे दोषी बोलले जाते त्यातसुद्धा आम्हाला कोणी दोषी दिसत नाही. परंतु इतके मात्र आहे की दोषी म्हटल्याबरोबर त्वरित आमची प्रतिक्रमणे होत असतात. आमची चार डिग्री कमी आहे ना, त्याचे हे फळ आहे. नाही तर आम्हाला संपूर्ण वीतरागता वर्तत असते.

आणि तुम्हाला तर खूप प्रतिक्रमणे करावी लागतील. मी बोलतो पण आम्हाला जागृती असते, परंतु तुम्ही असे बोलता कामा नये. जागृती असली पाहिजे ना! म्हणून असे कधी बोलू नये.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केले नाही तर काय होईल? दोष लागेल का?

**दादाश्री :** तो दावा करील. लोकांनी आपल्यावर कोर्टात शेकडो दावे ठोकलेले असतात. त्यांचा निकाल केला नाही तर काय होईल? दावे चालूच राहतील. म्हणजे जोपर्यंत प्रतिक्रमण करत नाही तोपर्यंत हे दावे चालूच राहतील.

## आत्मज्ञानानंतर जलकमलवत्

**प्रश्नकर्ता :** तसे हे ज्ञान घेतल्यानंतर आम्ही 'जलकमलवत्' (पाण्यामध्ये कमळाप्रमाणे) राहू शकतो.

**दादाश्री :** हो, जलकमलवत्च असतो. हा मार्गच जलकमलवत्चा आहे. तुम्ही असे किती वर्ष राहू शकलात? ज्ञान घेऊन तुम्हाला किती वर्षे झाली?

**प्रश्नकर्ता :** एक वर्ष पूर्ण होईल.

**दादाश्री :** तर जेव्हा अशी दहा वर्षे होतील तेव्हा काय स्थिती

असेल? पहिल्या वर्षी एवढा जोश आहे तर दहा वर्षांनंतर काय स्थिती असेल? आणि जगात सर्व लोक बोलतात, 'अरे, आम्ही हिमालयात जलकमलवत् राहतो.' परंतु ते तसे राहू शकत नाहीत. त्या सर्व कल्पनेच्या गोष्टी आहेत! कल्पनांची जाळी!! ते जर असे म्हणत असतील की 'आम्ही जलकमलवत् राहतो', तर ते जेव्हा इथून जात असतील तेव्हा जर तुम्ही मला सांगितले की 'हे सर्व जलकमलवत् राहतात' तर मी त्यांना म्हणेन, 'महाराज, तुम्हाला काडीमात्र अक्कल नाही.' मग लगेचच त्यांचे 'जलकमलवत्' कळून येईल! कोणाही महाराजांना असे बोलू नये. उगाच कोणाचा अपमान करणे हा गुन्हा आहे. म्हणून मग मी महाराजांना दोनशे रुपये देतो. आणि दोनशेला ते कबूल झाले तर मी त्यांना काय सांगतो? 'अहो, आज माझे डोके जरा तापलेले आहे, भावाबरोबर भांडण झाले आहे.' मग ते म्हणतात, 'हो, याचे डोके जरा असेच आहे.' नंतर ते माझ्या डोक्यावर हातसुद्धा ठेवतात (आशीर्वाद देतात).

अशा भोवऱ्यांना मूर्ख बनवायला किती वेळ लागतो? निव्वळ भोवरे! कारण ज्याला हरायला येते त्याच्या समोर हे भोवरे कसे जिंकतील? जो हरण्याची कला शिकला आहे, तिथे मग भोवरा किती उड्या मारू शकेल?!

हे भोवरे म्हणजे कोण? आम्ही माणसाला भोवरा म्हणत नाही. प्रकृती ज्याला जबरदस्तीने नाचवते आणि तो नाचतो, आणि म्हणतो 'मी नाचलो', अशा व्यक्तीला कृष्ण भगवंतांनी भोवरा म्हटले आहे. कृष्ण भगवंतांनी म्हटले आहे त्यालाच आम्ही भोवरा म्हणत आहोत. म्हणजे दुसऱ्या शब्दात याला भोवरा म्हणतात. बाकी, कोणी भोवरा म्हणत नाही.

कोणाला वाईट वाटेल असे कोण बोलेल? मला तर प्रतिक्रमण करता येते म्हणून मी बोलतो. मी तर बोलतोसुद्धा आणि त्यावरचे औषधही घेतो. परंतु जगातून चुकीच्या गोष्टी निघून गेल्या पाहिजेत! चुकीच्या गोष्टींनाच प्रोत्साहन मिळाले आहे ते आता थांबले पाहिजे. नंतर त्यासाठी प्रतिक्रमण केले तर काय हरकत आहे? मग प्रोत्साहन तरी मिळणार नाही ना?

आम्ही त्यांना 'अक्कल नाही' असे म्हटले, तर तो जलकमलवत् राहू शकत नाही ना? जल पण राहत नाही आणि कमल पण राहत नाही. लोक काय म्हणतात? आमची परीक्षा घ्या ना महिनाभर. 'अरे बाबा, यात परीक्षा घ्यायची नसते, परीक्षेत तर तू वेडा होऊन जाशील.'

म्हणून रुपयाचे नाणे पटकन वाजवून पाहा ना, कलदार आहे की खोटा आहे? लगेच कळेल. नंतर त्यांच्यासाठी दोनशे रुपये खर्च करा! कित्येक असेही असतात जे दोनशे रुपयात कबूल होत नाहीत. तेव्हा तुम्ही म्हणा, 'माझे डोके जरा सटकले आहे', म्हणजे तो खुश होईल. त्याला वाटेल कोणी शहाणी व्यक्ती तर आम्हाला असे बोलणारच नाही. 'याचे डोके जरा सटकलेले आहे म्हणून तो असे बोलत आहे.' त्यांना न्याय करता येतोच ना? पण बघा ना, आपल्याला तर कळेलच ना? आपल्याला हेच पाहायचे होते की, 'हा जलात आहे की कमलात आहे', या दोन्हीही गोष्टी संपल्याच ना? मग आम्ही त्यांच्या दुकानात (त्यांच्याजवळ) बसणारच नाही ना! असे करण्यात काही हरकत आहे का?

अशी परीक्षा करणे कोणी शिकवत नाही. लोकांना काय वाटते की जर माझ्यावर प्रयोग केले तर? आणि कोणी जर माझ्यावर प्रयोग केले तर मी खुश आहे. परीक्षा करूनही जर समजूतदार बनत असतील तरी चांगलेच आहे. पण परीक्षेशिवायच खोटे नाणे कधीपर्यंत घरी ठेवणार? बाहेर काही घ्यायला गेलो तर जिलेबीचा एक तुकडाही मिळणार नाही.

## एवढाच आहे मोक्षमार्ग

आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान हा आहे मोक्षमार्ग. आपले महात्मा काय करतात? पूर्ण दिवस आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यानच करत असतात. आता त्यांना जर सांगितले, 'तुम्ही आता या बाजूला या, व्रत, नियम, करा.' तर ते म्हणतील, 'आम्हाला व्रत, नियमांची काय गरज? आम्हाला आत शांती आहे, चिंता नाही

कसलीही उपाधी नाही. निरंतर समाधीत राहू शकतो. मग या सर्वांची काय गरज?' ही तर कटकट आहे. उपधान (एक प्रकारचे तप) तप, आणि अमके तप. हे सर्व तर गोंधळलेली माणसे करतात. ज्यांना गरज आहे, शौक आहे, ते करतात. म्हणून आम्ही म्हणतो की, हे तप वगैरे तर शौकीन लोकांचे काम आहे. ज्यांना संसाराचा शौक आहे, त्यांनी ते तप करावे.

**प्रश्नकर्ता :** परंतु अशी मान्यता आहे की तप केल्याने कर्मांची *निर्जरा* (आत्म प्रदेशापासून कर्मांचे वेगळे होणे) होते.

**दादाश्री :** असे कधीच होत नाही. कोणत्या तपाने निर्जरा होते? त्यासाठी आंतरिक तप हवे. अदीठ तप, आम्ही म्हणतो ना की आपले सर्व महात्मा अदीठ तप करतात, ते तप डोळ्यांनी दिसत नाही. डोळ्यांनी दिसणारे तप आणि कळून येणारे तप या सर्वांचे फळ पुण्य आहे आणि अदीठ तप, म्हणजे आतील तप, आंतरिक तप, जे बाहेरून दिसत नाही, त्याचे फळ मोक्ष आहे.

लोकांना वाटते की, अरे! आम्ही तर व्रत, नियम करत नाही. व्रत, नियम हे मोक्ष मार्गासाठी नाहीत. नियम-बियम हे सर्व तर ज्यांना संसारात भटकत राहायचे आहे अशा लोकांसाठी आहेत. ज्यांना मोक्षाला जायचे आहे त्यांनी तर पटकन आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यानाच्या गाडीत बसून जावे. निरंतर चोवीस तास तेच करत राहावे, दुसरे काही करायचे नाही.

## माफी मागा सर्व कषायांची

या साध्वीजींनी काय करायला हवे? साध्वीजी जाणतात की त्यांना कषाय होतात, दिवसभर कषाय होत असतात. मग त्यासाठी त्यांनी काय केले पाहिजे? तर त्यांनी संध्याकाळी एकत्र बसून एक पूर्ण *गुंठाणा* (48 मिनिटे, गुणस्थानक) हा कषाय भाव झाला, यांच्याप्रती हा कषाय भाव झाला, यांच्याप्रती हा कषाय झाला, असे सर्व आठवून ज्याच्याप्रती दोष झाला असेल त्याच्याप्रती प्रत्याख्यानही केले पाहिजे की 'पुन्हा असे

करणार नाही, पुन्हा असे करणार नाही', असे केले तर त्या मोक्षमार्गावर बरोबर चालल्या आहेत.

त्या बिचाऱ्या तर असे काही करत नाहीत, मग काय होणार? मोक्षमार्ग नीट समजून घेतला तर त्या मार्गाने चालता येईल ना? समजण्याची गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** परंतु जोपर्यंत त्या प्रत्यक्ष माफी मागत नाहीत तोपर्यंत त्यांच्यात अढी तर राहणारच ना? म्हणून प्रत्यक्ष माफी मागायलाच हवी ना?

**दादाश्री :** प्रत्यक्ष माफी मागण्याची गरज नाही. भगवंतांनी मनाई केली आहे. जर एखादी चांगली व्यक्ती असेल तर तुम्ही त्याची माफी मागायला जा. प्रत्यक्ष माफी मागा, आणि जर निर्बल व्यक्ती असेल, तर तुम्ही माफी मागितल्यावर तो टोमणे मारील. आणि तो निर्बल माणूस आणखी निर्बल होईल. म्हणून अशा लोकांची प्रत्यक्ष माफी न मागणेच चांगले. बहुतेक सर्व जग निर्बलच आहे. बदल्यात टोमणे मारणार. म्हणेल 'तरी मी सांगतच होते ना, तेव्हा तुला समजत नव्हते, तू ऐकत नव्हतीस, आता आलीस ना ताळ्यावर.' 'अहो, ती ताळ्यावरच आहे, ती बिघडली नाही. तू बिघडलेली आहेस, ती सुधारली आहे, सुधारत आहे.'

असे समजतच नाही, बिचाऱ्यांना भानच नसते ना! थोडेसे जरी भान असते ना, तर ती गोष्टच वेगळी असती. अजिबात भान नाही, किंचितही नाही.

## क्रियाकांडामुळे मोक्षमार्ग नाही

मोक्षमार्ग म्हणजे आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान. यालाच म्हणतात मोक्ष मार्ग! स्वत:चे गुन्हे जाहीर करणे. मग 'ते चुकीचे आहे' असा पश्चात्ताप करणे आणि 'पुन्हा असे करणार नाही' असा निश्चय करणे. असा आहे हा आपला 'मोक्षमार्ग'!

मोक्षमार्गात क्रियाकांड वगैरे काही नसते. क्रियाकांडे फक्त संसार

मार्गातच असतात. संसार मार्ग म्हणजे ज्यांना भौतिक सुखे पाहिजेत, दुसरे काही तरी पाहिजे, त्यांच्यासाठी क्रियाकांडे आहेत. मोक्षमार्गात असे काही नसतेच. मोक्षमार्ग म्हणजे काय? तर 'आलोचना-प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान.' बस, मग गाडी चालवतच राहायची, तोच हा आपला मोक्ष मार्ग आहे. यात क्रियाकांड वगैरे काहीच नसते ना! तुम्हाला समजले ना? क्रियाकांड कशासाठी? भौतिक सुखासाठी. म्हणून भगवंतांनी सांगितले, की ज्यांना भौतिक सुखे पाहिजेत त्यांनी तप करावे. त्यामुळे तुम्हाला भौतिक सुखे, देवगतीचे सुख प्राप्त होईल. संसारी सुखे प्राप्त होतील, परंतु ज्यांना अशी सुखे नको असतील त्यांच्यासाठी आपला मोक्षमार्ग आहे. तेव्हा मग लोक विचारतात, 'तिथे क्रिया का नाहीत?' अहो, पण आमची क्रियांची लाइनच नाही ना! आमचा धंदा, बिझनेस नाही ना. आणि ते खोटे बोलतात, उलट बोलतात, त्यात त्यांचा दोष नाही. ते कर्मांच्या उदयाधीन बोलतात. आणि तुम्ही पण कर्मांच्या उदयाधीन बोलता, पण तुम्ही ते जाणायला हवे की हे खोटे बोलले जात आहे आणि हाच पुरुषार्थ आहे.

पुरुष आणि प्रकृती, प्रकृती काय करीत आहे ते जाणले पाहिजे आणि प्रकृती जेव्हा काहीच करणार नाही, तेव्हा तुमच्या 360 डिग्री पूर्ण झाल्या असतील. मग किंचितदेखील हिंसक वर्तन, हिंसक वाणी, किंवा हिंसक मनन, असे काहीच राहणार नाही.

आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान, हाच मोक्ष मार्ग. किती तरी जन्मांपासून आमची हीच लाइन आहे. किती तरी जन्मांपासून 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' करत, करत, करत आम्ही इथपर्यंत आलो आहोत.

म्हणून तीर्थंकर भगवंतांनी म्हटले आहे की अनंत जन्म घालवल्यानंतरही, समकित झाल्यानंतरही, काही भागाचा व्यवहार समकित झाल्यानंतरही, तो अर्धपुद्‌गल परावर्तन काल असतो. तर बोला आता, केवढे सारे जन्म कमी झालेत! अर्धपुद्‌गलामध्ये आला तरी त्याचे पुष्कळ जन्म कमी झाले.

**प्रश्नकर्ता :** तो मग लिमिटमध्ये आला.

**दादाश्री :** हो, लिमिटमध्ये आला, त्यामुळे मग पुढे प्रगती करतो. समकित प्राप्त झाल्यानंतर महावीर भगवंतांचे सत्तावीस अवतार झाले होते. पण लिमिटमध्ये आले, असे भगवंतांनी सांगितले होते.

## दोनच गोष्टींचा धर्म

कषाय न करणे, आणि प्रतिक्रमण करणे, हे दोनच धर्म आहेत. कषाय न करणे हा धर्म आहे, आणि जर पूर्व कर्मानुसार कषाय झालेच तर त्याचे प्रतिक्रमण करणे हाच धर्म आहे. याशिवाय तिसरा कोणताही धर्म नाही. आणि नेमक्या ह्या दोन गोष्टीच लोकांनी वगळल्या आहेत.

आता जर तुम्ही त्यांना काही उलटे बोललात, तर तुम्हाला त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल. एवढेच नव्हे तर त्यांनाही तुमच्यासाठी प्रतिक्रमण करावे लागेल. त्यांना का प्रतिक्रमण करावे लागेल? तर 'मी कधी तरी चूक केली असेल म्हणून यांना मला शिवीगाळ करण्याची वेळ आली?' म्हणजे त्यांना त्यांच्या चुकीबद्दल प्रतिक्रमण करावे लागेल. त्यांना त्यांच्या पूर्वजन्माचे प्रतिक्रमण करावे लागेल आणि तुम्हाला तुमच्या या जन्माचे प्रतिक्रमण करावे लागेल! एका दिवसात अशी पाचशे-पाचशे प्रतिक्रमणे कराल तेव्हा मोक्षाला जाऊ शकाल!

असे धर्मध्यान आणि अशी प्रतिक्रमणे तर आता इतर कुठेही राहिली नाहीत ना! मग काय? नाहीतरी रडून रडून पण भोगावे तर लागतेच ना! त्याऐवजी हसून भोगले तर काय चुकीचे आहे?

तुम्ही जरी एवढेच केले तर मग दुसरा कोणताही धर्म शोधला नाहीत तरी काही हरकत नाही. एवढे पाळलेत तरी पुरे आहे, आणि मी तुम्हाला गॅरंटी देतो, तुमच्या डोक्यावर हात ठेवतो, जा, मोक्षासाठी शेवटपर्यंत मी तुम्हाला मदत करीन! तुमची तयारी पाहिजे. एवढ्या एकाच शब्दाचे पालन केले तरी खूप झाले!

## मताग्रह म्हणजे अतिक्रमण?

अतिक्रमणामुळे हे जग उभे झाले आहे आणि प्रतिक्रमणामुळे ते

बंद होईल. बस, एवढाच याचा लॉ (कायदा) आहे. असे प्रतिक्रमण या शास्त्रांमध्ये राहिले नाही. म्हणून हे सर्व आता बंद झाले आहे. ते लोक ज्याला प्रतिक्रमण म्हणतात, त्या साऱ्या जड क्रिया आहेत, त्यामुळे एकाही दोषाचा नाश होत नाही, आणि तरीही दोषांचा नाश करण्याची गोष्ट करतात आणि बोलतात, त्याने काहीही निष्पन्न होत नाही.

**प्रश्नकर्ता :** मताग्रहालाच अतिक्रमण म्हणतात ना?

**दादाश्री :** मताग्रह हे तर सर्वात मोठे अतिक्रमण. त्याच्या विषाने तर हे हिंदुस्तान मृतप्राय झाला आहे. सध्या हे सर्वात मोठे विष आहे. प्रत्येकानेच हे विष अधिकाधिक पसरवले आहे.

## मुळात तर आम्ही महावीरांचेच

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आपल्या वाणीत जैन धर्माचे पारिभाषिक शब्द खूप येतात.

**दादाश्री :** हे तर ज्ञानच सर्व प्रकट झाले आहे. शब्द आपोआपच निघत राहतात. शेवटी मूळ तर आम्ही महावीर भगवंतांचेच आहोत ना! दुसरे काही आवडतच नाही. दुसऱ्या कुणाची गोष्ट आवडत नाही. आम्ही वैज्ञानिकांची गोष्ट मानण्यासाठी तयार आहोत, महावीर भगवंत वैज्ञानिक म्हटले जातात. आम्हीसुद्धा वैज्ञानिक म्हटले जातो.

महावीर भगवंतांनी कोणती आज्ञा दिली आहे? तर दूषम काळात आज्ञेनुसार वागण्यास सांगितले आहे, आणि जर आज्ञेनुसार वागता आले नाही तर प्रतिक्रमण करायला सांगितले आहे.



# [ 5 ]
# अक्रम विज्ञानाची पद्धत

## अक्रमापासून नवा यथार्थ धर्म

धर्म तर कसा आहे? पॉजिटिव्ह अहंकारात धर्म येतो. या सर्व शास्त्रांमध्ये काय म्हटले आहे की, 'दया करा, सत्य बोला, चोरी करू नका.' अहो, म्हणजे जसे चालले आहे तसेच ना? म्हणून लोकांनी पुस्तके वाचणे बंद केले. कारण त्या पुस्तकात लिहिल्याप्रमाणे काही होत नाही, म्हणून ही पुस्तके कामाची नाहीत. दया बाळगू शकत नाही, सत्य बोलू शकत नाही. त्या पुस्तकांमध्ये वारंवार हेच तर लिहिले गेले आहे ना! म्हणून तर लोकांनी पुस्तके एका बाजूला ठेवून दिली आहेत.

शास्त्रांमध्ये काय सांगतात की 'चोरी करू नका, खोटे बोलू नका, लबाडी करू नका,' मग करायचे तरी काय? ते तरी सांगा ना! या गोष्टी करू नये, तर मग करायचे काय? जर आम्हाला कुठे जायचे असेल आणि तिकीट मिळाले नाही तर ते काळ्या बाजारातच घ्यावे लागते ना? आता ही शास्त्रे असे सांगतात की 'असे करू नका', मग तर आम्हाला सूरसागरात (बडोद्यामधील एक तलाव) जाऊन बुडावे लागेल!

जग परिणाम बदलू इच्छिते. तर ते परिणाम कसे बदलतील? इथे तर सगळेच बदलले आहेत! पूर्वी जेव्हा शंभरात 5 टक्के बिघडलेले

होते, तेव्हा लोक म्हणायचे की, 'भाऊ आपले आचार (आचरण) शुद्ध करा, आचार शुद्ध करा.' परंतु आज तर 95 टक्के लोकांचे आचार बिघडलेले आहेत, आचाराचे दिवाळेच निघाले आहे, तिथे मग काय करू शकतो? म्हणून आम्ही हा नवा शोध लावला आहे! आणि लोक देखील वास्तवात जे 'डिस्चार्ज' आहे त्यालाच 'चार्ज' मानत आहेत. म्हणून आम्ही त्यांची ही मान्यता सोडवली की, अहो, तुम्ही 'डिस्चार्ज'ला 'चार्ज' मानत आहात, याला काय अर्थ आहे? मीनिंगलेस (व्यर्थ) गोष्ट आहे. धर्मामध्ये आचार येतच नाहीत. 'मी आचार करतो' असे जर तुम्ही म्हणाल तर आचार पुन्हा उभा राहील, त्यामुळे धर्म उभा राहील, पण शुद्धता येणार नाही. 'डिस्चार्ज'मध्ये शुद्धता येणार नाही.

अर्थात काळानुसार ज्ञान द्या! आपण म्हणू की पूर्वी 'बारा आणे मण' बाजरी मिळत होती. मोठा लाऊड स्पीकर घेऊन ओरडत राहिलो की, आपल्या देशात तर पुष्कळ पीक असायचे. बारा आण्याला एक मण बाजरी मिळत होती. आता पुन्हा बारा आणे मण बाजरी मिळेल! तेव्हा लोक काय म्हणतील, 'अरे, काही तरीच बोलू नका.' ह्या गोष्टी या काळाला अनुरूप नाहीत. आणि ही सर्व शास्त्रेही या काळाला अनुरूप नाहीत.

## मागा प्रतिक्रमण करण्याची शक्ती

आपले अक्रम विज्ञान आपल्याला काय सांगते? एखाद्याला विचारले की 'तू खूप दिवसांपासून चोरी करत आहेस का?' तर तो म्हणेल 'हो.' प्रेमाने विचारले तर सर्व काही सांगेल. 'किती वर्षांपासून चोरी करत आहेस?' तर तो सांगेल, 'दोन वर्षांपासून करत आहे.' मग आम्ही त्याला सांगू, 'तू चोरी करतोस, काही हरकत नाही. पण तू एवढे प्रतिक्रमण करत जा.' असे म्हणून आम्ही त्याच्या डोक्यावरून हळूवार हात फिरवतो. आम्ही त्याला काय शिकवतो?

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी प्रतिक्रमण कर.

**दादाश्री :** तेव्हा तो विचारतो, 'कसे करू?' मग आम्ही सांगतो, 'अशा प्रकारे कर.' यामुळे त्याला आश्वासन मिळते की, ओहोहो, इतर

सगळे जण तर माझा तिरस्कार करत होते, आणि हे तर प्रेम दाखवीत आहेत.'

प्रतिक्रमण केले म्हणून चोरी पूर्णपणे पुसली गेली. कारण त्याचा अभिप्रायच बदलून गेला. तो जे करत आहे त्यात आता त्याचा अभिप्राय नाही. नॉट हिज ओपिनियन (त्याचा अभ्रिपाय नाही). शेठ, माझे बोलणे तुम्हाला समजले का?

म्हणजे मला काय सांगायचे आहे की, भले तू चोरी केलीस, त्याला माझी हरकत नाही. एखादा 15-16 वर्षाचा मुलगा असेल आणि त्याने दोन-चार वेळा चोऱ्या केल्या असतील, तर आम्ही त्याला सांगतो की, 'तू चोरी केलीस, काही हरकत नाही, पण आता तू असे कर, की ज्यामुळे त्याची जोखीमदारी तुझ्यावर राहणार नाही.' तेव्हा तो विचारतो 'मी काय करू?' 'तू दादांचे नाव घे, आणि मग पश्चात्ताप कर. आता पुन्हा मी असे करणार नाही, चोरी केली हे चुकीचे केले, आता पुन्हा असे करणार नाही,' असे म्हण, असे त्याला शिकवतो.

आम्ही असे शिकवल्यानंतर त्याचे आई-वडील काय म्हणतात? 'त्याने पुन्हा चोरी केली.' अहो, पुन्हा चोरी केली तरीही असेच बोलत राहावे (पुन्हा प्रतिक्रमण कर). असे बोलल्याने काय होते ते मी जाणतो. याशिवाय दुसरा उपायच नाही.

म्हणजे हे अक्रम विज्ञान असे शिकवते की हे जे बिघडलेले आहे, ते सहज सुधारणार नाही, पण या पद्धतीने त्याला सुधारा.

क्रमिक मार्गात सुधारण्यासाठी अशी काही पद्धत नाही. ते तर म्हणतात, 'मारून-ठोकून त्याला सुधारा.' अहो, तो असा सुधारणार नाही. ही तर त्याची प्रकृती आहे. कढीत मीठ जास्त पडले तर काही तरी उपाय करून कमी करता येते. कढीसाठी खूप उपाय आहेत, पण याचा उपाय तर हा असाच करावा लागतो. या उपायाने बऱ्याच लोकांना फायदा झाला आहे.

'तू चोरी केलीस, त्याला हरकत नाही. पण तू ज्याप्रमाणे करतोस,

त्याऐवजी आता याप्रमाणे कर.' असे म्हटल्यावर त्याला समजते की हे मला गुन्हेगार मानत नाहीत. त्यामुळे त्याचा अहंकार दुखावला जात नाही, नाही तर अहंकार घायाळ होतो. मी तर असेही पाहिले आहे, की एखाद्या मुलाला त्याचा बाप जेव्हा मारतो, तेव्हा तो मुलगा मनात असे भाव करतो की, 'मी मोठा झाल्यावर या बापाला मारल्याशिवाय राहणार नाही.' अरे, तुम्ही त्याची चोरी सोडवायला गेलात आणि त्याने तर उलट वैर बांधून घेतले. मारता कामा नये. असे घाबरवून कोणाला सुधारणे हा योग्य उपाय नाही. घाबरवण्यासाठी कधीतरी डोळे वटारणे हे ठीक आहे, आणि तेसुद्धा जर वाकड्या स्वभावाचा मुलगा असेल तर असे करू नये!

आपल्याकडे अशी म्हण आहे की, 'काळा असून कोठडीत हात घालतो', तेव्हा डोळे वटारावे लागतात. म्हणजे केव्हा केव्हा डोळे वटारावे, केव्हा कसे वागावे, यासाठी विवेक आणि सद्विवेक राखावा असे सांगितलेले आहे. सद्विवेक तर कुठेच नाही, आणि लोक म्हणतात 'सद्विवेक करा.'

## औषधाशिवाय रोग बरा होत नाही

आम्हाला कुणी विचारले, की 'मी तर चोरीचा धंदा सुरू केला आहे, तर आता मी काय करू?' तेव्हा मी त्याला सांगतो, 'तू ते कर, माझी हरकत नाही, पण त्यात अशी जोखीम असते. ती जोखीम जर तुला सहन होत असेल तर तू चोरी कर. आमची हरकत नाही.' तर तो म्हणतो, 'साहेब, त्यात तुम्ही काय उपकार केलेत? जोखीम तर माझ्यावरच येईल ना?' तेव्हा मी त्याला म्हणतो, 'माझ्या उपकाराच्या रूपाने मी तुला सांगतो की 'दादां'च्या नावाने प्रतिक्रमण कर, किंवा महावीर भगवंतांच्या नावाने प्रतिक्रमण कर की, 'हे भगवंता, मला हा धंदा करायचा नाही, तरीही तो करावा लागत आहे, त्यासाठी मी क्षमा मागतो,' सतत अशी क्षमा मागत रहा आणि धंदाही करत जा. जाणूनबुजून करू नकोस. जेव्हा तुला आतून वाटेल की 'आता हा धंदा करायचा नाही', तेव्हा तू ते बंद कर. तुझी इच्छा आहे ना हा धंदा बंद करण्याची?

तरीही आतून धक्का लागला आणि करावे लागले तर भगवंतांजवळ माफी माग. बस एवढेच! दुसरे काही करायचे नाही.'

चोराला असे सांगू नये की 'उद्यापासून धंदा बंद कर', त्याने काहीही निष्पन्न होणार नाही. काही चालणारच नाही ना! 'हे सोडून दे, ते सोडून दे', असे काहीही सांगू नये. आम्ही काहीही सोडायला सांगत नाही. या पाचव्या आऱ्यात सोडण्यासाठी काहीही सांगण्यासारखे नाही. आणि असेही सांगू नये, की 'हे तू ग्रहण कर.' कारण सोडल्याने सुटेल असेही नाही. हो, नाही तर मग ओरडत राहील 'मला करायचे आहे, पण होत नाही. उपवास करायचा आहे, पण होत नाही', अरे, असे का गात राहिला आहेस? त्याऐवजी भगवंताजवळ क्षमा माग ना?! 'हे भगवंता! मला तर उपवास करायचे होते, पण होत नाहीत, त्याबद्दल मी क्षमा मागतो.' परंतु हा तर 'होत नाही, होत नाही' असे गाणे गातच राहतो. 'होत नाही, होत नाही' असे कधीच बोलू नये. असा काही नियम आहे का की तू असे बोललेच पाहिजे? हा तर एक प्रकारचा अहंकार आहे. 'होत नसेल' तरी असे गात राहण्याची गरजच नाही. पण तो कशाला गात असतो? तो त्याचा अहंकार दाखवित आहे.

लोकांना हे विज्ञान बिलकुल अनोळखी वाटते. कधी ऐकलेही नाही, पाहिलेही नाही, आणि जाणलेही नाही! आतापर्यंत तर लोकांनी काय म्हटले, 'ही वाईट कर्मे सोडा, आणि चांगली कर्मे करा.' लोकांमध्ये सोडण्याचीही शक्ती नाही आणि बांधण्याचीही शक्ती नाही, आणि उगाच गात राहतात. 'तुम्ही करा' असे जर कोणाला म्हटले तर ते म्हणतात, 'माझ्याने होत नाही.' 'मला सत्य बोलायचे आहे, पण माझ्याने होत नाही.' म्हणून आम्ही नवीन विज्ञान काढले, 'भाऊ, तुला असत्य बोलण्यात तर काही अडचण नाही ना? ते तर तुला जमेल ना? तर आता जेव्हा तू असत्य बोलशील तेव्हा त्याचे अशा प्रकारे प्रतिक्रमण कर. तू चोरी करतोस त्याला माझी हरकत नाही, पण तू त्याचे प्रतिक्रमण कर.' याउलट लोक म्हणतात, 'नाही, चोरी बंदच कर', पण ती एकदम कशी बंद होईल? बद्धकोष्ठता झाली असेल तर त्याला जुलाबासाठी

औषध द्यावे लागते, आणि ज्याला जुलाब झाले असेल त्याला जुलाब बंद करण्याचे औषध द्यावे लागते! आहे तसे चालेल असे हे जग आहे का?

बाप मानतो की 'हा मुलगा चोरी करत आहे, ती बंद करायची असेल तर करू शकतो. त्याने स्वत:च बंद केली तर बंद होईल.' मग करा ना, तुम्ही तुमचेच बंद करा ना! तुमचे जे दोष आहेत त्यांना बंद करा ना? गुरु महाराज पण असेच सांगतात 'हे सोडा, ते सोडा', अहो महाराज, मग तुम्ही तपकीर ओढणे सोडा ना! आणि हा तुमचा क्रोध सोडा ना! 'आपण' 'चंदुलाल'ला सांगतोच ना की तू क्रोध सोडून दे?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** आणि नाही सोडले तर प्रतिक्रमणे करावी लागतात, काय करावी लागतात?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणे, दादा.

**दादाश्री :** किती प्रतिक्रमणे करावी लागतात?

**प्रश्नकर्ता :** खूप प्रतिक्रमणे करावी लागतात, रोज सुमारे एक हजार प्रतिक्रमणे करावी लागतात.

**दादाश्री :** प्रतिक्रमण केले म्हणजे तो सुटला.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्यामुळे भाव पूर्णपणे बदलून जातो.

**दादाश्री :** भावच बदलून जातो, पूर्ण रस्ताच बदलून जातो. आणि जर मारून-ठोकून मुलांना सुधारायला जाल तर काहीही निष्पन्न होणार नाही, तो तर चुकीचा उपाय आहे.

**प्रश्नकर्ता :** आता जी अडाणी माणसे आहेत ती युक्तीवाद करतात की, 'दादा तर म्हणतात की तू चोरी कर.'

**दादाश्री :** हो, युक्तीवाद करतात. कारण त्यांना हे समजत नाही ना? त्यांना जेव्हा समजेल तेव्हा हे त्यांच्या कामी येईल. समजतच नसेल

तर ते तरी काय करणार? ही गोष्ट समजणे फार कठीण आहे. अत्यंत तीक्ष्ण बुद्धी असेल तरच समजेल असे आहे.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही चोराला असे सांगता की, 'चोरी कर, पण एवढे मात्र लक्षात ठेव की, 'मी हे चुकीचे करत आहे', मनातून त्याचा पश्चात्ताप कर आणि प्रतिक्रमण कर.' याचा खूप चांगला परिणाम होतो!

**दादाश्री :** जबरदस्त परिणाम होतो.

**प्रश्नकर्ता :** शेवटी त्याला असेच वाटते की आता मला हे काम करायचेच नाही.

**दादाश्री :** कुठलीही शिक्षा, दंड या गोष्टींचा फायदा होत नाही. परंतु या अक्रम विज्ञानाची ही पद्धत तर फार वेगळ्या प्रकारची आहे.

## जगातील सर्व 'रिलेटिव्ह' धर्म देहाध्यासी

म्हणूनच आम्ही सांगतो ना, की या जगातील सर्व धर्म देहाध्यासी मार्गाचे आहेत, देहाध्यास वाढविणारे, आणि आपला हा देहाध्यास रहित मार्ग आहे. सर्व धर्म म्हणतात, तुम्ही तपाचे कर्ता आहात, त्यागाचे कर्ता आहात. तुम्हीच त्याग करता, आणि तुम्ही त्याग 'करत नाही, करत नाही.' असे म्हणणे हेही 'करत आहे' म्हणण्यासारखेच आहे. तसे तर तुम्ही कर्तेपणा स्वीकारत आहात. आणि सांगता माझ्याकडून त्याग होत नाही, तर तोसुद्धा कर्तेपणाच आहे. हो, आणि जे कर्तेपणा स्वीकारतात ते सारे देहाध्यासी मार्ग आहेत. आम्ही कर्तेपणा स्वीकारतच नाही. आपल्या पुस्तकात कोठेही 'असे करा', असे लिहिलेले नसते.

इथे तर कोणी विरोध करत नाही. विरोध केला तर आम्हाला त्याचे हिशोब मिळतील की, 'बाबा रे, या जगात कुणाला शौचाला जाण्याचीसुद्धा शक्ती नाही.' कोणी विरोध केला तर आम्ही त्याला समजावू की, हे सर्व असे का आहे? विनाकारण त्याच्या मागे का लागला आहात? म्हणजे, 'मी हे करतो, असे तप करतो, याचा त्याग करतो', असे म्हणून तर तुम्ही लोकांना उलट्याच मार्गावर नेत आहात.

मी त्याग केला, तुम्ही पण त्याग करा, आणि बटाटे सोडा. अरे, लोकांच्या मागे कशाला लागला आहात? म्हणजे जे करायचे आहे ते तर राहूनच गेले आणि जे करायचे नाही, तेच करायला लावतात. आणि खरे तर 'करायचे नाही' हेही शक्य होत नाही, मग उगाच 'वेस्ट ऑफ टाइम एन्ड एनर्जी', (शक्ती आणि वेळेचा व्यय) कशाला? जे करायचे आहे ते तर वेगळेच आहे. करायचे एवढेच आहे की तुम्हाला शक्ती मागायची आहे. आणि पूर्वी जी शक्ती मागितली होती, त्याप्रमाणे आज होत राहिले आहे.

**प्रश्नकर्ता :** पूर्वीचे तर आता इफेक्ट (परिणामा)मध्येच आले आहे.

**दादाश्री :** हो, इफेक्टमध्ये आले आहे, म्हणजे कॉजेसच्या रूपात तुम्हाला शक्ती मागायची आहे. आम्ही 'नऊ कलमांमध्ये' जशी शक्ती मागण्यासाठी सांगितले आहे, तशी मागितली, तर त्यात संपूर्ण शास्त्र सामावते. एवढेच करायचे आहे. दुनियेत करायचे किती? तर एवढेच. शक्ती मागायची, जर कर्ताभावाने करायचेच असेल तर.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे शक्ती मागणे हेच ना?

**दादाश्री :** कारण सगळेच मोक्षाला थोडेच जातात? पण कर्ताभावाने करायचे असेल तर एवढे करा. शक्ती मागा. कर्ताभावाने शक्ती मागा. असे आम्ही म्हणतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे ज्यांनी ज्ञान घेतले नाही, त्यांच्यासाठी ही गोष्ट आहे?

**दादाश्री :** हो, ज्यांनी ज्ञान घेतलेले नाही अशा जगातील लोकांसाठी आहे. नाही तर आता ज्या मार्गाने लोक चालत आहेत तो तर बिलकुल उलट मार्ग आहे. त्यामुळे कोणाही व्यक्तीला त्याचा किंचितही फायदा मिळणार नाही.

**प्रश्नकर्ता :** मी म्हणत होतो की, लोकांना हे लॉजिक समजतच

नाही, एवढे श्रेष्ठ दादांचे लॉजिक आहे. पण ते समजून घेण्याची त्यांची तयारीच नाही.

**दादाश्री :** मी तेच म्हणत आहे, लोक समजण्यास तयारच नाहीत. लोक यात खोलवर जाण्यास तयारच नाहीत. 'हा काही तरी नवीनच प्रकार आहे, आणि उलटेच आहे' अशी त्यांना भीती वाटते.

**प्रश्नकर्ता :** जगामध्ये जे चालले आहे, त्यापेक्षा हे काही वेगळे आहे, म्हणून हे चुकीचे आहे असे मानतात का?

**दादाश्री :** हो.

**प्रश्नकर्ता :** आणि दुसरे म्हणजे मी आयुष्यभर जे करत आलो आहे ते कसे सोडून द्यायचे? असे त्यांना वाटते.

**दादाश्री :** हो. मी केलेले सर्व वाया जाईल का? त्यांची ही भीती काढावी लागेल ना?

**प्रश्नकर्ता :** मुख्य गोष्ट तर हीच आहे, दादा.

**दादाश्री :** पण ते म्हणतात 'दु:ख तर खूप आहे पण जे आहे तेच चालवून घ्यायचे.' मी त्यांना सांगितले, 'अहो, तुम्ही चालवून घ्या, पण तुमच्या शिष्यांना तरी परत फिरू द्या ना!' त्यावर ते म्हणाले 'नाही, मग आम्ही एकटेच काय करणार?' म्हणजे असे आहे हे सर्व.

या मिथ्यात्वच्या रोगाला पसरवले, तेही निसर्गानेच पसरवले आहे, आणि ते आता बदलेल तेही निसर्गच बदलेल. आम्ही तर यात निमित्त मात्र आहोत.

अरे, जुन्यामध्ये कोठेही सार नव्हते, म्हणून तर हे नवे निघाले आहे. नाही तर असारलाच सार मानले होते.

म्हणून कृपाळू देवांनी म्हटले, *'सर्वस्व लुंटावा जेवो योग कर्यो छे में, सर्वस्व लुंटावा जेवो योग आव्यो छे!'* (सर्वस्व लुटवून टाकण्यासारखा योग मी केला आहे, सर्वस्व लुटवून टाकण्यासारखा योग आला आहे).

## 'माझ्याने होत नाही' असे म्हणू नये का?

तसे तर पुस्तकांत सर्व व्यवहारच सांगितला आहे ना! 'असे करा, तसे करा, दया करा, शांती राखा, समता राखा.' याशिवाय दुसरे करणार तरी काय? आणि त्यातही स्वत:च्या सत्तेत तर काहीच नाही. तुमच्या सत्तेत काही नाही आणि काही नवीनच सांगतात 'हे करा, ते करा', मग काय होईल?

**प्रश्नकर्ता :** मग तर घोटाळा होईल.

**दादाश्री :** घोटाळाच झाला आहे ना? लोक जाणतात की 'हे तर आमच्याकडून होतच नाही.' आणि तसे ते मानतातही. घोटाळा होत असेल तरी बरेच म्हणावे, परंतु हा तर 'होत नाही' असेच मानून घेतो. म्हणून तो न्यूट्रल होत जातो. मेल-फिमेलमधून न्यूट्रल होत जातो. 'माझ्याने होत नाही, असे होत नाही, करायचे आहे पण होत नाही.' अरे, हे तुला कोणी शिकवले? असे बोलूच नको! लोक बोलतात का असे?

**प्रश्नकर्ता :** हो, बोलतात ना.

**दादाश्री :** कारण आजच्या उपदेशकांनी लोकांच्या मनात असे ठसवून दिले आहे की 'हे कराच.' भगवंत असे बोलत नाहीत. महावीर भगवंत काय असे बोलतील? भगवंत एवढे मोठे शास्त्र मौखिक बोलले तर काय ते असे बोलतील? पण आजचे उपदेशक मात्र असे बोलतात, 'ब्रह्मचर्य पालन करा.' अहो, तुमच्याकडून तरी पालन होते का? मग, मला का सांगता? एक तर जे यथार्थ साधू असतील, ते पालन करू शकतात आणि दुसरे गो-पुत्र (बैल) पालन करू शकतात. हे दोघेच ब्रह्मचर्य पालन करू शकतात. जे यथार्थ साधू आहेत ते पालन करू शकतात. त्याला 'यथार्थ ब्रह्मचर्य' म्हटले जाते. आणि हे गो-पुत्र पालन करतात, त्याला परवश ब्रह्मचर्य म्हणतात.

कोणी दोषी नाहीत बिचारे. माझ्या ज्ञानात तर ते सर्व निर्दोषच आहेत. तरी पण व्यवहारात मला म्हणावे लागते ना? नाही तर खरी हकीकत समजणारच नाही.

लोकांना असे सांगू नये की, 'चोरी करू नका, लबाडी करू नका, खोटे बोलू नका.' असे बोलू नये. असे कसे बोलता? साऱ्या हिंदुस्तानला बरबाद करून टाकले आहे, अगदी शेवटच्या पायरीवर आणून सोडले आहे!

'करायचे आहे, पण होत नाही', वाकडे कर्म उदयास आले तर काय होईल? भगवंतांनी तर असे सांगितले होते की 'उदय स्वरूपात राहून तुम्ही त्याला जाणा.' करण्यासाठी सांगितले नव्हते. फक्त 'त्याला जाणा' एवढेच सांगितले होते. त्याऐवजी हे म्हणतात, 'हे केले, पण होत नाही, करत आहोत पण होत नाही. खूप इच्छा आहे पण होत नाही.' अरे, पण विनाकारण असे रडगाणे का गात आहात? 'माझ्याने होत नाही, होत नाही', असे चिंतवन केल्याने आत्मा कसा होऊन जाईल? दगडच होऊन जाईल. आणि हे लोक तर कर्मकांडेच करत राहतात. आणि शिवाय 'होत नाही, होत नाही' असेही बोलत बसतात. असे किती लोक बोलत असतील?

**प्रश्नकर्ता :** सर्वच, बहुतेक सर्वजण.

**दादाश्री :** 'होत नाही' असे म्हणतात, म्हणजे जसे चिंतवन (विचार) कराल तसा आत्मा होऊन जातो. म्हणून 'होत नाही, होत नाही, होत नाही', असे म्हटल्याने मग जडासारखे होऊन जातात.सतत असे बोलल्यावर त्यांना जडासारखे व्हावे लागेल. परंतु त्यांना त्यांच्या जबाबदारीची जाणीवच नाही. म्हणून बिचारे असे बोलतात. मी त्यांना मनाई करतो की, असे बोलू नये. अरे, 'होत नाही' असे तर बोलूच नये. तू तर अनंत शक्तीवाला आहेस, असे जेव्हा आम्ही समजावतो, तेव्हा मग तो 'मी अनंत शक्तीवाला आहे' असे बोलतो. नाही तर आतापर्यंत 'होत नाही' असेच बोलत होता! अनंत शक्ती काय निघून गेली आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** हे तर काय म्हणतात? 'शक्ती द्या.' 'हे करा, असे करा, तसे करा', असे म्हणत नाहीत. जे 'करा' असे म्हणतात ना,

त्यांनीच सर्वांना भटकवत ठेवले आहे. यामध्ये कुठेही 'करा' असा शब्द आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही, 'शक्ती द्या', असेच आहे.

**दादाश्री :** ते तर म्हणतात 'करा, करा.' अरे काय करा? तुम्हीही केले आणि आम्हीही केले, काहीही निष्पन्न झाले नाही, आणि येथे तर, 'हे दादा भगवान, शक्ती द्या!' बस एवढेच!

करोडो, अब्जो वर्षांपासून या हिंदुस्तानात लोक इतकी अध्यात्म वाणी गातच राहिले आहेत, परंतु अध्यात्म वाणी म्हणजे नक्की काय?

हे तर 'जे झालेले आहे' त्याला 'मी केले' असे म्हणतात. पण ते तर 'इट हॅपन्स' आहे.

**प्रश्नकर्ता :** हे आर्तध्यान हल्ली बऱ्याच लोकांना का होत असते?

**दादाश्री :** ही सर्व दु:खे याच कारणामुळे झाली आहेत. सारी दु:खे या कारणानेच उभी राहिली आहेत. जर असे उघड करण्यात आले, की एवढा भाग 'इट हेपन्स' आहे आणि एवढ्या भागावर तुमची सही होईल, तर खूप दु:खे कमी होऊन जातील.

आता, यासाठी तुम्हाला काय करावे लागेल? जर काही वाईट झाले तर त्याला सुधारायचे. भावपूर्वक सुधारायचे. काही चुकीचे झाले, तर पंपिग करायचे. मदत करायची. बस, एवढेच करायचे आहे. वाईट झाले तर सुधारायचे.

अर्थात, ते 'होऊन जाते.' मी एकदम कुणाचा अपमान केला, तर ते 'होऊन गेले' असे म्हटले जाते. नंतर मी आतून सुधारेन, की 'हे चुकीचे झाले, त्याचा मी पश्चात्ताप करतो, प्रतिक्रमण करतो, प्रत्याख्यान करतो', याला 'सुधारणे' म्हणतात, याला भ्रांत पुरुषार्थ म्हणतात.

जगात वास्तविक पुरुषार्थ तर नाहीच, पण त्याला भ्रांत पुरुषार्थ असे म्हणतात. स्वत:च चूक करतो आणि स्वत:च त्याचा स्वीकार करतो की, 'ही चूक झाली' आणि स्वत:च याप्रमाणे त्याचा पश्चात्ताप करतो.

बाकी, सत्‌धर्माला तर जगाने कधी स्पर्श पण केला नाही, सत्‌धर्माचे एक अक्षर देखील जगाला समजलेले नाही. हे जे घडत आहे तेच करेक्ट (बरोबर) आहे.

ते तर म्हणतात, 'माझे ऐकत नाहीत', अरे, पण का ऐकतील? कोणी कुणाचे ऐकतो का? तो पण करून आला आहे, आणि तुम्ही पण करून आला आहात. तुम्ही असे बोलता आणि तो तसे करतो, त्यामुळे तुम्हाला वाटते की 'मी सांगतो आणि तो ऐकतो.' वास्तवात तर तो माझेसुद्धा ऐकत नाही, कधीच नाही. ही तर पूर्वी घडून गेलेली घटना आहे. नाटकात घडून चुकली आहे. त्याची रिहर्सल झालेली आहे, म्हणून तर आम्ही त्याला 'व्यवस्थित' म्हणतो ना! त्याचे काय कारण? तर ते घडून गेले आहे. मग ते कशाला पाहता? जे पूर्वी घडून गेले आहे, त्याला आम्ही 'व्यवस्थित' असे म्हणतो.

हेच तर समजून घ्यायचे आहे. पण लोक 'धर्म, धर्म', असे म्हणत राहतात. ती सर्व चांगली माणसे आहेत, मोठी माणसे आहेत, आम्ही ते नाकारत नाही. परंतु तुम्ही धर्म कशाला म्हणता? सत्‌धर्म कशाला म्हणता? हे तर सर्वांनी गायलेलेच आहे, सर्व तेच तेच गात आहेत ना, कुणी नवीन गात आहे का? काही फायदा-बियदा व्हायला नको का? काही बदल नको का घडायला? हेच तर करत आले आहेत. दळलेले पीठ परत परत दळत राहतात व सारे पीठ उडवून टाकतात.

कारण माणूस काही करू शकेल असे नसतेच. मनुष्य स्वभाव काही करू शकत नाही. करणारी परसत्ता आहे. हे जीव, फक्त जाणणारेच आहेत. म्हणून तुम्ही हे जाणत राहायचे, आणि तुमच्या या जाणण्यामुळे चुकीच्या ठिकाणी जी तुमची श्रद्धा बसली होती, ती नष्ट होईल. आणि मग तुमच्या अभिप्रायामध्ये बदल होईल. काय बदल होईल? तर 'खोटे बोलणे चांगले आहे', हा अभिप्राय नष्ट होईल. आणि हा अभिप्राय बदलला यासारखा दुसरा कोणताच पुरुषार्थ नाही. या जगात ही फार सूक्ष्म गोष्ट आहे, पण खूप खोल विचार करण्याची गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** नाही, पण ही गोष्ट तर पूर्णपणे लॉजिकल (तर्कशुद्ध) आहे.

**दादाश्री :** हो, ही लॉजिकल आहे. खूप विचार करण्यासारखीही गोष्ट आहे. आपले लोक मग काय म्हणतात? 'आम्हाला सर्व काही माहीत आहे पण आमच्याकडून तसे होत नाही.' 'होत नाही' असे म्हणत राहिल्यावर काय होणार? तो काय म्हणाला?

**प्रश्नकर्ता :** काही होत नाही.

**दादाश्री :** हे 'होत नाही, होत नाही'चे पालुपद, ही सर्वात मोठी जोखीम आहे. कोणती जोखीम? तर भ्रांतीमध्ये सुद्धा, आत आत्मा असल्यामुळे 'जसे बोलतो तसे घडून जाते.' जसे चिंतवन करतो तसे घडून जाते. म्हणून 'काही होत नाही, होत नाही', असे बोलल्याने जनावराचा किंवा दगडाचा जन्म मिळेल, म्हणजे जे काहीच करू शकत नाहीत असे जीव. परंतु त्यांना या धोक्याची जाणीवच नाही. लोकांना 'काही होत नाही' असे बोलताना तुम्ही ऐकले आहे ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** असे कधीच बोलू नये. 'काही होत नाही' असे बोलूच नये. अहो, करायचे काहीच नसते. शौचाला जाणे हेही परसत्तेत आहे, तर मग काही करण्याचे तुमच्या हातात कसे असू शकेल? असा कोणताही मनुष्य जन्माला आला नाही की, ज्याच्या हातात थोडीशीही करण्याची सत्ता आहे. तुम्हाला तर फक्त जाणायचे आहे आणि निश्चय करायचा आहे. बस, फक्त एवढेच करायचे आहे. एवढे जरी समजले, तरी तुमचे काम होऊन जाईल. पण ही सहज समजेल इतकी सोपी गोष्ट नाही.

तुम्हाला समजले का? काही करण्यापेक्षा जाणणे हेच चांगले आहे, हे समजले का? 'करणे' असे लगेच होऊ शकते का?

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आपण जे सांगत आहात ते समजले. आपले म्हणणे बरोबर आहे, परंतु 'असे करावे', हे समजल्यानंतर सुद्धा करायचे

तर बाकीच राहते ना? जशी करण्याची सत्ता नाही, तशी जाणण्याचीही सत्ता नाहीच ना?

**दादाश्री :** नाही! जाणण्याची सत्ता आहे, करण्याची सत्ता नाही. ही खूप सूक्ष्म गोष्ट आहे. ही एवढी गोष्ट जरी नीट समजली तरी खूप झाले.

## अभिप्राय बदला

समजा, एक मुलगा चोर बनून, चोरी करू लागला आहे संधी मिळाल्यावर खिशातून पैसे काढून घेतो. घरी आलेल्या पाहुण्यांनासुद्धा सोडत नाही. अरे, कित्येक पाहुण्यांकडे तर परतीचे तिकीट काढण्यासाठीही पैसे उरत नाहीत, मग ते बिचारे काय करतील? पैसे परत कसे मागतील? आणि ज्या घरातून पैसे चोरीला गेले त्या घरातील माणसांना सांगूही शकत नाहीत, कारण तसे केले तर घरची माणसे त्या मुलाला मारतील, म्हणून दुसऱ्या कोणाकडून उसने घेऊन ते घरी परततात, काय करणार मग? तो मुलगा पैसे चोरून त्यांचे खिसे पार रिकामेच करून टाकतो ना? तर, आम्ही त्या मुलाला काय शिकवतो की, 'या जन्मी तू दादा भगवानांपाशी चोरी न करण्याची शक्ती माग.'

आता त्यामुळे त्याचा काय फायदा होईल? कोणी म्हणेल यात तुम्ही काय शिकवले? तो तर शक्ती मागत राहतो, आणि चोरीही करत राहतो. अरे! करू दे ना चोरी. पण तो सतत शक्ती मागत आहे की नाही? हो, शक्ती तर मागतो. आम्ही जाणतो की हे औषध काय काम करत आहे. तुम्हाला कसे समजणार की हे औषध कसे काम करत आहे?

**प्रश्नकर्ता :** खरेच, त्यांना समजत नाही की हे औषध कसे काम करत आहे? म्हणजे शक्ती मागितल्याने लाभ होतो की नाही, तेही त्यांना समजत नाही.

**दादाश्री :** याचा भावार्थ काय आहे? एक तर तो मुलगा मागत आहे की 'मला चोरी न करण्याची शक्ती दे', म्हणजे त्याने स्वतःचा

अभिप्राय बदलला. 'चोरी करणे चुकीचे आहे, आणि चोरी न करणे हेच बरोबर आहे' अशी शक्ती मागतो, म्हणजे तो 'चोरी करू नये' या अभिप्रायावर आला. सर्वात महत्त्वाचे तर अभिप्राय बदलला हेच आहे! आणि अभिप्राय बदलला तेव्हापासूनच त्याचे गुन्हेगार होणे थांबले.

आणि दुसरे काय झाले? तर तो देवाकडे शक्ती मागत आहे, म्हणून त्याच्यात परम विनय उत्पन्न झाला. 'हे देवा! मला शक्ती दे.' असे म्हटले की देव ताबडतोब त्याला शक्ती देतो. गत्यंतरच नाही ना! देव सर्वांनाच शक्ती देतो. मागणारा मात्र पाहिजे. म्हणून तर मी सांगतो की तुम्ही मागायला विसरता! काही मागतच नाही, कधीच मागत नाही.

'शक्ती मागणे', हे तुम्हाला समजले का?

**प्रश्नकर्ता :** हा तर फार मोठा वैज्ञानिक खुलासा आहे. त्याचा अभिप्राय बदलला, आणि योग्य तेच मागितले.

**दादाश्री :** आणि 'शक्ती दे' असे म्हणतो. 'दे' असे म्हणणे ही काय साधीसुधी गोष्ट आहे? मग देव खुश होऊन म्हणतो, 'घे.'

आणि दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे त्याचा अभिप्राय बदलला आहे. अन्यथा त्याला मारून-ठोकून त्याचा अभिप्राय बदलू शकत नाही, तसे केल्याने तर त्याचा अभिप्राय अजून बळकट होतो की 'चोरी केलीच पाहिजे.' अरे, असे मारून-ठोकून औषधोपचार होत नसतात, उपचारासाठी तर दादांकडे घेऊन जा. दादाजी त्याला मांडीवर बसवून शहाणा करतील. औषधाचा जाणकार तर हवा ना?

अभिप्राय बदलणे ही काही सोपी गोष्ट नाही, अशा गुप्त प्रकारेच तो बदलता येतो. असेच जर आम्ही सांगितले की, 'चोरी करणे बरोबर नाही, ते चुकीचे आहे', तर त्याला वाटेल मी तर करत आहे आणि हे उगाच 'करू नकोस' असे सांगतात. यामुळे तो कधी योग्य मार्गावर येणार नाही. आमचा हा वैज्ञानिक शोध आहे.

हे सर्वात महत्त्वाचे आहे की त्याने स्वतःचा अभिप्राय बदलला.

आणि आता तो म्हणतो, मी माझा अभिप्राय तर बदलला, पण देवा आता मला शक्ती दे, मला तुझ्या शक्तीचीच गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** आणि मग 'देणारा देण्यासाठी तयारच बसला आहे, म्हणून मागण्यासारखे आहे.'

**दादाश्री :** हो, मागा, तुम्ही मागाल ते द्यायला मी तयार आहे.

एका तासातच मी तुम्हाला माझ्यासारखा बनवेन, अशी गॅरंटी दिली आहे, सर्व काही सांगितले आहे, अशी गॅरंटी दिली आहे की नाही? कितीतरी वर्षांपासून मी गॅरंटी देत आहे, की 'माझ्यासारखा एका तासातच बनवेन. मात्र तुमची तयारी पाहिजे.'

ज्ञानी पुरुष सर्व औषध देतात, रोगाचे निदान पण करतात आणि औषधही देतात. आपण फक्त त्यांना विचारायचे की, 'मला हे असे समजले आहे, पण नक्की काय आहे ते मला सांगा.' मग ते लगेच खरे काय आहे ते सांगतात आणि मग त्यांनी सांगितलेले 'बटण' दाबले की गाडी सुरू होते.

**प्रश्नकर्ता :** चूक झाल्याचे समजल्यावर प्रतिक्रमण विधी करायचा की नाही?

**दादाश्री :** काही हरकत नाही. फार अनावर झाले असेल तर, 'दादा, मी माफी मागतो, आणि पुन्हा मला शक्ती द्या.' अशी दादांकडे माफी मागायची आणि सोबत ज्या कारणासाठी शक्ती मागायची आहे त्याकरता, 'दादा, मला शक्ती द्या, शक्ती द्या असे म्हणायचे. तुम्ही शक्ती मागून घ्या, तुमची स्वत:ची शक्ती वापरू नका, नाही तर तुमची शक्ती संपून जाईल. आणि जर शक्ती मागून वापराल तर ती संपणार नाही, उलट वाढेल. कारण तुमच्या दुकानात किती माल (शक्ती) असेल?'

प्रत्येक बाबतीत 'दादा, मला शक्ती द्या', प्रत्येक बाबतीसाठी सतत शक्ती मागूनच घ्यावी. प्रतिक्रमण करायचे राहिले तर, 'योग्य पद्धतीने प्रतिक्रमण करण्याची मला शक्ती द्या.' असे म्हणून सर्व शक्ती

मागून घ्यायच्या. आमच्याकडे तर तुम्ही मागून मागून थकाल एवढी शक्ती आहे.

## शक्ती मागून काम साधून घ्या

मी 'नऊ कलमे' दिली आहेत. एका गृहस्थाला मी म्हटले की, 'या नऊ कलमांत सर्व काही आले आहे, यात काहीच बाकी ठेवले नाही. तुम्ही ही नऊ कलमे रोज वाचत जा.' त्यावर ते म्हणाले 'पण मला असे करता येणार नाही.' मी म्हणालो, 'अरे, मी हे करायला सांगत नाही, 'करता येणार नाही' असे का म्हणता? मी असे करायला सांगतच नाही. तुम्ही तर फक्त एवढेच म्हणायचे 'हे दादा भगवान, मला शक्ती द्या.' म्हणजे फक्त शक्ती मागण्यासाठी सांगत आहे.' त्यावर ते म्हणाले, 'मग तर मजा येईल!' आणि ह्या लोकांनी तर करणेच शिकवले आहे.

'हे दादा भगवान, मला, कोणत्याही धर्माचे किंचितमात्रही प्रमाण दुखावणार नाही, दुखविले जाणार नाही, किंवा दुखावण्यासाठी अनुमोदन दिले जाणार नाही, अशी परम शक्ती द्या.'

धर्म म्हणजे, तीन लोक मिळून झेंडा हलवतात, अर्थात तीन लोक एकत्र येतात तेव्हा त्याला 'गच्छ' म्हणतात. तीन साधू एकत्र येऊन बसतात, त्यांनी सुरुवात केली, बसले, म्हणजे गच्छ सुरू झाले. भगवंतांनी म्हटले आहे की फक्त एका व्यक्तीने गच्छ बनत नाही. म्हणूनच कृपाळूदेव म्हणाले, की *'गच्छ-मतनी कल्पना ते नहीं सद्व्यवहार'* (गच्छ-मताची जी कल्पना आहे, तो सद्व्यवहार नव्हे.)

अर्थात हे सर्व आता पुन्हा कन्स्ट्रक्ट (निर्माण) करायचे आहे. सर्व भिंती, फाउंडेशन सर्वच पाडून पुन्हा नव्याने बांधण्यासाठीच हे सर्व मटिरियल (सामान) येत आहे. दगड, चुना-वाळू, जे पूर्वी घातले होते ते सर्व काढून आता आर.सी.सी.चे फाउंडेशन होणार आहे. धर्माचा पाया तर किती मजबूत असायला हवा!

ते गृहस्थ म्हणाले 'हे माझ्याकडून होणार नाही, म्हणून मी करणार नाही.' मी म्हणतो की, 'तुम्ही फक्त शक्ती मागा.' मग ते म्हणाले 'ती

शक्ती कोण देणार?' मी सांगितले, 'शक्ती मी देईन, तुम्ही मागाल त्या शक्ती द्यायला मी तयार आहे.' पण मागताच येत नसेल, तर मी काय करू? मग मलाच शिकवावे लागते की अशा प्रकारे शक्ती मागा. तुम्हाला शक्ती मागता येत नाही म्हणून मग मलाच शिकवावे लागते की अशा अशा प्रकारे शक्ती मागा. शिकवायला नको का? पाहा ना, हे सारे काही शिकवलेलेच आहे ना! मीच शिकवलेले आहे हे सर्व. एखादे कलम म्हण बघू.

**प्रश्नकर्ता :** हे दादा भगवान, मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा किंचितमात्रही अहम् दुखावणार नाही, दुखविला जाणार नाही, किंवा दुखविण्यासाठी अनुमोदन दिले जाणार नाही, अशी परम शक्ती द्या.

माझ्याकडून कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा किंचितमात्रही अहम् दुखविला जाणार नाही, अशी स्याद्वाद वाणी, स्याद्वाद वर्तन आणि स्याद्वाद मनन करण्याची मला परम शक्ती द्या.

**दादाश्री :** मग ते समजून गेले आणि म्हणाले 'हे तर जमेल, यात सर्व काही आले.'

ते म्हणाले 'पण मला हे जमणार नाही, मी कसे करू?' मी म्हटले, 'हे करायचे थोडेच आहे? तुम्हाला हे करायचे नाही, तुम्ही करूच नका. निवांतपणे रोजच्यापेक्षा दोन भाकऱ्या जास्त खा, पण या शक्ती मागा.' त्यावर ते म्हणाले 'ही गोष्ट मला जमेल.'

**प्रश्नकर्ता :** सर्वात आधी हीच शंका येते, की शक्ती मागितल्यावर मिळेल की नाही?

**दादाश्री :** तीच शंका चुकीची ठरते. आता ते शक्ती मागत राहतात ना?

## 'पाहा आणि जाणा', जणू काही सिनेमा आहे

**प्रश्नकर्ता :** या 'नऊ कलमांत' आम्ही शक्ती मागतो की, 'असे

करू नये, करवू नये, आणि करविण्यासाठी अनुमोदन देऊ नये', म्हणजे याचा अर्थ असा आहे की, भविष्यात असे होऊ नये यासाठी आम्ही शक्ती मागतो, की मग पूर्वी केलेले सर्व धुतले जावो यासाठी आहे हे?

**दादाश्री :** ते सर्व धुतले जाते, आणि शक्ती उत्पन्न होते. शक्ती तर आहेच, परंतु धुतले गेल्यामुळे शक्ती व्यक्त होते. शक्ती तर आहेच पण व्यक्त झाली पाहिजे. म्हणून दादा भगवानांची कृपा मागत आहोत की, हे आमचे सर्व धुतले जावे, तर शक्ती व्यक्त होईल.

शक्ती तर पूर्णपणे आत आहेच, पण अव्यक्त रूपात आहे. अपूर्ण का आहे? कारण आपल्याला अजूनही या (इतर) सर्व गोष्टी चांगल्या वाटतात, तरीही या ज्ञानानंतर बरेच काही कमी झाले आहे ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** जसजसे कमी होत जाईल, तसतशा शक्ती व्यक्त होत जातील. चांगले वाटते, याचा अर्थ तिरस्कार करायचा असे नाही, पण त्यातच तन्मयाकार होऊन जाता, स्वत:ला विसरता, स्वत:ची शक्ती विसरता, आणि त्यातच तन्मयाकार राहता. यालाच 'चांगले वाटते' असे म्हणतात. खा, प्या, पण असे तन्मयाकार होऊ नका. तुम्ही सिनेमा पाहायला जाता, तेव्हा त्यातील एखादा पुरुष किंवा स्त्री चांगली वाटली तर काय तिला मिठी मारता? आणि सिनेमात जर कोणी कोणाला मारत असेल तर काय तुम्ही 'कशाला मारतोस? मारू नकोस' असे ओरडता? तिथे तुम्हाला समजतेच ना की हे फक्त पाहायचेच आहे, बोलायचे नाही.

किती वर्षांपूर्वी सिनेमा पाहायला गेला होता? तेव्हा पाहिले तर होते ना? तेव्हा काही बोलत नव्हते ना, की 'का मारत आहेस?' हो, तिथे फक्त पाहायचेच असते.

सिनेमा असे म्हणत नाही की, 'तुम्ही मला तुमच्याबरोबर घेऊन जा.' तो तर म्हणतो फक्त 'पाहून जा.' मग जर तुम्ही काही उलट केले तर तो सिनेमा बिचारा काय करणार? सिनेमा कधी म्हणतो का की

तुम्ही मला तुमच्याबरोबर घेऊन जा? पण जर तुम्ही स्वत:च डिंक लावून जाल तर काय होईल? डिंक-बिंक सर्व धुतल्यानंतर गेले पाहिजे. स्वत:च डिंक चोपडून जाता, म्हणून तर जे काही असेल ते लगेच चिकटून जाते.

तुमच्यात ती शक्ती आल्यानंतर, आत शक्ती उत्पन्न झाल्यानंतर ती शक्तीच कार्य करवून घेईल, तुम्ही काहीच करायचे नाही. तुम्ही कराल तर अहंकार वाढीस लागेल की, 'मी करायचा प्रयत्न करतो पण होत नाही,' असे 'होत नाही' हे परत सुरू होईल. म्हणून शक्ती मागा. या 'नऊ कलमांत' सर्व जगाचे प्रतिक्रमण येऊन जाते. चांगल्या प्रकारे करा. आम्ही तुम्हाला दाखवून देतो, नंतर आम्ही आमच्या देशात (मोक्षात) निघून जाऊ ना!

**प्रश्नकर्ता :** दोषांचे प्रतिक्रमण करण्यासाठी आम्ही रोज 'नऊ कलमे' पाळीपाळीने म्हणत राहिलो तर त्यात शक्ती आहे का?

**दादाश्री :** तुम्ही जी 'नऊ कलमे' म्हणता ते वेगळे आहे, आणि या दोषांचे प्रतिक्रमण करता ते वेगळे आहे. जे दोष होतात त्यांची प्रतिक्रमणे तर रोजच्या रोज करावी लागतात.

**प्रश्नकर्ता :** ही जी 'नऊ कलमे' दिली आहेत, ती विचार, वाणी आणि वर्तन यांच्या शुद्धतेसाठी दिली आहेत ना?

**दादाश्री :** नाही, नाही. अक्रम मार्गात अशा शुद्धतेची गरजच नाही. ही 'नऊ कलमे' तर तुमचे जे अनंत जन्मांपासूनचे सर्वांशी हिशोब बांधले गेले आहेत, त्या हिशोबांपासून सुटण्यासाठी दिली आहेत. तुमचे 'वहीखाते' साफ करण्यासाठी दिली आहेत.

**प्रश्नकर्ता :** ही सर्व वहीखाती विचार, वाणी आणि वर्तन याचीच आहेत ना?

**दादाश्री :** नाही, विचार-वाणी-वर्तन ही तर वेगळी गोष्ट आहे. ते काय म्हणू इच्छितात की, आज क्रमिक मार्गात लोक ज्या आचारांचे

पालन करत आहेत त्या आचारांचे पालन जर मी राजी-खुशीने करत असेन तर बीज पडेल. आणि मग पुढील जन्मी परत ती लिंक चालू राहील. परंतु जर तो आचारांचे पालनच करत नसेल तर मग त्याच्यासाठी क्रमिक मार्ग नाहीच. आणि अक्रमात तर आचार वगैरेची गरजच नाही. अक्रमात तर आर्तध्यान-रौद्रध्यान बंद झाले पाहिजेत.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे याचा अर्थ असा झाला की, अक्रम मार्गात जे कोणी ज्ञान घेतात, त्यांचे विचार, वाणी, वर्तन हे डिस्चार्ज रूपात आहेत, म्हणून तो प्रश्नच उभा राहत नाही.

**दादाश्री :** हो, विचार, वाणी, आणि वर्तन हे सर्व तर डिस्चार्ज स्वरूपातच आहेत, मग त्यांचे काय देणेघेणे?

अनंत जन्मांपासून लोकांशीच वादावादी झालेली असते म्हणून ही 'नऊ कलमे' म्हटल्यामुळे ते सर्व ऋणानुबंध सुटून जातात, हे तर प्रतिक्रमण आहे, सर्वात मोठे, जबरदस्त प्रतिक्रमण आहे.

**प्रश्नकर्ता :** ही जी 'नऊ कलमे' आहेत, त्या नऊ कलमांमध्ये जसे सांगितले आहे, त्यानुसारच आमची भावना आहे, इच्छा आहे, अभिप्राय पण तसाच आहे.

**दादाश्री :** ही 'नऊ कलमे' म्हटल्याने तुमचे आत्तापर्यंत जे काही दोष झाले आहेत ते सर्व दोष सैल होऊन जातात. आणि मग त्याचे फळ पण येईलच. दोष जळून गेलेल्या सुंभासारखे होऊन जातात. जरासा हात लावल्यावर ते विस्कटून जातात.



[ 6 ]

# राहतील फुले, जातील काटे

## चित्त शुद्धीकरण, हीच आहे अध्यात्म सिद्धी

**प्रश्नकर्ता :** कर्मांची शुद्धी कशी होते?

**दादाश्री :** कर्मांची शुद्धी चित्ताची शुद्धी केल्यामुळे होते. चित्ताची शुद्धी झाली की कर्मांची शुद्धी होते. चित्ताच्या अशुद्धीमुळेच कर्मे अशुद्ध होतात. चित्त जर शुद्ध झाले तर कर्मे शुद्ध होऊनच जातात.

**प्रश्नकर्ता :** प्रत्येक कर्म शुद्ध होते? वाटेल ते कर्म केले तरी ते शुद्ध होते?

**दादाश्री :** चित्त शुद्ध झाले, की कर्मे शुद्ध होऊन जातात. चित्त अशुद्ध असेल तर कर्म अशुद्ध, चित्त शुभ असेल तर कर्म शुभ, चित्त अशुभ असेल तर कर्म अशुभ! म्हणजे हे सर्व चित्तावर अवलंबून आहे, म्हणूनच चित्त दुरुस्त करायचे आहे. लोक म्हणतात की मला चित्तशुद्धी करायची आहे. या जगात चित्तशुद्धी करण्यासाठीच अध्यात्म आहे. तात्पर्य चित्तशुद्धी करण्याची गरज आहे.

चोरी केल्यामुळे चित्त अशुद्ध होते, आणि नंतर पश्चात्ताप केल्याने तेच चित्त परत शुद्ध होते. पश्चात्ताप न केल्यामुळेच या लोकांच्या चित्ताची अशुद्धी राहिली आहे. त्यामुळे सर्व अशुद्ध कर्मे होत राहतात.

ते हे समजतात पण तरी पश्चात्ताप करत नाहीत. जाणून देखील ते असेच म्हणतात, की 'सर्व जण असेच करत आहेत ना!'

म्हणजे स्वत:चे चित्त अशुद्ध होत आहे, याचे भान राहत नाही.

**प्रश्नकर्ता :** व्यवहार शुद्धी कशी होते?

**दादाश्री :** जर व्यवहारात चित्तशुद्धी ठेवली की 'मला यांना दगा द्यायचा नाही', तर मग ती व्यवहार शुद्धी झाली. आणि जर दगा दिला गेला तर तो व्यवहार अशुद्ध झाला. अर्थात, नीती-नियम आणि प्रामाणिकपणे वागले, तर व्यवहार शुद्धी राहते.

'ऑनेस्टी इज द बेस्ट पॉलिसी' आणि 'डिसऑनेस्टी इज द बेस्ट फूलिशनेस' (प्रामाणिकपणा हीच उत्तम नीती आहे, आणि अप्रमाणिकपणा हा सर्वात मोठा मूर्खपणा आहे).

व्यवहार शुद्धीसाठी, समोरच्याला दु:ख होणार नाही अशा प्रकारे व्यवहार करणे, याला 'व्यवहार शुद्धी' म्हणतात. समोरच्याला अजिबात दु:ख होता कामा नये. आपल्याला दु:ख झाले तर ते सहन करावे पण समोरच्याला मात्र दु:ख होता कामा नये.

**प्रश्नकर्ता :**आम्ही कर्मांचे प्रतिक्रमण केले तर आमची सुटका होईल का?

**दादाश्री :** प्रतिक्रमण केल्याने बहुतेक सर्व कर्मे संपून जातात. थोडी फार बाकी राहतात. अतिक्रमणामुळेच ही कर्मे बांधली जातात. ज्या रसाने (रुचीने) अतिक्रमण केले असेल तोच रस मग भोगावा लागतो. प्रतिक्रमण केले तरी रस तर भोगावाच लागतो. जितका रस घेतला असेल तितका भोगावा लागेल. कारण रसपूर्वक केले होते ना! मुख्य दोष अतिक्रमणाचा आहे. व्यवहार सुरळीत चालत असेल, कोणाला काही त्रास होत नसेल, सहजपणे होत असेल तर त्याला हरकत नाही. परिणामी प्रतिक्रमणाच्या परिणामामुळे नवीन कर्मबंधन होत नाही. जुनी कर्मे मात्र भोगावीच लागतात.

## कर्ताभाव गेल्यानंतर

**प्रश्नकर्ता :** ज्ञान प्राप्तीनंतर आपला कर्ताभाव निघून गेला. म्हणजे आपले नवे पुद्‌गल (जे पूरण-गलन होते) बनणे बंद झाले का?

**दादाश्री :** कर्ताभाव गेला म्हणजे नवीन कर्म बंधन बंद झाले.

**प्रश्नकर्ता :** तर आता जी जुनी कर्मे बाकी राहिली आहेत त्यांना जीर्ण करण्यासाठी काय उपाय आहे?

**दादाश्री :** नाही, ते आपोआपच होईल, पाच आज्ञा दिल्या आहेत ना? आज्ञेत राहाल तर सर्व जुन्या कर्मांचा समभावाने निकाल होऊनच जाईल, आणि नवे कर्म बंधन पण होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** परंतु जर भारी (गाढ) कर्मे बांधली गेली असतील तर ती आम्हाला हलकेपणाने भोगून संपवायची आहेत का?

**दादाश्री :** नाही, त्यासाठी वारंवार प्रतिक्रमण करावे लागते. जे कर्म खूप चिकट (गाढ) असेल तर त्यासाठी जास्त प्रतिक्रमणे करावी लागतात. कर्म जास्त चिकट आहे असे जर वाटले, तर प्रतिक्रमण-प्रत्याख्यान केल्याने ते धुतले जाईल. तरी पण ते (कर्म) पूर्णपणे संपणार नाही, कारण हे एक अवतारी ज्ञान आहे.

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमण झाले, पण त्याची जागृती नसेल तर?

**दादाश्री :** म्हणजे प्रतिक्रमण होत नाही, असे?

**प्रश्नकर्ता :** नंतर जागृती आली की प्रतिक्रमण होते.

**दादाश्री :** म्हणजे त्याला डुलकी लागते. पण त्यामुळे त्याला कर्म बंधन होत नाही. कर्म कधी बांधले जाते? तर 'मी चंदुलाल आहे' असे मानत असेल तेव्हा. डुलकी लागल्यामुळे तर ते कच्चे राहिले. जे कच्चे राहिले त्याचे फळ नंतर येईल. 'कच्चे' राहता कामा नये. डुलकी घेतली तर डुलकीचे फळ तर मिळेलच ना? कर्ता होण्याचे फळ नाही, पण जे कच्चे राहिले त्याचे फळ येते.

## राहिले फक्त प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आता फक्त प्रतिक्रमणच राहिले ना, दादाजी?

**दादाश्री :** हो, प्रतिक्रमणच. आणि तेसुद्धा अतिक्रमण झाले तरच. दिवसभर अतिक्रमण होत नसते. दिवसभर शांतीच असते. परंतु टेबलावर खाण्याच्या बाबतीत काही भानगड झाली तर झाले अतिक्रमण. पण तो काही आजचा दोष नाही, तो पूर्वीचा आहे, चारित्र्यमोहनीय आहे. आज तर आपल्याला असे पसंतच नाही. तरी पण होत असते, नाही का?

## अतिक्रमण आणि आक्रमण

एक 'अतिक्रमण' आणि दुसरे 'आक्रमण', या दोन शब्दांचे प्रतिक्रमण करावे लागते. आक्रमण, ही गोष्ट आपल्यात असता कामा नये. आक्रमण म्हणजे ॲटॅकिंग नेचर (हल्ला करण्याचा स्वभाव) आक्रमण म्हणजे प्रत्येक गोष्टीत, प्रत्येक शब्दात ॲटॅक (हल्ला) करणे. शब्दांमध्ये ॲटॅक होतो, त्याला ॲटॅकिंग नेचर म्हणतात, आक्रमण म्हणतात.

अतिक्रमण आणि आक्रमण, यात काय फरक आहे?

**प्रश्नकर्ता :** आक्रमण म्हणजे सरळ ॲटॅकच झाला?

**दादाश्री :** हो, ॲटॅकच बस! हल्ला करणे म्हणजे आक्रमण! आणि क्रमण म्हणजे काय? तर जशा सामान्य व्यवहारामध्ये गप्पागोष्टी चालू असतात तशाच गप्पागोष्टी सकाळपर्यंत होत राहतात. आणि त्यामुळे जर कोणाला दुःख झाले नसेल तर समजावे की ते क्रमण आहे. सहज कोणावर तरी जोक (विनोद) केला आणि तो जर हळव्या मनाचा असेल तर चालवून घेतो. परंतु जर आत त्याला थोडेसे जरी दुःख झाले, तर त्याला अतिक्रमण केले असे म्हणतात. आम्ही सगळ्यांशी विनोद करतो पण कसा? तर निर्दोष विनोद करतो. आम्ही त्याचा रोग (दोष) काढून त्याला शक्तिवान बनविण्यासाठी विनोद करतो. थोडी गंमत वाटते आणि आनंदही होतो, आणि त्याचबरोबर तो पुढे प्रगती पण करतो. म्हणजे आम्ही निर्दोष विनोद करतो. पण त्या विनोदाने कोणालाही दुःख होत नाही.

अतिक्रमण होणे हे स्वाभाविक आहे, आणि प्रतिक्रमण करणे हा आपला पुरुषार्थ आहे.

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमण झाले की प्रतिक्रमण करण्याची सर्वांना सवयच झालेली असते. 'अतिक्रमण झाले' असा त्याचा अभिप्राय असल्यामुळे त्याला असेच वाटते की हे अतिक्रमण झाले आहे. परंतु खरोखर अतिक्रमण झाले नसेलही. असे घडते ना?

**दादाश्री :** पण अतिक्रमण झाले, तर ते लगेच कळून येते. स्वत:ला कळतेच की हे जरा कडक बोलले गेले, असे कळत नाही का? उलटी केली आणि चूळ भरली यात फरक नाही का?

**प्रश्नकर्ता :** फरक आहे.

**दादाश्री :** ते सर्व कळते. स्वत:ला काही दु:ख झाले, तर समजून घ्यावे की अतिक्रमण झाले आहे.

**प्रश्नकर्ता :** दुसरा एक शब्द आहे 'पराक्रम', म्हणजे नेमके काय?

**दादाश्री :** क्रम-अक्रमाच्या पलीकडे, ते म्हणजे पराक्रम. सध्या तर तू प्रतिक्रमण कर ना? पराक्रम जेव्हा येईल तेव्हा येईल, ते स्टेशन फार मोठे आहे, ते थोडे उशीराने येईल. आतापासून त्याची वाट पाहत बसलो, तर हे अक्रम राहून जाईल.

तू प्रतिक्रमण कर ना, अजून तर तुला आक्रमणाचे प्रतिक्रमण करावे लागत आहे, मग पराक्रम कसा करशील?

**प्रश्नकर्ता :** आक्रमणासमोर पराक्रमाची गरज आहे ना?

**दादाश्री :** आक्रमणासमोर तर प्रतिक्रमण करावे. पराक्रम तर क्रम-अक्रम या दोन्हींच्या पलीकडे आहे. हा पराक्रम शब्द तू कुठून चोरून आणलास?

**प्रश्नकर्ता :** मी आप्तवाणी-6 चे वाचन केले ना!

**दादाश्री :** असे होय! आपल्याजवळ प्रतिक्रमणाचे फार उत्तम साधन आहे. *आडाई* (अहंकारामुळे आडमुठेपणा) करतात, त्याचे प्रतिक्रमण करावे लागते. प्रतिक्रमणात खूप बळ आहे. पण तुम्ही तर प्रतिक्रमणाचे सैन्य पाठवतच नाही ना? तुम्ही जर प्रतिक्रमणाचे सैन्य पाठवलेत, तर ते जिंकेलच! सैन्य जिंकेल की नाही?

## प्रकृती उत्पन्न झाली क्रमणामुळे, पसरली अतिक्रमणामुळे

**प्रश्नकर्ता :** तसे पाहिले तर हे प्रतिक्रमण सर्व प्रकारे मुख्य आहे ना? कारण समजो किंवा न समजो, चूक दिसो किंवा न दिसो, काही येत असो किंवा नसो, तरी पण प्रतिक्रमणामुळे या सर्व गोष्टींचे समाधान आपोआपच मिळत असते ना?

**दादाश्री :** अतिक्रमणामुळे हे सारे उत्पन्न झाले आहे, आणि इथून जर स्वतःच्या देशाला (मोक्षाला) जायचे असेल तर प्रतिक्रमण करा. सोपी गोष्ट आहे ना? सोपी आहे की कठीण?

**प्रश्नकर्ता :** खूपच सोपी आहे.

**दादाश्री :** अतिक्रमणामुळे हे सर्व उत्पन्न झाले आहे, आणि प्रतिक्रमणामुळे बंद होईल.

**प्रश्नकर्ता :** प्रकृती पूर्णपणे अतिक्रमणामुळेच उत्पन्न झाली आहे ना?

**दादाश्री :** प्रकृती क्रमणामुळे उत्पन्न झाली आहे आणि अतिक्रमणामुळे ती पसरत जाते. फांद्या-बिंद्या सर्व.

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमणाने प्रकृती पूर्णपणे पसरते.

**दादाश्री :** आणि प्रतिक्रमणाने तो सारा पसारा कमी होत जातो, तेव्हा त्याला भान येते.

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमणामुळे प्रकृती पसरत जाते. नंतर पुढे तुम्ही 'आक्रमण' म्हणतात ना? तर आक्रमणाने काय होते? अतिक्रमण आणि आक्रमणाच्या अटॅक ने?

**दादाश्री :** तेच तर अतिक्रमण आहे ना?

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमणापेक्षाही जास्त झाले ना?

**दादाश्री :** नाही, तेच आहे हे सर्व, छोटे आक्रमण किंवा मोठे आक्रमण, ते सर्व आक्रमणामध्येच येते आणि त्यालाच अतिक्रमण म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** अर्थात छोटे आक्रमण असो किंवा मोठे आक्रमण, ते सर्व अतिक्रमणच आहे?

**दादाश्री :** हो.

## या जगात कोणीही चुकीचा नाही

पण त्याने चांगला प्रश्न विचारला. असे प्रश्न विचारले आणि सायंटिफिकली सर्व समजून घेतले तर त्याचे उत्तर सापडेल, नाही तर त्याचे उत्तर मिळणार नाही.

मला काय म्हणायचे आहे की, समजा तुम्ही एखाद्या ठिकाणी जर दर्शनासाठी गेलात, तुम्हाला वाटले होते की ते ज्ञानी असतील पण तिथे ते गेल्यावर निघाले ढोंगी! तुम्ही तिथे गेलात तो तर प्रारब्धाचा खेळ होता, आणि तिथे गेल्यावर मनात त्यांच्याबद्दल वाईट भाव आले, की 'अरेरे! अशा नालायकाकडे मी का आलो?' तो नेगेटिव्ह पुरुषार्थ तुमच्या आत झाला, त्याचे फळ तर तुम्हाला भोगावे लागेल. त्याला नालायक म्हटल्याचे फळ भोगावे लागेल, ते पाप भोगावे लागेल. विचार येणे हे स्वाभाविक आहे, पण लगेच आतमध्ये काय करायला हवे की, 'अरेरे! मी का असा गुन्हा केला?' लगेचच असा चांगला विचार करून आपण तो दोष धुऊन टाकला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** माफी मागावी का?

**दादाश्री :** हो, मनात माफी मागावी. प्रतिक्रमण करावे.

**प्रश्नकर्ता :** माझ्या मन-वचन-कायेने जाणता की अजाणता जी काही चूक झाली असेल, त्याची मी माफी मागतो.

**दादाश्री :** हो, 'महावीर भगवंतांचे' स्मरण करून किंवा कोणत्याही इष्ट देवाचे स्मरण करून, 'दादां'ना आठवून प्रतिक्रमण करावे की, 'अरेरे! तो कसा का असेना, पण माझ्याकडून अशी चूक का झाली?' चांगल्याला चांगले म्हणण्यात दोष नाही, परंतु चांगल्याला वाईट म्हणणे हा दोष आहे. आणि वाईटास वाईट म्हणणे हा पण मोठा दोष आहे, जबरदस्त दोष आहे! कारण तो स्वतः वाईट नाही, त्याच्या प्रारब्धाने त्याला वाईट बनवले आहे. प्रारब्ध म्हणजे काय? तर त्याच्या संयोगांनी त्याला वाईट बनवले आहे, त्यात त्याचा काय गुन्हा?

हे समजले ना? ह्या सर्व फार सूक्ष्म गोष्टी आहेत. या गोष्टी शास्त्रांत लिहिलेल्या नसतात, किंवा कोणा साधूकडूनही समजावून सांगितल्या जात नाहीत.

म्हणजे थोडक्यात एवढेच जरी समजून घेतले, प्रारब्ध आणि पुरुषार्थ हे सर्व समजून घेतले तर त्याची गाडी रुळावर येईल. मग तो कोणत्याही ठिकाणी भाव बिघडू देणार नाही. भाव बिघडले आणि लगेच ते सुधारून घेतले तर मग काहीच हरकत नाही.

समजा, इथून काही स्त्रिया जात असतील आणि तेव्हा तुम्हाला कोणी सांगितले की, 'पाहा ना, ही वेश्या इथे आली आहे, इथे कशी घुसली?' कोणी तुम्हाला असे म्हटल्यावर तुम्ही ही तिला वेश्या म्हटले, तर हा भयंकर मोठा गुन्हा ठरेल. ती म्हणते 'संयोगामुळे माझी ही परिस्थिती झाली आहे, पण तुम्ही का गुन्हा करत आहात?' मी तर माझे फळ भोगत आहे पण तुम्हीसुद्धा गुन्हा का करत आहात? ती काय स्वतःहून वेश्या बनली आहे? संयोगांनी बनवली आहे. कोणत्याही जीवाला वाईट बनण्याची इच्छा नसते, संयोगच सर्व काही करवितात, आणि नंतर त्याला त्याची सवय होऊन जाते. सुरुवात तर संयोगच करवितात.

## बुद्धीने ते होणार नाही

**प्रश्नकर्ता :** तशी तर माणसाच्या संपूर्ण आयुष्यात कुठे न कुठे तरी चूक होणारच ना?

**दादाश्री :** नाही, चूक झाली पण ती चूक जर आपण जाणली, आणि खरे न्यायाधीश बनलो तर आपल्याला ती चूक दिसेल की 'ही चूक झाली आहे', म्हणून मग प्रतिक्रमण करून त्या चुकीचा डाग आपण मिटवू शकतो.

**प्रश्नकर्ता :** पण ते सर्व बुद्धीने करावे लागते ना?

**दादाश्री :** नाही, बुद्धीने नाही, आम्ही जे ज्ञान देतो, त्या ज्ञान प्रकाशाने काम होते. बुद्धी तर चूक पाहूच देत नाही ना! बुद्धी वकील आहे, म्हणून ती चूक पाहूच देत नाही.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान मिळाल्यावर जेव्हा अंतरात्मा होतो, तेव्हा सारे दोष कमी होऊन जातात का?

**दादाश्री :** दोष दिसत जातात आणि कमी होत जातात, दिसत जातात आणि कमी होत जातात. त्याची दृष्टी स्वत:चे दोष पाहण्याकडे वळते. जोपर्यंत जीवात्मा आहे, मूढात्मा आहे, तोपर्यंत दुसऱ्यांचे दोष पाहतो. त्याला स्वत:च्या दोषांबद्दल विचारले तर सांगेल, 'माझ्यात तर दोन-तीन दोषच आहेत, माझ्यात दोष नाही, याच्यात आहेत, हा तर दोषांचे भांडारच आहे.'

## अज्ञान दशेत प्रतिक्रमण करता येते का?

**प्रश्नकर्ता :** हे जे आपले प्रतिक्रमण आहे ते फक्त ज्ञान घेतलेल्या महात्म्यांसाठीच आहे की ज्यांनी ज्ञान घेतले नाही, अशा लोकांसाठी सुद्धा आहे?

**दादाश्री :** असे आहे, ज्ञान घेतले नाही त्यांच्यासाठी तर फक्त प्रतिक्रमण हा शब्द वापरला जातो. फक्त शब्दच, पण त्यांना प्रतिक्रमण कसे करता येईल? कारण त्यांना तशी जागृतीच नसते ना! जागृती असल्याशिवाय प्रतिक्रमण कसे होईल?

अशी जागृती कोणत्या काळात होती? ऋषभदेव भगवंतांनंतरच्या

बावीस तीर्थंकरांच्या वेळी सारे शिष्य जागृत राहत होते, ते निरंतर 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करत होते.

आम्ही जेव्हा ज्ञान देतो, तेव्हाच त्यांना जागृती राहू शकते, नाही तर जागृती राहत नाही. ते सर्व तर उघड्या डोळ्यांनी झोपले आहेत, असे शास्त्रकारांनी म्हटले होते.

**प्रश्नकर्ता :** ज्यांना ज्ञान नाही, ते काय ठराविक प्रकारचे दोषच पाहू शकतात?

**दादाश्री :** हो. बस एवढेच. त्यांना दोषांची माफी मागायला शिका असे थोडक्यात सांगायचे. जो दोष तुम्हाला दिसेल त्या दोषाची माफी मागा, आणि 'तो दोष बरोबर आहे', असे कधीही म्हणू नका, नाही तर तो दोष दुप्पट होईल. चूक झाल्यावर क्षमा मागा.

**प्रश्नकर्ता :** ज्यांनी ज्ञान घेतले नाही, त्यांना स्वतःचे दोष दिसतात, तर त्यांनी कशा प्रकारे प्रतिक्रमण करावे?

**दादाश्री :** ज्ञान घेतले नसेल, असे थोडे जागृत लोक असतात, की जे प्रतिक्रमण समजू शकतात. ते करू शकतात, पण अन्य लोकांचे हे काम नाही. परंतु प्रतिक्रमण शब्दाचा अर्थ 'पश्चात्ताप करणे', असे त्यांना सांगावे लागेल.

## शुद्धात्मा पदाच्या प्राप्तीनंतर प्रतिक्रमण कशासाठी?

**प्रश्नकर्ता :** दादाजी, मला अजूनही हे समजले नाही, की शुद्धात्मा पद दिल्यानंतरही प्रतिक्रमण कशासाठी करायचे?

**दादाश्री :** नाही, प्रतिक्रमण केले तरी हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करणे याबद्दल मी विचारत नाही, पण ते कसे करायचे? 'मी चंदुलाल आहे' म्हणून की 'मी शुद्धात्मा आहे' म्हणून?

**दादाश्री :** प्रतिक्रमण आपण स्वतः करायचे नाही. आत्म्याला

प्रतिक्रमणे करायची नसतात. जर आत्म्याला करायची असती तर ती झालीच नसती. आपण तर 'चंदुलाल'ला एका शेजाऱ्याप्रमाणे सांगावे की, 'भाऊ, असे अतिक्रमण का करतोस?'

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी, आम्ही शेजाऱ्याकडे कशाला जायचे?

**दादाश्री :** शेजारी, तो तर आपल्या स्वतःच्या पूर्वी केलेल्या चुकांचा परिणाम आहे. ती आपलीच गुन्हेगारी आहे.

मी काय सांगतो, ते तू जरा ऐक. समजा एक मुलगा या अहमदाबाद शहरात जरा शौकीन होऊन गेला आणि त्याने दोन एक हजाराचे कर्ज करून घेतले.

समजा आता जर त्या मुलाने आजपासून असा निश्चय केला की, 'आता मला एका पैचेही कर्ज घ्यायचे नाही.' आजच तो निश्चय करतो आणि निश्चयाप्रमाणे वागूही लागतो. एका पैचेही कर्ज घेत नाही आणि जेवढा पगार असेल तो सर्व घरी आणून देतो. तरी पण जे पूर्वीचे कर्ज आहे, ते तर त्याला चुकवावेच लागेल ना? आता तो नवीन कर्ज तर करत नाही, तरी पण मागील कर्ज का चुकवावे लागते? त्याचप्रमाणे 'चंदुलाल' हा पूर्वी केलेल्या चुकांचे फळ आहे, वहीखात्याचा हिशोब आहे, त्याचा निपटारा तर करावाच लागेल ना?

**प्रश्नकर्ता :** तर मग ज्ञान घेतल्यानंतर कुठलेही प्रतिक्रमण करावे लागणार नाही ना?

**दादाश्री :** नाही केले तरी हरकत नाही, करणे अनिवार्य नाही.

**प्रश्नकर्ता :** करायला माझी काही हरकत नाही, त्याला माझा विरोधही नाही, परंतु मला हे नीट समजून घ्यायचे आहे. मला हा प्रश्न वारंवार पडतो.

**दादाश्री :** प्रतिक्रमण केल्याने काय होते की, आत्मा आपल्या 'रिलेटिव्ह' वर स्वतःचा दबाव टाकतो. कारण अतिक्रमणामुळे 'रियल'वर दबाव पडतो. कर्म हे अतिक्रमण आहे, आणि जर त्यातच इंटरेस्ट (रस)

वाटू लागला तर पुन्हा पोचा पडेल. म्हणून जोपर्यंत आपण चुकीला 'चूक' म्हणत नाही, तोपर्यंत गुन्हा आहे. म्हणूनच हे प्रतिक्रमण ('चंदुलाल'कडून) करवून घेणे गरजेचे आहे.

**प्रश्नकर्ता :** मला अजूनही हे पटत नाही.

**दादाश्री :** तुझ्या वडिलांना तुझ्यामुळे वाईट वाटले, तर हे अतिक्रमण झाले. आता त्यांना वाईट वाटले, ही गोष्ट वाढवायची की कमी करायची? चंदुलालकडून आपण काय करून घ्यायला हवे?

**प्रश्नकर्ता :** मी मानतो की त्यांना वाईट वाटेल असे काही मी करताच कामा नये.

**दादाश्री :** नाही, पण ते तर होऊनच जाते. अतिक्रमण तर होऊनच जाते, अतिक्रमण म्हणजे जे 'आपोआपच होऊन जाते.' कुणालाही अतिक्रमण करायची इच्छा नसते.

**प्रश्नकर्ता :** परंतु ते आम्ही जाणूनबुजून केले असेल तर ठीक आहे.

**दादाश्री :** जाणूनबुजून तर कोणीच करत नाही, जाणूनबुजून करता येईल असे काही नसतेच. ते करायचे असेल तरीही होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** मग दादाजी, त्याला अतिक्रमण केले असे कसे काय म्हणता येईल?

**दादाश्री :** तुझ्या वडिलांशी तू गरजेपेक्षा जास्त बोललास, किंवा बॉक्सिंग केली (भांडलास), तर तू प्रतिक्रमण करतोस की नाही? जर प्रतिक्रमण करत नसशील तर तू 'अतिक्रमणा'च्या बाजूनेच आहेस असे सिद्ध होईल, आणि जर तू प्रतिक्रमण केलेस तर तू कुठल्या बाजूने आहेस? प्रतिक्रमणाच्या बाजूने.

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमण करावे असा माझा भाव नाही.

**दादाश्री :** भाव नाही, तरी पण तू अतिक्रमणाच्या बाजूनेच आहेस. जर तू विरोधी भाव बदलला नाहीस तर तू अतिक्रमणाच्या बाजूनेच

आहेस. म्हणून प्रतिक्रमण कर. म्हणजे तू अतिक्रमणाच्या बाजूने राहणार नाहीस.

जर कोणाच्या पायावर आपल्या चपलांचा पाय पडला, तर आपण त्यांना सॉरी म्हटले पाहिजे की नाही?

**प्रश्नकर्ता :** सॉरी म्हणायला हवे. हे बरोबर आहे.

**दादाश्री :** यालाच म्हणतात प्रतिक्रमण. प्रतिक्रमण म्हणजे दुसरे काही नाही.

**प्रश्नकर्ता :** हो, त्याच अर्थाने ना? बाकी काही नाही ना?

**दादाश्री :** त्यालाच आम्ही प्रतिक्रमण म्हणतो, जसे आपण 'सॉरी' म्हणतो ना, तसेच हे सर्व आहे, त्याला आम्ही प्रतिक्रमण म्हणतो.

**प्रश्नकर्ता :** माझ्याकडून अतिक्रमण झाले, आणि त्याचे मी प्रतिक्रमण केले पण समोरच्याने मला माफ केले नाही तर?

**दादाश्री :** समोरच्याचे आपण पाहायचे नाही. तुम्हाला कोणी माफ करो वा न करो, ते पाहण्याची गरज नाही. तुमच्यातील हा अतिक्रमण करण्याचा स्वभाव संपला पाहिजे. तुम्ही अतिक्रमणाच्या विरोधी व्हायला हवे.

**प्रश्नकर्ता :** आणि जर समोरच्याला दु:ख होत असेल तर?

**दादाश्री :** समोरच्याचे असे काहीही पाहायचे नाही. तुम्ही अतिक्रमणाच्या विरोधी आहात असे निश्चित व्हायला हवे. तुम्हाला अतिक्रमण करायची इच्छा नाही, जे झाले त्यासाठी पश्चात्ताप होत आहे आणि आता पुन्हा तसे करण्याची तुमची इच्छा पण नाही.

**प्रश्नकर्ता :** समोरच्याला सॉरी म्हणायची हिम्मत आली आहे, अतिक्रमण झाले की मी प्रतिक्रमण करीन.

**दादाश्री :** या जगात असा कोणीही माणूस जन्माला आला नाही, की जो किंचितही काही करू शकतो.

**प्रश्नकर्ता :** मुद्दाम अतिक्रमण होत असेल, एकमेकाला कापून टाकत असतील तर कसे चालेल? नंतर प्रतिक्रमण करून सुटता येईल का?

**दादाश्री :** मग दुसरे काय करू शकतो? ही सर्व भ्रांतीतून परत फिरण्याची प्रक्रिया आहे. यात खोलवर जाण्यात काही फायदा नाही. आपण कामाशी काम ठेवावे.

आपल्या येथे विचारण्यासारखे काही ठेवलेच नाही. फक्त आज्ञांचे पालन करायचे आहे. कधी काही विचारायचे असेल तर विचारू शकता, पण वायफळ चर्चा करत बसायचे नाही, नाही तर आतील सर्व निघून जाईल. आणि परत बुद्धीच्या जाळ्यात अडकाल. हे सर्व बुद्धीचे चाळे आहेत! हे ज्ञान असे आहे, की काहीच विचारावे लागत नाही.

## संक्षिप्त प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** आता दुसरी एक गोष्ट विचारतो, समजा फार लांबलचक प्रतिक्रमण करता येत नसेल, पटापट करता येत नसेल, पण जेव्हा काही चूक होते तेव्हा आत तर कळते की असे बोलायला नको होते, तर त्याला प्रतिक्रमण म्हणता येईल का?

**दादाश्री :** हो, ते प्रतिक्रमण आहे, एवढेच व्हायला हवे. हा आपला आत्ताचा अभिप्राय आहे. अशा तऱ्हेने धुऊन टाकावा.

तसे तर त्याला एक्झॅक्ट(यथार्थ) प्रतिक्रमण म्हणता येणार नाही, पण त्या अभिप्रायापासून तर तो दूर झाला ना?

**प्रश्नकर्ता :** तर मग खरे काय? असे संक्षिप्त प्रतिक्रमण केले तर चालेल का?

**दादाश्री :** त्याला काही हरकत नाही. तिथे प्रतिक्रमण नाही केले तर चालेल. 'असे व्हायला नको' असे वाटले, हे प्रतिक्रमणच आहे. परंतु हे कायमसाठी बरोबर आहे असे म्हटले, तर सगळे जण असे काही तरी विचित्रच करतील. काही ठराविक संयोगात असे घडले तर

हरकत नाही, असे चालेल, हे प्रतिक्रमणच आहे. 'असे व्हायला नको होते' असे वाटणे हे प्रतिक्रमणच आहे. आपला अभिप्राय बदलला ना! कसेही करून अभिप्राय बदलायचा आहे.

## प्रतिक्रमण विरोधी बनू नका

प्रतिक्रमण तर आपल्याला अभिप्राय काढून टाकण्यासाठी करायचे आहे. 'आता आपण त्या मताचे राहिलो नाही. आपण त्या मताच्या विरुद्ध आहोत', असे दर्शविण्यासाठी प्रतिक्रमण करायचे आहे. तुम्हाला समजले का?

**प्रश्नकर्ता :** जे अतिक्रमण झाले त्याचे आम्ही विरोधी आहोत, हे दाखविण्यासाठी प्रतिक्रमण करायचे आहे.

**दादाश्री :** हो, आणि पुन्हा असे करण्याची आपली इच्छा नाही. आपल्या स्वभावातून हे काढून टाकण्यासाठी प्रतिक्रमण करायचे आहे. जर प्रतिक्रमण केले नाही तर आपली ती इच्छा तशीच राहिली आहे, असे म्हणावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** पण आपला तर निकाली भावच आहे ना?

**दादाश्री :** हो, सर्व निकाली भावच आहेत, सर्वच निकाली आहे, पण तुम्हाला ते स्वभावात ठेवायचे असेल तर ठेवा, त्याला काही हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** जर हे निकालीच आहे, तर मग प्रतिक्रमण कशासाठी?

**दादाश्री :** सर्वच निकाली आहेत, केवळ भावच नाही, तर इतर सर्वही निकालीच आहे. प्रतिक्रमण तर, जेवढे अतिक्रमण केले तेवढेच प्रतिक्रमण करायचे असते, जास्त काही नाही. आणि जर तसे केले नाही तर आपला स्वभाव कधीच बदलणार नाही, जसा आहे तसाच राहील. तुम्हाला समजले की नाही?

विरोधी मत जर जाहीर केले नाही, तर मग ते मत तुमच्याजवळच

राहील. क्रोध आला तर तुम्ही क्रोधाच्या बाजूने नाही, यासाठी प्रतिक्रमण करावे लागते. नाही तर क्रोधाच्या बाजूने आहात, असे निश्चित होईल. आणि प्रतिक्रमण केले तर तुम्हाला क्रोध आवडत नाही, हे जाहीर झाले असे म्हणता येईल म्हणजेच तुम्ही त्यातून सुटलात. मुक्त झालात, मग तुमची जबाबदारी कमी झाली. 'तुम्ही त्याचे विरोधी आहात', असे जाहीर करण्यासाठी काही साधन तर असले पाहिजे ना! तुम्हाला क्रोध ठेवायचा आहे, की काढून टाकायचा आहे?

**प्रश्नकर्ता :** तो तर काढूनच टाकायचा आहे.

**दादाश्री :** जर काढून टाकायचा असेल, तर प्रतिक्रमण करा. मग तुम्ही क्रोधाच्या विरोधात आहात. आणि जर तुम्ही प्रतिक्रमण केले नाही तर तुम्ही क्रोधाशी सहमत आहात असे होईल.

**प्रश्नकर्ता :** जे घडायचे ते घडून गेले. मग आम्ही प्रतिक्रमण केले काय किंवा नाही केले काय तरी त्यात काही फरक पडत नाही ना?

**दादाश्री :** हो, चालेल असे आहे, पण आता जर जास्त प्रतिक्रमणे केली, तर जास्त फायदा होईल, बरे का! तुम्हाला चालेल असे करायचे आहे, की जास्त फायदा हवा आहे?

**प्रश्नकर्ता :** करण्यासाठी नाही, मी तर वैज्ञानिक दृष्ट्या विचारत आहे.

**दादाश्री :** सर्व काही निकाली आहे, परंतु जिथे अतिक्रमण होत असेल तिथे आपण विचार करायला हवा. नाही तर आपला स्वभाव आपल्याजवळच राहील. आपण या स्वभावाच्या विरोधी आहोत, आपण त्यात सहमत नाही, असे निश्चित व्हायला हवे.

**प्रश्नकर्ता :** सहमत नाही असे जर निश्चित झाले असेल तर ते प्रतिक्रमण मनातच करायचे असते ना?

**दादाश्री :** हो, मनातच. सर्व काही मनातच करायचे आहे, दुसरे काही करायचे नाही. बोलायचे नाही, आणि तोंडावर सांगायलाही जायचे

नाही. तुम्ही त्याचे विरोधी आहात. तुम्ही जरी प्रतिक्रमण केले नाही पण 'आम्हाला हे आवडत नाही', एवढेच जरी मनात बोललात तरी खूप झाले, तुम्ही त्यापासून वेगळे झालात, तुम्हाला त्या भानगडीत राहायचे नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्ही प्रतिक्रमण केले तर काय याचा अर्थ असा झाला की आम्ही थोडे क्रमिकमध्ये घुसलो?

**दादाश्री :** क्रमिकमध्ये घुसलो यासाठी हे नाही, पण आपण स्वभावाच्या विरोधी आहोत, असे जोपर्यंत निश्चित होत नाही तोपर्यंत स्वभाव आपल्याजवळ तसाच राहील. ही फार सूक्ष्म गोष्ट आहे. जर तुम्हाला समजली तर तुमचे कल्याण होईल. शिवी दिली त्याला हरकत नाही, पण आम्ही शिवी देण्याच्या विरोधात आहोत, असे तर वाटलेच पाहिजे ना आपल्याला?

**प्रश्नकर्ता :** आम्ही प्रतिक्रमण करतो, पण समोरची व्यक्ती तर कर्म बांधतच असते ना?

**दादाश्री :** ते तुम्हाला पाहायचे नाही, तुम्ही मनात बोललात की तुम्ही सुटलात.

## तो सारा व्यवहार निकाली

**प्रश्नकर्ता :** समजा असा एखादा प्रसंग घडला आणि अतिक्रमण करण्याआधीच आमच्या लक्षात आले की हे तर डिस्चार्ज भाव (निर्जरा भाव) आहेत, माझे भाव नाहीत, तर काय हे प्रतिक्रमण नाही?

**दादाश्री :** तुमच्यासारखी जागृती सर्वांना नसते, 'हे माझे भाव नाहीत' अशी जागृती सर्वांना नसते. त्याऐवजी असे सरळ शिकवणे चांगले आहे.

**प्रश्नकर्ता :** हे जे प्रतिक्रमण म्हणतात, ते स्वत:चे भाव आहेत, असे आपण थोडेच मानतो?

**दादाश्री :** नाही, त्यांचे म्हणणे बरोबर आहे की, 'हे भाव माझे

नाहीत', एवढे दाखवण्यासाठीच आपण प्रतिक्रमण म्हणत आहोत. सर्वांना तर 'माझे भाव नाहीत' अशी जागृती नसते ना!

समभावाने निकाल करणे आणि कुणावर अतिक्रमण न करणे, हा सर्व व्यवहार निकाली आहे. अतिक्रमण होता कामा नये, तरीही अतिक्रमण झालेच तर प्रतिक्रमण करा. म्हणजे निकाली व्यवहाराच्या रूपात गाडी चालली.

## प्रतिक्रमण करतो, अतिक्रमण करणारा

आम्ही जेव्हा ज्ञान देतो, त्यानंतरच स्वत:चे दोष दिसू लागतात. तोपर्यंत दुसऱ्यांचे दोष दिसतात पण स्वत:चे दोष मात्र दिसत नाहीत. दुसऱ्यांचे दोष शोधायचे असतील तर शेकडोंनी दिसतील, परंतु स्वत:चे मात्र दोन, तीन दोषच दिसतात, बाकीचे दिसतच नाहीत. आता ज्ञान मिळाल्यानंतर, चांगल्या तऱ्हेने पोषण प्राप्त करून हे रोपटे मोठे झाले की त्वरित सर्व दोष दिसू लागतात. तुम्हाला दररोज काय दिसते? स्वत:चे दोष दिसतात की दुसऱ्यांचे?

**प्रश्नकर्ता :** स्वत:चेच दिसतात.

**दादाश्री :** म्हणजे स्वत:चे दोष दिसतात, मोठे दोष असतील तर त्यांचे प्रतिक्रमण करावे आणि छोटे असतील तरीही प्रतिक्रमण करावे. ज्याने दोष केले त्यानेच प्रतिक्रमण करावे. म्हणजेच 'चंदुलाल'ने प्रतिक्रमण करावे. तुम्ही काहीच करायचे नाही. तुम्ही 'चंदुलाल'ला सांगावे की प्रतिक्रमण कर. आणि इतर दोष तर फक्त पाहिल्यानेच निघून जातील. जे हलक्या प्रकारचे दोष असतात ते फक्त पाहिल्यावर निघून जातील. पण जेव्हा सर्व दोष दिसतील, तेव्हा ते जातील. तेव्हा निर्दोष होईल.

मी तुम्हाला अशी दृष्टी दिली आहे, की तुम्हाला या जगात कुणाचा एकही दोष दिसणार नाही. तुम्हाला कोणी मारले तरीही तुम्हाला त्याचे दोष दिसणार नाहीत. तुम्हाला दोष दिसतात का?

**प्रश्नकर्ता :** स्वत:चे दोष दिसतात.

**दादाश्री :** आणि जर दुसऱ्यांचे दोष दिसले तर तुम्ही त्वरित प्रतिक्रमण करता?

**प्रश्नकर्ता :** हो, दादा.

**दादाश्री :** तुम्हाला कोणावर ॲटॅक (अतिक्रमण) करण्याचा विचार येत नाही. कोणी तुम्हाला शिवी दिली, मारले, किंवा नुकसान केले, तरी त्यांच्यावर कधी ॲटॅक करायचा विचार येत नाही, आणि संपूर्ण जग, साधू-संन्यासी सर्वच, 'काय आहे? काय म्हणालात? मी असे करीन, तसे करीन' असे ॲटॅक करतात.

आणि यांना ॲटॅकचा विचार देखील येत नाही, यांना म्हणतात 'ज्ञानीभक्त.' ज्ञानीभक्त म्हणजे मुक्त झाला.

## दोष कमी झाले तरच ते यथार्थ प्रतिक्रमण

प्रतिक्रमण कशाला म्हणावे, की हलके वाटते, हलकेपण अनुभवास येते. पुन्हा त्याला तसे दोष करताना खूप दुःख होत असते. आणि बाकी ते दोषांचे गुणाकार करतात.

तुम्ही कधी खरे प्रतिक्रमण पाहिले आहे का, एक तरी दोष कमी होईल असे प्रतिक्रमण?

**प्रश्नकर्ता :** नाही, ते इथेच पाहायला मिळाले.

**दादाश्री :** 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' हे एकमेव मोक्षमार्गाचे साधन आहे, अन्य कोणतेही साधन या जगात नाही. दुसरे साधन हेच की ज्ञानी पुरुषांकडून ज्ञान मिळाल्यानंतर हे उपयोगी पडेल. आणि ज्ञान मिळण्याआधी जर प्रतिक्रमण केले असेल तर त्याने दोष मंद झालेले असतात. पण तेव्हा तेवढी प्रतिक्रमणे होत नाहीत, माणसाला तेवढी जागृती राहू शकत नाही.

ज्ञान घेतल्यानंतर आपल्याला आत कळते की 'हा दोष झाला आहे.' दोष कळल्यावरच प्रतिक्रमण होऊ शकते. तोपर्यंत होऊ शकत

नाही ना? ज्ञान घेतल्यानंतर अशी जागृती राहील की अतिक्रमण होताच लगेच तुम्हाला कळेल की 'ही चूक झाली.' आणि चूक कळल्यावर तुम्ही लगेचच प्रतिक्रमण कराल. मग त्याच्या नावाने पद्धतशीर प्रतिक्रमणे होतच राहतील. आणि प्रतिक्रमण केल्याने ते धुतले जाईल. दोष धुतल्यानंतर समोरच्याला वैरभाव राहत नाही. नाही तर आपण जेव्हा त्याला पुन्हा भेटतो तेव्हा त्याच्याबरोबर भेद निर्माण होतो. असे काही घडले की भेद निर्माण होतो की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** कारखान्यात देखील कुणाबरोबर अतिक्रमण झाले आणि त्याचे आपण प्रतिक्रमण केले, तर त्याचे मन आपल्याशी जुळून येते, नाही तर मन दुरावते.

## पाप धुतले जाण्याची प्रतीती

**प्रश्नकर्ता :** आमची पापकर्मे आता आम्ही कशी धुवावीत?

**दादाश्री :** पाप कर्मांचे जितके डाग लागले आहेत, तितकी प्रतिक्रमणे करावी लागतील. डाग जर चिकट असेल, तर त्याला वारंवार धूत राहायचे. वारंवार धूत राहायचे.

**प्रश्नकर्ता :** तो डाग निघाला की नाही, हे कसे कळेल?

**दादाश्री :** ते तर जेव्हा आतून मन स्वच्छ होऊन जाते ना, तेव्हा कळते. चेहऱ्यावर मस्ती येते. तुम्हाला ते कळत नाही का? डाग निघूनच गेला तर कळणार कसे नाही? त्यात काय अडचण आहे? आणि जरी धुतला गेला नाही तरी आपल्याला हरकत नाही. तुम्ही प्रतिक्रमण करत राहा ना! साबण लावत राहा! तुम्ही पाप ओळखता का? खरोखर ओळखता का?

**प्रश्नकर्ता :** दादांच्या आज्ञेचे पालन न करणे म्हणजे पाप?

**दादाश्री :** नाही, असे नाही, त्याला पाप म्हणत नाहीत. समोरच्याला दु:ख झाले तर ते पाप आहे. मग तो कोणताही जीव असो,

मनुष्य असो की जनावर असो, किंवा झाड असो, विनाकारण झाडाची पाने तोडली तर त्यालाही दु:ख होते, म्हणजे ते पाप आहे.

आणि आज्ञांचे पालन करता आले नाही तर तुमचे स्वत:चेच नुकसान होईल. आणि पापकर्म म्हणजे तर इतर कोणाला दु:ख देणे. म्हणून कोणाला किंचितमात्रही दु:ख होणार नाही असे वागावे.

**प्रश्नकर्ता :** मनुष्य आपल्या स्वभावानुसार वागत असेल तर त्यात पुण्य किंवा पाप लागते का?

**दादाश्री :** समोरच्याला दु:ख झाले, तर पाप लागेल. तो स्वभावानुसार वागतो, पण त्याला हे समजायला हवे की माझ्यामुळे समोरच्याला दु:ख होत आहे, म्हणून मी त्याची माफी मागितली पाहिजे की, 'माझा स्वभावच वाकडा आहे ना, म्हणून तुम्हाला दु:ख झाले, त्यासाठी मी माफी मागतो.'

आपण प्रतिक्रमण केले तर ते फार चांगले आहे. आपले कपडे (दोषरूपी डाग) तर स्वच्छ होतील ना? आपल्या कपड्यांमध्ये मळ का राहू द्यायचा? दादांनी असा उत्तम रस्ता दाखवला आहे, तर का स्वच्छ करू नये?

## चूक नाही, तिथे भोगणेही नाही

कोणाला आपल्यामुळे किंचितमात्र दु:ख झाले तर समजावे की ती आपलीच चूक आहे. आपल्या आत परिणाम वर-खाली होतात म्हणून चूक आपलीच आहे, असे कळते. समोरची व्यक्ती भोगत आहे, म्हणून त्याची चूक तर प्रत्यक्षच आहे, परंतु आपण निमित्त बनलो, आपण त्याला रागावलो, म्हणून आपलीही चूक आहे. दादांना का भोगावे लागत नाही? कारण त्यांची एकही चूक उरली नाही. आपल्या चुकीमुळे समोरच्यावर काहीही परिणाम झाला, जर काही उधारी झाली, तर त्वरितच मनातून माफी मागून जमा करून टाकावे. आपली चूक झाली तर उधारी होते पण त्वरितच कॅश-रोख प्रतिक्रमण करून घ्यावे. आणि जर कोणाच्या निमित्ताने आपली चूक झाली तरीही आपण 'आलोचना-

प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' करावे. मन-वचन-कायेने, प्रत्यक्ष दादा भगवानांच्या साक्षीने सतत माफी मागत राहावी.

पावलोपावली जागृती राहायला हवी. आपल्यात 'क्रोध-मान-माया-लोभ' रूपी कषाय आहेत. ते चुका करवितातच आणि उधारी करवितात. परंतु अशा वेळी आपण लगेच, अगदी त्याचक्षणी माफी मागून जमा करून, सर्व स्वच्छ करून टाकावे. हा व्यापार पेंडिंग (बाकी) ठेवायचा नाही, याला अस्सल नकद व्यापार म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** आता ज्या चुका होतात, त्या मागील जन्माच्याच आहेत ना?

**दादाश्री :** मागच्या जन्माच्या पापांमुळेच या चुका होतात. पण या जन्मातही चुका संपवत तर नाही, उलट वाढवतच जातो. चुकांना संपविण्यासाठी चुकीला चूक म्हणून ओळखले पाहिजे, तिचे समर्थन करता कामा नये. याला 'ज्ञानी पुरुषां'ची किल्ली म्हणतात. त्या किल्लीने कोणत्याही प्रकारची कुलपे उघडतात.

जेव्हा स्वत:च्या चुका संपतील तेव्हा काम होईल, किंवा मग ज्ञानी पुरुष तुम्हाला तारतील तेव्हा होईल. ज्ञानी पुरुष तारू शकतात. तुम्ही जर त्यांना म्हटले की 'मला वाचवा' तर ते वाचवतील. त्यासाठी त्यांना 'फी' नको आहे, कारण अमूल्य वस्तूची किती 'फी' द्याल? हा मुळा तर मूल्यवान म्हटला जातो. मुळा तर दहा पैशांचा. म्हणजे बघा मूल्यवान आहे ना? आणि ही तर अमूल्य वस्तू आहे. म्हणून त्याचे मूल्यच नसते. अमूल्य! अमूल्य!! अर्थात त्याची अशी किंमत करता येत नाही.

दोष झाल्याशिवाय राहतच नाही ना! निव्वळ दोषच दोष होत राहतात. आणि ते दोष तुम्हाला दिसत राहतात. दोष दिसला की त्या दोषाचे प्रतिक्रमण करावे, पश्चात्ताप करावे, आणि 'पुन्हा असे करणार नाही', असे प्रत्याख्यान करावे. त्याला 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण म्हणतात. दोष झाल्याबरोबर लगेच त्याला धुवावे. तुम्हाला अशी लगेच धुऊन टाकण्याची इच्छा आहे, की मग बारा महिन्यानंतर?

## म्हणून तर गेले उलट दिशेने

**प्रश्नकर्ता :** जेव्हा क्रमिकचे प्रतिक्रमण करत होतो तेव्हा डोक्यात काही शिरत नव्हते, पण आता इथे हे प्रतिक्रमण करतो तेव्हा हलके-फुलके झाल्यासारखे वाटते.

**दादाश्री :** परंतु ते प्रतिक्रमण तर तुम्ही समजल्याशिवायच करत होता ना! (खरे) प्रतिक्रमण म्हणजे दोष लगेच कमी झाले पाहिजेत, त्याला प्रतिक्रमण म्हणतात. आपण उलट दिशेने गेलो होतो, आणि आता परत फिरलो त्यालाच म्हणतात प्रतिक्रमण. आणि ते तर परत फिरलेच नाहीत, आहेत तिथेच आहेत, उलट आणखी पुढे गेले! मग त्याला प्रतिक्रमण म्हणूच कसे शकतो?

## मागील जन्मांचे प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** आमचे काही मागच्या जन्मांचे हिशोब असतील म्हणूनच आता अतिक्रमण होत असते ना!

**दादाश्री :** हो, म्हणूनच होते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जेव्हा आपण आपल्यासाठी प्रतिक्रमण करतो, तेव्हा ती सारी प्रतिक्रमणे मागच्या जन्माच्या पापांसाठीच असतात?

**दादाश्री :** तो हिशोब तर आम्ही संपवून टाकतो. आता आपले लोक (महात्मा) 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करतात, म्हणून आपले दोष त्वरित निर्मूल होऊन जातात.

## मोठ्या दोषांचे प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** आम्हाला आमचा मोठा दोष दिसला तर त्याचे प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** मुळात प्रतिक्रमण शब्दांच्या रूपात असते. पण ते शब्दांचे जंजाळच आहे ना? जर तसे करता येत नसेल तर म्हणावे, 'हे, दादा भगवान!' किंवा ज्या भगवंताला मानत असाल, त्या भगवंताला

स्मरून म्हणावे, 'माझ्याने ही चूक झाली आहे, या व्यक्तीवर जास्त क्रोध केला, त्याची मी क्षमा मागतो, पश्चात्ताप करतो, आणि पुन्हा असे करणार नाही.' बस, फक्त एवढेच बोललात तरी चालेल.

बाकी शब्दांचे जंजाळ तर फार मोठे आहे. मोठमोठ्या शब्दात सर्व सांगितलेले असते, याचा कधी पार येईल? ते सारे शब्द बोलावे लागतात. याउलट हे तर असे संक्षिप्तमध्येच बोलायचे असते.

## परिणामिक प्रतिक्रमण

समोरच्याची चूक असेल तरीही आपणच माफी मागायची.

**प्रश्नकर्ता :** सर्वां समक्ष, दादांच्या साक्षीने, प्रत्येक व्यक्तीने स्वत:च्या चुकांची माफी मागितली तर?

**दादाश्री :** ती तर, समजा की एक सुरुवात आहे. त्याने धुतले जात नाही. तुम्ही असे प्रतिक्रमण करावे की समोरची व्यक्ती आपणहून तुमच्याशी बोलू लागेल. आता माझ्या हजेरीत सुरुवात करा.

जेव्हा जेव्हा गुंता होत आहे असे वाटेल तेव्हा अवश्य 'दादां'ची आठवण येईल, आणि गुंता होणार नाही. आम्ही तर म्हणतो की तू गुंता करूच नकोस, आणि जर कधी गुंता झालाच तर प्रतिक्रमण कर. गुंता हा शब्द लोकांना सहज समजेल असा आहे. लोक 'सत्य बोला, दया करा, चोरी करू नका,' हे ऐकून, ऐकून तर थकून गेले आहेत.

आत गुंता झाला असेल तर तसेच झोपून जायचे नाही, तर गुंता सोडवायला हवा. शेवटी काहीच मार्ग सापडला नाही, तर भगवंतांजवळ सतत माफी मागत राहावी की, 'ह्यांचाशी गुंता झाला आहे, त्यासाठी मी माफी मागतो', असे केल्याने गुंता सुटेल. 'माफी' हेच सर्वात मोठे शस्त्र आहे. बाकी, दोष तर निरंतर होतच राहतात.

## अहंकार, पाशवी आणि मानवीय

तुम्ही जेव्हा समोरच्याला रागावता, तेव्हा तुमच्या लक्षात असे येत

नाही का की जर तुम्हाला कोणी रागावले तर कसे वाटेल? असे लक्षात ठेवून मगच रागवा.

समोरच्याचाच विचार करून प्रत्येक कार्य करणे, यालाच म्हणतात मानवी अहंकार. आणि फक्त स्वत:चाच विचार करून प्रत्येकांबरोबर वर्तन करणे आणि दुसऱ्यांना त्रास देणे, याला काय म्हणाल?

**प्रश्नकर्ता :** पाशवी अहंकार?

**दादाश्री :** पूर्वी कधी असे केले होते का? नाही?

**प्रश्नकर्ता :** आता ज्ञान घेतल्यानंतर जर असे संयोग उत्पन्न झाले तर काय करावे?

**दादाश्री :** ज्ञान घेतल्यानंतर तर ज्ञान त्याला वेगळे ठेवते. वेगळे राहता आले तर त्याच्यावर काही (परिणाम) होत नाही. तो जर वेगळा राहून सर्व नाटक पाहत राहिला तर मग काहीच हरकत नाही, आणि जर तन्मयाकार झाला, तरीही त्यात तो नाही. म्हणजे तेव्हा जर वेगळेपण राहिले नाही तर नंतर जेव्हा ती फाइल परत येईल तेव्हा वेगळे राहून सही करावी लागेल. ती फाइल परत येईल, जसे सही नसलेले पेपर पुढे जात नाही ना, तसे. परंतु निकाल तर तुम्हालाच करावा लागेल. मी जे म्हणतो ते पूर्णपणे समजले ना?

**प्रश्नकर्ता :** हो, दादाजी.

**दादाश्री :** सही झाली नसेल तर तो पेपर पुन्हा समोर येईल, मग तो पाहून, वाचून समभावाने त्याचा निकाल केला की त्यातून सुटाल.

आता असे कधी होत नाही? तर जेव्हा एखादे कर्म फार चिकट असेल, गाढ कर्म असेल तेव्हाच माणसाकडून चूकभूल होऊन जाते. तेव्हा आपण पश्चात्ताप करतो. चूक झाल्यावर त्याला पश्चात्ताप होतोच ना! पश्चात्ताप केल्याने कर्म हलके होऊन जाते, म्हणजे जेव्हा परत येईल तेव्हा ते इतके नरम झालेले असते की त्या स्थितीत आपण (समभावाने निकाल) करू शकतो. पश्चात्ताप केल्यामुळे असे शक्य होते.

आपण सांगावे, 'चंदुभाई' पश्चात्ताप करा ना, अतिक्रमण का केले? दादांचा नियम काय आहे? अतिक्रमण केले म्हणून तुम्ही प्रतिक्रमण करा. बस! हे सर्व नियमानुसारच आहे ना?

आपले विज्ञान तर प्रत्येक कोपऱ्यातून अगदी नियमानुसारच असते. हे विज्ञान म्हणजे दरअस्सल विज्ञान आहे.

पूर्ण क्रमिक ज्ञान तर भगवंतांनी केवलज्ञानात राहून सांगितले, आणि ते कल्पनेत आले, आणि आपले हे (अक्रम)सुद्धा केवलज्ञानात राहूनच सांगितले आहे, पण ही कल्पनेबाहेरची गोष्ट आहे! त्यामध्ये तर विरोधाभास पाहावयास मिळतो, पण यात नाही.

## चूक दाखवील, त्याला शाबासकी?

कुणी तुमची चूक दाखवली तर तुम्ही त्याला शाबासकी देता का?

**प्रश्नकर्ता :** आता ते तर जसा ज्याचा अहंकार तसे.

**दादाश्री :** अरे, राम तुझी माया! तेव्हा तर काहीच्या काही बोलतो. त्याऐवजी तेव्हा वाटायला हवे की 'जर मला कोणी असे म्हटले तर मी काय करायला हवे?'

**प्रश्नकर्ता :** या बाबतीत तर मी असे समजेन की, 'तू जे केलेस ते बरोबरच आहे.'

**दादाश्री :** नाही, नाही, नाही. कारण आपल्याला आपली खरी चूक समजतच नाही. काही गोष्टींमध्येच समजते की, 'माझ्याकडून ही चूक झाली', पण बाकीच्या गोष्टीत समजत नाही, म्हणून तो उलटेच बोलतो.

कोणी जर असे म्हणाले की, 'चंदुभाई चूक करतात', तर तुम्ही पण चंदुभाईला सांगावे, 'चंदुभाई, तुमच्याकडून चूक झाली असेल म्हणूनच ते असे बोलतात ना? नाही तर विनाकारण कोणी असे बोलेल का?' काही ना काही चूक झालीच असेल, त्याशिवाय कोणी असे बोलत नाही. तर मग आपल्यालाही असे म्हणायला काय हरकत आहे?

'भाऊ, काही तरी चूक असेलच म्हणून ते बोलत आहेत, तर आता त्यासाठी तुम्ही माफी मागा.' आणि जर चंदुभाईने कुणाला दुःख दिले तर आपण चंदुभाईला सांगावे, 'बाबा रे, प्रतिक्रमण कर!', कारण आपल्याला मोक्षाला जायचे आहे. आता वाटेल तसे वागून चालणार नाही.

## अंडरहॅन्डची चूक पाहू नये

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्यांचे दोष दिसत असतील, स्वतःचे दोष दिसत असतील तर काय ते फक्त पाहतच राहावे? काय करावे?

**दादाश्री :** स्वतःचे दोष दिसले तर, काही ठराविक लोकांना सांगावे आणि ठराविक लोकांना सांगू नये. आणि इतर काही व्यक्तींचे दोष दिसले, तर त्याचे प्रतिक्रमण करून ती गोष्ट संपवावी, असे तीन रस्ते आहेत. एक तर दोष दिसले तर प्रतिक्रमण करावे, आणि जर प्रतिक्रमण केले नाही, आणि दोष दिसतच राहिले तर कोणाचे दोष सांगावे, पोलिसांचे, मॅजिस्ट्रेटचे, या सर्वांचे दोष सांगावेत की तुम्ही सर्व असे आहात. परंतु हे जे अंडरहॅन्ड (आश्रित) आहेत, त्यांचे दोष सांगू नयेत. समजले ना?

प्रत्येक गोष्ट चुकांनी भरलेलीच असते. म्हणून चुका तर होतीलच ना? बिन चुकांचा तर कोणीच नसतो. कोणाचीही चूक काढणे, हा मूर्खपणा आहे. तुला चूक काढणे आवडते का?

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्याचा दोष दिसला, ही जी चूक झाली, तर काय त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल?

**दादाश्री :** लोकांचे दोष दिसले, तर ते सोडून द्यावेत. मग त्या पुढे आपण काय करावे की, 'अरेरे, अजूनही तुम्ही दुसऱ्यांचे दोष पाहत आहात?' त्याचे प्रतिक्रमण करा.' याला स्वतःचा दोष पाहिला असे म्हणतात. असे पन्नास झाले तरी फार झाले.

दुसऱ्यांचे दोष पाहण्याचा आपल्याला अधिकारच नाही. म्हणून त्या दोषाबद्दल माफी, क्षमा मागावी, आणि प्रतिक्रमण करावे. दुसऱ्यांचे

दोष पाहाण्याची सवय तर पूर्वीपासूनच होती ना? त्यात नवीन काय आहे? ती सवय एकदम सुटणार नाही. ती तर या प्रतिक्रमणानेच सुटेल. जिथे दोष दिसतात तिथे 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करा. 'शूट ऑन साइट!'

## निश्चय करणे, म्हणजे काय?

**प्रश्नकर्ता :** अजून जशी प्रतिक्रमणे व्हायला हवीत, तशी होत नाहीत.

**दादाश्री :** आपल्याला जे काही करायचे असेल त्याचा आधी निश्चय करावा लागतो.

**प्रश्नकर्ता :** निश्चय करणे म्हणजे त्यात करण्याचा अहंकार तर आलाच ना? मग हे काय आहे, ते जरा समजवा.

**दादाश्री :** हे फक्त बोलण्यासाठीच आहे, फक्त बोलण्यासाठी.

**प्रश्नकर्ता :** महात्म्यांमधील काही लोक असे समजतात की आपल्याला काहीच करायचे नाही, निश्चयसुद्धा करायचा नाही.

**दादाश्री :** पण नाही, मला विचारले तर मी त्यांना सांगेन की अहंकाराशिवाय निश्चय कसा होऊ शकेल? निश्चय म्हणजे काय, तर 'डिसायडेड' पूर्वक (ठरवून) करणे. ठरवून म्हणजे काय? तर हे नाही, आणि 'हे', बस. 'तसे नाही, तर असे असायला हवे.'

आपण अशी 'रॉंग बिलीफ' तर म्हणू शकत नाही ना? पण अशा प्रकारे शब्दात बोलावे लागते, तेव्हाच ती गोष्ट समजेल. नाही तर समजणारच नाही ना! पण असे बोलल्याने समजेल.

## प्रतिक्रमण उशिरा करू शकतो?

**प्रश्नकर्ता :** आतमध्ये उत्पात होतो, तेव्हा त्याचे 'शूट ऑन साइट' निकाल करणे जमत नाही, परंतु संध्याकाळी 10-12 तासानंतर असा विचार येतो, की हे सर्व चुकीचे झाले, तर काय त्याचा निकाल होऊ शकतो? एवढ्या उशिराने केले तरी?

**दादाश्री :** हो, उशिराने का होईना, त्याचे प्रतिक्रमण करायला हवे. चूक झाल्यावर प्रतिक्रमण करावे, की माझ्याकडून ही चूक झाली आहे, आता पुन्हा असे करणार नाही, 'हे दादा भगवान! माझी चूक झाली. आता पुन्हा मी करणार नाही.'

**प्रश्नकर्ता :** स्वरूप ज्ञान घेतल्यानंतर काही कर्म झाले, उदाहरणार्थ, कधी कोणाप्रती अतिक्रमण झाले, तर तेव्हा लगेच 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' होत नाहीत.

**दादाश्री :** कोणत्या कारणाने होत नाहीत?

**प्रश्नकर्ता :** लगेच होत नाहीत.

**दादाश्री :** लगेच झाले नाही तर दोन तासांनी करा. अरे, रात्री करा. रात्री आठवून करा. रात्री आठवून करू शकता ना की, 'आज कोणाबरोबर वाद-विवाद झाला?' असे रात्री करता येत नाही का? अरे, मग आठवड्यानंतर करा. आठवड्यानंतर सर्व एकत्रपणे करा. आठवड्याभरात जेवढी अतिक्रमणे झाली असतील त्या सर्वांचा एकत्रपणे हिशोब करा.

**प्रश्नकर्ता :** परंतु ते लगेच व्हायला हवे ना?

**दादाश्री :** लगेच झाले तर त्यासारखी चांगली गोष्टच नाही, आपल्याकडे तर बहुतेक सर्व शूट ऑन साइटच करतात. (दोष) दिसताच शूट करा. दिसताक्षणीच शूट.

## अजागृतीबद्दल प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** मी जेव्हा दादांचे नाव घेतो, किंवा आरती करतो तेव्हा मन इतरत्र भटकत असते. मग आरतीमध्ये काही वेगळेच गात राहतो, काही ओळी वेगळ्या गायल्या जातात. मनात जे विचार येतात त्यात तन्मयाकार होऊन जातो. मग थोड्या वेळाने त्यातून परत फिरतो.

**दादाश्री :** असे आहे ना, त्या दिवशी तुम्ही प्रतिक्रमण करावे.

विचार आले तर हरकत नाही, जेव्हा विचार येतात तेव्हा आपण 'चंदुलाल'ला पाहू शकतो की 'चंदुलाल'ला विचार येत आहेत', जर असे सर्व पाहता आले तर 'आपण' आणि 'ते' दोन्ही वेगळेच आहेत. पण तेव्हा तुम्ही जरा कमी पडता.

**प्रश्नकर्ता :** तेव्हा तर जागृतीच राहत नाही ना?

**दादाश्री :** तर त्यासाठी प्रतिक्रमण करावे की, 'ही जागृती राहिली नाही त्याचे मी प्रतिक्रमण करतो. दादा भगवान, मला क्षमा करा.'

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करण्याचे फार उशिरा आठवते की या व्यक्तीचे प्रतिक्रमण करायचे होते.

**दादाश्री :** पण आठवण तर येते ना? सत्संगात जास्त बसण्याची गरज आहे. सर्व काही बारकाईने विचारून घ्यावे लागते. हे तर विज्ञान आहे. सर्व काही विचारून घेण्याची गरज आहे.

तुमची इच्छा तर आहे ना, प्रतिक्रमण करण्याची, तरीही होत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** हो, इच्छा तर आहेच ना?

**दादाश्री :** हो, पण प्रॅक्टिस नाही ना? म्हणून प्रथम तुम्हाला त्याची प्रॅक्टिस करावी लागेल. आधी दोन-चार दिवस प्रॅक्टिस करावी लागेल. जर डॉक्टरने आपल्याला सांगितले असेल की, आज उजव्या हाताने जेवू नका, तरीही खाताना उजवा हात पुढे येतोच ना?

**प्रश्नकर्ता :** सतत आमच्या ध्यानात असेल, तर प्रयत्न करावा लागत नाही, सहजच होऊन जाते.

**दादाश्री :** हो, हे सर्व काही सहजच होईल असे आहे. यासाठी काही करावे लागत नाही. ते सर्व मी तुम्हाला करून देईन.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करताना आनंद तर वाटतो, चांगले वाटते. पण अजूनही जेवढे दोष दिसले पाहिजेत तेवढे दिसत नाहीत.

**दादाश्री :** पण आता दिसतील, अजून वेळ लागेल. जेव्हा आवरणे कमी होतील तेव्हा दिसतील. अजून तर सर्व मोठे मोठे(स्थूल)च चालले आहे. पण प्रतिक्रमण केल्यामुळे तुझी आवरणे कमी होतील.

(स्वत:चे) दोष दिसणे ही काही साधी-सोपी गोष्ट नाही. आणि आम्ही तर पूर्णपणे उघड करून देतो, पण त्याची अशी दृष्टी असेल की, 'मला (दोष) पाहायचे आहेत', तर मग त्याला दिसत राहतील. जसे जेवणाच्या ताटातून जेवण करण्यासाठी स्वत:ला हात तर उचलावा लागतो ना? आपोआपच जेवण माझ्या तोंडात जाईल, असे थोडेच होईल? प्रयत्न तर करावेच लागतील ना?

माणसाकडून दोष होणे स्वाभाविक आहे, त्यापासून मुक्त होण्याचा रस्ता कोणता? तर 'प्रतिक्रमण.' आणि तो फक्त ज्ञानी पुरुषच दाखवू शकतात.

## समोरचा बिलकुल अजाण असेल तेव्हा

**प्रश्नकर्ता :** कधी तरी असेही होते की आपल्याला आपली चूक वाटत असते, पण ती चूक समोरच्या व्यक्तीच्या लक्षातच येत नाही, असे होऊ शकते का?

**दादाश्री :** हो, मला तर सर्वांच्या चुका दिसत असतात, पण त्यांना माहीतच नसते.

**प्रश्नकर्ता :** तसे नाही, मला वाटते की माझ्याकडून तुमच्याप्रती काही चूक झाली आहे, पण तुम्हाला असे वाटतच नाही की, 'मी तुमच्याप्रती काही चूक केली आहे', तर मी जो पश्चात्ताप करतो त्याचा काय परिणाम होतो?

**दादाश्री :** हो, जर तुम्ही पश्चात्ताप केला की, 'मी चूक केली आहे' तर तुम्ही सुटलात. मग समोरच्याला ही गोष्ट समजो की न समजो, त्याचा कशाला विचार करायचा?

**प्रश्नकर्ता :** मला वाटले की मी चूक केली आहे.

**दादाश्री :** हो, त्याचे पोस्ट ऑफिस बंद असेल म्हणून काय झाले? आपले पोस्ट ऑफिस तर चालूच आहे ना? आपण उलटा शिक्का मारला. शिक्का उलटा लागला तर आता तो सरळ करायचा.

**प्रश्नकर्ता :** किंवा मग बुद्धीच अशी असेल, की जी थोड्या थोड्या दिवसांनी काही चुका शोधून, ढवळाढवळ करत राहते?

**दादाश्री :** ती काय ढवळाढवळ करते?

**प्रश्नकर्ता :** की, 'ही तुझी चूक झाली आहे, असे तुला करायला नको होते.' अशी ढवळाढवळ करत असते.

**दादाश्री :** हो, मग ती चांगलेच सांगते ना? नाही तर असा सावध करणारा कोण मिळेल?

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी, कदाचित ती चूक झालीही नसेल, तरीही?

**दादाश्री :** नाही, चूक झाली नसेल असे नाही, चूक झालेलीच असते म्हणून तर सांगते, आतून सावध करते. नाहीतर कोण सावध करणार या जगात? कोणीही सावध करत नाही. आत जे ज्ञान ठेवले आहे ना, तेच सावध करते!

## ज्याचा द्वेष गेला, तोच खुदा

आतमध्ये आपोआप प्रतिक्रमणे होत राहतात. लोक विचारतात, आपोआपच प्रतिक्रमणे होतात का? मी सांगतो, 'हो, बघा मी कसे यंत्र ठेवले आहे? त्यामुळे आपोआपच प्रतिक्रमण सुरू होते.' तुमची नीयत स्वच्छ असेल तर सर्व काही तयार असते.

**प्रश्नकर्ता :** हे खरे आहे दादा, प्रतिक्रमणे आपोआपच होतात आणि दुसरे म्हणजे हे विज्ञान असे आहे की अजिबात द्वेष होत नाही.

**दादाश्री :** हो, द्वेष होत नाही.

**प्रश्नकर्ता :** ते तर मोठे आश्चर्यच आहे, दादाजी!

**दादाश्री :** त्यालाच खुदा (परमात्मा) म्हणतात, ज्याला द्वेष नाही, त्याला खुदा म्हणतात.

## असे बोलू नये

**प्रश्नकर्ता :** हे भाऊ म्हणतात की 'माझ्याने प्रतिक्रमण होत नाही', त्याला काय म्हणावे?

**दादाश्री :** आत तर प्रतिक्रमणे होत असतात पण ते लक्षात येत नाही. पण एकदा असे बोलले, की 'माझ्याने होत नाही' की मग ते बंद होते, ती मशीन बंद होते, 'जशी भजना तशी भक्ती.' ते तर आत होतच राहते. काही काळानंतर होते.

**प्रश्नकर्ता :** आमच्यामुळे कुणाला दु:ख झाले तर ते आम्हाला आवडत नाही, बस, एवढेच वाटते, त्याहून पुढे जाता येत नाही. प्रतिक्रमण होत नाही.

**दादाश्री :** हे तर आपण जसे बोलू तशी आत जी मशीन ठेवलेली आहे, ती चालते! जशी भजना तशी भक्ती. तुम्ही म्हटले की, 'माझ्याने हे होत नाही', तर तसे होईल आणि जर तुम्ही म्हटले की, 'माझ्याने खूप प्रतिक्रमणे होतात, की मी अगदी थकून जातो' तर खरेच तो थकून जातो. म्हणजे प्रतिक्रमण करणारा करीत आहे, तुम्ही तुमची गाडी ढकलत राहा ना, नंतर पुढे पुढे पाचशे-पाचशे प्रतिक्रमणे होऊ लागतील. तुम्ही फक्त बोलत राहा की 'माझ्याने प्रतिक्रमणे होतात.'

हे विज्ञान सर्वच दोषांना नष्ट करणारे आहे, वीतराग बनविणारे आहे. मला प्रतिक्रमण करायचेच आहे, असा निश्चय केला तर प्रतिक्रमण होणारच 'नाही होत' म्हटले की मग उलटे होईल. म्हणून 'नाही होत' असे म्हणू नये. होतीलच, का नाही होणार?

## दररोज रात्री प्रतिक्रमण

तुम्हाला प्रतिक्रमणापासून सुटका करून घ्यायची आहे का? ते कसे शक्य आहे? कारण हेच तर मुख्य आहे, हेच तिकीट आहे.

**प्रश्नकर्ता :** उलट असे वाटले पाहिजे की, 'प्रतिक्रमण' कसे जास्त करता येईल?

**दादाश्री :** हो! या जागृतीमुळे होतील. रोजच करावी. दिवसभर असे 'ऑन द मोमेंट' प्रतिक्रमण करावे. त्वरितच होत नसेल तर पूर्ण दिवसाचे (दोष) आठवून, आठवून संध्याकाळी करावीत, 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान.'

'आलोचना'मध्ये दादा भगवानांना सांगावे 'अजून असे असे होत आहे, असे व्हायला नको होते, तरीही झाले आहे, त्याबद्दल मी पश्चात्ताप करतो, आणि आता पुन्हा असे करणार नाही, असा मी निश्चय करतो.'

**प्रश्नकर्ता :** सकाळपासून ते संध्याकाळपर्यंत, दिवसभरात जे जे काही घडले असेल, त्यासंबंधात संध्याकाळी चंदुलालची चांगलीच खबर घेतो की तू चांगले-वाईट काय काय केलेस? त्याचा सारा हिशोब संध्याकाळी कर.

**दादाश्री :** असे आहे, की शक्यतोवर 'शूट ऑन साइट' करावे. दोष दिसल्याबरोबर त्वरित प्रतिक्रमण करावे. आणि जर असे करता आले नाही तर संध्याकाळी एकत्र करावे. पण तसे करताना दोन चार (दोष) राहून जातात, ते तरी कशाला शिल्लक ठेवावे? आणि असे कोण ठेवणार? आपले काम तर 'शूट ऑन साइट'चे आहे ना!

## जन्म लढण्यासाठी नाही

**प्रश्नकर्ता :** दोषांसाठी तर संपूर्ण जागृती राखायची आहे. मग त्याच्या मागे लागावे का?

**दादाश्री :** दोष संपवायचे आहेत. त्यांचा निकाल लावायचा आहे.

**प्रश्नकर्ता :** आपण दोषांचे प्रतिक्रमण करतो, त्यावेळी आत जी प्रक्रिया होते, त्याने दोषांचा निकाल होतो, 'शूट' शब्दाने दोष संपतात का?

**दादाश्री :** 'शूट' शब्द तर गमतीसाठी आहे, 'शूट' मुळे शूरता येते. लोकांनी ऐकले तर तर शूरता येईल ना?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणाच्या प्रकियेने दोषांचा अंत येतो, समाधान करून निपटारा करू शकतो का?

**दादाश्री :** समाधान झाले की मग 'शूट-बीट' करायची आवश्यकता राहत नाही. आपले विज्ञान काय सांगते? तू त्याला मारून आलास, म्हणून प्रतिक्रमण कर. खरे तर, भगवंत काय म्हणतात निपटारा करा, निकाल करा. शेवटपर्यंत लढायचे नाही, हा जन्म लढण्यासाठी नाही. भगवंतांनी 'मार' हा शब्दच लिहू दिला नाही. 'मार' शब्दानेच आत हिंसेची सुरुवात होत असते. म्हणून 'मार' शब्द लिहूच नका, असे ते म्हणाले.

## तेव्हाच आयुष्याचा अंत येतो

**प्रश्नकर्ता :** 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करतात, ते देखील ध्यानाचे परिवर्तनच आहे ना?

**दादाश्री :** हो, ते ध्यानाचेच परिवर्तन आहे.

**प्रश्नकर्ता :** 'शूट' केले म्हणजे त्याने पुद्गलाला नष्ट केले, जे 'व्यवस्थित'मध्ये होते, त्यात ढवळाढवळ केली, तर मग पुढचा जन्म कसा मिळेल?

**दादाश्री :** तो जन्म पण ह्याच्यासारखाच मिळेल. जी लिंक आहे ती तशीच्या तशी येते.

**प्रश्नकर्ता :** जे शूट करून बदलून टाकतात त्यांचे आयुष्य तेवढेच असते की छोटे?

**दादाश्री :** त्याचे आयुष्य इथे संपणार होते, म्हणून त्यावेळी संपण्याचे सर्व 'सरकमस्टेन्शियल एविडन्स' एकत्र येऊन आयुष्य समाप्त होऊन जाते, भोवरा वेगाने फिरतो!

तुझे कसे चालले आहे?

**प्रश्नकर्ता :** पाचशे ते हजार दोष दिसतात.

**दादाश्री :** बघा ना, रोज पाचशे दोष दिसतात. हे जर तू वर्तमानपत्रात लिहिले, तर लोक दुसऱ्याच दिवशी तुझ्या दर्शनासाठी येतील! नाही तर कुणाला स्वतःचे दोष दिसतात का? पाच दोषसुद्धा दिसत नाहीत, मोठमोठ्या आचार्यांनासुद्धा दिसत नाहीत.

आता, आत तुम्हाला स्वतःच्या किती चुका दिसतात?

**प्रश्नकर्ता :** अनेक.

**दादाश्री :** मग? एक जरी चूक दिसली तरी त्याला भगवंत मानतात, मग सर्व दिसल्यावर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** हो, क्षणोक्षणी चुका दिसतात, दादाजी.

**दादाश्री :** हो, क्षणोक्षणी दिसतात आणि क्षणोक्षणी प्रतिक्रमणे करावी लागतात.

## क्रमिकमध्ये एवढी स्पष्टता नसते

'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण होऊ लागतात तेव्हापासूनच त्याला ज्ञानी म्हटले जाते. दोष दिसताच 'शूट आऊट' करतो, त्याला ज्ञानी म्हणतात. क्रमिक मार्गात ज्ञानी 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करतात, परंतु त्यांना अशी स्पष्टता नसते. एवढी सारी स्पष्टता नसते.

## जजमेंट क्लियर

**प्रश्नकर्ता :** आम्ही दोषांचे प्रतिक्रमण तर करतो, पण समोरच्या व्यक्तीचे गुण असतील, तर त्यासाठी काय करावे? त्यासाठी प्रतिक्रमण करावे का?

**दादाश्री :** त्या गुणांमुळे, त्यांच्याशी भावपूर्वकच आपले वर्तन चांगले असते. त्यात मग दुसरे काही करायचे नसते.

जेव्हा कर्मे खूप चिकट असतात व गाठी असतात, तेव्हा मनुष्य चुका करतो. पश्चात्ताप केल्याने त्या गाठी इतक्या सैल होतात, की

पुढील जन्मात त्या सहजपणे धुता येतात. प्रतिक्रमण करूनही दोष शिल्लक तर राहतो, पण किती? तर ती गाठ दिसते पण पुढच्या जन्मात जरासा हात लावल्याबरोबर ती गळून पडते. हे प्रतिक्रमण केल्याने बळ मिळते आणि रिफंड (प्रतिफळ) मिळतोच! अर्थात आत प्रतिक्रमण झाले, तर दोष धुतले जातात. त्याला स्वत:ची चूक दिसायलाच हवी. कोणती चूक झाली हे ऑन द मोमेंट (तत्क्षणी) दिसायला हवे. कारण आपले एवढे जजमेंट तर असतेच. जजमेंट क्लियर (स्पष्ट न्याय) असले पाहिजे. क्लियर जजमेंट असेल तरच काम होईल.

## अहंकाराला झाकतात

जेव्हापासून दोष दिसायला सुरुवात होते, तेव्हापासूनच समजावे की मोक्षाला जाण्याचे तिकीट मिळाले. स्वत:चे दोष कुणालाही दिसत नाहीत, मोठमोठ्या साधू-आचार्यांनाही दिसत नाहीत! स्वत:चे दोष दिसत नाहीत, मुळात हीच सर्वात मोठी उणीव आहे. आणि हे विज्ञान असे आहे की, हे विज्ञानच तुम्हाला निष्पक्षपातीपणे जजमेंट देते. स्वत:चे सर्व दोष उघड करते. दोष झाल्यानंतर का होईना, पण उघड करते ना? आता जे झाले ते झाले, ती वेगळी गोष्ट आहे. गाडीचा वेग जास्त असेल तर अपघात होऊ शकतो ना? मग तेव्हा तरी कळेलच ना?

कुणालाही कळत नाही! या साधू-संन्यासी, आचार्यांना, कुणालाही कळत नाही! दोष झाले हे कळतच नाही. म्हणून 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करत नाहीत. कदाचित त्यांना असे वाटते की थोडा दोष झाला आहे.

खूप भारी दोष झाला असेल, तर मनात त्यांना असे वाटते की हे चुकीचे झाले. पण मग कोणी येऊन त्यांना सांगितले की, 'महाराज तुम्ही या शिष्याशी असे का वागलात?' तेव्हा स्वत:ची चूक झाली आहे हे माहीत असूनसुद्धा ते उलटेच बोलतात. काय बोलतात? तर 'माझा हा शिष्य कसा आहे ते तुम्ही ओळखतच नाही. त्याच्याशी असेच वागणे योग्य आहे', असे म्हणतात. उलट त्याच्याबद्दल वाकडेच बोलतात. जिथे

उंचवटा होता तेथेच खड्डा खणतात! आपला अहंकार जपण्यासाठी असे करतात का कोणी?

**प्रश्नकर्ता :** हो, करतात.

**दादाश्री :** आपला अहंकार जपण्यासाठी सर्व काही करतात, मोठमोठे साधू-आचार्य सगळेच असे करतात. कारण अहंकार तर जपावाच लागतो ना? नाही तर तो कोणाबरोबर झोपेल? कोणाबरोबर झोपावे? सोबत जरी स्त्री नसली तरी अहंकाराला जवळ करून झोपताना आनंद वाटतो ना? अहंकाराला जपून ठेवले नाही तर मग तो झोपेल कोणाबरोबर? म्हणून प्रथम त्यालाच जपतात.



# [ 7 ]
# होतो चोख व्यापार

## व्यापारात प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** आपण जेव्हा कुणाला मानसिक दु:ख देतो, तेव्हा त्याला अन्याय म्हणतात. व्यापारामध्ये माल तर तोच असतो, परंतु जर भाव वाढवले तरच जास्त कमाई होईल, पण आम्ही भाव वाढवल्यामुळे ग्राहकाला दु:ख होते, तर काय त्यामुळे आमचे नुकसान होईल का?

**दादाश्री :** तुम्ही भाव वाढवाल तर त्याला दु:ख होईल. जर भाव वाढवले नाही तर काही हरकत नाही; यात जर तुम्ही कर्ता होऊन केले तर दु:ख होईल, आणि जर 'व्यवस्थित'ला कर्ता समजलात, तर मग तुमची काहीच जबाबदारी नाही. 'व्यवस्थित' कर्ता आहे, हे समजा आणि त्याचा स्वीकार करा. खरोखर तर ती तुमची जबाबदारी नाही. मी तुम्हाला अशा स्टेज (स्थिती) वर आणून बसवले आहे, की तुमची जोखीम संपते, जोखीमेचा शेवट होतो. म्हणजे कर्म करीत असतानाही तुम्हाला अकर्माच्या स्थितीत ठेवले आहे.

तरी पण तुमची इच्छा अशी आहे की 'अशा अकर्म स्थितीवर आणले, पण आम्ही करू शकतो असे तर आहेच! जर तुम्ही कर्ता झालात तर बंधन होईल! हे तर मी ज्यांना ज्ञान देतो त्यांच्यासाठीच आहे, इतर सर्व तर कर्ता आहेतच. माझे ज्ञान समजून, मग पाच आज्ञा समजून घेतल्या तर सुटका होईल.

**प्रश्नकर्ता :** आम्ही कर्ता नाही, परंतु त्या कर्मात आमचा सहभाग असल्यामुळे इतरांना दु:ख होत असते, आमच्या कर्मामुळे.

**दादाश्री :** पण आम्ही म्हणजे कोण? 'चंदुभाई', की 'शुद्धात्मा'?

**प्रश्नकर्ता :** चंदुभाई.

**दादाश्री :** तुम्ही तर शुद्धात्मा आहात ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** मग चंदुभाई कर्ता आहे, त्याच्याशी तुम्हाला काय देणेघेणे? तुम्ही वेगळे, आणि चंदुभाई वेगळे.

**प्रश्नकर्ता :** चंदुभाई कर्ता बनून तन्मयाकार होतो, तेव्हा कळते की समोरच्या पार्टीला दु:ख झाले आहे.

**दादाश्री :** तर मग चंदुभाईला सांगावे की 'भाऊ, माफी माग, असे दु:ख का दिले? तुम्हाला मात्र माफी मागायची गरज नाही. जो अतिक्रमण करतो, त्यानेच प्रतिक्रमण करावे. चंदुभाई अतिक्रमण करतो, म्हणून त्याच्याकडूनच प्रतिक्रमण करून घ्यायचे.'

**प्रश्नकर्ता :** मी साड्या विकायचा धंदा करतो, आसपासच्या दुकानदारांनी जर पाच रुपये भाव वाढवला, तर मी पण पाच रूपयाने भाव वाढवतो, मग याला मी चुकीचा व्यापार केला असे म्हणायचे का? तर या गोष्टीचा माझ्यावर काही परिणाम होईल की नाही?

**दादाश्री :** परंतु तिथे कर्ता कोण आहे?

**प्रश्नकर्ता :** चंदुभाई. साडी विकणारा.

**दादाश्री :** तुम्ही शुद्धात्मा आहात, आणि हे तर चंदुभाई करतो, तर मग 'यू आर नॉट रिस्पॉन्सिबल' (ती तुमची जबाबदारी नाही).

आणि दुसऱ्या तऱ्हेने कुणा व्यक्तीला प्रत्यक्ष दु:ख झाले आहे असे वाटले, तर त्याकरिता तुम्हाला चंदुभाईला सांगावे लागेल की,

'भाऊ, तू जे अतिक्रमण केले आहे, त्याचे आता प्रतिक्रमण कर.' बाकी, मी तुमच्यावर अजिबात जोखीम ठेवलेली नाही, तुमची जोखीम उडवून टाकली आहे.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही चंदुभाईला असे मोकळे सोडले तर तो वाटेल ते करील?

**दादाश्री :** नाही, म्हणूनच मी त्याला 'व्यवस्थित' (सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स) म्हटले आहे की, 'या एका जन्मासाठी एका केसाइतकाही फेरफार करण्याचा अधिकार नाही, 'वन लाईफ' – एका जन्मासाठी, बरे का! ज्या जन्मात मी 'व्यवस्थित' देतो, त्या 'व्यवस्थित'मध्ये फेरफार होऊ शकेल असे नाही. म्हणून तर मी तुम्हाला मोकळीक देतो. अर्थात हे सारे मी (ज्ञानात) 'पाहून' सांगत आहे, आणि त्यामुळे मला ओरडावेही लागत नाही की, 'बायको बरोबर का फिरत होतात? आणि असे का? तसे का? पुढच्या जन्मासाठी नाही, परंतु या जन्मासाठी 'यू आर नॉट रिस्पॉन्सिबल एट ऑल.' (तुम्ही किंचितही जबाबदार नाही) एवढे सारे तर सांगितले आहे.

## हे आहे अक्रम विज्ञान

हे तर विज्ञान आहे. त्वरित मुक्ती देणारे आहे. आणि जर हे विज्ञान समजले तर मेळ बसेल असे आहे. जिथून मेळ बसवाल तिथून मेळ बसेल. आणि जर कोणत्या गोष्टीचा मेळ बसत नसेल तर त्याला विज्ञान म्हणता येणार नाही. मेळ बसवायचा असेल तर बसलाच पाहिजे. कधीच विरोधाभास होता कामा नये. शंभर वर्षे झाली तरी विरोधाभास होणार नाही. त्यालाच म्हणतात सिद्धांत. हा 'अक्रम सिद्धांत' तर बुद्धीला जुमानत नाही. भलभले बुद्धिवंत मुंबईत आले, परंतु कोणालाही जुमानत नाही, कारण ही बुद्धी पलीकडची गोष्ट आहे! बुद्धी तर मर्यादित आहे, आणि अक्रम विज्ञानाला तर मर्यादाच नाही.

## व्याज घ्यावे की घेऊ नये?

**प्रश्नकर्ता :** व्याज घ्यावे की घेऊ नये?

**दादाश्री :** 'चंदुलाल'ला व्याज घ्यायचे असेल तर घेऊ द्या, पण त्याला सांगावे नंतर प्रतिक्रमण कर.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण का करावे? व्याज घेणे हे अतिक्रमण आहे का?

**दादाश्री :** अतिक्रमण केले म्हणून. व्याज घेणे अतिक्रमण केव्हा म्हटले जाईल? तुम्ही जे व्याज घेता, त्यामुळे जर समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले तर त्याला अतिक्रमण म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** शास्त्रामध्ये व्याज घ्यायला मनाई केली आहे, त्यामागे काय हेतू आहे?

**दादाश्री :** व्याजासाठी मनाई याकरिता केली आहे की, व्याज घेणारी व्यक्ती नंतर कसायासारखी होते. म्हणून मनाई केली आहे. ती अहितकारी गोष्ट आहे. तो जर नोबल (मोठ्या मनाचा) राहू शकला तर हरकत नाही.

आदर्श व्यवहाराने आपल्याकडून कोणाला दु:ख होऊ नये, एवढेच पाहायचे आहे. तरीही कुणाला दु:ख झालेच तर त्वरित त्याचे प्रतिक्रमण करावे. मात्र कुणाला दु:ख होईल अशी भाषा आपण बोलू नये. व्यवहारात पैशांची देवाण-घेवाण वगैरे जो व्यवहार आहे, तो तर सामान्य रिवाज आहे, त्याला आम्ही व्यवहार म्हणत नाही. कुणालाही दु:ख होणार नाही असे वागावे, आणि दु:ख झालेच तर प्रतिक्रमण करावे, यालाच आदर्श व्यवहार म्हणतात.

## वसूली करणाऱ्यांचे प्रतिक्रमण करा

या प्रतिक्रमणामुळे समोरच्या व्यक्तीवर परिणाम होतो आणि तो पैसे परत करतो. समोरच्या व्यक्तीत अशी सद्‌बुद्धी उत्पन्न होते, प्रतिक्रमणामुळे असा सुलट परिणाम होतो. पण काही लोक तर वसूली करणाऱ्याच्या घरी जाऊन त्याला शिवीगाळ करतात, त्यामुळे मग त्याचा उलट परिणाम होईल की नाही? खरे तर, लोक गुंतागुंत वाढवीतच राहतात. हे सारे जग परिणाम करणारेच आहे.

**प्रश्नकर्ता :** आम्ही कोणा घेणेदाराचे प्रतिक्रमण केले तरी पण तो पैसे मागतच राहील ना?

**दादाश्री :** मागण्या न मागण्याचा प्रश्न नाही, राग-द्वेष होता कामा नये. कर्ज तर कदाचित राहीलही!

## काळ्या बाजाराचेही प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** सध्या टॅक्स (कर) एवढे जास्त आहेत, की चोरी केल्याशिवाय मोठमोठ्या व्यापाराचे संतुलन राहत नाही. सर्वच लाच मागतात, मग त्यासाठी चोरी तर करावी लागते ना?

**दादाश्री :** चोरी करा, पण तुम्हाला पश्चात्ताप होतो की नाही? पश्चात्ताप झाला तरी हलके होऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** तर मग या परिस्थितीत काय करावे?

**दादाश्री :** तुम्ही जाणता की हे चुकीचे होत आहे, म्हणून तुम्ही हृदयपूर्वक पश्चात्ताप करा. खेद झाला तरच सुटता येईल. आता जर काळाबाजाराचा माल आणला तर तो काळाबाजारातच विकावा लागतो. मग चंदुलालला सांगा, की प्रतिक्रमण कर. यापूर्वी तुम्ही प्रतिक्रमण करत नव्हता, म्हणून तर कर्मांचे तलाव भरत होते, आता प्रतिक्रमण करून सर्व स्वच्छ करून टाकावे. लोभ कोणत्या निमित्ताने होतो? लोखंड काळ्या बाजारात जाऊन विकले, तर चंदुलालला सांगावे, 'चंदुलाल, तुम्ही विकता त्यात हरकत नाही, ते 'व्यवस्थित'च्या आधीन आहे, पण आता त्याचे प्रतिक्रमण करा.' आणि म्हणावे पुन्हा असे होता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** कित्येक ठिकाणी लोक उपाशी मरतात, आणि दुसरीकडे मी काळ्या बाजारात पैसे कमावतो, तर याचा समभावाने निकाल कसा होऊ शकतो?

**दादाश्री :** ते जे करत आहेत ना, ते ठीकच आहे. प्रकृती जे करते ना, तो कॉजचा इफेक्ट (कारणाचा परिणाम)च आहे. नंतर आपल्या लक्षात येते की, 'हे न्यायपूर्वक झाले नाही', म्हणून आपण 'चंदुभाई'ला

सांगावे की असे करू नकोस. माफी मागावी की पुन्हा कधी असे करणार नाही. तो असे म्हणेलही पण मग परत तसेच करील. कारण प्रकृतीमध्ये तसे विणलेलेच आहे ना! नंतर 'आपण' ते धूत राहायचे.

## चोरीचेही प्रतिक्रमण

लोकांची तुला चीड येते का?

**प्रश्नकर्ता :** घरामध्ये कुणाचे दोष दिसले की चीड येते.

**दादाश्री :** चंदुलालला चीड येते ना?

**प्रश्नकर्ता :** हो, चंदुलाललाच ना.

**दादाश्री :** आणि 'तुला'? 'तुला' चीड येत नाही?

**प्रश्नकर्ता :** चीडही त्यालाच येते, आणि भोगणेही त्यालाच येते.

**दादाश्री :** ज्याला चीड येते, त्याला भोगावे लागतेच. मग तुझे किती नुकसान झाले?

**प्रश्नकर्ता :** खूप जास्त नुकसान झाले.

**दादाश्री :** असे होय? लोकांना मारण्याचे भाव तर होत नाहीत ना? लोकांकडून पैसे ओरबाडून घेण्याचे भाव तर होत नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** नाही, असे तर होत नाही.

**दादाश्री :** लोकांचे काही चोरण्याचे भाव होतात का?

**प्रश्नकर्ता :** लोकांची चोरी, ती कशी?

**दादाश्री :** माल विकायचा, आणि वजन जास्त लिहायचे.

**प्रश्नकर्ता :** तसे थोडे फार होत असते.

**दादाश्री :** अजूनही असे होत आहे? मग तू प्रतिक्रमण करतोस का?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण कधी होते, कधी होत नाही.

**दादाश्री :** सगळीकडे लक्ष असले पाहिजे ना? शंभर किलो ऐवजी 101 किलो लिहिले, तर एका किलोची चोरी केली ना?

**प्रश्नकर्ता :** त्याचे प्रतिक्रमण केल्याने काय होईल?

**दादाश्री :** प्रतिक्रमण केल्याने आपण त्या अभिप्रायात नाही. असा अभिप्राय आज नाही. आज तर ते जास्त फोर्सने (धक्क्याने) होत आहे. आज तुझा चोरी करण्याचा अभिप्राय आहे का?

**प्रश्नकर्ता :** अजिबात नाही.

**दादाश्री :** म्हणून जर प्रतिक्रमण केले तर समजावे की आज त्याचा तसा अभिप्राय नाही. हे पूर्वीच्या फोर्समुळे होत आहे.

**प्रश्नकर्ता :** यामुळे त्याचे पुढील जन्माचे कर्मफळ बदलून जाईल का?

**दादाश्री :** नाही. याच जन्मात समाप्त झाले असे म्हटले जाईल. जगातील लोकांचा चोरी करण्याचा अभिप्राय असतो, आणि 'असे तर करावेच लागते' असे म्हणून त्या अभिप्रायाला ते आणखी मजबूत करतात. आणि तुला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** असे होता कामा नये, असे वाटते.

**दादाश्री :** म्हणजे तू उत्तरेकडे जात आहे आणि लोक दक्षिणेकडे जात आहेत. हे तर चंदुलालचे मागील जन्माचे स्वरूप दिसत आहे. त्या हिशोबाने ते किती भयंकर होते? मागील स्वरूप कसे होते?

**प्रश्नकर्ता :** फार भयंकर, प्रतिक्रमण केल्यानंतरही दोष सतत दिसतच असतील तेव्हा काय करावे?

**दादाश्री :** त्याचे वारंवार प्रतिक्रमण करावे. किंवा मग सर्व दोषांचे एकत्र-सामूहिक प्रतिक्रमण करावे. पंधरा मिनिटे दोष दिसत राहतील, नंतर सर्व दोषांचे एकत्र प्रतिक्रमण करावे.

लोक म्हणतात, 'आम्ही भेसळ करू आणि भगवंतांकडे माफी

मागू.' पण माफी देणारा तर कोणीच नाही. तुम्हालाच माफी मागायची आहे आणि तुम्हालाच माफी द्यायचीही आहे.

## अनीतीचे खूप खूप प्रतिक्रमण

कोणी म्हणेल, 'मला धर्म नको, मला भौतिक सुखे पाहिजेत', तर मी त्याला सांगेन, 'प्रामाणिक राहा, आणि नीतीचे पालन करा.' मी त्यांना देवळात जायला सांगणार नाही. तुम्ही दुसऱ्यांना देता तोच देवधर्म आहे, पण दुसऱ्यांचे बिन हक्काचे घेत नाही, तो मानव धर्म आहे. प्रामाणिकता हा सर्वात मोठा धर्म आहे. 'डिसऑनेस्टी इज द बेस्ट फूलिशनेस' (अप्रामाणिकता हा सर्वात मोठा मूर्खपणा आहे)!!! मी प्रामाणिक होऊ शकत नाही, मग काय मी समुद्रात उडी टाकू? माझे दादाजी असे शिकवतात की अप्रामाणिक झालास तर त्यासाठी तू प्रतिक्रमण कर. त्याने तुझा पुढचा जन्म उज्जवल होईल. अप्रामाणिकतेला अप्रामाणिकता म्हणून ओळख आणि त्यासाठी पश्चात्ताप कर. पश्चात्ताप करणारा माणूस प्रामाणिक आहे, हे नक्की.

दान देतात, अनीतीने पैसे कमावतात, असे सर्वच आहे. त्याचा उपाय सांगितला की अनीतीने पैसे कमावले तर रात्री चंदुलालला सांगावे 'तू सतत प्रतिक्रमण कर', 'अनीतीने का कमावलेस? म्हणून प्रतिक्रमण कर.' त्याच्याकडून दररोज चारशे-पाचशे प्रतिक्रमणे करवून घ्यावीत. स्वतः करायचे नाही, चंदुलालकडून करवून घ्यावीत. जो अतिक्रमण करतो, त्याच्याकडून प्रतिक्रमण करून घ्यावे.

जर भागीदाराबरोबर मतभेद झाले, तर लगेच तुम्हाला जाणीव होईल की 'हे गरजेपेक्षा जास्त बोलले गेले.' म्हणून ताबडतोब त्याच्या नावाने प्रतिक्रमण करावे. तुमचे प्रतिक्रमण कॅश पेमेंटवाले (रोख) असायला हवे. आपली ही बँक पण कॅश आणि पेमेंट पण कॅश आहे.

## काय केल्याने अंतराय संपतील?

ऑफिसमध्ये परमिट घ्यायला गेलात, पण साहेबाने ती दिली नाही, तर मनात वाटते की, 'साहेब नालायक आहे, असा आहे, तसा

आहे.' आता त्याचे फळ काय येईल? हे त्याला माहीत नाही. म्हणून प्रतिक्रमण करून मनातील हे भाव बदलून टाकावे. यालाच आम्ही जागृती म्हणतो.

या संसारात अंतराय कसे पडतात ते मी तुम्हाला समजावतो. तुम्ही ज्या ऑफिसमध्ये नोकरी करता, तिथे तुम्ही असिस्टन्ट (सहायक) ला बेअक्कल म्हटले तर तुमच्या अकलेवर अंतराय पडेल. बोला आता, अशा तऱ्हेने संपूर्ण जगाने अंतरायात अडकूनच हा मनुष्य जन्म गमावून टाकला आहे! समोरच्या व्यक्तीला बेअक्कल म्हणण्याचा तुम्हाला अधिकारच नाही. तुम्ही असे बोललात तर समोरचाही उलट बोलेल. त्यामुळे त्यालाही अंतराय पडेल. बोला आता, या अंतरायांपासून जग कसे सुटेल? तुम्ही कुणाला नालायक म्हणता, तेव्हा तुमच्या लायकीवर अंतराय पडतो! तुम्ही जर त्याचे लगेचच प्रतिक्रमण केले तर तो अंतराय पडण्या अगोदरच धुतला जातो.

## अंडरहॅन्डवर रागावण्याबद्दलचे प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** नोकरीचे कर्तव्य पाळताना मी खूप कठोरपणे लोकांचे अपमान केले होते, त्यांना धुत्कारले होते.

**दादाश्री :** त्या सर्वांसाठी प्रतिक्रमण करावे. त्यात तुमचा उद्देश खराब नव्हता. तुमच्या स्वत:साठी नव्हता, याला तर सरकारशी सिन्सियारिटी (प्रामाणिकता) म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** त्या हिशोबाने मी खूप वाईट माणूस होतो, किती तरी लोकांना दु:ख झाले असेल ना?

**दादाश्री :** त्यासाठी तुम्ही एकत्र प्रतिक्रमण करावे की, माझ्या या कडक स्वभावामुळे जे जे दोष झाले त्यासाठी मी क्षमा मागतो. वेगवेगळे करण्याची गरज नाही.

**प्रश्नकर्ता :** *जाथु* (एकत्र) प्रतिक्रमण करायचे का?

**दादाश्री :** हो, तुम्ही अशा प्रकारे करावे की सरकारी काम

करताना माझ्या स्वभावामुळे जे-जे दोष झाले, लोकांना दुखावले, गेले, त्यासाठी मी क्षमा मागतो. असे रोज बोलावे.

## रागवा, परंतु...

**प्रश्नकर्ता :** एक अधिकारी असेल, बॉस असेल, तो जर आपल्या अंडरहॅन्डला रागावला तर त्याला दुःख होणारच ना? कर्मचारी जर काही चुकीचे करत असेल, तर त्याला रागावणे हे अधिकाऱ्याचे कर्तव्यच आहे ना?

**दादाश्री :** असे आहे, की रागावणे ही फार मोठी जबाबदारी आहे. रागावणे म्हणजे आपला हात भाजणार नाही आणि सेमोरच्याला लागणार नाही, अशा प्रकारे रागावले पाहिजे. लोक असा विचारच करत नाहीत, आणि सरळ खरडपट्टी काढतात. रागावणारा फार मोठा गुन्हेगार ठरतो. ज्याला रागावलो त्याचे जे व्हायचे ते होईल, पण रागावणारा तर फसलाच ना!

**प्रश्नकर्ता :** त्याचे जे कर्तव्य आहे, त्या कर्तव्यापोटी त्याला अशी काही पावले उचलावी लागतात. मग तो तरी काय करेल? गत्यंतरच नाही ना? त्याला हे करावेच लागते.

**दादाश्री :** नाही, ते करा, पण त्यासाठी असा काही उपाय शोधा, की जेणेकरून समोरच्यावर जास्त परिणाम होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** दुसरे काय शोधणार? तो जर काम करत नसेल, तर त्याला रागवावे तर लागेलच ना?

**दादाश्री :** परंतु मोजून-मापून रागवता की न मोजताच? लोक असे मोजून रागावतात का? असे पावशेर मोजून रागवतात का? नाही ना? मग असे करणे योग्य आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही, ते तर न मोजताच करतात, परंतु त्याचे असे आहे की जिथे नोकरी करतात तिथे तर हे ठरलेलेच असते की एखादा माणूस नीट काम करत नसेल तर त्याच्या विरुद्ध अशी पावले उचलावीत. असे कोड (नियम) ठरलेलेच असतात.

**दादाश्री :** नियमानुसार कार्यवाही करण्यात काही हरकत नाही, परंतु ते सर्व ऑन पेपर करावे. आणि तुम्ही तर प्रत्यक्ष त्याच्या तोंडावर रागावता, मग तेव्हा मोजमाप ठेवता का? की असेच रागावता?

**प्रश्नकर्ता :** परंतु दादाजी, तो जर काम करत नसेल, आपण त्याला काम दिले आणि तो त्या कामाची टाळाटाळ करत असेल, तर त्याला रागावावेच लागतेच ना?

**दादाश्री :** हो, रागवा ना.

**प्रश्नकर्ता :** कधी तरी रागवावे लागते, नाही तर त्याला नोकरीतून काढून टाकावे लागते. डिसमीस करावे लागते. मग आम्हाला दु:ख वाटते की त्याची मुले उपाशी मरतील.

**दादाश्री :** पण असे आहे की, तुम्ही त्याला इशारा देऊन सांगावे की, 'भाऊ, तुला नोकरीतून काढून टाकावे लागेल, डिसमीस करावे लागेल, तेव्हा आता तू सावध हो आणि काम कर.'

**प्रश्नकर्ता :** असा इशारा आम्ही देतो की 'तू काम करत नाहीस, तुझे काम संतोषजनक नाही. तुला डिसमीस करण्यात येईल', असे सर्व लिहून देतो.

**दादाश्री :** मग?

**प्रश्नकर्ता :** तरीही तो सुधारत नाही, म्हणून त्याला नोकरीतून काढून टाकावे लागते. आणि काढून टाकल्यावर त्याची मुले दु:खी होऊन रडत रडत माझ्या घरी येतात. आम्हाला दु:ख होते, आणि त्यांनाही दु:ख तर होतेच ना?

**दादाश्री :** दु:ख बंद करायचे असेल, तर मग राहू द्यावे. तुम्ही स्वत:च काम करून घ्यावे.

**प्रश्नकर्ता :** आम्ही जर कार्यवाही केली नाही तर आम्हाला आमच्या वरिष्ठांची (बॉसची) बोलणी खावी लागतात.

**दादाश्री :** मग करा ना कार्यवाही! पण कार्यवाही याप्रमाणे करा की 'तुम्ही तर शुद्धात्मा आहात,' आणि 'चंदुभाई कार्यवाही करत आहे.' मग त्यात जोखीम राहणार नाही. चंदुभाई तर डिस्चार्ज आहे, म्हणून त्याने कार्यवाही केली तर तुमची जोखीम राहणार नाही. आपण चंदुभाईला सांगावे की, 'शक्यतोवर कार्यवाही करायची नाही, असे काही करू नकोस. आणि तरी पण त्याने कार्यवाही केली तर ठीक आहे.'

**प्रश्नकर्ता :** तुमचे म्हणणे बरोबर आहे. आम्ही अलिप्त राहून कार्यवाही केली, पण त्यामुळे जर त्या व्यक्तीचे मन दुखावले तर त्यावर प्रतिक्रमणाऐवजी दुसरा कोणता मार्ग आहे का?

**दादाश्री :** केवळ प्रतिक्रमणच, दुसरे काही करायचे नाही.

## पश्चात्ताप करावा, निमित्त बनल्याबद्दल

**प्रश्नकर्ता :** आज आम्ही नोकरी करतो आणि आमच्या हाताखाली असणाऱ्या व्यक्तीने चूक केली तर त्याला शिक्षा करावी लागते, कारण नोकरीत आम्ही अशा पदावर आहोत.

**दादाश्री :** नाही, पण असे काही घडले तर घडल्यानंतर तुम्ही चंदुभाईकडून पश्चात्ताप करून घ्यावे, की जे करण्यायोग्य नाही ते करावे लागत आहे. आपल्या निमित्ताने, त्याला दुःख झाले, त्याबद्दल पश्चात्ताप करावा की हे काम माझ्या वाट्याला का आले? आपण असे निमित्त बनता कामा नये. पण सध्या तुम्ही त्या पदावर आहात म्हणून तसे केल्याशिवाय चालत नाही, म्हणून तुम्हाला आता 'रूटीन' (रोजची) सर्व कामे तर करावी लागणारच.

## यात तर ज्याचा गुन्हा, त्याला शिक्षा

**प्रश्नकर्ता :** मी 'डी.एस.पी.'चा 'पी.ए.' आहे. मला कित्येक लोकांना डिसमिस करावे लागते, तर त्याचे मला दुःख वाटते. तर त्यात बंधन आहे का?

**दादाश्री :** कित्येक वेळा असेही घडते की, तुम्ही वर लिहून

पाठवता की या माणसाला डिसमिस करा, आणि तो डिसमिस होत नाही, असे घडते का कधी?

**प्रश्नकर्ता :** हो, घडते ना?

**दादाश्री :** म्हणजे 'तुम्ही डिसमिस करता' ते पण तुमचे रूटीन आहे, आणि मनात जर असे भाव असतील की त्याला डिसमिस करायचा नाही, तर मग बंधन नाही. हे तर ज्याचा जेवढा गुन्हा असेल तेवढी शिक्षा त्याला मिळते, असा नियमच आहे. ते नाकारता येत नाही. तेव्हा तुम्ही असा भाव करावा की त्याला दु:ख होऊ नये, बाकी रूटीन कामे तर होतच राहतील.

## भाव बदलल्यामुळे जोखीम टळेल

फाशी देणाऱ्या व्यक्तीला जर ज्ञान दिलेले असेल आणि फाशी देण्याचे काम त्याच्या वाट्याला आले, परंतु जर त्याने भाव बदलले तर त्याला कसलेही बंधन होणार नाही. याउलट ज्याचे भाव असे असतील की, 'याला फासावर चढवायचे आहे' तर त्याला बंधन होईल. मग जरी त्याने त्याला फासावर चढवले नाही, तरीही बंधन आहे. म्हणजे भावच मुख्य गोष्ट आहे. भाव बदलले ना, मग त्याला तुरुंगात टाकले तरी तो पुण्य बांधेल, असे आहे हे जग. स्वत:च्या भावाची समज असली पाहिजे.

## कर्तव्य निभावा 'ज्ञानात' राहून

**प्रश्नकर्ता :** आम्ही कुणाच्या गुन्ह्यांचे रिपोर्ट केले तर, आम्हाला गुन्हा लागेल की नाही?

**दादाश्री :** नाही, काही होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** माझ्या हाताखाली काम करणारा माणूस बरोबर काम करत नसेल किंवा घोटाळा करत असेल, आणि ही गोष्ट जर मी माझ्या साहेबांना सांगितली, तर काय मला कर्मबंधन होईल?

**दादाश्री :** नाही, कर्मबंधन होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** आणि जर ही गोष्ट मी साहेबांना कळवली नाही तर आमचे सर्व तंत्र बिघडून जाईल.

**दादाश्री :** म्हणजे वरच्या साहेबांना सांगावेच लागेल, पण विनयपूर्वक सांगावे. तुम्ही त्यांना सर्व नीट समजावून सांगितले पाहिजे, रुबाबाने नाही.

**प्रश्नकर्ता :** बाहेर व्यवहारामध्ये हे कसे शक्य आहे?

**दादाश्री :** तुम्ही तर तसा भाव ठेवावा. नंतर 'जे घडले ते करेक्ट.' असा तुमचा भाव असावा आणि त्यांना समजावून सांगणे गरजेचे आहे, जेवढ्या वेळा समजावून सांगता आले तेवढे करेक्ट, आणि समजावून सांगता आले नाही तरीही करेक्ट.

**प्रश्नकर्ता :** जर कोणी अहंकाराने आडमुठेपणा करत असेल आणि आमच्याजवळ त्याला शिक्षा करण्याची सत्ता नसेल, अशावेळी आम्ही आमच्या उच्च अधिकाऱ्याकडे त्याला शिक्षा व्हावी असा रिपोर्ट करतो. आता शिक्षा तर त्या उच्च अधिकाऱ्यांनी दिली पण रिपोर्ट तर मी केला, म्हणून निमित्त तर मीच बनलो ना?

**दादाश्री :** नाही, पण तुमच्या मनात तसा भाव नाही ना! हे तर चंदुभाई करत आहे, मग त्यात तुम्ही काय करणार? चंदुभाई जे करतो ते पाहात राहावे. जग तर चालतच राहील. त्यासाठी कोणत्याही प्रकारची भीती बाळगू नये. मनात असा भाव ठेवावा की, 'माझ्यामुळे कोणत्याही जीवाला किंचितमात्र दु:ख होऊ नये.' मग तुम्ही आपले रूटीन काम करत राहावे. जे रूटीन आहे, त्यात तुम्ही हस्तक्षेप करू नये. किंवा शंका-कुशंकाही करू नये. तुम्ही तुमच्या स्वरूपात राहावे. बाकी, कर्तव्य तर पार पाडावेच लागेल ना?

## शेवटी, उपायामध्ये प्रतिक्रमण

आतापर्यंत फसगत झाली पण आता तुम्ही ही कला शिकलात ना? लोक काय म्हणतात, 'विंचू चावला तर चावू द्यावा!' अरे, पण

शक्ती आहे का? 'शक्ती नसेल तरी पण विंचवाला चावू देतो, हीच ज्ञानीची निशाणी आहे.' असे लोक म्हणतात. अहो, पण आत शक्ती नसेल तर विंचवाला एका बाजूला ठेवा ना? विंचू असो की विंचवाचा बाप असो, त्याला एका बाजूला सारा ना? हो, त्याला मारू नका.

**प्रश्नकर्ता :** खरोखर असे ज्ञानी असतात का की जे विंचवाला चावू देतात?

**दादाश्री :** लोक असे म्हणतात की 'ज्ञानी असाल तर विंचवाला चावू द्याल.'

**प्रश्नकर्ता :** तो तर अहंकारच म्हणायचा ना?

**दादाश्री :** हा सारा अहंकारच आहे ना!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे विंचू आपल्याला सोडत नसेल तर त्याला ओढून काढावा, पण मरणार नाही अशा प्रकारे त्याला ओढून काढावा?

**दादाश्री :** हो, आणि तरी पण तो मेला तर प्रतिक्रमण करावे, हाच त्यावर उपाय आहे.

**प्रश्नकर्ता :** तसा मारून टाकण्याचा हेतू नाही.

**दादाश्री :** तसा हेतू नाही, पण कधी असे झालेच तर काय करावे? त्यावर उपाय तर असला पाहिजे ना? विंचवाला चावू देण्याची शक्ती तर आत नाही, आणि मग मनात 'हाय, हाय, हाय' करत राहण्यापेक्षा आधीच सावध राहा ना, सर्व उपाय आहेत. आपल्याजवळ तर हे पूर्ण अक्रम विज्ञान आहे.

**प्रश्नकर्ता :** हे तर सर्व प्रॅक्टिकल झाले ना दादाजी?

**दादाश्री :** हो, प्रॅक्टिकलच आहे.



# [ 8 ]
# अशी तुटते श्रृंखला ऋणानुबंधांची

## ऋणानुबंधातून कसे सुटावे?

**प्रश्नकर्ता :** पूर्व जन्माच्या ऋणानुबंधातून सुटण्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** ज्याच्याबरोबर आपले पूर्वीचे ऋणानुबंध असतील आणि ती व्यक्ती जर आपल्याला आवडतच नसेल, त्याच्याबरोबर राहणे आवडतच नसेल, पण तरी नाइलाजाने सोबत राहावे लागत असेल, तर अशा प्रसंगी काय करावे? त्याच्याबरोबर बाहेरचा व्यवहार तर ठेवायला हवा पण आतमध्ये सतत त्याच्या नावाने प्रतिक्रमण करावे, कारण आपण मागील जन्मात अतिक्रमण केले होते, त्याचा हा परिणाम आहे. कोणते कॉजेस केले होते? तर मागच्या जन्मी त्याच्याबरोबर अतिक्रमण केले होते. त्या अतिक्रमणाचे ह्या जन्मात फळ आले आहे. म्हणून आता त्यासाठी प्रतिक्रमण केले तर प्लस-मायनस (वजा-बेरीज) होऊन जाईल. म्हणजे आतून तुम्ही त्याची माफी मागा. सतत माफी मागतच राहा की, 'मी जे जे दोष केले त्याबद्दल माफी मागतो' कोणत्याही भगवंताच्या साक्षीने माफी मागून घ्या, तर ते सर्व संपून जाईल.

त्याचा सहवास आवडत नसेल तर काय होईल? त्याच्याकडे खूप दोषी दृष्टीने पाहिल्यामुळे, म्हणजे एखाद्या पुरुषाला स्त्री आवडत नसेल

तर तो सतत तिला दोषीच पाहतो, आणि त्यामुळे तिरस्कार निर्माण होतो आणि मग त्याला त्या स्त्रीची भीती वाटत राहते. आपल्याला ज्याच्याबद्दल तिरस्कार असेल ना, त्याची आपल्याला भीती वाटते. त्याला पाहिल्याबरोबरच घाबरायला होते. असे झाले तर समजावे की हा तिरस्कार आहे. म्हणून त्या तिरस्कारातून सुटण्यासाठी सतत माफी मागतच राहा, असे केल्याने दोनच दिवसात तिरस्कार बंद होऊन जाईल. त्या व्यक्तीला समजणार नाही, पण तुम्ही आत त्या व्यक्तीची सतत माफी मागत राहा, ज्यांच्याप्रती जे जे दोष झाले असतील, त्यांच्या नावाने, 'हे भगवंता! मी क्षमा मागत आहे', असे म्हणत राहा. हा दोषांचा परिणाम आहे. तुम्ही कोणत्याही व्यक्तीप्रती जे जे दोष केले असतील, त्यासाठी त्याच्या आत बसलेल्या भगवंताकडे सतत माफी मागत राहा, तर ते सर्व दोष धुतले जातील.

## नातेवाईकांसाठी प्रतिक्रमण

हे सर्व (रिलेटिव्ह) संबंध तर नाटक आहे. नाटकातील बायको-मुलांना कायमसाठी आपले करून घेतले तर चालेल का? हो, नाटकात बोलतात तसे बोलण्यात हरकत नाही, 'हा माझा मोठा मुलगा, शतायु' पण सर्व वरकरणी, नाटकी. या सर्वांना खरे मानले यासाठीच प्रतिक्रमण करावे लागते. जर खरे मानले नसते तर प्रतिक्रमण करावे लागले नसते. जिथे खरे मानले गेले, तिथे राग-द्वेष सुरू होतात. आणि प्रतिक्रमणानेच मोक्ष आहे. हे 'दादा' दाखवतात त्या 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' यानेच मोक्ष आहे.

**प्रश्नकर्ता :** कधी कधी मन दु:खी होते की त्यांनीही ज्ञान घेतले आहे, आणि आम्हीही घेतले आहे, मग असे का होते?

**दादाश्री :** हे तर सारे कर्मांचे उदय आहेत, म्हणून आपण प्रतिक्रमण करावे. कर्मांचे उदय असल्यामुळे धक्का लागल्याशिवाय राहत नाही. त्यांची तशी इच्छा नसते, तरीही सर्व कर्मांचे धक्के लागत राहतात. कर्मे भोगल्याशिवाय गत्यंतरच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** मला असे वाटते की त्यांचे चांगलेच करावे, परंतु माझ्याकडून बिघडूनच जाते. आणि मी चुकीची ठरते.

**दादाश्री :** पण त्यात काय अडचण आहे? जे झाले ते करेक्ट. ज्याला चांगले करायचे आहे, त्याला भीती बाळगण्याची गरजच नाही. आणि ज्याला वाईट करायचे आहे, त्याने कितीही भीती बाळगली, तरी काही फायदा होणार नाही. म्हणून आपण चांगलेच करायचे आहे असा निश्चय करावा.

**प्रश्नकर्ता :** पूर्वी मला खूप भीती वाटायची पण आता वाटत नाही.

**दादाश्री :** पण असे सर्व बोलण्याची गरजच नाही. ते जरी वाईट वाटल्यामुळे घरातून निघून गेले असतील, तरी दुसऱ्या दिवशी ते जेव्हा घरी येतील तेव्हा खुश होतील. आपण प्रतिक्रमण करावे.

हे सारे रिलेटिव्ह संबंध आहेत, रियल संबंध नाहीत. प्रतिक्रमण केले नाही तर ते तुटतात. प्रतिक्रमणाचा अर्थ काय? तर 'जोडणे.' समोरची व्यक्ती फाडते आणि आपण शिवले तर ते कापड टिकेल. पण समोरच्याने फाडले आणि आपणही फाडले तर काय उरेल?

**प्रश्नकर्ता :** माझे पती माझ्यापासून वेगळे राहतात, मुलांनाही सोबत घेऊन गेले आहेत. तर माझ्या कर्मात तसे होते म्हणूनच असे झाले ना?

**दादाश्री :** निश्चितच, दुसरे काय? नवीन तर काही होत नाही ना? त्याचे प्रतिक्रमण केले नाहीत म्हणून असे झाले. प्रतिक्रमण केल्यामुळे (अहंकार) परत फिरतो.

## चुकवायचे आहेत केवळ हिशोबच

पूर्ण जग म्हणजे हिशोबच आहे, आणि हिशोब चुकते करण्यासाठी आपल्याकडे 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' आहेत. अन्य ठिकाणी लोकांकडे हिशोब चुकवण्याचे कोणतेही साधन नाही, आपल्याजवळ

साधन आहे, 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान.' तुम्ही आता थोडेफार चुकते करायला लागला आहात ना? हिशोबच चुकते करायचे आहेत ना? आणखी काय?

कुणाच्या हातात त्रास देण्याचीही सत्ता नाही, आणि कुणाच्या हातात सहन करण्याचीही सत्ता नाही. हे सर्व तर पुतळेच आहेत, तेच सारे काम करत आहेत. आपण प्रतिक्रमण करतो त्यामुळे हे पुतळे आपोआपच सरळ होऊन जातात. कितीही वेडा माणूस असेल तरी तो आपल्या (दादाश्रींनी सांगितलेल्या) प्रतिक्रमणाने शहाणा होऊ शकतो.

## प्रतिक्रमणाचा प्रतिसाद निश्चित

दोन्ही बाजूचे नुकसान होऊ न देणे तेच ज्ञान आहे. आणि जरी दोन्ही बाजूचे नुकसान झाले, तरी पण मनात त्याचे प्रतिक्रमण केले तर दोन्हीकडचे नुकसान होणार नाही. दोन्हीकडचे नुकसान होऊ देऊ नये.

**प्रश्नकर्ता :** परंतु प्रतिक्रमण केल्यावर माफी तर मिळेल ना?

**दादाश्री :** प्रतिक्रमण तर आपण दोष झाल्याबद्दल करतो. दोष झाला नसेल तर प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. मग त्याच्या बरोबरचा आपला हिशोब संपला. जर काही उलटे झाले नसेल तर काही देणेघेणे नाही. जशी जशी प्रतिक्रमणे होत जातील, तसे तसे त्या लोकांबरोबरचे सारे काही हलके होत जाईल. त्या लोकांबरोबरचे संबंध अगदी क्लियर होतील.

समजा एका माणसाबरोबर तुमचे अजिबात पटत नसेल, तर त्या माणसासाठी तुम्ही दिवसभर प्रतिक्रमण केले, दोन-चार दिवस सतत प्रतिक्रमण केलेत तर पाचव्या दिवशी तो तुम्हाला शोधत शोधत इथे येईल. तुमच्या अतिक्रमणाच्या दोषामुळेच हे सर्व अडलेले आहे.

प्रतिक्रमण तर कोणीही करत नाही. ही शहाणी माणसे काय प्रतिक्रमण करतील? ते म्हणतील, 'दोष तर त्याचा आहे, मग मी कशाला प्रतिक्रमण करू? समोरच्याला विचारले की, 'भाऊ, तुम्ही काय करणार?'

तर तोही म्हणेल 'दोष त्याचा आहे, मग मी कशाला प्रतिक्रमण करू?' झाले तर! ह्या हिंदुस्तान आणि पाकिस्तानमध्ये बॉम्बार्डिंग चालूच राहू द्या ना!

## ते आहेत आपलेच परिणाम

**प्रश्नकर्ता :** कोणी आपले अहित करत आहे असे आपल्याला कळल्यावर हा परिणाम आहे असे समजून जे होत असेल ते पाहत व जाणत राहावे, की रात्री झोपताना प्रतिक्रमण करावे, की मग प्रत्यक्ष भेटून रोख प्रतिक्रमण करावे?

**दादाश्री :** अहित करीत असेल तर त्यासाठी अज्ञानीकडे कोणता उपाय आहे? तो त्याच्याशी भांडतो, शिवी देतो, मारतो. अज्ञानी दुसरा कोणता उपाय करणार? हेच उपाय करणार ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** शिवीगाळ केली, भांडाभांड केली म्हणून काय अहित बंद होत नाही. ते तर जेवढे हिशोब घेऊन आले असतील तसे होईलच आणि शिवाय हे सर्व जे केले, त्यामुळे पुढील जन्मासाठी पुंजी जमा केली. पुढच्या जन्मासाठी शिदोरी बांधली. आपण अशी शिदोरी बांधत नाही. आपण तर जो अहित करत असेल त्याला पाहत आणि जाणत राहायचे. तो जे अहित करीत आहे, तो तर माझ्या कर्मांचा परिणाम आला आहे. जसे विहीर आपल्याला 'चोर' म्हणाली तर काय विहीर आपले अहित करीत आहे असे म्हणायचे का? नाही, हा तर आपला परिणाम आला, कारण ती लगेचच करते ना? म्हणून आपल्याला कळते की हा त्याचा परिणाम आला, नाही तर कळलेच नसते. म्हणून त्याचे प्रतिक्रमण करण्याची गरजच नाही. कारण तो अहित करीत आहे. जर आपण कोणाचे अहित करत असू तर मात्र आपल्याला प्रतिक्रमण करावे लागते. समोरचा अहित करीत असेल तर आपल्याला प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. निवांतपणे पाहत राहावे.

कोणी आपले हित केले तर तोही आपला परिणाम आहे, आणि

कोणी अहित केले तर तोही आपलाच परिणाम आहे. जगातील लोक या दोन्ही ठिकाणी वेगळे वर्तन करतात. हित करणाऱ्यावर राग, आणि अहित करणाऱ्यावर द्वेष करतात. 'तुम्ही माझे सर्व बिघडविले, असे केले, तसे केले' असे म्हणतात पण तसे काही नसतेच. हे दोन्हीही राग-द्वेषाचे परिणाम आहेत. हित-अहित करणारा कोणी नाहीच. हा तर तुमचाच प्रतिध्वनी आहे, दुसरा कोणी नाहीच. यात बाहेरून कोणी कसा येईल?

## अपमान केला, त्याचेही प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा मला खूप वाईट वाटते, की मी इतके सर्व करतो, तरी पण हा माझा अपमान करतो.

**दादाश्री :** आपण त्याचे प्रतिक्रमण करावे. हा तर व्यवहार आहे, यात सर्व प्रकारचे लोक असतात. ते आपल्याला मोक्षाला जाऊ देत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** त्याचे प्रतिक्रमण आम्ही का करावे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण यासाठी करायचे की 'हा माझ्याच कर्माचा उदय होता, आणि त्यामुळे त्याला असे कर्म बांधावे लागले, त्याचे मी प्रतिक्रमण करतो, आणि पुन्हा मी असे करणार नाही की जेणेकरून माझ्या निमित्ताने कोणाला कर्म बांधावे लागेल.'

हे जग कोणाला सहजासहजी मोक्षाला जाऊ देईल असे नाही. सर्व बाजूने आकडे (हुक) परत संसारात खेचूनच आणतात. परंतु जर आपण प्रतिक्रमण केले तर ते आकडे सुटतील. म्हणून महावीर भगवंतांनी 'आलोचना-प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान' या तिन्ही गोष्टी, (प्रतिक्रमण) या एकाच शब्दात दिल्या आहेत, दुसरा कोणता मार्गच नाही. पण स्वत: प्रतिक्रमण केव्हा करू शकेल? जेव्हा स्वत:ला जागृती असेल तेव्हाच. ज्ञानी पुरुषांकडून ज्ञान प्राप्त झाल्यावर जागृती उत्पन्न होते. आपण प्रतिक्रमण करून घ्यावे, म्हणजे आपण जबाबदारीतून सुटतो.

## विश्वास परत मिळवता येतो का?

**प्रश्नकर्ता :** एखाद्या माणसावरचा आमचा विश्वास उठला असेल, त्याने आमचा विश्वासघात केला म्हणून त्याच्यावर आमचा विश्वास राहिला नसेल. तर तो विश्वास परत मिळविण्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** तुम्ही त्याच्यासाठी जे काही वाईट विचार केले असतील, त्याबद्दल पश्चात्ताप करायला हवा. विश्वास उठल्यावर तुम्ही जे जे वाईट विचार केले त्यासाठी पश्चात्ताप करावा लागतो, त्यानंतर सर्व नीट होईल. अर्थात प्रतिक्रमण करावे लागते.

## वारंवार प्रतिक्रमण कशासाठी?

**प्रश्नकर्ता :** सर्व एक्स्पर्ट (हुशार) स्त्रिया गोळा झाल्या आहेत आणि त्या एकमेकांशी कपट करत असतात. पण नंतर लगेच मनात प्रतिक्रमण करतात आणि प्रत्यक्ष माफी पण मागतात. एकमेकांबरोबर समोरासमोर कपट केले जाते, पण मग लगेच त्यांना कळते की 'ही चूक झाली.' आणि हे भाऊ तर म्हणतात, अशी चूक होताच कामा नये.

**दादाश्री :** नाही, असे चालत नाही. असा नवीन कायदा कुठून घेऊन आलात? इथे तर नो लॉ लॉ. इथे कायदाच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** एकदा खरे प्रतिक्रमण केले, तर ती चूक दुसऱ्यांदा व्हायला नकोच ना.

**दादाश्री :** नाही, असे म्हणू शकत नाही. कित्येक दोषांचे तर पन्नास-पन्नास, शंभर-शंभर थर असतात.

**प्रश्नकर्ता :** परंतु असे कुठले जोरदार प्रतिक्रमण नाही का की ज्याने ते सर्व थर एकदमच निघून जातील?

**दादाश्री :** नाही, असे शक्य नाही.

**प्रश्नकर्ता :** अक्रम प्रतिक्रमण करवून घ्या ना?

**दादाश्री :** असे दोन्ही हातांनी खाऊ शकत नाही, एकाच हाताने खावे लागते. हे सर्व तर प्रमाणात असलेलेच बरे. खूप दिवसापासून ताप येत असेल म्हणून काय एकाच दिवसात बाटलीतले सर्व औषध पिऊन टाकले तर चालेल का?

**प्रश्नकर्ता :** नाही चालणार.

**दादाश्री :** त्यामुळे मग उलटेच होईल. सर्व काही प्रमाणातच शोभून दिसते, नाही तर ते सर्व नष्ट होईल.

## ही आहे दुधातून मीठ काढण्याची प्रक्रिया

दादांच्या कृपेने सर्व काही ठीक होईल. आता ही नवीन गोष्ट जोडून घ्या की अखेर आपण जाणतो की हे दूध बिघडणार आहे आणि सकाळी या दुधाचा चहा बनू शकणार नाही, तर मग आपण त्या दुधातून मीठ काढून टाकण्याची प्रक्रिया केली पाहिजे, टाकलेले मीठ काढून टाकावे. हो... आपले विज्ञानच असे आहे, की ते मीठ काढून टाकते. नंतर मलमपट्टी करून पुन्हा सर्व नीट करून घ्यावे. रक्तस्त्राव थांबवावा. त्यानंतर काही उलट झाले आणि ते तुम्हाला कळले तर मग तुम्ही ते सोडून द्यावे. उलट झालेले कळतेच ना!

**प्रश्नकर्ता :** हो कळते.

**दादाश्री :** तर मग तुम्ही सोडून द्यावे. नंतर त्याची मलमपट्टीच करत राहावी. मग रक्त येणे थांबेल. पण मग पुन्हा कधी त्यांनी बोलावले की तुम्ही या, तर तुम्ही तिथे जावे. आणि तेव्हा जर रक्त आले तर मात्र ती गोष्ट लांबत जाईल.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे असे घडते की, जर त्या व्यक्तीचे ऑपरेशन करायला गेलो तर अन्य पंचवीस लोकांना त्यामुळे त्रास होतो.

**दादाश्री :** हो, जर असे घडून चुकले आहे तर आता जपून काम करावे. त्याला विवेक म्हणतात. खरी वस्तू पण विवेकपूर्वक द्यावी लागते, ती थोबाडीत मारून देता येत नाही. चांगले खाणेसुद्धा थोबाडीत मारून

देऊ नये. कारण सर्वांचे व्होटिंग आहे ना? खेड्यातील लोक असतील तर तिथे चालते, ते लोक हार्टिली असतात, म्हणून तुमचे खपून जाते. शहरात मात्र असे चालत नाही, शहरात असे जमणार नाही.

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे.

**दादाश्री :** खेड्यात हार्टिली असतात म्हणून तिथे सर्व चालून जाते. कुठे बिघडत आहे हे शोधून काढावे, की असे होता कामा नये, याची खबरदारी घ्यावी.

## त्याची पद्धत जमली पाहिजे

**प्रश्नकर्ता :** मी तुम्हाला त्याच उणीवेबद्दल विचारणार होतो की जेव्हा एखाद्याची बिलीफ (मान्यता) तुटते त्यावेळी त्याचा अहंकार दुखावला जातो का?

**दादाश्री :** आपल्याला जर बिलीफ तोडता येत नसेल, आणि त्याला दु:ख होत असेल तर बिलीफ तोडू नये.

मी बिलीफच तोडत असतो ना? 'की नाही, तुम्ही चंदुभाई नाहीत.' चंदुभाई तुम्ही नाहीच. म्हणजे असे करत करत त्याची किती तरी जन्मांची सर्वात मोठी बिलीफ फ्रॅक्चर होत जाते. एक्झॅक्टनेस असला पाहिजे, नाही तर त्याला खूप दु:ख होईल. भगवंतांबद्दल जी बिलीफ आहे ती मी तोडत असतो. म्हणजे मी जर त्याला असे सांगितले की 'भगवंत नाही' तर मी मेलोच समजा! म्हणून नीट समजावता यायला हवे की कशा प्रकारे नाही आणि कशा प्रकारे आहे. शिवाय कोणासाठी भगवंत आहे आणि कोणासाठी नाही, हे सर्व मी नीट सविस्तर समजावून सांगतो. त्याच्या मनाला किंचितही दु:ख होता कामा नये. आपले एकही हत्यार त्याला लागता कामा नये. आपले हत्यार आपल्याला लागले तरी त्याला मात्र लागून चालणार नाही, हे तू नीट समजून घे.

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे.

**दादाश्री :** त्याला ऑपरेशन म्हणतात, थोडी फार कमतरता असेल

तर ती दूर करावी. नव्याने क्षमापना करून घ्यावी. समोरच्या व्यक्तीला किंचितमात्र दुःख होऊ नये. असे ध्येयपूर्वक जीवन असायला हवे.

आपण दुःख देण्यासाठी आलो नाही, आपले ध्येय आहे आपल्यामुळे इतरांना सुख होवो, पण दुःख मात्र कोणालाही होऊ नये. म्हणजे समज नसल्यामुळे, आपल्या चुकीमुळेच समोरच्याला दुःख होत असते. 'त्याच्या चुकीमुळे त्याला दुःख होत आहे' असेही आपल्याला वाटू नये. त्याच्या चुकीमुळे, म्हणजे तो तर चुकीचा आहेच, त्याला तुम्ही सुधारू इच्छिता तर त्याला दुःखी न करताच सुधारावे.

## पाहताच अभाव झाला तर...

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा एखाद्या व्यक्तीला पाहून, त्याचे वर्तन पाहून अभाव होतो.

**दादाश्री :** ती तर आपली पूर्वीची सवयच आहे ना, त्या सवयीचा धक्का आजही लागत राहतो! परंतु तिथे आपले ज्ञान हजर ठेवावे. सवय तर पूर्वीची आहे म्हणून समोर येत राहणार. पण असे करत करत आपल्या ज्ञानाचा उपयोग कराल, तर हळूहळू सर्व स्थिर होत जाईल. सवयी तर संपल्याच पाहिजेत ना?

**प्रश्नकर्ता :** प्रश्न असा आहे की काही ठराविक लोकांबद्दलच तिरस्कार वृत्ती, किंवा असे काही का होत असते?

**दादाश्री :** पूर्वीचा हिशोब असेल तरच येईल ना? परंतु आज त्याच्याशी काही देणेघेणे नाही! आपण त्याचा शुद्धात्माच पाहतो. पूर्वी तर त्याच्या बाहेरच्या पॅकिंगवर (शरीरावर) तिरस्कार होत होता, पॅकिंगबरोबर हिशोब होते, पण आज त्याच्या पॅकिंगशी आपल्याला काहीच देणेघेणे नाही. त्याच्या पॅकिंगचे फळ त्याला मिळेल. पूर्वी तर आम्ही असेच समजत होतो की, 'हाच चंदुलाल आहे' आणि म्हणून आपल्याला तिरस्कार होत होता.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे अभाव अभिप्रायाच्या आधारावर असतो ना?

**दादाश्री :** असे सर्व अभिप्राय केले होते, त्याच्या फलस्वरूप हा अभाव होत असतो. त्यासाठी आपण 'प्रतिक्रमण' करून अभिप्राय बदलून टाकावा की नाही, 'तो तर फार चांगला आहे', मग तो आपल्याला चांगला दिसेल.

**प्रश्नकर्ता :** अभिप्रायाचे प्रतिक्रमण करावे की प्रत्याख्यान?

**दादाश्री :** प्रतिक्रमण करावे. कोणासाठी चुकीचा अभिप्राय बनला असेल, तर तो बदलून, 'तो तर खूप चांगला आहे' असा चांगला अभिप्राय बनवावा. जो वाईट वाटतो, त्याला आपण चांगला आहे असे म्हटले की अभिप्राय बदलतो. पूर्वीच्या अभिप्रायामुळे आज तो आपल्याला वाईट वाटतो. कोणीही वाईट नसतोच. स्वतःच्या मनालाच हे सांगावे. अभिप्राय मनाने बनवले होते. मनाजवळ ही जमापुंजी आहे. आम्ही जितके अभिप्राय देतो ते सर्व धुऊन टाकतो.

**प्रश्नकर्ता :** धुण्यासाठी कोणते साधन आहे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण. ज्यांना हे अक्रम विज्ञान प्राप्त झाले असेल आणि आत्मा-अनात्म्याचे भेदज्ञान झाले असेल त्यांना नवीन कर्मबंधन होत नाही. अभिप्रायांचे प्रतिक्रमण झाले नाही तर समोरच्यावर त्याचा परिणाम होत राहतो, म्हणून त्याचे तुमच्याबद्दल चांगले भाव होत नाहीत, शुद्ध भावाने राहिले तर एकही कर्म बांधले जाणार नाही, आणि जर प्रतिक्रमण केले तर झालेला परिणाम पण राहणार नाही. साताने गुणले होते त्याला साताने भागले, तोच पुरुषार्थ.

म्हणजे तुमच्या मनाची छाया त्याच्यावर पडत असते. जशी आमच्या मनाची छाया सगळ्यांवर पडते ना! जरी चक्रम असला तरी तो शहाणा होतो; 'मगनभाई आवडत नाही' असे जर तुमच्या मनात असेल तर तो समोर आल्यावर तुम्हाला आवडत नाही, आणि तो फोटो त्याच्यावर पडतो. त्याच्या आत त्वरित फोटो पडतो (त्याला जाणवते) की 'तुमच्या मनात काय चालले आहे? तुमच्यामधील परिणाम त्याला गोंधळात टाकतात, स्पष्टपणे त्याला समजत नाही पण गोंधळ निर्माण

होतो. म्हणून आपण अभिप्राय तोडून टाकावेत. आपले सर्व अभिप्राय आपण धुऊन टाकावे म्हणजे आपण सुटलो. आणि मग आपले मन बदलते.

कित्येक लोकांची वाणी खूप बिघडलेली असते, याचे कारण पण अभिप्रायच आहे. म्हणजे जे अभिप्राय भरले गेले आहे त्यामुळेच हा गोंधळ आहे. जर अभिप्रायच ठेवला नाही तर काहीच गोंधळ नाही.

**प्रश्नकर्ता :** परंतु जर अजूनही तिरस्कार होत असेल तर आम्ही गुन्हेगार आहोत का?

**दादाश्री :** नाही, गुन्हेगार नाही, 'पाहिले व जाणले' म्हणजे खूप झाले की, 'हा जेव्हा समोर येतो, तेव्हा त्याच्यासाठी तिरस्कार होतो, आणि तो समोर येतो, तेव्हा आनंद वाटतो.'

**प्रश्नकर्ता :** तर त्यासाठी प्रतिक्रमण करावे लागेल का?

**दादाश्री :** समोरच्याला दु:ख झाले तर प्रतिक्रमण करावे. बाकी, विचार तर येतात आणि जातात, त्याचे प्रतिक्रमण करायची गरज नाही. त्यासाठी तर एवढेच करायचे की, 'असे होता कामा नये' एवढेच जरी बोललात, तरी खूप झाले. प्रतिक्रमण तर जेव्हा कधी क्रोध झाला असेल आणि त्यामुळे कोणी दुखावला गेला असेल तर आपण प्रतिक्रमण करावे.

**प्रश्नकर्ता :** परंतु जर मनात असा विचार आला असेल तर प्रतिक्रमण करायला नको का?

**दादाश्री :** असे सर्व तर चालायचेच. घुसतानाही वेगाने घुसते आणि निघतानाही वेगाने निघते.



# [ ९ ]
# निर्लेपता, अभावापासून फाशीपर्यंत

## असे कळून येतेच

**प्रश्नकर्ता :** समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले आहे हे कसे कळेल?

**दादाश्री :** ते तर त्याचा चेहरा पाहूनच कळते. त्याच्या चेहऱ्यावरचे हास्य गायब होते. चेहरा उतरतो. त्यामुळे लगेच कळते ना, की समोरच्यावर परिणाम झाला आहे. असे लक्षात येत नाही का?

**प्रश्नकर्ता :** हो, लक्षात येते.

**दादाश्री :** समोरच्यावर काय परिणाम झाला आहे ते समजण्याऐवढी शक्ती तर माणसात असतेच.

**प्रश्नकर्ता :** परंतु कित्येक असे हुशार असतात, की ते चेहऱ्यावर काहीच एक्स्प्रेशन (हावभाव) येऊ देत नाहीत.

**दादाश्री :** तरीही तुम्हाला जाणीव असतेच की माझे शब्द कठोर निघालेत, म्हणून त्याला ते जिव्हारी लागलेच असतील. असे समजून तुम्ही प्रतिक्रमण करून घ्यावे. असे कठोर शब्द निघाले म्हणून त्याला जिव्हारी लागलेच असतील, हे तुम्हाला कळेलच ना?

**प्रश्नकर्ता :** हो, कळेल.

**दादाश्री :** आणि तेसुद्धा (प्रतिक्रमण) त्याच्यासाठी करायचे नाही. परंतु आता त्यात तुमचा अभिप्राय नाही, त्या अभिप्रायापासून वेगळे होण्यासाठी आहे. प्रतिक्रमण म्हणजे काय? तर पूर्वीच्या अभिप्रायाशी तुम्ही आता सहमत नाही. आणि प्रतिक्रमण केल्याने तुमच्या बोलण्यामुळे समोरच्यावर होणारा परिणाम होत नाही, अजिबात होत नाही. मनात ठाम ठरवा की 'मला समभावाने निकाल करायचाच आहे.' त्यामुळे समोरच्यावर त्याचा परिणाम होतो आणि त्याचे मन सुधारते. याउलट तुम्ही जर मनात असे ठरवले की 'मी त्याचे असे करीन, तसे करीन', तर त्याच्या मनातही तशीच प्रतिक्रिया होते.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा आहे की आपण प्रतिक्रमण करत राहावे, आणि हळूहळू आपल्या सर्व सवयी मोडतील.

**दादाश्री :** प्रतिक्रमणामुळे सर्व काही निघून जाते.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणामागे जेवढा जोरदार भाव असेल तेवढा...

**दादाश्री :** नाही, अगदी मनापासून व्हायला हवे. भावपूर्वक असावे, मग जरी शब्द नीट बोलता आले, नाही आले तरी चालेल, पण अगदी मनापासून असावे.

## जिथे प्रकृतीचे दिवाळे निघाले आहे, तिथे

**दादाश्री :** त्याच्या बाबतीत जर कोणी हस्तक्षेप केला तर तो त्याला 'तू बेअक्कल आहेस, तू असे करतोस', असे सर्व सुनावतो, तेव्हाच त्याला बरे वाटते. मग रात्रभर निवांत झोप लागते.

**प्रश्नकर्ता :** असे का होत असेल?

**दादाश्री :** त्याचा अहंकारच असा आहे की बघा, मी याची कशी खरडपट्टी काढली? याचा त्याला आनंद वाटतो. पूर्वी तुम्ही सुद्धा रागवायचे ना?

**प्रश्नकर्ता :** परंतु मी सर्वांसाठी खूप प्रतिक्रमणे केली.

**दादाश्री :** तेव्हा सर्व सुरळीत झाले.

**प्रश्नकर्ता :** त्याच्याकडून प्रतिक्रमण का होत नाही?

**दादाश्री :** त्याच्याने प्रतिक्रमण सुरूच होणार नाही ना!

**प्रश्नकर्ता :** का नाही होणार?

**दादाश्री :** कारण अजून तर तो 'दिवाळखोर' अवस्थेतच आहे, कर्ज कमी झालेलेच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** कसले कर्ज, कोणत्या प्रकारचे कर्ज?

**दादाश्री :** त्याचे दिवाळे निघाले आहे, तुमच्याकडून तर प्रतिक्रमण होऊ शकत होते. आणि त्याचे अंतिम डिग्रीचे दिवाळे निघाले आहे, पहिला नंबरच आहे, म्हणून असे चालते (!)

**प्रश्नकर्ता :** नंतर अशी स्थिती येते की (स्वत:चे) दोष दिसू लागतात, दोष होतात परंतु जोपर्यंत प्रतिक्रमण होत नाहीत तोपर्यंत चैनच पडत नाही.

**दादाश्री :** तिथपर्यंत पोहोचायला तर अजून खूप वेळ लागेल. कारण जबरदस्त दिवाळे निघाले आहे. कुणाला दु:ख द्यायचे बाकी ठेवले नाही. जो कोणी भेटला त्याला दु:खच दिले आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दु:ख दिल्याने दिवाळे निघते?

**दादाश्री :** नाही तर काय? दिवाळेच निघेल ना?

**प्रश्नकर्ता :** काय काय केल्याने दिवाळे निघते?

**दादाश्री :** सगळ्यांनाच दु:ख दिले, असे सर्व केल्याने दिवाळे निघते. त्याने कोणाला सोडलेच नाही ना, मग आई-वडील असो किंवा कोणीही असो, सर्वांनाच दु:ख दिले. पूर्वजन्मी लबाड लोकांच्या टोळीत सामील झाला होता, किती तरी जन्मांपासून असेच चालत राहिले आहे, म्हणून त्याला हेच बरे वाटते ना?

**प्रश्नकर्ता :** पण आता बरे वाटत नाही.

**दादाश्री :** किती तरी कर्मे भरली होती. तुम्ही त्याची उंची पाहिली का? आणि शरीर असे दबलेले, गाठीवाले असते, कर्मे जर जास्त असतील तर शरीर छोटे असते, अरुंद असते.

**प्रश्नकर्ता :** मग आता त्याने कोणता उपाय करावा? प्रतिक्रमणे होत नसतील तर मग आणखी काय करावे?

**दादाश्री :** काही वेळेसाठी प्रतिक्रमण केले तरी तो हळूहळू पुढे जाईल.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणाशिवाय दुसरा कोणताच उपाय नाही का?

**दादाश्री :** आता जरी परिणामकारक वाटत नसेल, तरी सतत करत राहिल्याने नंतर परिणामकारक होत जाईल.

**प्रश्नकर्ता :** कधी ना कधी नक्कीच असे होईल.

**दादाश्री :** (दोष) संपविण्याचा वेगही तेवढाच आहे.

**प्रश्नकर्ता :** जर बालपणापासूनच असे असेल, तर याचा अर्थ असा आहे की मागील जन्मी त्याने असे भाव केले होते?

**दादाश्री :** मागील जन्मी त्याने रुबाब दाखविण्याचे भाव केले होते. लोकांना धमकावण्याचे, घाबरवण्याचे, असे सर्व भाव केले होते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दुसऱ्यांना घाबरवणे, हा तर किती मोठा दोष म्हणायला हवा ना?

**दादाश्री :** ते तर जेव्हा स्वत:वर बेतेल तेव्हा कळेल. जेव्हा कोणी तुम्हाला घाबरवतो तेव्हा कळते की, 'ओहोहो, हे लोक असे करतात!' मग तुम्हीही जेव्हा तसेच करता, तेव्हा तुम्हाला कळत नाही का?

## दु:ख दिल्याबद्दलचे प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** 'माझ्यामुळे त्याला दु:ख होईल असे मला काहीच

करायचे नाही, तरीही त्याला दु:ख दिले जाते.' आपण अशी कृपा करावी की 'माझे परमाणू उसळू नयेत.'

**दादाश्री :** आज तुला आशीर्वाद देऊ. तू त्याची सतत माफी मागत रहा. मागील जन्मी तू त्याला खूप दु:ख देत होतीस.

**प्रश्नकर्ता :** आता फारच झाले. ही माझी खूप मोठी ग्रंथी आहे.

**दादाश्री :** हो, पण काही तरी तर करावेच लागेल ना? सतत त्याची माफी मागतच राहावी. फुरसत मिळाल्यावर 'मी क्षमा मागते' असे थोडक्यात प्रतिक्रमण करावे. त्याच्याबरोबर अतिक्रमण केले आहे, म्हणून प्रतिक्रमण करावे लागेल. वारंवार दु:खच दिले आहे ना?

**प्रश्नकर्ता :** मी त्याचे खूप प्रतिक्रमण करत असते.

**दादाश्री :** हो, खूप कर 'मी त्याची क्षमा मागते', आणि 'हे दादा भगवान! मला, त्याला किंचितही दु:ख न देण्याची, त्रास न देण्याची शक्ती द्या.' असे सतत मागत राहावे. आणि आम्ही शक्ती देतोसुद्धा. तू मागशील तर तुला मिळेल.

**प्रश्नकर्ता :** रोजच मागेन.

**दादाश्री :** ठीक आहे.

**प्रश्नकर्ता :** माझ्याकडून त्यांना किंचितमात्रही दु:ख झाले असेल, आणि आता इथे एकांत मिळाल्यावर त्यासाठी प्रतिक्रमण केले तर चालेल का?

**दादाश्री :** ते तर त्वरितच, त्याचक्षणी करायला हवे.

तुम्हाला आता कुणाला दु:ख देण्याची इच्छा तर होत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** कधी कधी दु:ख दिले जाते.

**दादाश्री :** दु:ख दिले गेले तर काय करता?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण.

**दादाश्री :** प्रतिक्रमण केले, म्हणजे मग कोर्टात केस चालणार नाही. 'भाऊ तुझी माफी मागतो' अशा प्रकारे तुम्ही निकाल केला.

## पश्चात्तापाने कर्मे संपतात

**प्रश्नकर्ता :** एखाद्या माणसाला आपण झिडकारतो, आणि झिडकारल्यानंतर पश्चात्ताप होतो, तर याला काय म्हणावे?

**दादाश्री :** पश्चात्ताप झाला म्हणजे झिडकारण्याची सवय काही दिवसाने सुटते. झिडकारल्यावर पश्चात्ताप केला नाही, आणि असे मानले की, 'मी किती चांगले केले', तर ती नरकात जाण्याची निशाणी आहे. चूक केल्यावर पश्चात्ताप व्हायलाच हवा.

**प्रश्नकर्ता :** समोरच्याचे मन दुखावले असेल, तर त्यातून सुटण्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण करावे, आणि तो जर प्रत्यक्ष भेटला तर त्याला म्हणावे 'भाऊ, मला अक्कलच नाही, मी चुकलो' असे बोलण्याने त्याचे घाव भरून निघतील.

## झिडकारण्याच्या परिणामाचा उपाय

**प्रश्नकर्ता :** झिडकारण्याचा परिणामच भोगावा लागणार नाही यासाठी कोणता उपाय करावा?

**दादाश्री :** झिडकारण्यावर दुसरा कोणताच उपाय नाही, फक्त सतत प्रतिक्रमणच करत राहावे. जोपर्यंत समोरच्याच्या मनाचे समाधान होत नाही तोपर्यंत करत राहावे. आणि जर प्रत्यक्ष भेटला तर गोड बोलून क्षमा मागावी, की 'भाऊ, माझ्याकडून तर फार मोठी चूक झाली, मी तर मूर्ख आहे, बेअक्कल आहे.' त्यामुळे समोरच्याचे घाव भरत जातील. आपण स्वत:ची निंदा करतो तेव्हा समोरच्याला बरे वाटते, आणि त्याचे घाव भरून निघतात.

आम्हाला आमच्या मागच्या जन्मीचे झिडकारण्याचे परिणाम दिसतात, म्हणून तर मी सांगतो की, कोणालाही झिडकारू नये. मजुरालाही

झिडकारू नये. अरे, शेवटी तो साप होऊन पण बदला घेईल. 'झिडकार' आपल्याला सोडणार नाही. फक्त प्रतिक्रमणच वाचवू शकते.

## अशी पापे धुतली जातात का?

**प्रश्नकर्ता :** कुणाला दु:ख दिल्यानंतर आम्ही प्रतिक्रमण करतो, परंतु त्याला जबरदस्त आघात व दु:ख झाले असेल, तर त्यामुळे आम्हाला कर्म बंधन होईल का?

**दादाश्री :** तुम्ही त्याच्या नावाने सतत प्रतिक्रमण करतच राहा. त्याला जेवढ्या प्रमाणात दु:ख झाले असेल तेवढ्या प्रमाणात प्रतिक्रमणे करावी लागतात.

**प्रश्नकर्ता :** सासूने सुनेला काही म्हटले, आणि त्या सुनेने आत्महत्या केली, ती मरून गेली, इतके सारे घडले. नंतर त्यासाठी प्रतिक्रमण केले तर तिला शांती मिळेल?

**दादाश्री :** आपण तर प्रतिक्रमण करतच राहावे. दुसरी कोणती जबाबदारी आपली नाही, आणि जर ती व्यक्ती जिवंत असेल तर आपण त्यांनाही सांगू शकतो. काय नाव आहे तुमचे?

**प्रश्नकर्ता :** चंदुभाई.

**दादाश्री :** जर ती व्यक्ती जिवंत असेल तर तुम्ही त्यालाही सांगू शकता की, 'या चंदुभाई (फाइल नं.1)ला तर अक्कलच नाही. तुम्ही त्याला माफ करा', असे म्हटले की ते खुश होतील. आपली अक्कल कमी आहे, असे म्हटल्यावर समोरचा खुश होतो. आपण म्हणावे की 'या चंदुभाईला भानच नाही, अक्कल नाही, म्हणून तो तुमच्याशी असा वागला आणि हे सर्व घडले.' असे म्हटले, की तो खुश होऊन जाईल. त्याचा हात मोडल्यावरही जर एवढे बोललात ना, तर हात मोडल्याचे नुकसान त्याला जाणवणार नाही. तो खुश होऊन जाईल. कारण हात मोडणे हे तर निश्चितच होते, परंतु निमित्त तर तुम्हीच बनलात. म्हणून निमित्त बनल्याबद्दल माफी मागून घ्यावी. म्हणजे रक्कम जमा-उधार झाली.

## फाशी देतानाही असे निर्लेप

**प्रश्नकर्ता :** अशुभ भाव होत असतात परंतु त्वरितच असे वाटते, की 'मी ही चूक केली.'

**दादाश्री :** म्हणून मी तुम्हाला सांगतो की, 'रिलेटिव्हमध्ये जे डिस्चार्ज भाव आहेत ते अशुभ भाव आहेत.' डिस्चार्जमध्ये अशुभ भाव होत आहेत, आणि (नवीन) चार्ज होत नाहीत. अशुभ भाव झाल्यावर तुम्ही त्वरितच असे म्हणता की, 'असे होता कामा नये, असे होता कामा नये.' याला काय म्हणतात? 'संयम.' या उलट अशुभ भाव झाल्यावर त्याच्याशी एकाकार होणे याला 'असंयम' म्हणतात, पण तुम्ही तर अशुभ भावापासून अगदी वेगळेच राहता ना?

**प्रश्नकर्ता :** हो, हो.

**दादाश्री :** अशुभ भाव, ही इफेक्टिव (परिणामकारक) गोष्ट आहे, टाळले तरी टाळता येत नाहीत, आणि आता जर हा चंदुलाल (फाइल नं 1) कोणावर संतापला तर तुम्हाला आत असे वाटते की 'ते होता कामा नये.' असे का वाटते? असे वाटते ना? म्हणजे चंदुलाल जे करत आहे, तेही तुम्ही जाणता, तो आत असे करत आहे तेही तुम्ही जाणता. 'तुम्ही' या दोन्ही गोष्टी जाणणारे आहात. संयम परिणामालाही जाणणारे, आणि 'असंयम' परिणामालाही जाणणारे, तेच तुम्ही 'स्वतः' आहात. असे अनुभवास येते ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** हो, हा तमाशा पाहत राहा. एक जज (न्यायाधीश) मला म्हणाले 'साहेब, तुम्ही मला ज्ञान तर दिले, पण आता मी कोर्टात फाशीची शिक्षा द्यायची की नाही?' तेव्हा मी त्यांना सांगितले 'फाशीची शिक्षा देणार नाही तर मग काय करणार?' त्यावर ते म्हणाले, 'पण फाशीची शिक्षा दिली तर मला दोष लागेल.' मग मी त्यांना विचारले, 'मी तुम्हाला चंदुलाल' बनविले आहे, की 'शुद्धात्मा' बनविले आहे? तर ते म्हणाले, 'शुद्धात्मा' बनविले आहे. मग चंदुलाल जे करतो,

त्यासाठी तुम्ही जबाबदार नाही. आणि जर जबाबदार आहे असे तुम्हाला वाटत असेल तर मात्र तुम्ही 'चंदुलाल' आहात. तुम्ही राजीखुशीने भागीदार होत असाल तर त्याला आमची हरकत नाही. पण भागीदार होऊ नका. मग मी त्यांना पद्धत सांगितली की तुम्ही असे म्हणा की 'हे भगवंता, माझ्या वाट्याला हे असे काम का आले?' आणि त्यासाठी प्रतिक्रमण करा, आणि मग सरकारच्या कायद्याप्रमाणे काम करत राहा.

## मग जबाबदारी नाही

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्याने सुटता येते, असे जर आम्ही लक्षात ठेवले तर त्यामुळे सर्व लोकांना स्वच्छंदीपणे वागण्याचे लायसेन्स मिळून जाईल ना?

**दादाश्री :** नाही, हकीगत तर अशीच आहे, पण तसे समजायचे नाही. तुम्हाला प्रतिक्रमण करायचे. प्रतिक्रमण केले की तुम्ही सुटलात. तुमच्या जबाबदारीतून तुम्ही मुक्त झालात. नंतर ती व्यक्ती चिंता करून, डोके फोडून मेली, तरी त्या गोष्टीचा आणि तुमचा काही संबंध नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्ही जेव्हा प्रत्यक्ष 'सॉरी' म्हणतो, आणि त्यातही कोणा ज्युनियर व्यक्तीला 'सॉरी' म्हणतो तेव्हा त्याची मिजास एवढी वाढते की विचारू नका.

**दादाश्री :** असे काहीही म्हणायचे नाही. जर तुमच्याकडून काही बोलले गेले तर नंतर तुम्हाला पश्चात्ताप होतो की नाही? पश्चात्ताप होतो म्हणजेच तुम्ही प्रतिक्रमण करत आहात. 'यू आर नॉट रिस्पॉन्सीबल एट ऑल.' (तुम्ही किंचितही जबाबदार नाही) म्हणूनच आम्ही म्हणालो की त्याची जबाबदारी आम्ही आमच्यावर घेतो. कारण तुम्ही जर एवढे केले तर मग तुमची जबाबदारी राहिली नाही. मग त्याची वकिली करणे आम्हाला येते. पण आम्ही सांगितल्याप्रमाणे तुम्ही एवढे केले, तर तुम्ही कायद्यात आलात. मग जी काही वकिली करायची असेल ती आम्हाला करता येते. नंतरचे आम्ही सांभाळून घेऊ. आमच्या सांगण्यानुसार तुम्ही एवढे करा, तरी खूप झाले.

आपल्या बोलण्यामुळे समोरची व्यक्ती आत्महत्या करेल अशी परिस्थिती निर्माण झाली तर आपण अर्धा-पाऊण तासापर्यंत सतत प्रतिक्रमण करतच राहावे की, 'अरेरे, असे संयोग कुठून आले? माझ्या निमित्ताने असे कसे घडले?' मग तुमची काही जबाबदारी राहिली नाही. म्हणून यात घाबरण्याचे काही कारणच नाही. तुम्ही इथपर्यंत आमच्या आज्ञेचे पालन केले, तर त्यानंतरच्या कोर्टाचे सारे काही आम्ही सांभाळून घेऊ. भांडण झाले, तर ते आम्ही मिटवून टाकू. पण एवढे जरी केले ना तरी खूप झाले. जेवढा हिशोब आहे तेवढाच, जास्त खोल उतरण्याची गरज नाही.

## ज्ञानींचे प्रतिक्रमण कुंपणासहित

आमच्याकडून देखील काही लोकांना दुःख होत असते, जरी आमची तशी इच्छा नसली तरीही. सामान्यपणे हल्ली असे घडतच नाही, पण क्वचित एखाद्या माणसाबरोबर असे होऊन जाते. गेल्या पंधरा-वीस वर्षात दोन-तीन माणसांशी असे झाले असेल. तेसुद्धा निमित्त असेल म्हणूनच ना? नंतर आम्ही त्यांच्यासाठी प्रतिक्रमण करून त्याच्याबाजूने कुंपणही घालतो जेणेकरून तो पडणार नाही. आम्ही त्याला ज्या उंचीवर नेले आहे तिथून तो पडू नये, त्याचे रक्षण करण्यासाठी आम्ही कुंपण घालतो. कसेही करून त्याला पडू देत नाही. त्याने जरी विरोध केला, शिव्या दिल्या, तरीही त्याला पडू देत नाही. त्या बिचाऱ्याला समजतच नाही, तो बेभानपणेच बोलत असतो. त्याला आमची हरकत नाही. जर त्याला पडू दिले तर मग आम्ही त्याला उंचीवर नेलेले व्यर्थ म्हणावे लागेल.

आम्ही सैद्धांतिक असतो की, 'भाऊ, आम्ही हे झाड लावले, आहे, लावल्यानंतर जर ते झाड रोड बनविण्यात मध्ये येत असेल तर तो रोडच वळवायचा पण त्या झाडाला मात्र काही इजा होऊ द्यायची नाही. असा आमचा सिद्धांत आहे. आम्ही कोणाला पडू देत नाही. तो मग त्याच जागेवर राहतो. आम्ही त्याचे सर्व विचारच बदलून टाकतो. आम्ही घरी बसल्याबसल्याच त्याचे विचार बदलून टाकतो. त्यासाठी आम्हाला जरा जास्त मेहनत करावी लागते. तुम्हा सर्वांसाठी मेहनत करावी लागत नाही, पण त्याच्यासाठी खूप मेहनत करावी लागते. त्याचे

सारे विचारच आम्हाला धरून ठेवावे लागतात. याहून पुढे तो विचार करू शकणार नाही, असे करावे लागते. क्वचितच कोणाच्या बाबतीत असे घडते ना! सगळ्यांसाठी असे नसते!!

**प्रश्नकर्ता :** हे कुंपण वगैरे घालणे, हे सारे काय आहे? यात त्याच्यासाठी तुम्ही काय करता?

**दादाश्री :** आम्ही त्याचे अंतःकरण पकडतो, त्याचे 'व्यवस्थित' आमच्या हातात घेतो.

**प्रश्नकर्ता :** ते कसे काय?

**दादाश्री :** ते तर, आम्ही सर्व घेऊन टाकतो, असे घेतले नाही तर तो पडून जाईल ना!

**प्रश्नकर्ता :** आम्ही जे प्रतिक्रमण करतो, ते तर आमच्याकडून अतिक्रमण झाले म्हणून करतो. तर मग आमच्या अतिक्रमणामुळे समोरच्या व्यक्तीला जे दुःख झाले त्यासाठी प्रतिक्रमण करायचे का?

**दादाश्री :** हो, त्यासाठीच. अन्य कोणत्याही कारणासाठी नाही. आता तुमचे (शुद्धात्म्याचे) तर काहीच देणेघेणे राहिले नाही ना! आता त्याच्याबरोबर व्यवहारच राहिला नाही. फक्त कोणाला दुःख होऊ नये, एवढेच पाहायचे आहे, आणि जो गुन्हेगार आहे त्यालाच सांगावे की, 'प्रतिक्रमण कर.' बाकी, तुम्हाला म्हणजे 'शुद्धात्म्याला', काहीही धुण्याचे शिल्लक नाही, सर्व काही धुतले गेले.

**प्रश्नकर्ता :** पण काय आमच्याकडून पुन्हा अशी अतिक्रमणे होणार नाहीत?

**दादाश्री :** 'होणार नाही' असे नाही, अतिक्रमणे ही तर डिस्चार्ज आहेत, म्हणून होतच राहतात. जेवढी आहेत तेवढीच निघतील. तेव्हा 'नाही होणार' आणि 'होणार', हा प्रश्नच नाही. तुम्हाला वाटले की हे अतिक्रमण झाले, तर त्याचे प्रतिक्रमण करवून घ्यावे आणि जर अतिक्रमण नसेल तर डिस्चार्जला पाहातच राहावे. दुसरे काहीच नाही.

**प्रश्नकर्ता :** आमचा एक नातेवाईक आहे, तो इतक्या मोठमोठया चुका करतो, ब्लंडर्स करतो, की त्याला देव पण माफ करणार नाही, आणि त्याने जर आमच्याकडे माफी मागितली, की 'माझी चूक झाली, मी चुकलो' असे म्हणू लागला तर तेव्हा काय करावे?

**दादाश्री :** माणसाने माफी द्यावी, देव माफ करू शकत नाही. देव तर निर्बल (!) आहे ना? आपण बलवान आहोत. कारण देव तर जेव्हा त्याचा सर्व हिशोब पूर्ण होईल तेव्हाच त्याला माफी देईल. देवाला हिशोब पूर्ण करून घ्यावाच लागतो. आपण असे हिशोब ठेवतच नाही. आपण तर माफ करून टाकतो, 'तुझे भले होवो!'

## परत परत तीच चूक केली तर?

**प्रश्नकर्ता :** एखादा मनुष्य चूक करतो, नंतर आमच्याजवळ माफी मागतो, आम्ही त्याला माफ करतो. त्याने जरी माफी मागितली नाही तरी पण आम्ही त्याला मनापासून माफ करतो, पण तो मनुष्य परत परत चूक करत असेल तर आम्ही काय करावे?

**दादाश्री :** त्याला प्रेमाने समजावावे, जेवढे समजावता येईल तेवढे समजावावे, दुसरा काही उपायच नाही, आणि आपल्या हातात काहीच सत्ता नाही. या जगात तुम्हाला माफी देण्याव्यतिरिक्त दुसरा कोणता उपायच नाही. जर माफ केले नाही, तर त्याने मार खाल्यानंतर तुम्ही त्याला माफ कराल. दुसरा उपायच नाही. तुम्ही त्याला समजावावे. तो परत परत चूक करणार नाही, असे त्याने आपले भाव बदलले तरी खूप झाले. त्याने जर आपले भाव बदलले, की 'आता परत अशी चूक करायची नाही', तरीही चूक होतेच पण ती वेगळी गोष्ट आहे. माणसाने ठरवले की 'आता मला चूक करायचीच नाही' तरी पण चूक होऊन जाते ती वेगळी गोष्ट आहे. पण 'चूक करायचीच आहे' असे म्हटले तर मग त्याचा कधी अंतच येणार नाही. त्याला तर उलट्या रस्त्याने चालणारा माणूस म्हणावा. परंतु 'चूक करायची नाही' असा निश्चय केल्यावर पुन्हा चूक झाली तर स्वतःलाही पश्चात्ताप होतो, असे झाले तर अशा चुकीला हरकत नाही. चूक करणाऱ्याला पश्चात्ताप होतो. 'चूक

करणार नाही' असे ठरवल्यानंतर पुन्हा जर चूक झाली, तर हरकत नाही. म्हणजे तो 'चूक करणार नाही' असा निश्चय पण करतो, पश्चात्ताप पण करतो, हो, पश्चात्ताप मात्र करायलाच हवा. आणि जर पुन्हा चूक झाली तर पुन्हा पश्चात्ताप करावा.

याचे कारण काय? तर जसे कांद्याला थर (पाकळ्या) असतात, तसेच चुकांचेही अनेक थर असतात, पश्चात्ताप केल्याने एक थर दूर होतो, पण मग दुसरा थर येतो, म्हणून कांदा जसा होता तसाच दिसतो. आणि जेव्हा सगळे थर निघून जातात तेव्हाच तो संपतो, तोपर्यंत नाही. अनंत जन्मांपासून अपार चुका केल्या आहेत.

## ते आहे अर्थहीन

**प्रश्नकर्ता :** त्याला कळतच नाही की 'मी चूक करत आहे', आणि तो चुका करतच राहिला तर काय करावे? त्याला पश्चात्तापही होत नसेल तर काय करावे?

**दादाश्री :** तर मग त्याला काही अर्थच नाही, ते मीनिंगलेस (अर्थहीन) आहे. जिथे भानच नाही, ते सारे अर्थहीन आहे. आपल्याला त्याचा विरोध तर करावाच लागेल. त्याला भानावर आणावे लागते. भान येईल यासाठी विरोध करायला हवा.

**प्रश्नकर्ता :** कोणी जर वारंवार अशा चुका करत राहिला तर त्याच्यावरचा आपला प्रेमभाव आटतो. त्याच्याबद्दल जो मान असेल तोही आटतो.

**दादाश्री :** हो, मग दुसरे काय होणार? शक्यतो आपण (प्रेमभाव आणि मान) आटू देऊ नये. कारण या कलियुगात याशिवाय दुसरे काय होणार? आपले तर रिलेटिव्ह संबंध आहेत, दुसरे आणखी काय असणार? आपले आटले तर उलट आपलेच बिघडेल. म्हणून जसे आपण अनोळखी लोकांशी वागतो, तसेच त्याच्याशी वागावे लागेल.

मुलाला भाजी आणण्यासाठी पाठविले आणि त्याने त्यातले थोडे

पैसे काढून घेतले, नंतर ही गोष्ट समजल्यावर काय फायदा? तो जसा आहे तसाच चालवून घ्यावा लागतो, त्याला हाकलून देता येते का? दुसरा मुलगा घ्यायला थोडेच जाणार? दुसरा मिळणार पण नाही ना?

**प्रश्नकर्ता :** आणि जरी मिळाला तरी त्याच्यापेक्षा वरचढ नसेल याची काय खात्री?

**दादाश्री :** हो. आज सर्व काही विचारून घ्या आणि आपले (मोक्षाचे) काम करून घ्या.

## समोरच्यालाही निभावून घ्या

**प्रश्नकर्ता :** तर मग अशा व्यक्तीसाठी आम्ही काय करावे? समोरचा माणूस चुका करत राहतो आणि त्याला पश्चात्तापही होत नाही, त्याला कळतही नाही, तर तेव्हा आम्ही काय करावे?

**दादाश्री :** आपल्याला आत्महत्या करायची नाही. आणखी काय करू शकतो? या देहाची आत्महत्या म्हणजे फार मोठी आत्महत्या, नंतर मनाचीही आत्महत्या करतो. मनाची आत्महत्या म्हणजे संसारातून मन उडून जाते. असे करू नये. कारण त्यामुळे मग मुलांवरूनही मन उडून जाते. सगळ्यांवरून मन उडून जाते. असे करू नये. आपल्याला सर्व काही निभावून नेता यायला हवे. हा संसार कसेही करून निभावून नेण्यासारखा आहे. सध्या कलियुग आहे, तेव्हा कोण काय करणार? देअर इज नो सेफ साइड एनिव्हेयर, (कुठेही सुरक्षितता नाही.) इथे तर सेफ साईड आहे असे मानून झोपून जाण्यासारखे आहे. सिन्सियारिटी-मोरॉलिटी गॉन फॉर एवर (निष्ठा आणि नैतिकता कायमच्या निघून गेल्या आहेत.) म्हणून हे ज्ञान प्राप्त करून घ्या, तर कायमचे सुखी व्हाल, मग कसलीही अडचण येणार नाही, बस आनंदच, आनंद.

## प्रतिक्रमणाच्या सूक्ष्म उणीवा

**प्रश्नकर्ता :** आमच्याकडून कोणी दुखावला असेल आणि म्हणून तो इथे (सत्संगात) येत नसेल. मग आम्ही अहंकार करून त्या गोष्टीला

झटकून टाकतो आणि म्हणतो 'अरे, मी तर त्याचे प्रतिक्रमण केले आहे.' तरी पण तो येत नाही, मग आता माझे काय देणेघेणे?

**दादाश्री :** हे सर्व चुकीचे आहे. एकंदरीत तर हे सर्व तुमच्या निमित्तानेच झाले आहे ना, म्हणून तुम्ही जे शक्य असेल ते करायला हवे. आणि तरीही समाधान झाले नाही तर मग सोडून द्यावे. समाधान झाले नाही तर त्याचा ताप करून घेऊ नये.

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे, पण मला हे जाणून घ्यायचे आहे की मग माझ्या समजुतीत काय असावे? की 'मी तर प्रतिक्रमण केले आहे, माझी आता त्याच्याबद्दल काहीच तक्रार नाही.' पण आता स्वत: गोळी सोडणे, मग इतके केल्यानंतर पुसून टाकणे हे स्वत:साठी तर सोपे आहे, पण ज्याला गोळी लागली आहे त्याला तर आग होतच असते ना?

**दादाश्री :** पण तो येथे दर्शनासाठी येत नाही, म्हणजे त्याला आत किती आग होत असेल की, हा नालायक माणूस मला भेटला, म्हणून मी जाऊ शकलो नाही. तेव्हा आता तुम्हाला त्याचा समभावाने निकाल तर करावाच लागेल ना?

**प्रश्नकर्ता :** आम्ही त्याचे प्रतिक्रमण केले आणि आता आमचे त्याच्याबद्दल कोणतेही अभिप्राय राहिलेले नाहीत हे डिमार्केशन कसे कळेल? आता माझे अभिप्राय शंभर टक्के संपून गेले आहेत, हे कसे समजेल?

**दादाश्री :** तरीही त्याचे समाधान होत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** त्याचे समाधान होत नाही. आणि कदाचित आमच्या मनातूनही जात नसेल, कधी तरी असेही वाटते की 'अरे, तो तर किती सेनसिटिव्ह आहे. मी जरासे बोललो तर त्यात त्याने एवढे का मनाला लावून घ्यावे?' असे जर आत वाटत असेल तर अभिप्राय संपविण्यात आम्ही कमी पडू.

**दादाश्री :** तुम्हाला असे वाटत असेल तरीही ते तुम्हाला कळत नाही.

**प्रश्नकर्ता :** हो, कळत नाही, ही गोष्ट खरी आहे. हे फार सूक्ष्म आहे. म्हणून सेफ साइडसाठी त्याचे प्रतिक्रमण करणे चांगले आहे ना?

**दादाश्री :** अशा केसेस जगात कमी असतात, म्हणून त्याची समजूत काढावी. पाहा ना, अजूनही तो येत नाही ना?

## अकर्ता तरीही समोरच्याला दु:ख

आपले महात्मा 'करायचे आहे' असे म्हणतात, ते तर डिस्चार्ज भावाने म्हणतात. जसे नाटकात म्हणतात ना, 'तुम्हाला मारून टाकू' तसे. त्यात काही हिंसा लागत नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्ही अकर्ता राहतो, पण चंदुभाई जे काही कर्म करतो, त्यामुळे त्याच्या आसपासचे काही लोक दुखावतात, तर त्यांना असे वाटते की हा चंदुभाईच त्यांना दु:ख देत आहे. तेव्हा आमच्यावर त्याचा परिणाम होतो, त्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** ते तर मी सांगितलेच आहे ना, की चंदुभाईने जर कोणाशी अतिक्रमण केले तर, कोणाला दुखावले, तर चंदुभाईला म्हणावे, 'बाबा, त्याच्या नावाने तू प्रतिक्रमण कर.' आणि जर अतिक्रमण झाले नसेल, तर मग काहीच करायचे नाही.



# [ 10 ]
# संघर्षाच्या विरोधात

## ऋणानुबंधीबरोबर

**प्रश्नकर्ता :** ज्यांच्याबरोबर काही ऋणानुबंध असतील, त्यांच्याशीच संघर्ष होत असतो ना? अन्य कोणाबरोबर संघर्ष होत नाहीत ना?

**दादाश्री :** ज्यांच्याशी पूर्वीचे हिशोब असतील, त्यांच्याशीच संघर्ष होतो.

**प्रश्नकर्ता :** आता, माझा कोणाशीही संघर्ष होत नाही. सर्व ठिकाणी सांभाळून घेतो, पण यांच्याबरोबर 6-8 महिन्यांतून एकदा तसे होत असते. तसे तर आता खूप कमी झाले आहे, पण यांच्याबाबतीत आंतरिक तप होत नाही, वाद होतोच.

**दादाश्री :** त्याला काही हरकत नाही. तुला त्याचा निकाल केल्याशिवाय सुटकाच नाही ना? त्यांनाही निकाल करायचा आहे आणि तुम्हालाही निकाल करायचा आहे, पण तेवढ्यातच संघर्ष झाला म्हणजे चूक कोणा एकाची नाही तर दोघांची म्हणायची. कोणाची 40 टक्के, तर कोणाची 60 टक्के, कोणाची 30 टक्के असेल, तर कोणाची 80 टक्के, 70 टक्के चूक असते, अर्थात दोघांची काही ना काही चूक तर असतेच.

**प्रश्नकर्ता :** आणि मग दोन, पाच मिनिटातच समाधान पण होऊन जाते.

**दादाश्री :** हो, ते तर होऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** परंतु त्यावेळी पराक्रम करून संयोगांना सांभाळून घेतले, तर आनंद होतो, पण अजूनही तसे करता येत नाही.

**दादाश्री :** म्हणून तर हळूहळू अशी जागृती राखून करावे. तुम्ही जेवढे माझ्यासोबत राहाल ना, तसे तसे परिवर्तन होत जाईल. माझा एकच शब्द तुमच्या कानावर पडला ना, तर तो शब्दच काम करत राहील.

**प्रश्नकर्ता :** ती एक म्हण आहे ना, ज्याने नेम चुकवला, तो शंभर वर्षांपर्यंत जिवंत राहतो; त्याचप्रमाणे आमचे कषाय उत्पन्न होतात त्यांच्यावर जर ताबा मिळवला तर सर्व काही जिंकता येईल!

**दादाश्री :** असे आहे ना, ताबा म्हणजे काय? तर आपल्याला जेव्हा करायचे असेल तेव्हा करू शकतो. आपल्याला 'स्व:त'चे ज्ञान मिळाले आहे, तर आता हे सारे (कषाय) ताब्यातच राहतील, ज्ञानच काम करील.

म्हणून सर्वात चांगला उपाय हा आहे की, 'चंदुलाल कसा आहे, कसा नाही', असा त्याच्याशी वार्तालाप करावा, तोच एक उपाय आहे. काय करावे लागेल?

**प्रश्नकर्ता :** त्याच्याबरोबर (चंदुलाल बरोबर) निरंतर वार्तालाप करत राहावे, आणि त्याला सांगत राहावे की, 'ही चांगली गोष्ट नाही, तुझा नेम का चुकतो?

**दादाश्री :** हो, असे म्हणू शकता, सर्व काही म्हणू शकता. त्यानंतर तो जर परत चुकला, तर परत सांगावे, आणि प्रतिक्रमण करवून घ्यावे. प्रत्याख्यानही करावेच लागते. नाही तर 'हेच बरोबर आहे.' असे मानून घेईल.

## कर्मोदयाच्या फोर्स पुढे

प्रतिक्रमण केले म्हणजे आपला या गोष्टीबद्दलचा अभिप्राय बदलला

आहे की, 'हेच बरोबर आहे आणि ते चुकीचे आहे.' आमचा हा अभिप्राय आता बदलला आहे.

**प्रश्नकर्ता :** महात्म्यांचे अभिप्राय तर पूर्णपणे बदलून गेले आहेत, परंतु जेव्हा कर्मांचे उदय येतात, तेव्हा ते हलवून सोडतात. आत्ताच हे भाऊ जे बोलले, ते त्यांच्याकडून स्वभावाबाहेरचे बोलले गेले आहे.

**दादाश्री :** हो, स्वभावाबाहेरचे बोलले गेले, हे तुम्हाला समजले ना? या कर्मांच्या उदयाने एवढा जोर केला की ते सहसा बोलत नाहीत असे सर्व बोलले. त्यामुळे आता आपल्याला जास्त पश्चात्ताप होतो की, 'हे कसे काय झाले?', याचे कारण आत अजूनही फार मोठा रोग आहे, त्याला निघू द्या. आणि त्यासाठी आज सवड काढून पाचेक तासांपर्यंत सतत पश्चात्ताप करत राहा.

पश्चात्तापामध्ये काय म्हणावे लागते? तुम्हाला कुठे जायचे आहे? तुम्हाला काय त्रास आहे? आणि जर काही भानगड झाली तर 'जे घडले तेच करेक्ट' असे म्हणून सोडून द्यावे. स्वतःचा आग्रह धरून बसलात तर मात्र मार पडेल. तुमची जी प्रकृती नव्हती ती बाहेर आली ना?

**प्रश्नकर्ता :** असे तर कधीच करत नाही, पण तरी असे का केले हेच कळत नाही.

**दादाश्री :** तेच तर पाहायचे आहे, त्यांचा रोग निघायचा असेल आणि यांचाही रोग निघायचा असेल म्हणूनच हे सर्व (संयोग) एकत्र आले ना?

**प्रश्नकर्ता :** हा तर त्यांचा उदय आहे, ते स्वतः बोलत नाहीत.

**दादाश्री :** हो, ते स्वतः बोलत नाहीत, त्यांचा उदय फार जोर करतो. आपण विचारावे की, तुमची अशी भावना होती का? तर ते म्हणतील, 'नाही, माझी तर इच्छा नव्हती, तरीही ते घडले' तर ते सारे निघून गेले, धुतले गेले आणि स्वच्छ झाले, क्लियर कट! असे आहे की, मन स्वच्छ करायचे असते.

## सामूहिक प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** काही कर्मांच्या उदयावेळी खूप वादविवाद झाला असेल, तर तेव्हा मोठे कर्मबंधन होत असते. मग त्यासाठी दोन-चार वेळा प्रतिक्रमण करावे लागेल की मग एकदाच केले तरी चालेल?

**दादाश्री :** जेवढे शक्य असेल तेवढे करावे आणि नंतर सामूहिक प्रतिक्रमण करावे. प्रतिक्रमणे खूप करायची राहिली असतील तर मग सामूहिक प्रतिक्रमण करावे. की, 'हे दादा भगवान, या सर्वांसाठी मी सामूहिक प्रतिक्रमण करीत आहे.' आपण दादा भगवानांनाच सांगावे, इतर कोणाला नाही की, 'हे दादा भगवान! या सर्व दोषांचे मी सामूहिक प्रतिक्रमण करीत आहे' असे म्हटले की मग संपले.

## समाधान, आत्मज्ञानाद्वारेच

**प्रश्नकर्ता :** दादाजी, ही अहंकाराची गोष्ट चांगली आहे. बऱ्याचदा ती घरातही लागू पडते, संस्थेतही लागू पडते. दादाजींचे काम करत असतानाही काही वेळा अहंकारामुळे संघर्ष होत असतो. तिथेही लागू पडते. तिथेसुद्धा समाधान पाहिजेच ना?

**दादाश्री :** हो, समाधान तर पाहिजेच ना! आपल्या येथे 'ज्ञान' घेतलेला माणूस समाधान करील, पण ज्याला 'ज्ञान' नाही तो कसे समाधान करील? तिथे मग दरी निर्माण होते, त्याच्यापासून मन वेगळे होत जाते. आपल्या येथे वेगळे होणार नाही!

**प्रश्नकर्ता :** परंतु दादाजी, संघर्ष करायला नकोच ना?

**दादाश्री :** संघर्ष होतो, हा तर स्वभाव आहे. तसा माल भरून आणला आहे म्हणून असे घडते. जर असा माल आणला नसता, तर असे झाले नसते. म्हणून आपण समजून घ्यावे की, ह्याची अशी सवयच आहे, 'चंदुलाल'ची अशी सवय आहे असे आपण जाणावे, तर मग आपल्यावर त्याचा परिणाम होणार नाही. कारण सवय सवयवाल्याची (पूर्वसंचित संस्कारवाल्या जीवाची) आणि 'आपण' आपले (शुद्धात्मा)!

आणि मग त्याचा निकाल होऊन जाईल. तुम्ही अडकून राहिलात तर मात्र त्रास होईल. बाकी, संघर्ष तर होणारच. संघर्ष होणार नाही असे कधी होतच नाही! पण त्या संघर्षामुळे आपण एकमेकांपासून वेगळे होणार नाही याची मात्र दक्षता घ्यावी. संघर्ष तर अवश्य होणार. पती-पत्नीमध्येसुद्धा संघर्ष होतात, पण तरी ते एकजूटीने राहतातच ना? असे तर चालायचेच. म्हणून आम्ही कोणावरही दडपण आणले नाही की, 'तुम्ही संघर्ष करूच नका.'

**प्रश्नकर्ता :** त्यात तंत राहायला नको.

**दादाश्री :** तंत राहतच नाही ना? जर कोणी म्हणाला की मला तंत राहतो तरीही तो तंत नाही (महात्म्यांसाठी).

**प्रश्नकर्ता :** परंतु दादाजी, 'संघर्ष होऊ नये.' असा भाव तर सतत ठेवायला हवा ना?

**दादाश्री :** हो, भाव ठेवायला हवा. तेच तर करायचे आहे ना! त्याचे प्रतिक्रमण करावे आणि त्याच्याप्रती (चांगले) भाव ठेवावे! आणि पुन्हा असे झाले तर पुन्हा प्रतिक्रमण करावे, कारण प्रतिक्रमणाने एक थर तर निघूनच जातो, नंतर दुसरा थर निघतो. (दोष) थरवाले असतात ना? माझे जेव्हा संघर्ष होत होते तेव्हा मी नोंद करायचो की आज तर चांगले ज्ञान मिळाले! संघर्षामुळे आपण घसरून पडत नाही, नेहमी जागृतच राहतो ना! ते तर आत्म्याचे व्हिटॅमिन आहे. अर्थात या संघर्षाची हरकत नाही. संघर्षानंतर एकमेकांपासून वेगळे व्हायचे नाही, तोच पुरुषार्थ आहे. जर समोरच्याशी आपले मन वेगळे होऊ लागले, तर प्रतिक्रमण करून सर्व ठीक करावे. आम्ही या सगळ्यांशी कसा मेळ बसवतो? तुमच्याशीही मेळ बसतो की नाही? असे आहे, की शब्दाने संघर्ष निर्माण होतात. मला तर खूप बोलावे लागते, तरीसुद्धा कोणाशी संघर्ष होत नाही ना?

एका माणसाने मला सांगितले की, 'मी फार मोठा दंगेखोर आहे, फक्त तुम्हीच मला इथे येऊ दिले आहे, इतर कुणी येऊ देत नाही.' मी म्हणालो, 'भाऊ, इथे तर सर्वांसाठी स्थान आहे, जरी दंगेखोर असला

तरीही!' दंगे करा पण आत्मा प्राप्त करा. दंगा करून फार तर पाच-दहा लोकांना शिव्या देईल, आणखी काय करणार? 'तुम्ही बेअक्कल आहात, असे आहात, तसे आहात,' असे म्हणेल. पण शेवटी पुद्‌गलालाच शिव्या देणार ना? आत्म्याला कोण शिवी देऊ शकतो का?

संघर्ष तर होणारच. संघर्ष म्हणजे, ही भांडी एकमेकांवर आपटतात की नाही? आपटणे (संघर्ष करणे) हा पुद्‌गलचा स्वभाव आहे, पण तसा माल भरलेला असेल तरच, नसेल भरलेला तर नाही. पूर्वी आम्हालाही संघर्ष होत असत, परंतु ज्ञान झाल्यानंतर मात्र संघर्ष झाला नाही. कारण आमचे ज्ञान अनुभव ज्ञान आहे. आणि आम्ही या ज्ञानाने सर्व निकाल करून आलेलो आहोत. आम्ही समजून उमजून आलो आहोत, आणि तुम्हाला निकाल करायचे अजून बाकी आहे. तुम्ही तर मोक्षात बसला आहात, वर तीन मजली चढवून, परंतु इथले खालचे बांधकाम करायचे बाकी राहिले आहे ना? वर बसल्यानंतर आता उलट बांधकाम करावे लागेल. आणि सरळ मोक्ष प्राप्तीसाठी प्रयत्न करणारे लोक तर पाया खणून, खोरे, फावडे इथेच सोडून पळून गेलेत. आत शांतीच नाही मग कोण करेल अशी डोकेफोड? येथे आम्ही प्रथम शांती करून देतो, नंतर खालचे सर्व तो स्वतःच करून घेतो. म्हणूनच हे अक्रम विज्ञान काढले आहे ना?

## तीन जन्मांची गॅरंटी

ज्याला संघर्ष होत नाहीत, त्याचा तीन जन्मांनंतर मोक्ष होईल, याची मी गॅरंटी देतो. संघर्ष झालाच तर प्रतिक्रमण करावे. संघर्ष पुद्‌गलाचा आहे आणि पुद्‌गलाच्या पुद्‌गलाशी झालेला संघर्ष प्रतिक्रमण केल्यामुळे नाश होतो.

समोरचा भागाकार करत असेल तर आपण गुणाकार करावा, म्हणजे रक्कम उडून जाईल. समोरच्या व्यक्तीसाठी 'त्याने मला असे म्हटले, तसे म्हटले.' असा विचार करणे हा गुन्हा आहे. रस्त्यावरून चालत असताना जर झाडावर आपटलो तर आपण झाडाला का ओरडत नाही? झाडाला जड कसे म्हणू शकतो? जी आपटतात ती सर्व झाडेच

आहेत! गाईचा पाय आपल्या पायावर पडला तर आपण काही बोलतो का? तसेच या सर्व लोकांचे आहे. 'ज्ञानी पुरुष' या सर्वांना माफी कसे देऊ शकतात? ते जाणतात की ह्या बिचाऱ्यांना काही समजत नाही, झाडासारखे आहेत. समजूतदार असेल त्याला तर सांगावेच लागत नाही, तो तर आत त्वरित प्रतिक्रमण करून टाकतो.

अहिंसा पूर्णपणे समजेल अशी नाही. पूर्णपणे समजणे खूप कठीण आहे. त्यापेक्षा असे ठरवले असेल की, 'घर्षणात कधीच पडायचे नाही.' त्यामुळे काय होते? तर शक्ती अनामत राहते, उलट शक्ती दिवसेंदिवस वाढतच जाते. त्यानंतर घर्षणामुळे होणारे नुकसान टळते.

कधी घर्षण झालेच तर घर्षणानंतर आपण प्रतिक्रमण केले, तर ते सर्व पुसले जाईल. आपण हे समजून घेतले पाहिजे की ह्या इथे घर्षण होत आहे, तर त्याचे प्रतिक्रमण करायला हवे. नाही तर फार मोठी जोखीम आहे. या ज्ञानाने मोक्षाला तर जाल, परंतु घर्षणामुळे मोक्षाला जाताना खूप अडचणी येतील आणि वेळही बराच लागेल!

जर या भिंतीसाठी तुम्हाला उलट-सुलट विचार आले तर हरकत नाही, कारण यात एकतर्फी नुकसान आहे. परंतु जिवंत व्यक्तींसाठी एक जरी उलट विचार आला तर मात्र जोखीम आहे. दोन्हीपक्षी नुकसान होते. पण नंतर आपण त्याचे प्रतिक्रमण केले तर सारे दोष संपून जातात. म्हणून जिथे जिथे घर्षण होत असेल तिथे प्रतिक्रमण करा, म्हणजे घर्षण बंद होऊन जाईल.

## संघर्ष, स्थूलपासून सूक्ष्मापर्यंतचे

**प्रश्नकर्ता :** ही जी स्थूल संघर्षाची उदाहरणे दिलीत, त्या सापाची, खांबाची, ती तर स्थूल संघर्षाची उदाहरणे आहेत. पण आता सूक्ष्म, सूक्ष्मतर, सूक्ष्मतम संघर्षाची उदाहरणे पण द्या. सूक्ष्म संघर्ष कसा असतो?

**दादाश्री :** वडिलांबरोबर तुझे जे होते, ते सर्व सूक्ष्म संघर्ष.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे नेमके काय?

**दादाश्री :** तुम्ही मारामारी करता का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** म्हणून तो सूक्ष्म संघर्ष.

**प्रश्नकर्ता :** सूक्ष्म म्हणजे मानसिक? वाणीने होतात ते पण सूक्ष्मात धरले जातात का?

**दादाश्री :** वाणीने होतात ते सर्व स्थूल आहेत. पण जे समोरच्याला कळत नाही, दिसत नाही, असे सर्व सूक्ष्मात येते.

**प्रश्नकर्ता :** मग सूक्ष्म संघर्ष टाळायचा कसा?

**दादाश्री :** आधी स्थूल, नंतर सूक्ष्म, नंतर सूक्ष्मतर आणि नंतर सूक्ष्मतम संघर्ष टाळायचे.

**प्रश्नकर्ता :** सूक्ष्मतर संघर्ष कशाला म्हणतात?

**दादाश्री :** तू एखाद्याला मारत असशील आणि त्यावेळी तो ज्ञान दृष्टीने पाहतो की 'मी शुद्धात्मा आहे, ही 'व्यवस्थित शक्ती' मारत आहे' अशा प्रकारे पाहतो, पण मनात थोडासा तुझा दोष पण पाहतो, तर हा झाला सूक्ष्मतर संघर्ष.

**प्रश्नकर्ता :** परत एकदा सांगा ना? नीट कळले नाही.

**दादाश्री :** हे जे तू सगळ्यांचे दोष पाहतोस ना, तो सूक्ष्मतर संघर्ष आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दुसऱ्यांचे दोष पाहणे, हा सूक्ष्मतर संघर्ष आहे?

**दादाश्री :** तसे नाही, स्वतः ठरवले असेल, की दुसऱ्यांच्यात दोष नाहीत, तरी पण दोष दिसतात, तो सूक्ष्मतर संघर्ष आहे. तुझे दोष तुला दिसले पाहिजेत. कारण तो शुद्धात्मा आहे आणि दोष वेगळे आहेत.

**प्रश्नकर्ता :** जो दोष पाहतो तो कोण आहे?

**दादाश्री :** दोषाला पाहणारा.

**प्रश्नकर्ता :** परंतु तिथे मनाचे स्थान नाही. ती गोष्ट मानसिक स्तरावर नाही.

**दादाश्री :** ती कोणत्याही स्तरावर असो, परंतु दोष पाहतो.

**प्रश्नकर्ता :** तर त्यालाच मानसिक संघर्ष म्हणतात?

**दादाश्री :** ते (मानसिक) सर्व तर सूक्ष्ममध्ये गेले.

**प्रश्नकर्ता :** मग या दोन्हीमध्ये नेमका फरक काय आहे?

**दादाश्री :** ही तर मनाच्याही पलीकडची गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** मानसिक संघर्ष आणि जे दोष...

**दादाश्री :** ते मानसिक नाहीत.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हा सूक्ष्मतर संघर्ष आहे, त्याक्षणी सूक्ष्म संघर्ष पण सोबत असतोच ना?

**दादाश्री :** ते आपण पाहायचे नाहीत. सूक्ष्म वेगळे आहे आणि सूक्ष्मतर वेगळे आहे. सूक्ष्मतम म्हणजे तर अगदी अंतिम गोष्ट.

**प्रश्नकर्ता :** एकदा सत्संगामध्ये तुम्ही असे म्हणाला होता की 'चंदुलाल'शी तन्मयाकार होणे, याला सूक्ष्मतम संघर्ष म्हणतात?

**दादाश्री :** हो, सूक्ष्मतम संघर्ष! तो टाळावा. चुकून तन्मयाकार झालात पण मग लक्षात येते ना की ही चूक झाली?

**प्रश्नकर्ता :** आता केवळ शुद्धात्मा तत्त्वाशिवाय या जगातील कोणतीही विनाशी वस्तू मला नको आहे, तरी देखील हा 'चंदुभाई' अधूनमधून तन्मयाकार होतो, म्हणजे हा सूक्ष्मतर संघर्ष झाला ना?

**दादाश्री :** याला तर सूक्ष्मतम म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** अशी एक भावना आहे की 'फक्त शुद्धात्मा

तत्त्वाशिवाय आणि दादांच्या पाच आज्ञा, याशिवाय इतर कुठल्याही वस्तूची इच्छा नाही.'

**दादाश्री :** सर्वांसाठी हीच तर मुख्य गोष्ट आहे ना. म्हणून हळूहळू असे करावे की ज्यामुळे ते दिसू लागेल.

**प्रश्नकर्ता :** असे दिसून येते की माझ्याकडून ही तिसरी आज्ञा भंग झाली, दुसरी आज्ञा भंग झाली, असे स्पष्टपणे दिसून येते.

**दादाश्री :** हो, स्पष्ट दिसते. बरोबर आहे.

**प्रश्नकर्ता :** आज्ञा भंग झाली, याला संघर्ष झाला असे म्हणावे?

**दादाश्री :** यात तर ती फाइल पुन्हा एकदा तपासण्याची गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही सूक्ष्मतर संघर्षाबद्दल जे बोललात की आपल्या अभिप्रायाने तर समोरचा निर्दोषच आहे, तरी पण त्याला दोषी ठरवला जातो, म्हणूनच त्याच्याबरोबर संघर्ष होतो ना?

**दादाश्री :** दोषी ठरवला जातो. तो गुन्हा लागू होतो ना?

**प्रश्नकर्ता :** त्यात थोडाफार तन्मयाकार झालो आणि परत आलो.

**दादाश्री :** हो परत आलात.

**प्रश्नकर्ता :** तर हा संघर्ष टाळण्याचा उपाय केवळ प्रतिक्रमणच आहे की मग दुसरा कोणता उपाय आहे?

**दादाश्री :** दुसरे कोणतेच हत्यार नाही.

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** ही जी आपली 'नऊ कलमे' आहेत, तीसुद्धा प्रतिक्रमणेच आहेत, दुसरे कोणतेही हत्यार नाही. या जगात प्रतिक्रमणाशिवाय दुसरे कोणतेही साधन नाही. प्रतिक्रमण हे सर्वोच्च आहे, कारण हे जग अतिक्रमणामुळेच उत्पन्न झाले आहे.

**प्रश्नकर्ता :** परंतु दादाजी, प्रतिक्रमण तर इतक्या वेगाने होत असतात, अगदी त्याचक्षणी.

**दादाश्री :** हो, त्याचक्षणी होतात.

**प्रश्नकर्ता :** हे तर आश्चर्यच आहे, दादाजी.

**दादाश्री :** हो, आश्चर्यच आहे.

**प्रश्नकर्ता :** दादांची कृपा, अजबच आहे.

**दादाश्री :** हो, अजब आहे. केवळ वैज्ञानिक गोष्ट आहे.

## तो अहंकार नाही का?

**प्रश्नकर्ता :** हे सर्व तर इतके आश्चर्यकारक आहे, 'घडले तेच करेक्ट', 'भोगतो त्याची चूक', ही सारी जी वाक्ये आहेत, ती तर सर्व अद्‌भुत आहेत. आणि दादांच्या साक्षीने प्रतिक्रमण करतो ना, तर त्यांची स्पंदने पोहोचतातच.

**दादाश्री :** हो, खरे आहे, स्पंदने लगेचच पोहोचतात, आणि त्याचे फळही मिळते. आपल्याला खात्री होते, असे वाटते की ह्याचा परिणाम होत आहे. सर्व स्पंदने पोहोचतात.

**प्रश्नकर्ता :** परंतु दादाजी, आपल्याला प्रतिक्रमण करावे लागते, याला आपला अहम्‌च म्हटला जाईल ना?

**दादाश्री :** नाही. कारण आपल्याला प्रतिक्रमण करायचे नाही, तो गुन्हा 'चंदुभाई'चा आहे, शुद्धात्मा तर केवळ 'जाणतो', शुद्धात्म्याने कोणताच गुन्हा केलेला नाही. म्हणून 'त्याला' प्रतिक्रमण करावे लागत नाही. फक्त ज्याने गुन्हा केला आहे 'त्याला'च, चंदुभाईच्या नावाने गुन्हा केला म्हणून 'चंदुभाई'च प्रतिक्रमण करील. अतिक्रमणामुळेच हा संसार उभा झाला आहे. अतिक्रमण कोण करतो? अहंकार आणि बुद्धी दोन्ही मिळून करतात.



# [ 11 ]

# पुरुषार्थ, प्राकृत दुर्गुणांच्या समोर

## रागातून द्वेष आणि द्वेषातून राग

**प्रश्नकर्ता :** विनाकारण कोणाला वैरभाव होत असेल, विनाकारण कोणी द्वेष करत असेल, विनाकारण कोणी कपट करत असेल तर काय त्याचा अर्थ असा आहे की कोणत्या तरी जन्मात आमचा त्याच्यावर राग (मोह, आसक्ती) होता?

**दादाश्री :** हो, आपणच तसा हिशोब केला आहे. त्याचीच ही प्रतिक्रिया आहे.

**प्रश्नकर्ता :** तर मग हा आपला कोणता हिशोब असेल? आपल्या रागाचा की द्वेषाचा?

**दादाश्री :** कपट, वगैरे सर्व रागामध्ये मोडते आणि अहंकार आणि क्रोध हे सर्व द्वेषामध्ये मोडतात. कपट आणि लोभ रागामध्ये मोडतात. लोभाची इच्छा झाली ते सर्व रागामध्ये येते. मी काय सांगू इच्छितो ते तुम्हाला समजते ना?

**प्रश्नकर्ता :** हो, समजते.

**दादाश्री :** राग म्हणजे काय? तर लोभ आणि कपट. मान आणि क्रोध म्हणजे द्वेष. जर कोणी कपट करत असेल तर ते रागामध्ये गेले. ज्यांच्यावर आपल्याला राग असतो ना, तो कपट करत राहतो.

रागाशिवाय तर कुठलाही जन्म गेला नाही. जोपर्यंत ज्ञान मिळत नाही, तोपर्यंत राग व द्वेष हे दोनच होत राहतात, याशिवाय तिसरी वस्तूच नसते.

**प्रश्नकर्ता :** परंतु दादा, द्वेष हे तर रागाचेच (मोह, आसक्तीचेच) संतान आहे ना?

**दादाश्री :** हो, रागाचेच संतान आहे, पण तो त्याचा परिणाम आहे, संतान म्हणजे त्याचा परिणाम आहे. जर राग खूप असेल तर ज्याच्याबद्दल राग आहे तो राग जर एक्सेस (प्रमाणाबाहेर) झाला तर परत त्याच्याबद्दलच द्वेष होऊ लागतो. कोणतीही गोष्ट प्रमाणाबाहेर गेली की मग ती आपल्याला आवडेनाशी होते आणि आवडेनाशी होणे यालाच द्वेष म्हणतात. समजले ना?

**प्रश्नकर्ता :** हो, समजले.

**दादाश्री :** आपण हे समजून घ्यायला हवे की ह्या सर्व आपल्याच रिॲक्शन्स आलेल्या आहेत! आपण त्याला मानपूर्वक बोलावतो परंतु जर आपल्याला त्याचे तोंड वाकडे दिसले तर समजावे की ती आपलीच रिॲक्शन आहे. मग अशा वेळी काय करावे? प्रतिक्रमण करावे. याशिवाय दुसरा कोणताच उपाय नाही. पण अशा वेळी लोक काय करतात? तर स्वत:ची तोंडेही वाकडी करतात! म्हणजे तो जसे वागतो तसेच तेही वागतात. आपण आता शुद्धात्मा झालो आहोत, म्हणून त्याला समजावून-उमजावून, स्वत:ची चूक स्वीकारूनही तो विषय संपवून टाकावा. आम्ही तर ज्ञानी पुरुष असूनसुद्धा सर्व चुका स्वीकारून निपटारा करतो.

## मान, शुभ मार्गासाठी

**प्रश्नकर्ता :** परंतु दादा, मानाचे परमाणू खूपच असतील, तर ते नुकसानदायक आहेत का?

**दादाश्री :** कोणते?

**प्रश्नकर्ता :** असा मान असेल की 'चला, आता ह्याचे भले करू, ह्याचे चांगले करू.'

**दादाश्री :** नाही, अशी कोणतीही गोष्ट नुकसानदायक नाही. दुसऱ्यांचा तिरस्कार करणारा मान मात्र व्यक्तीसाठी नुकसानदायक आहे.

मान कशाला म्हणावे? तर जो मान एक्सेस असेल, लोकांचा तिरस्कार करणारा मान असेल त्याला. बाकी, 'मी याचे चांगले करू' याला तर काहीच हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** मी जेव्हा खूप पृथक्करण करतो, तेव्हा मला असे वाटते की, आत सूक्ष्मपणे मान-प्रतिष्ठा अशी एक इच्छा असते, पण ती कोणाचा फायदा घेण्यासाठी नाही, तर कोणाचे तरी भले करण्यासाठी.

**दादाश्री :** हा जो (तुमचा) मान आहे ना, त्या मानानेच तुम्हाला इथे खेचून आणले आहे, जर हा मान भरलेला नसता ना, तर तुम्ही दुसऱ्या कुठल्या तरी ठिकाणी असता.

**प्रश्नकर्ता :** कारण सीमंधर स्वामीचे मंदिर बनत असते ना, तेव्हा मला वाटते की मी तर या स्पर्धेत उतरावे.

**दादाश्री :** जगात यासारखी दुसरी कोणती गोष्टच नाही ना! ही तर सर्वात चांगली गोष्ट आहे.

बाकी, मान कशाला म्हणतात? ते मी तुम्हाला सांगतो. आपल्यामुळे जर कोणाला दुःख झाले, आणि आपले वर्तनही तसेच असेल, तर त्याला मान म्हणतात. आणि इथे तर उलट लोकांना खूप आनंद होतो. सकाळी उठल्यावर ज्यांचा भगवंतावर भाव आहे, त्यांच्यावर दादांचा भाव संपूर्णच असतो. म्हणजे ही तर चांगली गोष्ट आहे. असे कोणाला होत नाही. मग ते मंदिर बनो वा ना बनो, ती वेगळी गोष्ट आहे, परंतु तुम्हाला हा फार उच्च प्रकारचा भाव झाला, ते तर खूप चांगले म्हणायला हवे. हे सारे समजले ना तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** हो, मला सतत अशी भावना राहते की, काही तरी करू, काही तरी करू, आणि जरी कितीही केले तरी पण मला असेच वाटते की अजून तर मी काहीच केले नाही.

**दादाश्री :** हो, असे वाटत राहते, जणू भुकेले आणि भुकेलेच आहोत! खूप उत्कृष्ट गोष्ट आहे ही! क्वचितच एखाद्या महापुण्यशालीला प्राप्त होते अशी गोष्ट आहे.

## हे आहेत पूर्वी भरलेले परमाणू

**प्रश्नकर्ता :** ईर्षा होत असते, ती होऊ नये यासाठी काय करावे?

**दादाश्री :** त्याचे दोन उपाय आहेत, ईर्षा झाल्यावर पश्चात्ताप करावा, आणि दुसरा उपाय, तर ही जी ईर्षा होत असते ती तुम्ही करत नाही. ईर्षा, हे तर पूर्व जन्मी भरलेले परमाणू आहेत, त्यांचा स्वीकार केला नाहीत, तन्मयाकार झाला नाहीत, तर ईर्षा संपून जाते. ईर्षा झाल्यावर पश्चात्ताप करणे हेच उत्तम आहे.

## शंकेपासून निःशंकता

**प्रश्नकर्ता :** मला समोरच्या व्यक्तीची शंका घ्यायची नसते तरी पण शंका आलीच तर ती कशी दूर करावी?

**दादाश्री :** तेव्हा मग त्याच्या शुद्धात्म्याला स्मरून क्षमा मागावी, आणि त्याचे प्रतिक्रमण करावे. पूर्वी चुका केल्या होत्या, म्हणून शंका येतात.

**प्रश्नकर्ता :** आपल्या कर्मांच्या उदयामुळे आपल्याला जे काही भोगावे लागते, त्यासाठी जर आम्ही प्रतिक्रमण करत राहिलो तर ते भोगणे कमी होईल ना?

**दादाश्री :** हो, कमी होईल. आणि ते आपल्याला भोगावे लागत नाही. 'आपण' तर 'चंदुभाई'ला सांगावे, 'तू प्रतिक्रमण कर', की मग कमी होईल. जसे जसे प्रतिक्रमण करू, तसे तसे ते कमी होत जाईल! मग सर्व काही ठीक होऊन जाईल.

हे सर्व तर कर्मांच्या उदयामुळे एकत्र आले आहेत, याला अज्ञानी पण बदलू शकत नाही, आणि ज्ञानी पण बदलू शकत नाही, तर मग आपण दोन्ही बाजूचे नुकसान का करून घ्यावे?

**प्रश्नकर्ता :** दादाजी हे तुम्ही बरोबर बोललात की हे जग पहिल्यापासून असेच आहे.

**दादाश्री :** यात दुसरे काही नाहीच. हे तर झाकलेले आहे म्हणून असे वाटते, आणि ही शंकाच त्रास देत असते. म्हणून शंका आली तर तिला येऊ द्यायची नाही, आणि प्रतिक्रमण करावे. प्रतिक्रमण करायचे जर बाकी ठेवले नाही तर तुमच्यावर कोणाला शंकाच येणार नाही, नि:शंकपद येते.

कोणाबद्दल थोडासुद्धा उलट-सुलट विचार आला तर तो लगेचच धुऊन टाकावा. तो विचार थोडा वेळ जरी टिकला तरी तो समोरच्या व्यक्तीपर्यंत पोहोचतो आणि तो उगवतो चार तासानंतर, बारा तासानंतर, किंवा दोन दिवसानंतरही तो उगवतो, म्हणून स्पंदनाचे वाहणे त्याबाजूला जाता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी आम्ही काय करावे?

**दादाश्री :** त्वरितच प्रतिक्रमण करून पुसून टाकावे. प्रतिक्रमण झाले नाही तर दादांना स्मरून किंवा तुमच्या इष्ट देवांना स्मरून थोडक्यात म्हणावे, 'हे विचार येत आहेत ते बरोबर नाहीत, ते माझे नाहीत.'

जंगलात जाताना लौकिक ज्ञानाच्या आधारे दरोडेखोर भेटले तर काय होईल? किंवा वाटेत वाघ दिसला तर काय होईल? असे विचार आले तर त्याचक्षणी प्रतिक्रमण करावे. शंका आली की बिघडलेच समजा. शंका येऊ द्यायची नाही. कोणत्याही व्यक्तीवर, कुठलीही शंका आली, तर प्रतिक्रमण करावे. शंकाच दु:खदायी आहे.

शंका आल्यावर प्रतिक्रमण करवून घ्यावे. आणि आपण तर ह्या ब्रह्मांडाचे मालक आहोत, आपल्याला शंका का यावी? माणूस म्हटल्यावर शंका तर येईल. पण चूक झाल्यावर रोख प्रतिक्रमण करून घ्यावे.

ज्याच्याबद्दल शंका येत असेल त्याचे प्रतिक्रमण करावे. नाही तर शंका तुम्हाला खाऊन टाकेल.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, संशय म्हणजे ग्रंथी का?

**दादाश्री :** संशय म्हणजे शंका ना?

**प्रश्नकर्ता :** हो, त्याला दुर्गुण म्हणायचे की ग्रंथी?

**दादाश्री :** तो दुर्गुणही नाही, आणि ग्रंथीही नाही. तो तर भयंकर आत्मघात आहे, एक प्रकारचा अहंकारच आहे. शंका म्हणजे संदेह करणे. संदेहापासून शंकेपर्यंतची सर्व लक्षणे आत्मघाती आहेत, त्याने काहीच फायदा होत नाही, भयंकर नुकसानच होत राहते. म्हणून आम्ही शंका करण्यास मनाई करतो. कोणीही शंका करू नका. शंका आली आणि खरोखर तसेच आहे असे जरी वाटले तरी पण शंका घेतल्याने काहीच निष्पन्न होत नाही.

अर्थात हा एक प्रकारचा अहंकार आहे. माझे म्हणणे समजले का?

**प्रश्नकर्ता :** मग शंकेचा उपाय म्हणून प्रतिक्रमण करावे का? शंका झाली की त्वरितच प्रतिक्रमण करावे?

**दादाश्री :** हो, ज्याच्याबद्दल शंका आली, त्याचे प्रतिक्रमण करावे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे शंकेचा हाच एक उपाय आहे?

**दादाश्री :** हो, हाच उपाय आहे, नाही तर शंका तुम्हाला खाऊन टाकेल.

**प्रश्नकर्ता :** कोणतीही शंका असेल तर त्याचे समाधान करून घेतलेले बरे, त्यामुळे त्या शंकेचे निरसन होईल.

**दादाश्री :** कोणत्याही गोष्टीबद्दल शंका वाटत असेल, तर त्याचे नीट परीक्षण करावे आणि मग झोपून जावे. आणि शेवटी परीक्षणही बंद करून टाकावे.

## भयाचे मूळ कारण

**प्रश्नकर्ता :** हे जे भय आहे, भयसंज्ञा, ती कोणत्या प्रकारची आहे? ती कशी उत्पन्न होते, आणि कशा प्रकारे चार्ज आणि डिस्चार्ज होते?

**दादाश्री :** जेवढे स्वत:ला टेम्पररी (विनाशी) समजाल तेवढे अधिक भय वाटेल.

**प्रश्नकर्ता :** मला समजले नाही, स्वत:ला टेम्पररी समजणे म्हणजे काय?

**दादाश्री :** मी 'चंदुभाऊच' आहे, ते टेम्पररी, आणि स्वत:ला तसेच मानतो, म्हणून भय वाटत राहते. 'मी शुद्धात्मा आहे, मला काहीच होत नाही, मी सनातन आहे' तर मग कसले भय?

**प्रश्नकर्ता :** मग भय वाटणार नाही.

**दादाश्री :** फॉरेनच्या लोकांना टेम्पररी जास्त वाटते, आपल्याकडील लोकांना टेम्पररी कमी वाटते, कारण कर्ता भाव झाला आहे. मी करतो, आणि मी केल्याने ही कर्मे होत आहेत. म्हणून येथे फॉरेनच्या तुलनेने भय कमी वाटते. फॉरेनवाले तर चिमणीप्रमाणे उडून जातात.

## शंका आणि भय

**प्रश्नकर्ता :** भय आणि शंका, या दोन्हीमध्ये परस्पर संबंध आहे का?

**दादाश्री :** शंकेमुळेच भय उत्पन्न होते ना! आणि भयामुळे परत शंका निर्माण होते. दोन्ही 'कार्य-कारण' असे आहेत. शंका तर बिलकुल बाळगू नये. कोणत्याही बाबतीत शंका बाळगू नका. मुलगा बिघडत आहे, किंवा मुलगी बिघडत आहे, अशी शंका घेऊ नका. पण तसे होऊ नये यासाठी प्रयत्न करा.

**प्रश्नकर्ता :** पण शंका तर वारंवार होतच असते.

**दादाश्री :** शंका, ही तर स्वत:ची आत्महत्या आहे. शंका मुळीच करू नका.

**प्रश्नकर्ता :** पण ती शंका का येते? शंका करण्याचा तर काही प्रश्नच येत नाही. तरीही क्षणोक्षणी शंका येतच राहते.

**दादाश्री :** शंका येते, म्हणून आपण म्हणावे की 'भाऊ, ही शंका माझी नाही, माझी नाही', शंका झाल्यावर त्वरित असे म्हणावे.

आपल्याला शंका होत नाही. शंकेमुळेच हे जग सडत आहे, त्याचे पतन होत आहे, स्वतः मरणार आहे, पण अशी शंका का येत नाही? मरणार नाही का?

**प्रश्नकर्ता :** मरणार आहे हे तर माहीतच असते.

**दादाश्री :** मग ती शंका का येत नाही? मरण्याची शंका आली की तो लगेच उपटून फेकून देतो, शंका आली की लगेचच दूर करतो. कारण खूप भीती वाटते. म्हणजे शंका काढून टाकावी, उपटून टाकावी. शंका वाटल्याबरोबर लगेचच उपटून टाकावी.

## जळलेल्या सुंभासारखी होते

कोणत्याही कृत्याचा पश्चात्ताप केला तर, त्या कर्माचा बहुतेक हिस्सा नष्ट होऊन जातो. नंतर जळून गेलेल्या सुंभासारखे त्याचे फळ मिळते. पुढच्या जन्मी त्या जळलेल्या दोरीला जरासा स्पर्श करताच ती विस्कटून पडते. (राख होते). कोणतीही क्रिया अशीच व्यर्थ जात नाही. प्रतिक्रमण केल्यामुळे ती दोरी जळून जाते, पण डिजाईन तसेच्या तसेच राहते. मग पुढच्या जन्मी काय करावे लागेल? तर जरासे झटकले की लगेच उडून जाईल.

## अक्रमात क्रियामात्र मृत

केलेल्या क्रिया अशाच जात नाहीत, परंतु हे ज्ञान घेतल्यानंतर, तुम्ही चेतन बाहेर वेगळे केले, त्यानंतरच्या सर्व क्रिया मृत क्रिया आहेत. निश्चेतन क्रिया आहेत, म्हणून आता त्यांची जबाबदारी राहत नाही.

हे अक्रम विज्ञान आहे. असे कोणतेही विज्ञान नाही की, ज्यामुळे पूर्णपणे संसारात राहूनही, मोहात राहूनही, मोक्षाला जाऊ शकू. असे दुसरे कोणतेही विज्ञान नसते, असे हे विज्ञान आहे.

मोक्षाला जाणे म्हणजे काय? क्रमिक मार्गात स्टेप बाय स्टेप

चढायचे, म्हणजे जितका मोह कमी होतो, तितक्या पायऱ्या तुम्ही चढता शिवाय आणि क्रमिक मार्गात तर ज्ञानींनाही चिंता असते, आत आनंद असतो आणि बाहेर चिंता असते. याउलट इथे तर बाहेरही चिंता नाही आणि आतही चिंता नाही. चिंतारहित जीवन जगात कुठेही असू शकत नाही, परंतु या अक्रम विज्ञानाच्या प्रतापाने हजारो लोकांना ते प्राप्त झाले आहे!!!

## नंतर ते कमी होत जातात

**दादाश्री :** आता प्रतिक्रमणे करावी लागतात का?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणे तर करावीच लागतील ना?

**दादाश्री :** पण आता कमी झाली आहेत ना? पूर्वी इतकी नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** हो, आता कमी झाली आहेत पण तरी करावी तर लागतात.

**दादाश्री :** प्रतिक्रमण, प्रत्याख्यान आणि आलोचना, हेच तर साधन आहे मोक्षाला जाण्यासाठी. अन्य कोणतेच साधन नाही. कर्मे तर होतच राहतील. इच्छा नसली तरी कर्मे होतच राहतील.

**प्रश्नकर्ता :** कर्मे तर आडवी येऊन घशात अडकतात.

**दादाश्री :** हो, घशात अडकतात. कर्माचा नियमच असा आहे. पण तुम्हाला हे कळतेच ना की हे अतिक्रमण झाले. समभावाने निकाल झाला नाही, तर अतिक्रमण होते. अतिक्रमण झाल्यावर तू काय करतेस?

**प्रश्नकर्ता :** मी प्रतिक्रमण करते.

**दादाश्री :** छान. तशी तर तू फार पक्की (हुशार) आहेस. ही जेवढी बाहेर आहे तेवढी आतही आहे, बरे का! इतकी पक्की आहे की अजिबात कर्मबंधन होणार नाही अशी वागते. म्हणजे चांगलेच आहे ना! खूपच चांगले म्हणायचे. यात तर पक्के असलेलेच बरे. संसारात पक्का असणारा माणूस स्वतःचे नुकसान करत राहतो. आणि यात जर पक्का झाला तर खूप चांगले.

## इफेक्टला इफेक्टने तोडायचे

**प्रश्नकर्ता :** आपण प्रतिक्रमण करतो, ते कर्मामुळेच करतो ना? प्रतिक्रमण करतो ते आपल्या हातात नाही. हा तर इफेक्ट (परिणाम) आहे ना?

**दादाश्री :** प्रतिक्रमण, हा इफेक्टच आहे, परंतु इफेक्टला इफेक्टने तोडायचे आहे, तर मग ते साफ होऊन जाईल. त्वरित धुऊन टाकायचे. आपण चंदुलालला सांगावे की, 'चंदुभाई धुऊन टाका. हे असे का केले?' ज्यामुळे समोरच्याला दु:ख होत नाही, अशी कर्मे करण्यात काही हरकत नाही. सर्व काही खा-प्या, जितकी कारली खायची असतील तितकी खा ना! गूळ घालूनही कारली खा, कारण कडू रसाची शरीराला गरज आहे, म्हणून जर कारली अशीच खाता आली नाही तर गूळ घालून खा, पण खा.

## 'तो' आहे पुरुषार्थ

कुणाला किंचितमात्र दु:ख होता कामा नये. इथे तर अजाणतेपणी अपार दु:खे होतात. समोरच्याला दु:ख होणार नाही, अशा प्रकारे तुम्ही व्यवहार करा. याला 'क्रमण' म्हणतात. या उलट अतिक्रमण केव्हा म्हणायचे? समजा, तुम्हाला घाई असते, आणि तो चहा प्यायला निघून जातो, नंतर जेव्हा तो परत येतो तेव्हा लगेच तुम्ही त्याच्यावर ओरडता, 'कुठे गेला होतास? नालायक आहेस, असा आहेस, तसा आहेस', याला अतिक्रमण म्हणतात. आणि ते तुमच्याकडून सहजच होऊन जाते. तशी काही तुमची इच्छा नसते.

अतिक्रमण होणे हे स्वाभाविक आहे, परंतु प्रतिक्रमण करणे, हा तर पुरुषार्थ आहे. प्रतिक्रमण केल्याने जे काही केले गेले असेल, ते स्वच्छ होऊन जाते. प्रतिक्रमणामुळे पडलेला डाग लगेच स्वच्छ होऊन जातो.



# [ 12 ]
# सुटतात व्यसने, ज्ञानींच्या पद्धतीने

## निकाल करा समभावाने

घरी जर कधी वरण जास्त तिखट झाले, तर आपण लगेच ओरडतो की 'हे वरण बिघडवले आहे, असे आहे, तसे आहे', पण नंतर आपल्याला कळते की ही तर आपली चूक झाली. आपण या फाइलचा समभावाने निकाल केला नाही. फाइलचा समभावाने निकाल करणे म्हणजे काय? तर आपल्याला वरण थोडे कमी घेऊन, कसेही करून फाइलचा व्यावहारिक रित्या निकाल करावा. अन्यथा आपल्याला त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल. असा दोष लगेच तुझ्या लक्षात येतो ना?

**प्रश्नकर्ता :** हो, लगेच लक्षात येतो.

## 'त्यामुळे' शारीरिक आजारही बरे होतात

**दादाश्री :** आपले ज्ञान प्रतिक्रमण करण्यास सांगते. कमी खाल्ले तेही अतिक्रमण आहे, का तर दोन वाजता परत भूक लागते, आणि जास्त खाल्ले तर तेही अतिक्रमणच आहे, म्हणजे नॉर्मलिटीमध्ये राहायला हवे.

शरीराचे जेवढेही रोग आहेत, ते सारे अतिक्रमणामुळे झाले आहेत. ते सर्व रोग प्रतिक्रमण केल्याने बरे होतात.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** रोगाचे मूळ शोधावे लागते. कोणत्या निमित्ताने रोग झाला आहे ते शोधावे लागते. प्रत्येकासोबतच्या संबंधाची नीट चौकशी करावी लागते. जेवढे संबंध आठवतात, तेच गरजेपेक्षा जास्त आहेत. त्याच फाइली आहेत. जे संबंध आठवत नाहीत त्यांचा काही त्रास नाही.

प्रमाणापेक्षा जास्त देणे, जबरदस्ती करणे, तेही दुःखच आहे. तुम्हाला जर जास्त वाढले तर तुम्ही काय कराल?

**प्रश्नकर्ता :** मग आम्हाला नको असे ठामपणे सांगावे लागेल. कारण जर खाल्ले तर फार त्रास होईल.

**दादाश्री :** हात जोडून, कसेही करून निपटारा करावा. या संसारात सर्व असेच आहे. नॉर्मलिटी आणणे कठीण आहे.

## नियमभंगासाठी प्रतिक्रमण

आपल्या ध्येयाप्रमाणे जे काही होऊ शकले नाही, ते सर्व लिहून रात्री प्रतिक्रमण करावे, एवढे केले तरी खूप झाले.

**प्रश्नकर्ता :** दादा, अजूनही कित्येकदा जरा जास्त खाल्ले जाते, पण त्याचे प्रतिक्रमण करतो.

**दादाश्री :** त्याला काही हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्ही अशा प्रकारे प्रतिक्रमण करतो की, 'हे दादा भगवान! ज्ञानी पुरुषांकडून मी जो नियम घेतला आहे, त्याचा भंग झाला आहे, त्याबद्दल मी क्षमा मागतो', अशा प्रकारे केले तर चालेल ना?

**दादाश्री :** म्हणजे आपण नियमाच्या पक्षातच आहोत, आणि हा जो देह आहे तो नियमाबाहेर गेला आहे, कारण आपण सत्संग करवितो ना, म्हणून आपण नियमाच्या आधीन आहोत हे निश्चित आहे. आपल्याला आज्ञा पाळायची आहे.

**प्रश्नकर्ता :** हो.

## प्रत्याख्यान करून चहा प्यायलो

**प्रश्नकर्ता :** मला सिगारेट ओढण्याची वाईट सवय लागली आहे.

**दादाश्री :** त्यासाठी तू असे मान की, हे चुकीचे आहे, वाईट गोष्ट आहे, आणि जर कोणी विचारले, की सिगारेट का पितोस? तर त्याचे समर्थन करू नकोस, 'वाईट आहे' असे म्हण. किंवा 'भाऊ, हा माझा कमकुवतपणा आहे', असे म्हण. असे केले तर कधी ना कधी हे व्यसन सुटेल, नाही तर कधीच सुटणार नाही. सोडण्यासाठी प्रयत्न करतोस का?

**प्रश्नकर्ता :** हो, करतो तरी पण सुटत नाही.

**दादाश्री :** नाही, पण असे प्रयत्न करू नये. आपण त्याचे समर्थन करायचे नाही. कोणी म्हटले की 'तू सिगारेट सोड ना' तर तू म्हणतोस, 'अहो नाही. ती सोडायची गरज नाही', असे काही तरी सांगून तू त्याचे समर्थन करतोस. अपमान झाल्यावर ती (सवय) सुटणार होती, पण तू तर म्हणतोस 'नाही, सिगारेट ओढलीच पाहिजे.' मग काय होईल? ती सवय सुटणारच नाही. आणि 'ही वाईट सवय आहे', असे जर मानले तर कधी ना कधी ती सुटेल.

**प्रश्नकर्ता :** जो डिस्चार्ज होत आहे, त्याला आम्ही पाहत राहिलो आणि त्याचे प्रतिक्रमण केले नाही, तर तो वाढेल की कमी होईल?

**दादाश्री :** तो काही वाढणार नाही. प्रतिक्रमण केले नाही, तर जे परमाणू आहेत, ते मग पुढील जन्मी परत दिसतील.

**प्रश्नकर्ता :** परंतु आपण आता (नवीन) भरत नसू, फक्त पाहत असू तर?

**दादाश्री :** प्रतिक्रमण करण्याची गरजच नाही. शंभर टक्के गरज नाही. पण तरी प्रतिक्रमण करा असे मी का म्हटले, तर त्याशिवाय तुम्ही त्या अभिप्रायापासून सुटू शकणार नाही. प्रतिक्रमण केले, म्हणजे तुम्ही त्या अभिप्रायाचे विरोधी झालात. आता तो अभिप्राय तुमचा राहिला

नाही, नाही तर तो अभिप्राय थोडा तरी शिल्लक राहील. या विज्ञानात प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. पण हे फक्त यासाठीच ठेवले आहे, नाही तर 'काही हरकत नाही' असे म्हटले तर आपला तो अभिप्राय शिल्लक राहील.

शास्त्रकारांनी विरोध केला की, तुम्ही याच्यात प्रतिक्रमण का ठेवले आहे? परंतु त्यांना माहीत नाही की, हा अक्रम मार्ग आहे आणि लोकांचा तो अभिप्राय शिल्लक राहील. एक तर दारू प्यायली ती प्यायली आणि जर प्रतिक्रमण केले नाही तर तो अभिप्राय तसाच राहील.

आम्हीसुद्धा प्रतिक्रमण करतोच ना. अभिप्रायापासून मुक्त व्हायलाच हवे. प्रतिक्रमण करण्यास हरकत नाही, पण अभिप्राय शिल्लक राहणे, याला मात्र हरकत आहे.

म्हणजे सायंटिफिकली (वैज्ञानिक रूपाने) त्याची गरज नाही, पण अजून टेक्निकली (तांत्रिक रित्या) तुम्हाला त्याची गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** आणि त्यात नुकसान तरी काय आहे? प्रतिक्रमण करण्यात काय नुकसान आहे?

**दादाश्री :** नुकसानीचा प्रश्न नाही.

**प्रश्नकर्ता :** मग?

**दादाश्री :** नुकसान आहे किंवा नाही यासाठी नाही, एक्झॅक्टनेससाठी ते ठेवले आहे.

'काय नुकसान आहे' असे तर बोलू शकत नाही. 'काय नुकसान आहे असे कुठे बोलू शकतो?' तर आपल्या सामान्य व्यापारामध्ये असे बोलू शकतो.

प्रतिक्रमण करणारी व्यक्ती सर्वोच्च वस्तू प्राप्त करते. म्हणजे हे टेक्निकली आहे, सायंटिफिकली पाहिले तर त्याची गरज नाही. पण टेक्निकली मात्र गरजेचे आहे.

**प्रश्नकर्ता :** सायंटिफिकली म्हणजे कसे?

**दादाश्री :** सायंटिफिकली तर तो त्याचा 'डिस्चार्ज' आहे, मग त्याला याची गरजच काय? कारण तुम्ही वेगळे आहात आणि ते वेगळे आहेत. पण लोकांमध्ये इतक्या साऱ्या शक्ती नाहीत! प्रतिक्रमण केले नाही, तर तो अभिप्राय तसाच राहतो. आणि प्रतिक्रमण केले म्हणजे तुम्ही त्या अभिप्रायापासून वेगळे झालात, ही गोष्ट तर निश्चितच आहे ना?

जेवढे अभिप्राय राहतील तेवढे हे मन शिल्लक राहील, कारण मन हे अभिप्रायांनी बनत असते. पुढे-मागे इतके विचार केले तरी पण राहूनच जाते, म्हणून मग थोडे फार (मन) शिल्लक राहीलच ना? पण आता त्याचे फळ येणार नाही. ते आपल्याला आतापासूनच समजते की, बघ रे बाबा, हेच जर असे आहे, तर ते याच्या तुलनेत...

**प्रश्नकर्ता :** म्हणजे याचा अर्थ असा झाला की, 'चंदुभाई' आणि 'चंदुभाई'चे परमाणू डिस्चार्ज आहेत. आता जर प्रतिक्रमण केले नाही तर तितके परमाणू शिल्लक राहतील.

**दादाश्री :** तेवढ्या प्रमाणात मन आपल्याला त्रास देईल. जर दारू प्यायलेला असेल तर कसे वाटेल?

**प्रश्नकर्ता :** म्हणजे कॉजेसच्या रूपाने पुढच्या जन्मासाठी बाकी राहतील?

**दादाश्री :** हो! अभिप्रायाने मन बनते, आणि अभिप्राय बाकी राहिले म्हणजे तेवढे मनही बाकी राहिले.

**प्रश्नकर्ता :** परंतु दादा, ज्ञान मिळण्याआधी जे झाले असेल, त्याचे काय?

**दादाश्री :** त्याचा तर काही प्रश्नच नाही. बहुतेक ते सर्व या ज्ञानानेच संपलेले असते. आणि जरी थोडेफार राहिले असेल तरी त्यामुळे पुढील जन्मात काही त्रास होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हे ज्ञान घेतल्यानंतरही थोडेफार बाकी राहणार ना?

**दादाश्री :** हो, राहणार तर! आपला प्रश्न आपल्यालाच सोडवायचा आहे. प्रतिक्रमण केले नाही, आळस केला, तर तेवढे बाकी राहील. पुरुषार्थ तर करावाच लागेल ना? 'पुरुष' झाल्यानंतर पुरुषार्थ केला नाही तर कसे चालेल?

आता चंदुभाईच्या कोणत्याही कार्याशी तुमचे काहीही देणेघेणे नाही, पण तुम्हाला चंदुभाईवर लक्ष ठेवले पाहिजे. 'तो काय करतो?' 'किती बिड्या ओढतो?' आणि जर चंदुभाईने अतिक्रमण केले तर त्याला सांगावे की, 'प्रतिक्रमण कर.' क्रमणाचा अधिकार आहे, अतिक्रमणाचा नाही.

आम्ही काय म्हटले की, आता व्यसनी झाला आहात त्याला माझी हरकत नाही, पण जे व्यसन झाले असेल त्याबद्दल भगवंताकडे प्रतिक्रमण करावे की, 'हे भगवंता! ही दारू पिऊ नये, तरी पण मी पीत आहे, म्हणून त्यासाठी मी माफी मागतो, पुन्हा कधी पिणार नाही, अशी मला परम शक्ती द्या.' 'एवढे कर रे बाबा!' याउलट लोक तर विरोध करतात की तू दारू का पितोस? अहो, असे करून तर तुम्ही त्याला आणखी जास्त बिघडवत आहात. त्याचे अहित करत आहात. मी काय म्हटले, तू जरी केवढाही मोठा गुन्हा केला असशील तरी पण याप्रमाणे प्रतिक्रमण करत जा. कारण प्रतिक्रमणाचा अर्थ काय आहे?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण म्हणजे 'माझ्याने प्रकृतीवश कर्मे तर होऊन जातात, परंतु मला त्याबद्दल पश्चात्ताप होतो, आणि मला ते सर्व सोडायचे आहे, असेच ना?

**दादाश्री :** हो. पण हा तर पश्चात्ताप झाला, पण प्रतिक्रमणाचा अर्थ काय आहे? की तो स्वत: 'दारू प्यायची आहे' या अभिप्रायाच्या विरोधात आहे. आणि ज्याचा हा अभिप्राय सुटला असेल तो मग पुढील जन्मात दारू पिणारच नाही. अर्थात प्रतिक्रमण करणे सोडू नये. म्हणूनच ही अशी सर्व वाक्ये लिहिली आहेत की त्यामुळे सर्व काही सुटेल.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, तुम्ही सकाळी 'चहा' पिताना म्हणालात की, आम्ही प्रत्याख्यान केल्यानंतर चहा प्यायलो.

**दादाश्री :** ओहोहो! होय.

**प्रश्नकर्ता :** त्याबद्दल विचारायचे आहे.

**दादाश्री :** तसे तर मी 'चहा' पीत नाही. तरी पण चहा पिण्याचे संयोग जुळून येतात. आणि जेव्हा अनिवार्यपणे असे घडते तेव्हा काय करावे लागते? जर प्रत्याख्यान केल्याशिवाय प्यायलो तर चहा मला चिकटणार. म्हणून तेल चोपडून मग ते रंगीत पाणी ओतायचे, पण तेल चोपडल्यानंतर. हो, आम्ही प्रथम प्रत्याख्यानरूपी तेल चोपडतो, नंतर हिरव्या रंगाचे पाणी ओततो, पण ते आत चिकटत नाही. म्हणून मी आधी प्रत्याख्यान केले आणि नंतर चहा प्यायलो.

हे एवढे समजण्यासारखे आहे. हे सारे प्रत्याख्यान करून करा. समजले ना? प्रतिक्रमण तर जेव्हा अतिक्रमण होते, तेव्हा करायचे. चहा पिणे याला अतिक्रमण म्हणत नाही. चहा तर अनिवार्यपणे प्यावा लागतो. त्याला अतिक्रमण म्हणत नाहीत. परंतु जर प्रत्याख्यान केले नाही, तेल चोपडले नाही, तर थोडेफार चिकटेल. तेव्हा आता सर्व काही तेल चोपडून (प्रत्याख्यान करून) करा ना!

**प्रश्नकर्ता :** नक्की.

**दादाश्री :** मोटार घेऊन फिरायला जाता, तेव्हा प्रत्याख्यान करून जावे. हे मला अनिवार्यपणे करावे लागत आहे, असे म्हणून मी प्रत्याख्यान करतो.

**प्रश्नकर्ता :** यांना घरी बटाटे आणि कांदे खावे लागले होते.

**दादाश्री :** तर त्याचे प्रतिक्रमण करावे. प्रतिक्रमण कराल तर चालेल. संयोगानुसार वागावे.

## शारीरिक वेदनीयमध्ये

**प्रश्नकर्ता :** जेव्हा समोरच्याला दु:ख होते तेव्हा तर आम्ही प्रतिक्रमण करतो, परंतु जेव्हा स्वत: स्वत:चीच शारीरिक वेदना भोगत असेल आणि दु:ख सोसत असेल, तर त्याचेही प्रतिक्रमण करायचे का?

**दादाश्री :** ते 'पाहत' राहायचे. तन्मयाकार झालात तर तेही पाहायचे. भोगावे लागते, वेदावे लागते, त्याला पाहत राहायचे. वेद म्हणजे जाणणे आणि वेद म्हणजे भोगणे. अत: ज्ञानी भोगण्यापासून जाणण्यापर्यंतच्या पदात असतात.

**प्रश्नकर्ता :** जास्त वेदना होतात तेव्हा तर पुद्‌गल उड्या मारू लागते.

**दादाश्री :** हो, तुम्ही उड्या मारता ते तर सर्वांना कळते, पण कोणाला दु:ख होऊ नये हेही पाहावे लागते. आणि जर कधी कोणाला दु:ख झालेच, दु:ख होईल असे बोलले गेले आणि समोरच्याला दु:ख झाले, तर तुम्ही 'चंदुभाई'ला सांगावे की 'तू प्रतिक्रमण कर.'

**प्रश्नकर्ता :** त्या गोष्टीसाठी तर पूर्णपणे प्रतिक्रमण केले जाते. परंतु शारीरिक वेदनेच्या वेळेस, मनोभावात खूप बदल होतात. त्या वेळी तर खरोखर आर्तध्यान, रौद्रध्यान यातच परिवर्तन होते.

**दादाश्री :** हे ज्ञानच असे आहे की आर्तध्यान-रौद्रध्यान होतच नाहीत. पण जे आर्तध्यान-रौद्रध्यान होतात, ते बाह्य विभागात होतात, म्हणजे वास्तवात ते चिकटत नाहीत (बंधन करत नाहीत). आर्तध्यान-रौद्रध्यान कशाला म्हणतात? तर ज्यात हिंसकभाव असेल. हिंसकभाव तर तुमच्यात दिसत नाही.

**प्रश्नकर्ता :** अशाता वेदनीय कर्म उदयात आलेत तर ती कर्मे भोगावी लागतात; ती भोगते वेळी, 'अरेरे, मेलो, मेलो,' असे ओरडतो. मी तर काही वाईट काम केले नाही, तरीही हे कर्म माझ्या उदयास का आले? मग अशा परिस्थितीत त्या व्यक्तीने कोणती भावना केली पाहिजे?

**दादाश्री :** 'या वेदनेपासून मी वेगळा आहे' अशी भावना केली तर हलके वाटते. आणि 'मला होत आहे' असे म्हटले तर त्या जास्त वाटतात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे ज्यावेळी वेदनेमुळे उद्वेग होत असतो तर ते आर्तध्यानामुळे होत असते की रौद्रध्यानामुळे होत असते?

**दादाश्री :** आर्तध्यानामुळे. यात ध्यानाचा प्रश्नच येत नाही. तो जर ज्ञानात असेल ना, तर या वेदना कोण भोगत आहे हे त्याने जाणायला हवे, आणि स्वत: कोण आहे हेही जाणायला हवे. म्हणजे आपण 'चंदुभाई'ला असे सांगावे, 'अहो, चंदुभाई, तुम्हीच भोगा. तुम्ही जे केले आहे ते आता तुम्ही भोगा.' त्यावेळी जर आपण वेगळे राहिलो तर वेगळेपणाचा लाभ मिळेल. नाही तर 'मला खूप वेदना होत आहेत' असे म्हटल्यावर वेदना खूपच वाढतील, अनेक पटीने वाढतील.

**प्रश्नकर्ता :** हे तर तुम्ही आपल्या महात्म्यांबद्दल सांगितले, ज्यांनी दादांचे ज्ञान घेतले आहे त्यांच्यासाठी, पण त्यांच्याव्यतिरिक्त जे इतर लोक भोगत असतात त्यांच्याबाबतीत तर ते आर्तध्यान झाले असेच म्हणावे लागेल ना?

**दादाश्री :** हो, आर्तध्यानच होते, दु:खमय परिणामच होतात. दु:खमय परिणाम म्हणजेच आर्तध्यान.

**प्रश्नकर्ता :** आणि मग तो समोरच्यावर चिडत राहतो म्हणून रौद्रध्यान पण होते ना?

**दादाश्री :** हो, मग रौद्रध्यान होईल. या निर्दोष जगात कोणी दोषी दिसता कामा नये. जग बिलकुल निर्दोषच आहे. म्हणजे जे दिसते ते आपल्या दृष्टी दोषामुळेच दिसते.

**प्रश्नकर्ता :** वेदनीय कर्म अतिचारामुळे बांधले जाते की अतिक्रमणामुळे?

**दादाश्री :** अतिक्रमणामुळे बांधले जाते.

आम्हाला अशाता कमी असतात. तरी बघा ना, या महिन्यात असे झाले की दादांवर ॲक्सिडेन्टची वेळ आली. मग जेव्हा हे (ॲक्सिडेन्ट) झाले तेव्हा जणू हा दिवा विझूनच जाईल असे झाले होते.

**प्रश्नकर्ता :** असे काही होणार नाही, दादा.

**दादाश्री :** नाही, असे नाही, 'हिराबा' (दादांच्या धर्मपत्नी) गेल्या,

तर काय यांना (ए. एम. पटेलला) जावे लागणार नाही? हे कोणते वेदनीय कर्म आले?

**प्रश्नकर्ता :** अशाता वेदनीय.

**दादाश्री :** लोक समजतात की आम्हाला वेदनीय आहे, परंतु आम्हाला वेदनीय स्पर्श करत नाही. तीर्थंकरांनाही स्पर्श करत नाही. आम्हाला हिराबांच्या जाण्याचा खेद नाही. आमच्यावर त्याचा काहीच परिणाम होत नाही. पण लोकांना असे वाटते की आम्हाला वेदनीय (कर्म) आले, अशाता वेदनीय आले. परंतु आम्हाला तर या वीस वर्षात एक मिनिट, एक सेकंदसुद्धा अशाता वेदनीयने स्पर्श केला नाही! आणि तेच विज्ञान मी तुम्हाला दिले आहे. तुम्ही जर कच्चे पडलात तर त्यात तुमचे नुकसान आहे, (योग्य) समज असेल तर तुम्ही कधी कच्चे पडणारच नाही ना? एक मिनिटही नाही.

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग ठीक आहे.

**प्रश्नकर्ता :** 'दादा भगवान' यांना तर वेदनीय कर्म स्पर्श करत नाही. पण अंबालालभाईंना तर स्पर्श करते ना?

**दादाश्री :** नाही, कोणालाही स्पर्श करत नाही, असे हे विज्ञान आहे. जर स्पर्शत असेल तर वेडेच होऊन जातील ना? हे तर समज नसल्यामुळे दु:ख आहे. जर समज असेल तर या फाइललाही स्पर्श करणार नाही. कोणालाच स्पर्श करणार नाही. ही जी दु:खे आहेत, ती (योग्य) समज नसल्यामुळेच आहेत. जर या ज्ञानाला समजून घेतले तर दु:ख राहीलच कसे? अशाताही राहणार नाही आणि शाताही राहणार नाही.



# [ 13 ]
# विमुक्ती, आर्त-रौद्रध्यानापासून

## आर्तध्यानाचा अर्थ

**प्रश्नकर्ता :** आर्तध्यान आणि रौद्रध्यान क्षणोक्षणी होतच राहतात. तर आर्तध्यान कशाला म्हणावे, आणि रौद्रध्यान कशाला म्हणावे? याचे जरा स्पष्टीकरण करा ना!

**दादाश्री :** आर्तध्यान म्हणजे स्वत:चे स्वत:लाच होते, कोणालाही मध्ये न आणता, कोणालाही दु:ख होणार नाही अशा प्रकारे सांभाळून स्वत:च दु:ख सहन करत असेल, तर ते आर्तध्यान. आणि जर दुसऱ्या कोणाला दु:ख देत असेल तर ते रौद्रध्यान.

आर्तध्यान म्हणजे तर स्वत:ला ज्ञान नसते आणि 'मी चंदुभाई आहे' असेच त्याला वाटत असते, आणि मग माझे असे झाले, किंवा तसे झाले तर काय होईल? असे वाटते ते आर्तध्यान. मुलींचे लग्न काय तू लावणार होतास? ती जेव्हा चोवीस वर्षांची होईल तेव्हा तिचे लग्न लावायचे, किंवा तीस वर्षांची होईल तेव्हा. पण हा तर पाच वर्षांची असेल तेव्हापासूनच तिच्या लग्नाची काळजी करत बसतो. याला आर्तध्यान केले असे म्हणतात.

स्वत:बद्दल उलट विचार करणे, उलट वागणे स्वत:ची गाडी चालेल की चालणार नाही? मी आजारी पडलो आणि मेलो तर काय होईल? असा विचार करणे याला आर्तध्यान म्हणातात.

**प्रश्नकर्ता :** दूरदर्शीता, भविष्याची चिंता?

**दादाश्री :** होय, भविष्याची चिंता वगैरे सर्व आर्तध्यानातच येते. तेसुद्धा जेव्हा ज्ञान नसेल तेव्हा त्याला आर्तध्यान म्हणतात. उद्या काय होईल? अमके पत्र आले आहे, इन्कमटॅक्सवाला काय करील? भविष्याचा विचार करताना भय वाटते तेव्हा आर्तध्यान झालेलेच असते. भविष्याच्या विचाराने जर भय वाटले तर समजावे की आर्तध्यान झाले.

आर्तध्यानामध्ये स्वत:च स्वत:बद्दल चिंता करत राहतो की, असे झाले तर काय होईल? तसे झाले तर काय होईल? सतत अशी भीती वाटत राहते.

## रौद्रध्यानाने दुसऱ्यावर परिणाम

तुम्ही जेव्हा दुसऱ्या कोणाबद्दल अशी कल्पना करता की, ह्याने माझे नुकसान केले, त्याला रौद्रध्यान म्हणतात.

दुसऱ्यांसाठी वाईट विचार आले, दुसऱ्यांना नुकसान करणारे विचार आले, तर ते झाले रौद्रध्यान. मनात विचार आला की ग्राहकांना देताना कापड ताणून मोजावे. आता कापड ताणून मोजण्याचा जो विचार आला तेव्हापासूनच ग्राहकांच्या हातात कमी कापड जाणार आहे. म्हणजेच ग्राहकांकडून जास्त पैसे मिळतील अशी कल्पना केली, याला रौद्रध्यान म्हणतात. दुसऱ्यांचे नुकसान करणारे ध्यान, याला रौद्रध्यान म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** रौद्रध्यान, म्हणजे आपल्याकडून दुसऱ्याला जे दु:ख दिले जाते यालाच रौद्रध्यान म्हणायचे का?

**दादाश्री :** हो, मग दु:ख होईल किंवा होणार नाही, पण तुम्ही त्यांना म्हणालात की 'हे सर्व नालायक आहेत, लुच्चे आहेत, चोर आहेत', तर ते सर्व रौद्रध्यानच म्हटले जाते.

वास्तवात या जगात कोणी दोषी नसतोच. दोषी वाटतो ते आपल्या गैरसमजुतीमुळेच वाटतो.

**प्रश्नकर्ता :** रौद्रध्यान तर मला असते. मी दुसऱ्यांच्या चुका

पाहतो, पण त्यामुळे दुसऱ्यांना दुःख कसे काय होते? मी त्यांना दोषी मानतो त्यात त्यांना कसे दुःख होईल? समोरच्या व्यक्तीला तर हे माहीतच नाही, तर मग त्याला रौद्रध्यान म्हणायचे की नाही?

**दादाश्री :** त्याचा परिणाम तर होतो, त्याला रौद्रध्यानच म्हणतात. समोरच्यावर परिणाम होतोच, का नाही होणार? तुम्हाला तसे वाटते की त्यांना माहीतच नाही. पण त्याचा परिणाम तर सर्व जागी झाल्याशिवाय राहतच नाही. त्याला स्वत:लाही समजत नाही.

## आर्तध्यान, रौद्रध्यानातून धर्मध्यान

कित्येक वेळा असे घडते की आम्ही आर्तध्यान, रौद्रध्यानात खूप खोल उतरत जातो, आणि तरीही आम्हाला त्याची जाणीवसुद्धा होत नाही, तर ते कसे जाणता येईल?

**दादाश्री :** दुःख होते म्हणजे ते आर्तध्यानच झाले ना? आणि रौद्रध्यानात अंतरदाहचे दुःख होते, खूप जास्त दुःख होते. आर्तध्यान-रौद्रध्यान, ही सर्व माणसांसाठी दुःखदायी आहेत. ही सर्व अशाता वेदनीयच आहेत.

**प्रश्नकर्ता :** तेसुद्धा क्षणोक्षणी होत राहते. त्यातून मुक्त होण्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** त्याला तुम्ही पाहत राहावे की वास्तवात तो दोषी नाही, पण माझ्या कर्माच्या उदयामुळेच मला दोषी दिसत आहे, परंतु वास्तवात तसे नाही. म्हणजे तो जर दोषी दिसत असेल तर तो निर्दोष आहे, असे म्हणून प्रतिक्रमण करावे.

तुम्हाला जर कोणाबद्दल वाईट विचार आले, तर तुम्ही हिशोब लावावा की, हा माझ्याच कर्माचा उदय आहे, यात त्या बिचाऱ्याचा काय दोष. हा माझ्याच कर्माचा उदय आहे. मग तो दोषी वाटत नाही, तेव्हा त्याला धर्मध्यान म्हणतात. जिथे रौद्रध्यान होणार होते, तिथेच आता धर्मध्यान झाले, आणि त्यामुळे आत खूप आनंद वाटेल. माझ्याच कर्माच्या

उदयाने तो दोषी दिसत आहे, तो तर निमित्तमात्र आहे. वास्तवात समोरचा दोषी नसतोच, तो निमित्तच असतो.

## आपलेच कषाय आपले शत्रू

**दादाश्री :** तुम्हाला कधी निमित्त भेटतात का?

**प्रश्नकर्ता :** हो, कधी कधी भेटतात.

**दादाश्री :** हो, ते तर फक्त निमित्तच आहेत, वास्तवात (दोषी) नाहीत. चोराने आपला खिसा कापून पैसे चोरले, तर तो निमित्तच आहे. वास्तवात तो गुन्हेगार नाही. पण आपले कषायच गुन्हेगार आहेत.

स्वत:चे कषायच स्वत:चे शत्रू आहेत. बाहेरचे कोणी शत्रू नाहीच. आणि ते कषायच त्याला मारत आहेत. बाहेरचा कोणी त्याला मारत नाही.

## पश्चात्तापाने ध्यान परिवर्तन

जबरदस्त रौद्रध्यान केले असेल, परंतु प्रतिक्रमण केल्याने त्याचे आर्तध्यानामध्ये परिवर्तन होते. दोघा जणांनी एकाच प्रकारचे रौद्रध्यान केले. दोघांनी म्हटले की अमक्याला मी मारून टाकीन. दोघांनी मारून टाकण्याचे भाव केले, त्याला रौद्रध्यान म्हणतात. परंतु त्यातील एकाला घरी गेल्यावर पश्चात्ताप झाला की 'अरेरे! मी असे भाव का केले?', त्यामुळे त्याचे रौद्रध्यान आर्तध्यानात बदलले, आणि त्या दुसऱ्याचे मात्र रौद्रध्यानच राहिले.

म्हणजेच पश्चात्ताप केल्यामुळे रौद्रध्यानाचे रूपांतर आर्तध्यानात होते. पश्चात्ताप केल्याने नरकगती बदलून तिर्यंचगती (पशुयोनी) प्राप्त होते. आणि अधिक पश्चात्ताप केला तर त्याचे रूपांतर धर्मध्यानात होते. एकदा पश्चात्ताप केल्यामुळे आर्तध्यान होते आणि पुन्हा पुन्हा पश्चात्ताप करत राहिल्याने धर्मध्यान होऊन जाते. म्हणजे क्रिया तीच असते पण (ध्यानात) फेरफार होत राहतो.

रौद्रध्यान केल्यानंतर पश्चात्ताप झाला की फेरफार होऊन जातो,

आणि जर आनंद व्यक्त केला की, 'नाही, त्याला मारलेच पाहिजे, मी जो विचार केला होता तो बरोबरच होता', असे म्हटल्यावर तो निगोदपर्यंत पोहोचतो. पुन्हा मनुष्य जन्मात येणे देखील कठीण होऊन जाते, त्या हद्दीपर्यंत तो खाली उतरतो. म्हणजे रौद्रध्यानात आनंद वाटले तर तो निगोदपर्यंत मागे पोहोचेल.

म्हणून रौद्रध्यान करूच नका. आणि जर झालेच तर खूप पश्चात्ताप करा. आर्तध्यान करूच नका पण झालेच तर पश्चात्ताप करा.

जर आर्तध्यान झाले आणि 'त्याने' पश्चात्ताप केले तर भगवंत म्हणतात, 'आम्ही' ते धर्मध्यानात जमा करून घेऊ.' मग यात भगवंत काय चुकीचे म्हणाले? भगवंत समंजस असतील की चक्रम असतील?

**प्रश्नकर्ता :** भगवंताना चक्रम कसे म्हणू शकतो? भगवंत समंजसच आहेत.

## प्रतिक्रमणाने पुद्‌गल प्राप्त करते धर्मध्यान

**दादाश्री :** दादांचे नाव घेऊन पश्चात्ताप कराल तर आर्तध्यान -रौद्रध्यानाचे धर्मध्यान होऊन जाईल. जेवढे समजले तेवढे तरी पुढे गेलात ना? रौद्रध्यान झाले तरीही पश्चात्ताप करा, आणि आर्तध्यान झाले तरीही पश्चात्ताप करा. या काळात धर्मध्यान तर समजेल असे नाही, म्हणून रौद्रध्यान, आणि आर्तध्यानावर पश्चात्ताप करून त्याचे धर्मध्यान बनवले, एवढा कारखाना सुरू करा. आजकालच्या लोकांना धर्मध्यान सरळपणे समजत नाही, कारण भगवंताचे दर्शन घेतानाही ध्यान बाहेर काढलेल्या चपलांवरच असते. म्हणून स्वतः भगवंतच म्हणतात की, 'माझे दर्शन घेतो त्याच वेळी चपलांचेही दर्शन घेत असतो. म्हणजे बरोबर चपलांचेही फोटो घेतो. मग मी काय करू'?!

म्हणजे या काळात धर्मध्यान होऊ शकत नाही, म्हणून दादा काय म्हणतात की जितकेही आर्तध्यान होईल, त्याचे पश्चात्ताप कराल तर धर्मध्यानाचे फळ मिळेल, आणि धर्मध्यानाशिवाय या पुद्‌गलाची (जे

पूरण-गलन होत असते) सुटका होणार नाही. या पुद्‌गलाला शुक्लध्यान कधीच होत नाही.

म्हणजे आर्तध्यान झाले तर हरकत नाही, त्याला धर्मध्यानात बदलू शकतो.

आपण म्हणावे 'हे, चंदुभाई, तू कशाला आर्तध्यान करत राहतोस? आर्तध्यान केलेस म्हणून आता तू पश्चात्ताप कर, प्रतिक्रमण कर', म्हणजे धर्मध्यान होईल.

**प्रश्नकर्ता :** 'आम्ही' स्वत: वेगळे राहून प्रतिक्रमण करवून घेतले तर त्याला काय म्हणतात?

**दादाश्री :** असे आहे की, तुम्ही तर शुद्धात्मा झाला आहात, पण या पुद्‌गलाची सुटका झाली पाहिजे ना? म्हणून जोपर्यंत त्याच्याकडून प्रतिक्रमण करवून घेत नाही, तोपर्यंत सुटका होत नाही. अर्थात, जोपर्यंत पुद्‌गलाला धर्मध्यानात ठेवत नाही, तोपर्यंत सुटका होत नाही, कारण पुद्‌गलाला शुक्लध्यान होऊ शकत नाही. म्हणून पुद्‌गलाला धर्मध्यानात ठेवा. म्हणजे सतत प्रतिक्रमण करवून घ्यावे. जितक्या वेळा आर्तध्यान झाले, तितक्या वेळा प्रतिक्रमण करवून घ्यावे.

आर्तध्यान होण्याचे कारण पूर्वीची अज्ञानता आहे. म्हणून आर्तध्यान झाले की 'तुम्ही' त्याच्याकडून प्रतिक्रमण करवून घ्यावे.

## हटत नाही शुक्लध्यान कधी

**प्रश्नकर्ता :** शुक्लध्यानातून पतन होऊन आर्तध्यान, रौद्रध्यानात येतो, म्हणून तेव्हा त्याला प्रतिक्रमणे करावी लागतात?

**दादाश्री :** हे खरे आहे, पण वस्तुस्थितीत प्रतिक्रमण 'स्वत:ला' करायचेच नाही. शुक्लध्यान कधी हटतच नाही. हे तर संयोगवश आहे. संयोगांशी काम करून घ्यायचे आहे. 'स्वत:' प्रतिक्रमण केले तर शुक्लध्यान उडून जाईल ना?

**प्रश्नकर्ता :** रौद्रध्यान आणि आर्तध्यान की जे 'डिस्चार्ज' स्वरूपाने

होत असतात, तर त्यांचे 'ऑन-द-मोमेंट' (तत्क्षण) प्रतिक्रमणही करून घेतो.

**दादाश्री :** रौद्रध्यान आणि आर्तध्यान आपल्या वहीखात्यात उधार राहता कामा नये.

तुम्ही सुद्धा त्याच पदात, शुक्लध्यान आणि धर्मध्यानाच्या पदातच आहात, फक्त एवढेच की तुम्हाला प्रतिक्रमणे करावी लागतात, त्याहून अधिक काहीच नाही ना! तुम्हाला आमच्या एवढे संसारी लाभ मिळत नाहीत. पण तरी तुम्ही त्याच पदावर बसला आहात ना!

रौद्रध्यान वगैरे सर्व होऊनच जातात. सहज होऊन जातात पण त्याचे प्रतिक्रमण त्वरित व्हायला हवे.

## जो येथे आला तो फसला

तुम्हाला तर काहीच करायचे नाही ना, तुम्ही शुद्धात्मा झालात, तुम्ही 'चंदुभाई'ला सांगावे, की 'प्रतिक्रमण कर, अतिक्रमण का केलेस?' काय म्हणावे? 'तू अतिक्रमण केलेस म्हणून आता त्याचे प्रतिक्रमण कर.' कुणाला दान दिले असेल त्याबद्दल प्रतिक्रमण करायची गरज नाही, कारण इथे हे विज्ञान धर्मध्यानासहित आहे.

अतिक्रमणाचे प्रतिक्रमण करायचे आहे. हे विज्ञान म्हणजे फक्त शुक्लध्यानच नाही. सरळ मोक्षाला जाता येईल असे नाही, एकावतारी होऊ शकेल असे आहे. कोणी दोन अवतारी, कोणी तीन अवतारी होऊ शकतो. एखादा फार लोभी असेल तर तो पंधरा जन्म पूर्ण करील. तो म्हणेल 'भाऊ, आता परत काही इथे यायचे नाही, मग मला अतिक्रमण करू दे ना?'

आमचे भागीदार असे होते की, मी त्यांना सांगत असे तुम्ही पंधरा जन्म पूर्ण कराल? त्यावर ते म्हणाले 'तुम्हाला असे वाटते का?' मी म्हणालो, 'हो, तुमचा लोभ तर... आता परत येथे यायला मिळणार नाही, तर पंधरा जन्म पूर्णच करून घ्यावे! परंतु मग पंधरापेक्षा जास्त तर होणारच नाहीत ना?'

फार लोभी असेल तरी पण पंधरापेक्षा जास्त जन्म तर होतच नाही ना! तो तर आता 'अटकण'मध्ये आला (अडकून पडला). जर अजूनही संसार भोगण्याची, भौतिक सुखांची इच्छा होत असेल आणि अजून पाच-सहा हजार जन्म घ्यायचे असतील, तर मात्र दादांना भेटू नकोस, आणि जर भेटलासच तरी ज्ञान घेऊ नकोस. कारण नंतर तू म्हणशील की आता मला यातून (मोक्ष मार्गातून) बाहेर निघायचे आहे, तरी तू निघू शकणार नाही, मोक्षाला जावेच लागेल. पण असा मूर्ख तर कोणीच नसतो. तरी मी अगोदरच बजावून सांगतो 'बाबा रे, सावध हो.' नंतर तू म्हणशील की आता मला यातून सोडवा, तरी पंधरा जन्मातून तू सुटू शकणार नाही, (पंधरापेक्षा जास्त जन्म घ्यावे लागणार नाहीत), कारण ही तर ज्ञानींची मोहोर आहे. तिला कोणीच मिटवू शकत नाही, खोडू शकत नाही.

ज्ञानी म्हणजे लाईसेन्स असलेला मनुष्य. त्यांच्याजवळ संपूर्ण जगाचे लाईसेन्स असते. जेथे देवलोक बसतात, देवलोक ऐकतात, असे हे विज्ञान आहे. याला परमहंसाची सभा म्हणतात. इथे आत्मा आणि परमात्मा याशिवाय दुसरी कोणतीच गोष्ट नसते, संसारासंबंधी कुठलीही गोष्ट नसते, पण धर्मध्यानासहित आहे. आपले अक्रम आहे ना?

## आत्मज्ञान असते तिथे आर्त-रौद्रध्यान नसतात

आर्तध्यान आणि रौद्रध्यान, हे तिर्यंचगती आणि नरकगतीचे कारण आहे.

**प्रश्नकर्ता :** आर्तध्यान आणि रौद्रध्यान करण्याची इच्छा तर नसतेच, तरी पण होऊनच जाते.

**दादाश्री :** माझे म्हणणे असे आहे की ते तर होईल, त्याला काही हरकत नाही, पण तुम्ही प्रतिक्रमण करा ना! त्याला आमचा विरोध नाही की तुम्ही असे का करता? तुम्ही प्रतिक्रमण करा, हेच आम्ही सांगतो. आम्हाला कोणाला काढून टाकायचे नाही. आपल्या येथे नेगेटिव्हसेन्स (नकारात्मक समज) नाही, 'पॉजिटिव्हसेन्स' (सकारात्मक

समज) आहे. आम्ही कोणालाही काढून टाकू इच्छित नाही. दोषांना सांगा, 'तुम्ही राहा, आणि आम्ही प्रतिक्रमण करू', तेव्हा मग ते आपोआपच निघून जातील.

आपले ज्ञानच असे आहे की आर्तध्यान आणि रौद्रध्यान होतच नाहीत. आर्तध्यान व रौद्रध्यान होऊच देत नाही, असे आहे. आणि जे आर्त-रौद्रध्यान आहेत ते आपले ध्यान नाहीत, तर ती घुसमटच आहे. खरे तर केवळ आर्त-रौद्रध्यान कधी होतच नाहीत. जिथे आत्मध्यान असते, तिथे आर्तध्यान व रौद्रध्यान नसतात. आणि जिथे आर्तध्यान व रौद्रध्यान आहेत तिथे आत्मध्यान नाही. दोन भाषा वेगवेगळ्या नसतात.

देहात धर्मध्यान असते आणि आत्म्यात शुक्लध्यान असते. परंतु जेव्हा घुसमट होऊ लागते तेव्हा मनात असे वाटते की, हे आर्तध्यान, रौद्रध्यान झाले. बस, म्हणूनच आपण त्याला म्हणावे 'अतिक्रमण का केलेस? तर आता प्रतिक्रमण कर.'

आत्मज्ञान असते, तिथे आर्तध्यान व रौद्रध्यान होत नाहीत. नाही तर आत्मा कधीच प्राप्त झाला नसता. आता तुम्हाला जी आर्तध्यान, रौद्रध्यान होतात, ती फक्त घुसमट आहे. आर्तध्यान, रौद्रध्यान कोणाला होतात? तर जो जीवित अहंकार असतो ना, त्याला होतात. त्या जीवित अहंकाराला मी संपवून टाकले आहे. आता मृत अहंकार राहिला आहे. त्याला कधी आर्तध्यान, रौद्रध्यान होत नाहीत. मेलेला काही नव्याने हलत-डुलत नाही.

म्हणजे यात जास्त काहीच नाही, तेव्हा नीट समजून घ्या. मी काय म्हणतो ते जर समजले की मग यात काहीच नाही.

हे ज्ञानच असे दिले आहे की, ते इटसेल्फ (स्वयंच) सर्व काही करत राहील. याला पूर्णपणे समजून घ्या. सविस्तर समजून घ्या. आणि समजले नाही तर शेवटी प्रतिक्रमण करत राहा. अत: ज्याला समजत नाही त्याला आम्ही प्रतिक्रमण करण्यास सांगितले आहे. आणि जर समजले असेल तर मग त्याला काही होतच नाही, बाहेरच लागत असते पण त्याला वाटते की इथेच लागले. खरे तर बाहेरच लागत असते!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे ही सारी भ्रांतीच आहे?

**दादाश्री :** नाही, भ्रांती नाही, ही सर्व तर घुसमट आहे; जेव्हा कर्माचा जोर जास्त असतो तेव्हा असे होत असते. इथे खूप सारी धूळ उडवली तर काय होईल? आपल्याला पुढचे काहीच दिसणार नाही.

**प्रश्नकर्ता :** आवरणे आहेत?

**दादाश्री :** ही सारी तर मोहनीय कर्मे आहेत, जी पूर्वी भरली होती ती जसजशी सुटत जातील, तसतशी निघत जातील.

आता तुम्ही मोक्षाचे काम करून घ्या! प्रतिक्रमण करत राहा हाच त्याचा उपाय आहे, आणि हाच त्याचा इलाजही आहे! तुमचे काही देणेघेणे नाही, म्हणजे महात्म्यांना आर्तध्यान होतच नाही. आत्म्याला आर्तध्यान-रौद्रध्यान होत नाहीत. आपल्या महात्म्यांना आर्तध्यान-रौद्रध्यान होतच नाहीत, कारण ते शुद्धात्मा आहेत, स्वत: नामरूप नाहीत.

**प्रश्नकर्ता :** भूतकाळात आर्तध्यान, रौद्रध्यानात जे गोंधळले असतील, आणि पूर्वीसुद्धा अशीच कामे केली असतील, तर आता जेव्हा त्यांचे परिणाम उदयास येतील त्यावेळी काय करावे?

**दादाश्री :** ते तर येतीलच ना. येणारच आहेत! परंतु आज त्यांना ज्ञानाने सोडत जायचे आहे. तेव्हा ज्ञान नव्हते म्हणून सोडता येत नव्हते. आता आपण ज्ञानाने सोडू शकतो. त्यासाठी प्रतिक्रमण करावे. तेव्हा प्रतिक्रमण केले नव्हते म्हणून अतिक्रमण दोष लागला होता. संपूर्ण जग या दोषामुळेच उभे राहिले आहे. जेव्हा प्रतिक्रमण सुरू होतात, तेव्हापासून सुटका होऊ लागते.

## 'ज्ञान' घेतल्यानंतर कर्मबंधन केव्हा होते?

**प्रश्नकर्ता :** ज्ञान घेतल्यानंतर जाणता-अजाणता आर्तध्यान-रौद्रध्यान झाले आणि त्याचक्षणी मनात खूप पश्चात्ताप झाल्यावर प्रतिक्रमण केले, तर महात्म्यांना कर्मबंधन होते का?

**दादाश्री :** प्रतिक्रमण केले तर कर्मबंधन होणार नाही. तुम्ही प्रत्येक वेळी प्रतिक्रमण करता का?

**प्रश्नकर्ता :** त्वरित प्रतिक्रमण करतो.

**दादाश्री :** आणि तुम्ही 'चंदुभाई' आहात की 'शुद्धात्मा'?

**प्रश्नकर्ता :** मी तर शुद्धात्मा आहे.

**दादाश्री :** मग काही हरकत नाही, प्रतिक्रमण करत असाल तर मग काही हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** काही निमित्ताने रौद्रध्यान झाले, आणि प्रतिक्रमण करायचे राहून गेले, आणि गुंता निर्माण झाला तर काय कर्मबंधन झाले असे समजायचे?

**दादाश्री :** कर्मबंधन केव्हा होते? जर दर्शन बदलले तर कर्मबंधन होते. दर्शन बदलले, श्रद्धा डळमळीत झाली तरच, नाही तर कर्मबंधन होत नाही. ज्याची प्रतीती हटत नाही त्याला काहीही होत नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे काही टाइम लिमिट (वेळेची मर्यादा)नाही? की इतक्या वेळेत कर्म बांधले जाईल?

**दादाश्री :** कर्म कधी बांधले जाते? तर जेव्हा प्रतीती डळमळीत होते, पुढे-मागे होते तेव्हा. साखर आणि मीठ एकमेकात मिसळले तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** बदल घडून येईल.

**दादाश्री :** म्हणून मग कर्मे बांधली जातात. साखरेला साखरेत राहू द्यावे, आणि मिठाला मिठात राहू द्यावे, म्हणजे प्रतीती बिघडता कामा नये. प्रतीतीवर डाग पडता कामा नये.

## द्रव्य परिणाम आणि भाव परिणाम

आता आर्तध्यान-रौद्रध्यान होत नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** आता होत नाहीत. दहा दिवसांपासून बंद झाले आहेत.

**दादाश्री :** पुन्हा कधी होतील?

**प्रश्नकर्ता :** जेव्हा दुसऱ्यांचे दोष पाहू, तेव्हा होतील?

**दादाश्री :** दोष दिसले की प्रतिक्रमण करावे. आता आपण 'कर्ता' राहिलो नाही ना? म्हणून आर्तध्यान-रौद्रध्यान होणार नाहीत. आणि जरी कोणाचे दोष दिसत असतील, तर ते त्याचे पूर्वीचे द्रव्य आहे, तो भाव नाही, जर भाव असेल तर त्याला आर्तध्यान-रौद्रध्यान म्हणतात. हे तर द्रव्य आहे, म्हणून आत जसा (माल) भरला असेल तसे तो बोलेल.

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्यांचे दोष पाहणे याला आर्तध्यान, रौद्रध्यान म्हणतात का?

**दादाश्री :** हो, आत तो दुसऱ्यांचे दोष पाहण्याचा माल भरून आला आहे, म्हणून असे पाहतो. तरीसुद्धा त्याचा दोष स्वतःवर येत नाही. त्याने मग प्रतिक्रमण करायला हवे की असे का होत आहे? असे होता कामा नये. बस, एवढेच. माल तर जसा भरला गेला असेल तसाच निघेल. त्याला आम्ही साध्या भाषेत 'भरलेला माल' म्हणतो, आणि भगवंतांनी त्याला द्रव्य म्हटले आहे. भरलेला माल निघतो असे म्हटल्यावर समोरच्याला लगेच कळते. परंतु याला शास्त्रीय भाषेत द्रव्य परिणाम आहे असे म्हणतात, आणि भाव परिणाम आहेत, असे म्हणतात.

आता हे असे सूक्ष्म या सर्वांना कसे समजेल? आणि ह्या सर्वांना शिकवायला गेलो, तर उलट ते दुसरे सर्वही विसरून जातील. त्यापेक्षा तर ही आपली गावठी भाषा चांगली आहे, लगेच समजते. तुम्हाला समजले ना? हा जो भरलेला माल आहे तो आता रिकामा होत आहे.

**प्रश्नकर्ता :** असे तर घडतच असते. समजा मी कोणाच्या पाठीमागे त्याच्याबद्दल काही वाईट बोलतो की, 'हा नालायक आहे, असा आहे, तसा आहे, आणि मग मी स्वतः असे मानतो की, माझे खरे आहे, मी करेक्ट आहे, मी अजिबात दोषी नाही, माझी काहीच चूक नाही' तर असे आर्तध्यान-रौद्रध्यान, आत क्षणोक्षणी होतच असते.

तर यात कोणत्या प्रकारची जागृती ठेवायला हवी की ज्यामुळे आपण वेगळे राहू शकू?

**दादाश्री :** असे तर होतच राहते. त्यानंतर आपण ओळखावे 'या वेळी जागृती राहिली नाही.' म्हणून दिवसभरात जे काही घडले असेल त्यासाठी संध्याकाळी ठरवावे की मला रात्री नऊ ते अकरा वाजेपर्यंत प्रतिक्रमण करायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे, प्रतिक्रमण हाच त्याचा उपाय आहे.

**दादाश्री :** हो, जे सर्व रस्त्यात, गल्लीत भेटले असतील, इतर कोणी भेटले असतील त्या सर्वांसाठी रात्री बसून प्रतिक्रमण करा.

**प्रश्नकर्ता :** जे जे कोणी भेटले असतील त्यांचे.

**दादाश्री :** भेटले असतील किंवा नसतील, पण त्या सर्वांसाठी तास, दोन तास प्रतिक्रमण करा, त्यावेळी त्याची शक्ती इतकी वाढेल की विचारू नका! आणि आनंदही खूप होईल.

**प्रश्नकर्ता :** आले लक्षात. म्हणजे शेवटी फावल्या वेळेतही प्रतिक्रमण करून घ्यावे.

**दादाश्री :** आठवून आठवून प्रतिक्रमण करावे.

## त्याला म्हणतात धर्मध्यान

**प्रश्नकर्ता :** आर्तध्यानाचे प्रतिक्रमण केले तर ते कशामध्ये येते?

**दादाश्री :** कशामध्येही येत नाही, प्रतिक्रमण केले म्हणजे जे डाग लागले होते ते धुतले गेले.

**प्रश्नकर्ता :** आणि जर रौद्रध्यानाचे प्रतिक्रमण केले तर?

**दादाश्री :** तेव्हा तर समोरच्या व्यक्तीचे प्रतिक्रमण करावे लागते.

**प्रश्नकर्ता :** परंतु या पुस्तकात तर असे लिहिले आहे की ते धर्मध्यानात जाते?

**दादाश्री :** हो, म्हणजे रौद्रध्यानाचे प्रतिक्रमण केले तर ते धर्मध्यानातच जाते, कारण रौद्रध्यानाला थांबवले.

**प्रश्नकर्ता :** तर मग आर्तध्यानाचे प्रतिक्रमण केले तर कशामध्ये जाईल?

**दादाश्री :** असे नाही, असे लिहिले नाही. पुस्तकामध्ये वेगळे लिहिले आहे. रौद्रध्यान होण्याचे थांबवले त्याला धर्मध्यान म्हणतात. असे लिहिले आहे.

**प्रश्नकर्ता :** आणि आर्तध्यानाला?

**दादाश्री :** जे रौद्रध्यानाला रोखते त्याला धर्मध्यान म्हणतात, आणि आर्तध्यानाला रोखते त्यालाही धर्मध्यानच म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** आणि पश्चात्ताप केला तर?

**दादाश्री :** पश्चात्ताप केला तर त्याचे सर्व धुतले जाते.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही कित्येकदा सत्संगामध्ये असे सांगता की जेव्हा आर्तध्यान आणि रौद्रध्यान होते तेव्हा जर त्यावर कंट्रोल राहिला तर ते धर्मध्यान आहे.

**दादाश्री :** ते धर्मध्यान कंट्रोलमध्ये कसे राहते की, 'हा माझ्याच कर्माचा उदय आहे. तो तर यात निमित्त आहे', तर हे त्याचे धर्मध्यान म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** हो, परंतु ते कंट्रोलमध्ये असेल तर ना?

**दादाश्री :** हो, जर गोळी सुटून गेली असेल तर प्रतिक्रमण करावे लागते.

**प्रश्नकर्ता :** रौद्रध्यानाचे प्रतिक्रमण केल्याने सरळ धर्मध्यान होते का?

**दादाश्री :** नाही, तसे नाही. हे तर यथार्थ शब्दावर आधारित आहे. प्रतिक्रमण आणि पश्चात्ताप, या दोन्हींमध्ये फरक आहे. यथार्थ प्रतिक्रमण करणे, अर्थात स्वतः शुद्ध भावाने करणे.

आपण फक्त पाहायचे, बस. प्रतिक्रमण विधीच्या शब्दात अन्य कोणाचे हस्तक्षेप तर नाही ना? एवढेच पाहायचे आहे. त्याच्यात माझे (दादांचे) शब्द आहेत की नाही? तुम्हाला फक्त तेवढेच पाहायचे आहे. अन्य कोणाची दखल असली तर तेही पाहायचे आहे. इतरांची चूक पाहण्याची आपल्याला गरजच नाही.

**प्रश्नकर्ता :** चूक नाही, पण एक्झॅक्ट (यथार्थपणे) समजून घ्यायला हवे ना?

**दादाश्री :** नाही, ते सारे, एक-एक शब्द खरे आहेत! भविष्यातही कोणाला त्यात बदल करण्याचा, खोडून टाकण्याचा अधिकार नाही!

## यथार्थ प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** खोडून टाकण्याचे विचारत नाही, कारण दोन, तीन वाक्ये एकाच वेळी आली ना...

**दादाश्री :** नाही, संयोगाने तो जर पूर्ण पुस्तक घेऊन आला तर मला सांगता येईल की कोणत्या संयोगात, काय बोलणे झाले होते... त्याच्या आसपासचे कनेक्शन (संबंध) माहीत असले पाहिजे. तुम्ही अर्धवट वाक्य घेतले तर त्याचा खरा अर्थ निघत नाही.

**प्रश्नकर्ता :**नाही, नाही. आप्तवाणी-2 मध्ये, पान नं. 109 वर, म्हटले आहे की रौद्रध्यानात पश्चात्ताप होत असेल तर ते आर्तध्यानात जाते, आणि जर रौद्रध्यानात यथार्थ प्रतिक्रमण केले तर ते धर्मध्यानात जाते.

**दादाश्री :** जे पूर्ण वाक्य बोलले गेले आहे, त्यात तर तुम्हाला फक्त एवढेच पाहायचे आहे की, दुसऱ्या कोणाची दखल आहे की नाही. जर दखल असेल तर मला सांगा. दुसरे म्हणजे, याला तराजूत मापायला जाऊ नका की याचा अर्थ असा होतो की नाही होत. कारण सर्व संयोगानुसार होत असते.

यथार्थ, म्हणजे जसे असायला पाहिजे तसे वाक्य फक्त ज्ञानी पुरुषच बोलू शकतात, दुसरे कोणी बोलू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** यथार्थ या शब्दाचे जरा स्पष्टीकरण करा ना.

**दादाश्री :** यथार्थ म्हणजे जसे असायला पाहिजे तसे, संपूर्ण! पण असे कोणाला समजणारच नाही ना? तशी काही विशेष मोठी माणसे आपल्या इथे झालेली आहेत त्यांना समजते आणि जर तुम्हाला समजत असेल तर तुम्ही पण करू शकता.

**प्रश्नकर्ता :** आतापर्यंत तर मी असेच समजत होतो की आमच्या मनात जर कोणाचे वाईट करण्याचे विचार आले, तर वाटते की नाही, आपण असे करू नये. आणि यालाच मी धर्मध्यान मानत होतो. ह्याने माझे नुकसान केले, तर लगेच माझ्यावर प्रतिक्रिया होते की यांचे मी असे करू. तर म्हणतो, 'नाही, ते आपले काम नाही.'

**दादाश्री :** हो, त्याला धर्मध्यान म्हणतात. पण ते तर धर्मध्यान आहे, तेच तर पाहण्यासारखे आहे की, त्या धर्मध्यानाने आर्तध्यान-रौद्रध्यानाला थांबवले. ते तर रोख धर्मध्यानच आहे. परंतु असे यथार्थ प्रतिक्रमण करणे ही तर फार मोठी गोष्ट आहे, आणि ते प्रतिक्रमण ही वेगळी गोष्ट आहे. तुम्ही म्हणता त्यानुसार, पण यथार्थ रूपाने.

**प्रश्नकर्ता :** दादा, पुस्तकात छापले गेले म्हणून ते कॉमन लेंग्वेजमध्ये (सामान्य भाषेत) गेले.

**दादाश्री :** हो, पण जी खरी व्यक्ती असेल तिला ते समजेलच ना? यथार्थ कोणाला समजेल?

**प्रश्नकर्ता :** मग मी विचार करून असा अर्थ काढला होता की, यथार्थ प्रतिक्रमण म्हणजे अजिबात कर्ता भाव नसणे.

**दादाश्री :** नाही, कर्ताभाव तर अजिबात नसतो. हे ज्ञान घेतल्यानंतर कर्ता भाव नसतोच. पण यथार्थ म्हणजे जसे असायला पाहिजे तसे एक्झॅक्टली (तंतोतंत). यथार्थचा अर्थच असा होतो जसे असायला पाहिजे तसे.

**प्रश्नकर्ता :** ज्ञानींना प्रतिक्रमण करावी लागत नाहीत ना?

**दादाश्री :** या अक्रम विज्ञानींना करावी लागतात.

**प्रश्नकर्ता :** नाही, पण यथार्थ प्रतिक्रमण आहे ना?

**दादाश्री :** यथार्थ तर जे आमच्या सोबत राहतात ते सर्व करू शकतात. आपले काही लोक अजून आहेतच. दुसरे काही लोक पण करू शकतात. त्यांच्याप्रमाणे तुम्ही सुद्धा करू शकता. तुम्हाला यथार्थ समजत नाही, त्याला हरकत नाही, पण तुम्ही यथार्थ कराल जरूर, ते मी जाणतो. 'यथार्थ'चा अर्थ फार भारी (गुह्य) आहे. 'जसे असायला पाहिजे तसे.'

## आत 'शुक्लध्यान' आणि बाहेर 'धर्मध्यान'

आपले विज्ञान काय सांगू इच्छिते, ते मी तुम्हाला सांगतो. आता उदयामध्ये दोष निघत असतो, किंवा उदयामध्ये चांगला भाव निघत असतो. दोनच प्रकारचे भाव निघतील ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** तर त्या उदयाला पाहा. पाहिल्याने स्वत:चे दोष दिसतात. जो दोषवाला आहे, त्याला दोष दिसतील आणि जो चांगला आहे त्याला चांगले दिसेल. पण आपण फक्त आपले दोषच पाहायचे दुसरे काही पाहायचे नाही.

या पुरुषार्थाने पुढील जन्मात फरक पडतो, पण आम्ही असे सांगू इच्छित नाही. आम्ही काय म्हणतो, की आपण तर शुद्धात्मा झालो, आणि आपल्याला पुढचा जन्म नको आहे. म्हणजे आम्ही काय सांगू इच्छितो की, हा जो उदय आहे त्याचा आम्ही निकाल करून टाकतो, त्याला जाणत राहतो.

दोष झाला हे जाणले, याला धर्मध्यान म्हणतात, आणि आतमध्ये शुक्लध्यान आहे. जेव्हा धर्मध्यान आणि शुक्लध्यान हे दोन्ही एकाच वेळी असतात. तेव्हा एकावतारी होऊ शकतो. आणि जेव्हा फक्त शुक्लध्यान असते तेव्हा मोक्ष होतो.

म्हणून दोष होतो तेव्हा त्या दोषाला आपण चिकटायचे नाही. यापूर्वी तुम्ही जी पुस्तके वाचली आहेत, त्यामुळे तुम्हाला असे वाटते की 'हे काय झाले, हे काय झाले'? आपण चांगल्या सवयी आणि वाईट सवयी, या दोन्हीपासून सेफसाइड केली आहे. आपण शुद्धात्मा आहोत आणि आपण स्वरूपात आलो आहोत. आता जे दोष आहेत, ते आपल्याला दिसतात, आपल्याला दिसू लागतात, सर्व सूक्ष्माहून सूक्ष्म दोष दिसू लागतील, आणि जसजशी दोषांना पाहण्याची दृष्टी खुलत जाईल तसतसे ते आणखी जास्त दिसत जातील.

आता जरी प्रतिक्रमणे होत नसतील तरीही मी सांगतो की काही हरकत नाही. पण फक्त त्या दोषांना पाहत राहा. आणि हे चुकीचे आहे असे जाणा. जाणाल तेव्हापासूनच त्याला धर्मध्यान म्हणायचे. म्हणजे बाहेरून धर्मध्यान आणि आतून शुक्लध्यान. हा मार्ग अगदी वेगळाच आहे, स्वच्छ मार्ग आहे आणि स्वाभाविक मार्ग आहे.

## अरे! असे अवेळी कुठून आले?

रात्री साडे अकरा वाजता सात-आठ पाहुणे तुमच्याकडे आले, आणि 'चंदुभाई आहेत का'? अशी हाक मारली, तर तुम्ही काय म्हणाल? ते पाहुणे तुमच्या गावाहून आले असतील आणि त्यातले एक, दोन जण तुमच्या ओळखीचे असतील आणि इतर सर्व त्यांच्या ओळखीचे असतील. रात्री साडे अकरा वाजता त्यांनी हाक मारल्यावर तुम्ही त्यांना काय म्हणणार? दरवाजा उघडाल की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, उघडू ना.

**दादाश्री :** आणि नंतर त्या लोकांना काय म्हणाल? परत जा असे म्हणाल?

**प्रश्नकर्ता :** नाही, नाही. 'परत जा' असे कसे म्हणता येईल?

**दादाश्री :** तर काय म्हणाल?

**प्रश्नकर्ता :** आम्ही त्यांना आत घेऊ, 'या, आत या' असे म्हणू.

**दादाश्री :** 'या, या, स्वागत आहे!' तुमच्यावर तसे संस्कार आहेत ना, म्हणून 'या, या' असे म्हणणार. सर्वांना सोफ्यावर बसवणार. सोफ्यावर जर लहान बाळ झोपले असेल तर पटकन उठवून त्याला बाजूला करणार आणि पाहुण्यांना सोफ्यावर बसवणार. परंतु मनात मात्र वाटणार, 'अरे! असे अवेळी कुठून आले?'

म्हणजे हे आर्तध्यान नाही, तर रौद्रध्यान आहे, कारण समोरच्या माणसासाठी आपण भाव बिघडविले. आणि आर्तध्यान म्हणजे तर स्वत:चा त्रास स्वत:च भोगणे. इथे तर तुम्ही दुसऱ्यांची उपाधी स्वत:वर घेऊन दुसऱ्यांवर आरोप लावला की, 'अरे! असे अवेळी कुठून आले?'

तरी पण तुम्ही तेव्हा काय म्हणाल? तुम्ही तुमचे संस्कार तर सोडणार नाही ना! हळूच म्हणणार 'थोडा...थोडा...थोडा' अहो, पण काय? तेव्हा म्हणाल थोडा चहा... तेव्हा पाहूणेही असे असतात की ते सरळ म्हणतात, 'चंदुभाई, आता चहाचे राहू द्या ना, आता खिचडी-कढी करून टाका ना, तरी बस झाले.' असे म्हणताच मग बघा तुमच्या बायकोची स्थिती! स्वयंपाक घरात काय होईल?

आता अशा वेळी काय करायला हवे? भगवंताची आज्ञा काय आहे? तर ज्याला मोक्षाला जायचे आहे, त्याने काय करायला हवे? 'अरे, असे अवेळी कुठून आले?' असा भाव तर माणसाला होतोच. सध्या या दूषमकाळाचा दबाव असा आहे वातावरणच असे आहे, की त्याला असा भाव येणारच. मोठा माणूस असेल तरी त्यालाही येणार. संयमीलाही येणार. पण संयमी त्यावेळी आपला भाव सुधारतो की 'हे तर आता राहणारच आहेत, तर तू मनात उलट भाव का करतोस?' बाहेर तर तू चांगला वागत आहेस आणि आत मात्र उलट चित्रण करत आहेस. अर्थात तुम्ही त्यांना जे चांगल्या प्रकारे स्वागत करून आत बोलावता, त्यांच्याशी गप्पागोष्टी करता ते तर तुम्ही मागच्या जन्माचे फळ भोगत आहात. आणि आत भाव बिघडवून पुढील जन्मासाठी नवीन कर्म बांधत आहात. 'अरे, असे अवेळी कुठून आले?' असे विचार केल्याने उलट कर्म बांधत आहात.

म्हणून तेव्हा तुम्ही भगवंताजवळ क्षमा मागून म्हणावे, 'हे भगवंता, माझी चूक झाली, वातावरणाच्या दबावामुळे माझ्याकडून असे चुकीचे बोलले गेले पण तशी माझी इच्छा नाही. ते खुशाल येथे राहोत.' अशा प्रकारे तुम्ही जर आतून साफ करून टाकले तर तो तुमचा पुरुषार्थ म्हटला जाईल.

असे तर होतच राहणार. मोठमोठ्या संयमधारींनाही होत असते. हा काळच असा विचित्र आहे. परंतु जर तुम्ही साफ करून टाकले तर मग तुम्हाला तसे फळ मिळेल.

स्त्रियांनी पण आतील भाव सुधारावे की, 'ठीक आहे, आता आलेच आहेत तर जेवल्याशिवाय राहणार नाहीत. तर मग मी कशाला भाव बिघडवू'? त्या ऐवजी, 'या, आरामात जेवा' असे म्हणावे.

म्हणजे आपल्याला अशा प्रकारे उपाय करायला हवा. जर भाव बिघडले तर त्याचा उपाय करायला हवा. कारण आता आलेच आहेत, तर ते चार दिवसापर्यंत जाणार नाहीत!

**प्रश्नकर्ता :** आम्ही तर रात्री कोणाला खाऊ घालतच नाही, आम्ही सर्व 'चोविहार' (रात्री भोजन वर्ज्य) करतो.

**दादाश्री :** मग तुम्ही काय सांगता? येथे जेवण मिळणार नाही असे?

**प्रश्नकर्ता :** आम्ही मनाई करतो.

**दादाश्री :** आणि चहा मागितला तर?

**प्रश्नकर्ता :** मागितला तरी देत नाही.

**दादाश्री :** असे होय? मग लोक काय करतात? त्यांना बाहेर नेऊन जेवू घालतात.

**प्रश्नकर्ता :** बाहेर नेऊन जेवू घातले म्हणजे त्याचे तेच झाले ना?

**दादाश्री :** मग काय करणार? त्यांना उपाशी झोपवणार? आपले हिंदू लोक कोणाला उपाशी झोपवत नाही. आपले संस्कारच तसे आहेत.

जे पाहुणे घरी आले आहेत, ते कर्माच्या उदयाने, आपल्या कर्मांचा आणि त्यांच्या कर्मांचा उदय! आणि आता जोपर्यंत कर्मांचे उदय पूर्ण होत नाहीत, तोपर्यंत तर ते जाणार नाहीत.

आता पत्नी काय विचारते चंदुभाईला? हे तुमच्या ओळखीचे लोक कधी जातील? तेव्हा तो म्हणतो 'माझे कसले ओळखीचे? कुठून तरी आले आहेत.' म्हणून मग ते ओळखीबाबतच्या गोष्टी करत नाहीत.

आता तर लोक डेव्हलप्ड (विकसित) झाले आहेत ना! म्हणून बायको नवऱ्याला म्हणते हे 'तुमच्या ओळखीचे', आणि जर तिच्या माहेरचे आले तर तो म्हणतो 'हे तुझ्या ओळखीचे!' म्हणजे असे भांडत बसतात, म्हणून लोक त्याला लेट गो करतात (चालवून घेतात).

आता लोकांनी अशा गोष्टीसाठी मन मोठे करून घेतले आहे की 'आता आपण ढवळाढवळ करायची नाही', कारण शेवटी ते तर राहणारच आहेत. म्हणून मनात असे समजावे की 'जोपर्यंत कर्मांचे उदय आहेत, तोपर्यंत त्यांना खुशाल राहू द्या.' जेव्हा माझ्या आणि त्यांच्या कर्मांचे उदय पूर्ण होतील तेव्हा ते स्वतःहून निघून जातील, तेव्हा असे म्हणावे की, आता खुशाल राहू द्या त्यांना, म्हणजे मग आर्तध्यान-रौद्रध्यान होणार नाहीत.

आणि मग जेव्हा ते चार दिवसानंतर जाऊ लागतील, तेव्हा जर आपण म्हटले की 'नाही, आज तर तुम्हाला थांबावेच लागेल', तरीही ते तुमचा हात सोडवून लगेच पळून जातील, कारण कर्माचे उदय आहेत. ते मग थांबणारच नाहीत. कोणी स्वतःच्या मर्जीने थांबत नसतात, कर्मेच त्यांना थांबवतात. म्हणून ते जात असताना जर तुम्ही त्यांना थांबविले की आज जाऊ नका, इथेच राहा, तरी ते झपाट्याने निघून जातील.

म्हणजे हे सर्व कर्माच्या आधीन आहे, म्हणून तुम्ही काय करावे

की, तुम्ही तुमच्या पुढील जन्माचे चित्रांकन बिघडवू नका. भावकर्माने पुढील जन्म बांधला जातो, म्हणून एवढे जरी सांभाळले तरी खूप झाले.

आर्तध्यान आणि रौद्रध्यानाला जपले तर पुढचा जन्म तरी चांगलाच मिळेल.

## मनोभाव बिघडू नयेत यासाठी

**प्रश्नकर्ता :** मग तुम्ही काय सल्ला देता? आमच्याकडे तर असा नियमच आहे की घरचे सगळेच चोविहार करतात. तर मग रात्री कोणी आले तर त्यांना जेवू घालावे की नाही?

**दादाश्री :** तेच तर सांगत आहे की, 'त्यांना जेवू घाला.' ते शेठ तर मलाच दोष देतील की यांच्या आज्ञेने आम्ही जेवू घालतो, पण तरीही हरकत नाही. खरोखर तर हा तुमचा गुन्हा नाही. आम्ही आज्ञा दिली आहे, म्हणून आमचाच गुन्हा, पण तुम्ही त्यांना जेवू घाला. ते जर म्हणाले की आम्हाला जेवू घाला तर त्यांना उपाशी ठेवू नका.

**प्रश्नकर्ता :** धर्मात 'अतिथि देवो भव' असे म्हटले आहे, तर यात खरे काय?

**दादाश्री :** म्हणूनच तर हे 'अतिथि देवो भव' असे म्हटले आहे. पहिल्यापासूनच म्हटले आहे की जेणेकरून लोकांचे मनोभाव बिघडू नयेत. अतिथि म्हणजे काय? तर जे आधी पत्राने न कळवता, तिथी न कळवता येतात. आपण त्यांना आलेले पाहतो तेव्हाच कळते की 'अहाहा! हे चंदुशेठ आले आहेत!'

मनात वाटते की 'अरे! असे अवेळी कुठून आले?' पण असे भाव बिघडू देऊ नयेत. भाव बिघडले नाहीत तरच पुढील जन्म सुधारेल. भाव बिघडले तर लगेच प्रतिक्रमण करून घ्यावे. तात्पर्य हेच की आर्तध्यान-रौद्रध्यान करता कामा नये.

## जमा करून सुटून जा

सर्वकाही कर्मांच्या उदयामुळे होत असते, त्याने शिवी दिली तरी

ते आपल्या कर्माच्या उदयामुळे आहे. एका माणसाने चंदुभाईला शंभर लोकांच्या समोर चार शिव्या दिल्या तर त्याही कर्माच्या उदयामुळेच दिल्या. म्हणून आपण समजून घ्यावे की, हे माझ्याच कर्माच्या उदयामुळे होत आहे, तो मात्र निमित्त आहे. तेव्हा मग मनात आपण काय करायला हवे? तर त्याच्यासाठी आपले भाव बिघडवू नये. उलट त्याचे भले होवो, त्याने मला माझ्या कर्मातून मुक्त केले, या कर्मातून मला सोडवले.

चार शिव्या खाऊनही सुटून गेलात ना, म्हणजे हलके झालात ना. मात्र सुटते वेळी चुकीचे कर्म बीज पडू द्यायचे नाही, एवढेच पाहावे.

लोक चार शिव्या तर खातात, पण कर्म बीज चुकीचे टाकतात. म्हणजे ते परत समोरच्याला पाच शिव्या देतात. अहो, चार तर सहन होत नाहीत, आणि तरीही पाच शिव्या दिल्या! ह्या चार जमा करून घ्या ना? तुम्हाला जर हे सहन होत नाही तर मग तुम्ही परत शिव्या का देता?

अशा प्रकारे मग भटकतच राहतात. विनाकारण गुन्ह्यात अडकतात. कुणासाठीही भाव बिघडवू नका, आणि जर बिघडलेच तर लगेचच सुधारून घ्या. पण मोक्षाला जायचे असेल तर यातून आपले काम कसे सिद्ध करावे ही कला शिकून घ्या. ज्ञानी पुरुष ही कला शिकवतात की, 'या प्रकारे निघून जावे.'

## त्यामुळे नवीन भाव होत नाहीत

**दादाश्री :** लोक काय म्हणतात? अरे! असे अवेळी कुठून आले? त्यामुळे त्यांना काय मदत होईल?

**प्रश्नकर्ता :** नाही, त्याने कोणतीही मदत होत नाही, उलट त्रास होतो.

**दादाश्री :** उलट त्यामुळे त्याने आपला पुढील जन्म बिघडवला.

**प्रश्नकर्ता :** परंतु दादा, त्याचक्षणी जर प्रतिक्रमण आणि पश्चात्ताप केले तर? महात्म्याने जरी प्रतिक्रमण केले, म्हणजे भाव बदलले, तरी

पण दुसरे नवीन भाव तर राहिलेच ना? खराब भाव बदलून चांगले भाव केले, तरी त्याचे भावकर्म तर राहणारच ना? जोपर्यंत केवलज्ञान होत नाही तोपर्यंत?!

**दादाश्री :** प्रतिक्रमण केल्याने जे खराब भाव आहेत, ते चांगले भाव बनत नाहीत. 'मी अतिक्रमण केले, म्हणून प्रतिक्रमण करतो, आणि पुन्हा मी असे करणार नाही.' असे म्हटल्यामुळे ते खराब भाव धुतले जातात.

## प्रारब्ध फळ आणि कर्मबंध

'मी चंदुभाई आहे' यामुळे कर्म बांधले जाते. तुम्हाला आता 'मी शुद्धात्मा आहे' हे लक्ष (जागृती) बसले आहे, म्हणून आता ती सर्व प्रारब्ध कर्मे राहिली. तुम्ही खाता, पिता, रात्री झोपता, हे सर्व करा.

**प्रश्नकर्ता :** आपण असे म्हणाला होता की, जर विस्तवाला हात लावला तर तो भाजणारच ना? आपल्याला विस्तवाचे ज्ञान आहे की त्यामुळे भाजायला होते, तरी पण विस्तवाला हात लावला तर आपण भाजूच ना? मग ते फळ देते की नाही? त्याला फळ दिले असेच म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** नाही, ते तर प्रारब्ध फळ आहे. हा अज्ञानी माणूस तो मीच आहे, या मान्यतेने कर्म बांधले जाते. ही मान्यता सुटली की कर्मबंधन सुटले.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दादा, ज्ञानाने ही गोष्ट बरोबर आहे, परंतु जेव्हा तो कार्य करत असतो, तेव्हा जर मनात वाईट विचार येत असतील तर मग प्रतिक्रमण करावे लागेल ना?

**दादाश्री :** तुम्हाला करायचे नाही 'त्याच्याकडून' करवून घ्यायचे. जबाबदारी तरी मिटवावी लागेल ना? आपण प्रतिक्रमण करतो म्हणजे जबाबदारी मिटवतो. चंदुभाईने अतिक्रमण केले, म्हणून त्याला 'तू प्रतिक्रमण कर' असे सांगावे. ती जबाबदारी आपण मिटवून टाकावी.

**प्रश्नकर्ता :** आणि जर प्रतिक्रमण झाले नाही तर जोखीम आहे का?

**दादाश्री :** तर मग तेवढे प्रतिक्रमण करणे बाकी राहिले. पण त्याऐवजी प्रतिक्रमण करणे चांगलेच आहे ना? 'अतिक्रमण का केलेस? म्हणून प्रतिक्रमण कर.' बाकी, हे ज्ञान मिळाल्यावर फक्त प्रारब्ध कर्म भोगणेच बाकी राहिले आहे.

**प्रश्नकर्ता :** परंतु प्रारब्ध कर्म भोगता-भोगता अतिक्रमण होऊन जाते ना?

**दादाश्री :** तर मग प्रतिक्रमण करावेच लागेल. त्याच्याकडूनच करवून घ्यायचे, आणि धुऊन घ्यायचे.

**प्रश्नकर्ता :** त्याने धुतले नाही तर काय होईल?

**दादाश्री :** नंतर परत धुवावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** नंतर म्हणजे किती जन्म होतील?

**दादाश्री :** नंतर म्हणजे एक दोन जन्म जास्त होतील. ही सगळी जोखीम आपलीच आहे, बाहेरचा कोणीच जोखीमदार नाही. 'चंदुभाईने' चूक केली म्हणून आपण चंदुभाईला सांगावे 'अतिक्रमण का केलेस? म्हणून प्रतिक्रमण कर.' आपण त्याच्याकडूनच धुऊन घ्यायचे. तू कपडे खराब केलेस म्हणून तूच धुऊन टाक.

**प्रश्नकर्ता :** असे करण्यात तर ओझे वाटते म्हणून दुसऱ्यांदा होत नाही. मग दिवसभर उपयोग राहणारच नाही ना?

**दादाश्री :** तोच उपयोग.

**प्रश्नकर्ता :** तो कोणता उपयोग म्हणायचा?

**दादाश्री :** तोच शुद्ध उपयोग.

**प्रश्नकर्ता :** पण हे अतिक्रमण केले ना?

**दादाश्री :** हो, पण प्रतिक्रमण करवून घेतो, तोच शुद्ध उपयोग.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण की अतिक्रमण?

**दादाश्री :** अतिक्रमण झाले तर त्याचे प्रतिक्रमण करवून घेतो, तो शुद्ध उपयोग. अतिक्रमणाशी आपले काही देणेघेणे नाही. अतिक्रमणाला तर फक्त जाणले, आणि प्रतिक्रमण केले, तो शुद्ध उपयोग.

**प्रश्नकर्ता :** साधारणत: एका तासात पाच-पंचवीस वेळा अतिक्रमण होत असेल तर?

**दादाश्री :** त्या सर्वांसाठी एकत्रपणे (सामूहिक) प्रतिक्रमण करावे. एकत्र करू शकता, 'त्या सर्वांसाठी एकत्रपणे प्रतिक्रमण करत आहे', असे म्हणावे.

**प्रश्नकर्ता :** ते कसे करावे? काय म्हणावे?

**दादाश्री :** एवढी सारी अतिक्रमणे झाली आहेत, म्हणून या सर्वांचे मी एकत्रपणे प्रतिक्रमण करत आहे. विषय बोलावे की या विषयी असे असे (अतिक्रमण झाले आहे), 'या सर्वांचे मी एकत्रपणे प्रतिक्रमण करत आहे', असे म्हटले की काम झाले. आणि तरीसुद्धा काही शिल्लक राहिले तर तेही धुऊन टाकता येईल. ते मग नंतर धुतले जाईल. त्या मागे जास्त वेळ घालवू नका. जर बसून राहिलात तर सर्वच बाकी राहून जाईल. गोंधळात पडण्याची गरज नाही.



## [ 14 ]
# बाहेर काढते कषायांच्या कोठडीतून...

### द्वेष झाला की लगेच प्रतिक्रमण

हे तर जंजाळच आहे, तुला त्यांच्याबद्दल जितके विचार येतात तितके प्रतिक्रमण करतच राहावे. जेव्हा जेव्हा विचार येतील तेव्हा तेव्हा त्याचे प्रतिक्रमण करावे. बस. ते विचार त्वरित मिटवून टाकावे. प्रतिक्रमण केल्याने आपले सारे ॲटॅकिंग (आक्रमक) विचार बंद होऊन जातात. मग मनात द्वेष भाव होत नाही. ज्यांच्याप्रती मनात व्याकूळता होत असेल त्यांचे प्रतिक्रमण केले तर व्याकूळता संपते.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करावे, ते मनातच करावे की मग वाचून किंवा बोलून करावे?

**दादाश्री :** नाही. मनातच, मनात करा, बोलून करा, कसेही करा, की माझ्याकडून त्यांच्याप्रती जो दोष झाला आहे, त्याबद्दल मी माफी मागतो. असे मनात बोललात तरी चालेल. मानसिक आक्रमण केले, म्हणून त्यासाठी प्रतिक्रमण करायचे बस. काही निम्न जातीचे लोक मारामारी करतात. आणि आपली माणसे शब्दाने मारतात. किंवा मग मनाने मारतात. शब्दाने मारतात की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, मारतात.

**दादाश्री :** या स्त्रिया तर म्हणतात, अजूनपर्यंत माझ्या काळजातून

तो शब्द निघत नाही, असा घाव पडला आहे मला. लोक असे शब्द बोलतात! शिवाय मनानेही दु:ख देतात, आणि तिही तिच्या घरचीच माणसे असतात.

**प्रश्नकर्ता :** मनाने म्हणजे न बोलताच ना?

**दादाश्री :** तो (कडक) बोलला आणि ती जर विरोध करेल अशी असेल तर तो मनाने मारतो. आणि जर पती विरोध करत असेल तर पत्नी सुद्धा मनाने मारते. माझ्या तावडीत सापडला तर मी 'त्याला सरळ करेन', ती मग संधीच शोधत असते.

**प्रश्नकर्ता :** एखादा वाईट प्रसंग घडला असेल, समोरची व्यक्ती तुमच्याबद्दल वाईट बोलत असेल किंवा वाईट करत असेल तेव्हा त्याच्या प्रतिक्रियेमुळे आमच्या मनात राग येतो आणि तो राग आम्ही शब्दांद्वारे (बोलून) बाहेर काढतो पण मनात असे वाटत असते की 'हे चुकीचे होत आहे', तर जे बोलले जाते त्याचा दोष जास्त लागतो की मनाने केले त्याचा?

**दादाश्री :** बोलून टाकता त्याने? बोलून त्यांच्याशी भांडले त्याने? (असे विचारायचे आहे का तुम्हाला?)

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** बोलून जे करता ना, ते भांडण लगेच हिशोब देऊन पूर्ण होते. आणि मनात केलेले भांडण पुढे वाढत जाते. जेव्हा बोलून भांडता तेव्हा तर तुम्ही समोरच्याला जे म्हणाल, ते तो लगेचच तुम्हाला परत करील. लगेच तुम्हाला त्याचे फळ मिळेल. आणि जे मनात करता त्याचे फळ तर तेव्हा येईल, जेव्हा ते फळ पिकेल. आता तर फक्त बीजच पेरले आहे, म्हणून त्याला कॉजेस (कारणे) म्हणतात. आणि कॉजेस पडू नयेत यासाठी तर मनात केलेल्याचे प्रतिक्रमण मनात करायचे.

## रागासमोर प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** आम्ही आतापर्यंत जी प्रतिक्रमणे केली आहेत, त्यात

आम्ही कोणावर क्रोध केला असेल, द्वेष केला असेल, यासाठी प्रतिक्रमणे केली तर काय राग (मोह, आसक्ती) यासाठीही आम्हाला प्रतिक्रमणे करावी लागतील का?

**दादाश्री :** रागासाठी प्रतिक्रमण करायचे नसते. हा जो राग होत आहे त्याला आपण बंद करण्याची गरज आहे. बस, एवढेच.

**प्रश्नकर्ता :** तो कसा बंद करावा?

**दादाश्री :** मला वीतराग व्हायचे आहे, म्हणून राग बंद करावा. मला त्या स्टेशनवर लवकर पोहोचायचे आहे, म्हणून जिथे बसला असाल तिथून उठावेच लागेल ना? अशा प्रकारे राग बंद करावा.

ज्ञान घेतल्यानंतर राग-द्वेष हे दोन्हीही डिस्चार्ज स्वरूपात आहेत. समोरच्यावर द्वेष झाला तर त्याला दु:ख होते, इफेक्ट (परिणाम) होतो. म्हणून आपण प्रतिक्रमण केले तर द्वेष धुतला जातो, आणि रागामुळे तर कुणाला काही बाधा होत नाही. शिवाय तो डिस्चार्ज आहे म्हणून संपून जाईल. प्रतिक्रमण झाले नाही तरी पण तो संपणारच आहे. म्हणून प्रतिक्रमण झाले नाही तरी काही होणार नाही.

उदाहरणार्थ आपण व्यापार करतो, तेव्हा आपल्याला काही लोकांकडून दहा लाख रुपयांचे घेणे असते आणि दुसऱ्या कोणाला आपल्याकडून पाच लाख रुपयांचे घेणे असते. तर त्यांना वाटते की चला, यांच्याकडून पैसे घेऊन यावे. आता, ते जर रात्रीच्या दोन वाजता पैसे वसूल करण्यासाठी आले तरी आपण त्यांना पैसे देऊन टाकावे, कारण आपल्याला तर मोक्षाला जायचे आहे आणि जर आपले रुपये परत आले नाहीत, तर आपण तडजोड करू शकतो. त्याचप्रकारे राग आणि द्वेषाच्या बाबतीत करायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा आहे की रागाची हरकत नाही, पण द्वेषाची हरकत आहे. पण मग रागामुळे आत्म्याच्या प्रगतीमध्ये अंतराय येतात का?

**दादाश्री :** जो राग भरलेला आहे, तो आल्याशिवाय राहणारच

नाही, आणि आपला जो राग आहे, तो आता वाढणार नाही, कारण डिस्चार्ज आहे, त्यामुळे आपल्याला बाधक नाही. जो भरलेला माल आहे, तो आल्याशिवाय राहणारच नाही ना? आपण राग करत नाही, तो तर भरलेला माल आहे, म्हणून राग होऊन जातो. म्हणजे आपण त्याच्याशी गोड बोलतो, एवढेच! हे सर्व डिस्चार्जच आहे. (राग) अवरोध तर करणारच होता, पण तो डिस्चार्ज झाला, म्हणून आज्ञा पालन तर करावेच लागेल ना? जर तुम्ही आज्ञा पालन करत असाल तर तुम्ही निरंतर आत्म्यातच आहात. तुम्ही नोकरी करत असाल किंवा अन्य काही करत असाल परंतु जर आज्ञा पाळली तर तुम्ही निरंतर आत्म्यातच आहात.

**प्रश्नकर्ता :** पण राग असेल तिथे आज्ञेत कसे राहू शकतो?

**दादाश्री :** राग आणि द्वेष कशाला म्हणतात? तर कॉजेस रागाला राग म्हणतात. इफेक्टिव रागाला राग म्हणत नाहीत. आता जो राग आहे, तो कॉजेस राग नाही, इफेक्टिव राग आहे, कारण तुम्ही तर शुद्धात्मा झालात. शुद्धात्म्याला राग-द्वेष होत नाहीत, आणि जो इफेक्ट आहे तो 'चंदुलाल'चा आहे.

इफेक्टमध्ये राग असो किंवा द्वेष असो, आपण 'चंदुलाल'ला सांगावे की काही काम बिघडले म्हणून समोरच्यावर 'ॲटॅक' का करतोस? त्याचे प्रतिक्रमण कर. आणि रागासाठी तर काहीच करायचे नाही.

रागामध्ये जर जागृती राहिली नाही, आज्ञेत राहिला नाही, तर मग त्याचे प्रतिक्रमण करावे लागेल.

## स्वमान सुटताच मोक्ष

**प्रश्नकर्ता :** असा कोणता रस्ता आहे का, की आपल्या स्वमानालाही ठेच लागू नये, आणि प्रतिक्रमणही होईल?

**दादाश्री :** प्रतिक्रमण तर करू शकता. प्रतिक्रमण आणि स्वमानाचे काय देणेघेणे? त्याने स्वमानाला ठेच कशी काय लागते? भगवंतासमोर स्वमान नसतोच ना! स्वमान तर लोकांसमोर असतो. भगवंतासमोर दीनता

दाखविण्यात काहीच हरकत नाही. दुसऱ्यांच्या समोर दीन होऊ नये. स्वमानाचा अर्थ काय, तर दुसऱ्यांच्यासमोर दीन होऊ नये. आणि ज्याचा स्वमान सुटला, तो मोक्षाचा अधिकारी झाला.

## आपल्या अभिमानाचा समोरच्यावर परिणाम

**प्रश्नकर्ता :** आमच्या अभिमानामुळे कोणाला त्रास न होवो, संताप न होवो, त्याऐवजी समोरच्याला सुख होईल, यासाठी आम्ही काय करावे?

**दादाश्री :** एवढाच भाव करावा, दुसरे काही करायचे नाही, आमच्या अभिमानामुळे 'कोणाला दुःख होऊ नये पण सुखच होवो', असा भाव करावा. तरीही कोणाला जर दुःख झालेच तर मग प्रतिक्रमण करावे, आणि पुढे जावे, आणखी काय करू शकतो? आपण काय तिथे रात्रभर बसून राहावे? बसता येईल असेही नाही! आपल्याला बसायचे असेल तरीही बसू शकणार नाही, मग काय करावे?

तरी पण लोकांना दुःख होणार नाही, अशा प्रकारे आपण पावले टाकावी.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हा सारा संसार अहंकाराचाच परिणाम आहे? मी 'चंदुलाल आहे' याचा परिणाम म्हणजेच सारा संसार ना?

**दादाश्री :** पण आता तुमचा तो अहंकार या 'ज्ञाना'नंतर निघून गेला. म्हणजे जर अहंकार राहिला तरच परिणाम उत्पन्न होतील ना? या ज्ञानानंतर नवीन परिणाम उत्पन्न होत नाहीत, आणि जुने परिणाम तर संपत जातात. फक्त जुनेच संपतील. म्हणजे प्रश्न सुटला. टाकीमध्ये नवे काही जमा होत नाही. कोणाची टाकी पन्नास गॅलनची असते, तर कोणाची पंचवीस लाख गॅलनची असते. टाकी मोठी असेल तर थोडा वेळ लागतो, पण रिकामीच होत आहे, मग काय?

**प्रश्नकर्ता :** परंतु टाकी रिकामी होईपर्यंत तर पूर आल्यासारखे कोणाला खाली पाडू, कोणाशी भांडू आणि कोणाला मारू सुद्धा ना!

**दादाश्री :** हो, हे जे तुम्ही मारता ना, ते तर त्याचे परिणाम

आहेत ना! त्याचे आपल्याला काय देणेघेणे? परंतु जर कोणाला दुःख झाले, तर त्याचे प्रतिक्रमण करावे.

## क्रोधाचे प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** मला खूप क्रोध येतो, त्याचे प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** या ज्ञानानंतर तुम्हाला क्रोध येतच नाही. परक्या वस्तूंमध्ये तंत राहतो, त्याला आम्ही क्रोध म्हणतो. आता या ज्ञानानंतर तुम्हाला तंत राहत नाही! आता केवळ उग्रता राहते, परमाणूंचे गुण बाकी राहिले आहेत.

हे ज्ञान घेतल्यानंतर 'क्रोध-मान-माया-लोभ' सर्व निघून जातात. यांना जर क्रोध आला असेल तर कोणी म्हणेल, 'नाही, हे रागावत होते.' मी म्हणालो, रागावणे आणि क्रोध या दोन्ही गोष्टी वेगळ्या आहेत. रागावणे ही पौद्गलिक गोष्ट आहे, आणि 'क्रोध' तर पुद्गल आणि आत्म्याची तन्मयाकार स्थिती आहे. आता जरी रागावले तरी त्या रागावण्याला क्रोध का म्हणत नाहीत? कारण क्रोधाच्या मागे नेहमीच हिंसक भाव असतो, पण यांना हिंसक भाव नसतो, हे तर लगेच प्रतिक्रमण करतात. एकीकडे क्रोध होत असतो आणि सोबत दुसरीकडे प्रतिक्रमण करत असतात. क्रोध झाल्याबद्दल प्रतिक्रमण करत असतात. तुम्ही मनात प्रतिक्रमण करता की नाही? निरंतर प्रतिक्रमण करत असता, म्हणून त्यात हिंसक भाव नाही.

आणि तंतही राहत नाही. तंत म्हणजे काय? रात्री भांडण झाले असेल ना, तर सकाळी भांडी आपटत राहतात!

जगातील लोकांचा सजीव क्रोध आहे, आणि तुमचा निर्जीव क्रोध आहे. परंतु निर्जीव क्रोध कोणाच्या तरी निमित्ताने होतो. मग त्या बिचाऱ्याला थोडे तरी नुकसान होणारच ना?

## क्रोध आणि राग, यातील फरक

'तंत आणि हिंसक भाव' हे दोन्हीही असतील तर त्याला क्रोध

म्हणतात, मान म्हणतात, कषाय म्हणतात, ही तीर्थंकर भगवंतांनी सांगितलेली गोष्ट आहे. तरीही जर राग आला, कोणाला दु:ख होईल असे बोलले गेले, तर आपण 'चंदुभाई'ला सांगावे 'चंदुभाई, चौऱ्याहत्तर वर्षे झाली, आता जरा नीट वागा ना! आणि प्रतिक्रमण करा, पश्चात्ताप करा. असे का केले?' आपण असे सांगू शकतो की नाही?

**प्रश्नकर्ता :** सांगू शकतो, सांगायलाच हवे.

**दादाश्री :** मग जरी ते सरकारी ऑफिसातले मोठे अधिकारी असो, तरी संकोच करायचा नाही, आपण सांगायलाच हवे की चौऱ्यात्तर वर्षे झाली, आता तरी शांत व्हा. म्हणजे कोणाला दु:ख झाले तर क्षमा मागितली पाहिजे. क्रमणात हरकत नाही, पण अतिक्रमणात हरकत आहे. म्हणून अतिक्रमण झाले तर सरकारही त्याला गुन्हा मानते. सर्व सामान्यपणे जे बोलतो, त्यात काही गैर नाही, पण काही वेगळेच, विचित्र बोलले गेले, आणि ते ऐकून सगळ्यांना वाटले की, 'अरेरे! हे असे कसे बोलत आहेत!' याला अतिक्रमण म्हटले जाते जेव्हा नियत वाईट असते तेव्हा त्याला अतिक्रमण म्हणतात. वाईट उद्देश असेल, तर त्याला अतिक्रमण म्हणतात.

तंत गेला की समजावे आता 'क्रोध-मान-माया-लोभ' राहिले नाहीत. तुम्ही आता शुद्ध झालात, ज्ञाता-द्रष्टा परमानंदी! आता 'चंदुभाई' काय करत आहेत, हेच पाहात राहावे. 'चंदुभाई'चे सर्व काही कोण चालवील? तर व्यवस्थित नावाची शक्ती आणि खूप चांगल्या प्रकारे चालवील.

रागावले गेले आणि समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले, जरी क्रोध झाला नसेल पण दु:ख झाले असेल, तर हा तर मानतो की, 'मी शुद्धात्मा आहे', परंतु ज्याने अतिक्रमण केले आहे, त्याच्याकडून प्रतिक्रमण करून घ्यावे. अतिक्रमण करणारा चंदुभाई आहे, तुम्हाला चंदुभाईला सांगावे लागेल की 'तू प्रतिक्रमण कर.' तुम्हाला प्रतिक्रमण करायचे नाही, आत्मा झाल्यानंतर प्रतिक्रमण करायचे नसते. परंतु ज्याने अतिक्रमण केले त्याच्याकडून, म्हणजे आपल्या शेजाऱ्याकडून, प्रतिक्रमण करून घ्यावे.

आता क्रोध-मान-माया-लोभ होणार नाहीत, परंतु मुलीसमोर अचानक खूप उग्र झालात तर तुम्ही 'चंदुभाई'ला सांगावे, 'इतके जास्त उग्र कशाला होत आहात? मुलीला किती वाईट वाटेल!' मनातल्या मनात माफी मागा. मुलीच्या तोंडावर असे सांगायचे नाही, पण मनातल्या मनात माफी मागून, 'परत असे करणार नाही', असे म्हणा. आणि जर तुम्ही काही कटकट केली नसेल किंवा कोणाला दुःख होईल असे केले नसेल तर मग माफी मागण्याची गरज नाही.

**प्रश्नकर्ता :** कषायांच्या तंतामुळे प्रतिक्रमण होत नाहीत.

**दादाश्री :** उद्वेगामध्ये प्रतिक्रमण खूप उशीराने होत असते, आणि तंतामध्येही थोडा उशीर होतो. 'उद्वेग' म्हणजे बॉम्बॉर्डिंग करतात तसे, आणि 'तंत' म्हणजे 'टियर गॅस' सोडल्यावर घुसमट होते तसे.

## प्रकृतीला 'पाहणे' तो पुरुषार्थ

**प्रश्नकर्ता :** ते बरोबर आहे. क्रोध होतो तेव्हा आत भाव असे होतात की, हे चुकीचे आहे, तू क्रोध करायला नको होतास.

**दादाश्री :** तेव्हा आपण 'चंदुभाई'ला सांगावे की 'भाऊ, अतिक्रमण का केलेस? आता प्रतिक्रमण कर.'

**प्रश्नकर्ता :** जेव्हा क्रोध येतो, तेव्हा आत असे वाटते की, 'हा चंदू असे का करत आहे? तो जे करत आहे ते फार चुकीचे आहे.' पण मग कधी तरी हा क्रोध आम्हाला पाडून तर टाकणार नाही ना? अशा वेळी आम्ही काय करावे?

**दादाश्री :** तुम्हाला कोणी पाडणार नाही, ते सारे मृत आहेत, जिवंतला कसे पाडतील? सारे पुद्‌गल मृत आहेत. कोणी काही करणार नाही, 'मी तर दादांचा आहे, माझ्याजवळ कशाला येता?' लाज वाटत नाही का? 'दादा, दादा, दादा' म्हणत राहावे.

**प्रश्नकर्ता :** असे वाटते की, हा क्रोध परत आम्हाला संसार परिभ्रमण करायला लावेल. नवीन कर्म बंधनात टाकील?

**दादाश्री :** तो कसा बंधनात टाकील? क्रोध तर बिचारा न्यूट्रल (नपुंसक) जातीचा आहे! ते तर जे क्रोधाने दबलेले आहेत, त्यांच्यासाठी आहे. आपण दबलेलो नाही.

आणि जर प्रतिक्रमण होत नसेल तर त्याला सांगू शकतो की 'बाबा, प्रतिक्रमण कर.'

**प्रश्नकर्ता :** क्रोधाची सुरुवात झाल्यानंतर प्रतिक्रमणाची सुरुवात होते का?

**दादाश्री :** सुरुवात तर होते, दोन्ही एकाच वेळी सुरू होतात.

**प्रश्नकर्ता :** क्रोध होत राहतो आणि त्याचबरोबर प्रतिक्रमणही होत राहते. दोन्ही एकाच वेळी. अतिक्रमण आणि प्रतिक्रमण हे दोन्ही समोरासमोर मारामारी करतात.

**दादाश्री :** म्हणजे आता या सर्वांचा छेद (नाश) होतो. हिशोब पूर्ण होत राहिला आहे. ही प्रकृती आहे आणि तुम्ही पुरुष आहात. पुरुष हा शुद्धात्मा आहे, शुद्धात्म्याला काहीही स्पर्शत नाही. शुद्धात्मा ज्ञाता-द्रष्टा आहे. 'प्रकृतीला' पाहत राहणे, हाच पुरुषार्थ!

आता तुम्ही पुरुष झालात आणि ही प्रकृती आहे. प्रकृती काय करत आहे, ते तुम्ही पाहत राहावे. 'चंदुभाई' वाईट करत असेल की चांगले करत असेल त्याच्याशी तुमचे काहीच देणेघेणे नाही. तुम्ही वेगळे आणि 'पाहणारा' वेगळा. जसे की जबरदस्त होळी पेटत असेल, पण होळी 'पाहणारा' वेगळा असतो ना? स्वत:चे घर होळीसारखे पेटत असेल, पण जो 'पाहणारा' असतो तो भाजत नाही. आणि जर 'माझे पेटत आहे' असे वाटले की लगेच तो भाजतो.

**प्रश्नकर्ता :** 'पाहाणाऱ्याला' 'माझे आहे' असे कधी होत नाही.

**दादाश्री :** 'पाहाणाऱ्याला' 'माझे आहे', असे होतच नाही. तो तर प्रेक्षक आहे. आपल्याला 'हे माझे' असे कधी होत नाही. 'माझे' उडवून टाकले आहे. 'माझे' ते तर तुम्ही मला अर्पण करून टाकले आहे.

पाहत राहिल्याने प्रकृती संपूच लागेल. प्रकृती संपत जाईल, आणि तेवढी कर्मे संपतील.

## गुन्हा आहे परंतु मृत

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमणामुळे जो आक्रोश होत असतो, तो काय प्रतिक्रमणामुळे शांत होऊन जातो का?

**दादाश्री :** हो, शांत होऊन जातो. चिकट फाइल (गाढ ऋणानुबंधवाली व्यक्ती किंवा संयोग) असेल, तर त्यासाठी पाच-पाच हजार वेळा प्रतिक्रमणे करावी लागतात, तेव्हा कुठे तो शांत होतो. राग बाहेर निघाला नसेल परंतु मनात अस्वस्थता होत असेल, आणि तरीही आपण त्यासाठी प्रतिक्रमण केले नाही, तर आपल्यावर तेवढा डाग राहतो. प्रतिक्रमण केले की मग स्वच्छ होऊन जाते. अतिक्रमण केले म्हणून प्रतिक्रमण करा.

**प्रश्नकर्ता :** कोणावर क्रोध झाल्यानंतर कळते, आणि आम्ही त्याचक्षणी त्याची माफी मागतो, तर याला काय म्हणतात?

**दादाश्री :** आता ज्ञान घेतल्यानंतर क्रोध झाला आणि नंतर त्याची माफी मागितली, तर काही हरकत नाही, तर त्यापासून मुक्त झालात! प्रत्यक्ष मागता आली नाही तर मनात माफी मागितली तरी चालेल.

**प्रश्नकर्ता :** प्रत्यक्ष सर्वांसमोर?

**दादाश्री :** हरकत नाही, जर कोणी अशी माफी मागितली नाही आणि आतल्या आत मागितली तरी चालेल. कारण हा गुन्हा जिवंत नाही, हे डिस्चार्ज आहे. डिस्चार्ज म्हणजे हा जीवित गुन्हा नसल्यामुळे एवढे अधिक वाईट फळ देत नाही.

## रोख परिणाम, मनापासून केलेल्या प्रतिक्रमणाचे

**प्रश्नकर्ता :** कोणावर खूप रागावलो आणि मग बोलून गप्प झालो, पण नंतर हे जे बोलले गेले त्यामुळे खूप अस्वस्थता वाटत राहते. तर काय त्यासाठी एकाहून जास्त प्रतिक्रमणे करावी लागतील?

**दादाश्री :** त्यासाठी दोन-तीन वेळा अगदी मनापासून प्रतिक्रमणे कराल, एकदम योग्य पद्धतीने, म्हणजे झाले. 'हे दादा भगवान, भयंकर भानगड झाली, जबरदस्त क्रोध झाला, समोरच्याला खूप दुःख झाले, मी जबरदस्त माफी मागतो' असे म्हणावे. माफी कोण मागतो? तुम्हाला माफी मागायची नाही, 'चंदुभाई'ने मागायची. ज्याने अतिक्रमण केले, तोच प्रतिक्रमण करेल. तुम्ही अतिक्रमण करत नाही.

## अतिक्रमणांच्या वर्षावापुढे

**प्रश्नकर्ता :** कोणाबरोबर जास्त वादविवाद झाले असतील, तर त्यामुळे मग मनात अढी वाढत जाते. कधी कधी एक-दोन प्रतिक्रमणे होतात, तर काहींसाठी चार-पाच वेळा किंवा त्याहून जास्त वेळा करावी लागतात, तर काय सगळ्यांसाठी एकदाच प्रतिक्रमण केल्याने सारे काही साफ होऊन जाईल?

**दादाश्री :** जेवढी जमेल तेवढी करा, आणि मग सामूहिकपणे करून टाका. जास्त प्रतिक्रमणे करायची राहिली तर मग सामूहिक प्रतिक्रमण करावे की, 'या सर्व कर्मांची वेगवेगळी प्रतिक्रमणे माझ्याकडून होत नाहीत, म्हणून मी त्या सर्वांसाठी एकत्रपणे प्रतिक्रमण करत आहे.' अन्य कोणाला नाही, तर तुम्ही दादा भगवानांना असे सांगावे, की 'हे दादा भगवान, या सर्वांचे मी एकत्र प्रतिक्रमण करत आहे.' म्हणजे ते पोहोचेल.

## प्रत्यक्ष माफी

**प्रश्नकर्ता :** दादा, जेव्हा पश्चात्ताप किंवा प्रतिक्रमण करतो, तेव्हा बऱ्याच वेळा असे होते की कोणती तरी चूक झाली किंवा कोणावर क्रोध झाला, तर आतून खूप दुःख होते की 'ही चूक झाली', पण त्या व्यक्तीची प्रत्यक्ष माफी मागण्याची हिम्मत होत नाही.

**दादाश्री :** प्रत्यक्ष माफी मागायचीही नाही, नाही तर ते त्याचा दुरुपयोग करतील. म्हणतील, 'हो, आता आलीस ना वळणावर?' असे आहे हे सारे. नोबल (उमदा) जातीचे नाहीत. हे लोक प्रत्यक्ष माफी

मागण्याच्या लायकीचे नाहीत. असे असतात, असतात असे, पण हजारात दहाएक लोकच असे असतात की जे माफी मागण्याआधीच नमतात. तुम्ही माफी मागण्याआधीच ते नमतात. आणि बाकीचे सर्व तर म्हणतील 'हो, कधीपासून सांगत होतो तरी तू ऐकतच नव्हतीस. आता आलीस ना वळणावर?' म्हणून आतूनच माफी मागून घ्यावी, त्याच्या शुद्धात्म्याला आठवून!

## ते आपल्याला पाहायचे नाही

**प्रश्नकर्ता :** आम्ही समोरच्या व्यक्तीवर क्रोध करतो, आणि नंतर लगेच प्रतिक्रमण पण करून घेतो, तरी पण आमच्या क्रोधाचा समोरच्या व्यक्तीवर झालेला परिणाम त्वरित नष्ट होत नाही ना?

**दादाश्री :** परिणाम नष्ट झाला की झाला नाही हे तुम्ही पाहायचे नाही. तुम्ही तुमचे कपडे धुऊन स्वच्छ करायचे. समोरचा माणूस तुम्हाला भेटतो तर तो त्याचा हिशोब असेल म्हणूनच भेटतो ना! तुमची इच्छा नसते तरी पण भेटतो. तुम्हाला आवडत नसेल तरीही होऊन जातो ना?

**प्रश्नकर्ता :** क्रोध तर होतोच.

**दादाश्री :** म्हणून तुम्ही ते पाहायचे नाही, तुम्ही प्रतिक्रमण करावे. तुम्ही सांगावे की, 'चंदुभाई, प्रतिक्रमण करा', मग तो कपडा खराब झाला की लगेच धुऊन टाकेल! दुविधेत पडायचे नाही. नाही तर परत तुमचे बिघडेल.

## अंडरहॅन्ड बरोबरील व्यवहार

**प्रश्नकर्ता :** निंदा केली त्यावेळी जरी त्याला जागृती राहिली नसेल, परंतु जर निंदा झाली किंवा रागावलो तर त्याला निंदा करणे असे म्हणतात का?

**दादाश्री :** त्यालाच तर कषाय म्हणतात. कषाय म्हणजे दुसऱ्यांच्या ताब्यात येणे. त्या वेळी तो बोलतो, पण बोलते वेळीच त्याला जाणीव होते की, 'हे चुकीचे होत आहे.' काही वेळा जाणीव होते आणि काही

वेळा अजिबात जाणीव होत नाही, असेच शब्द निघून जातात. नंतर थोड्यावेळाने जाणीव होते. याचा अर्थ जेव्हा झाले तेव्हा पण तो 'जाणत' होता.

**प्रश्नकर्ता :** आमच्या ऑफिसमध्ये तीन-चार सेक्रेटरी आहेत, त्यांना सांगितले की असे काम करायचे आहे. एकवेळा, दोन वेळा, चार-पाच वेळा सांगूनही त्या तीच चूक परत परत करत राहतात, तेव्हा मग मी त्यांच्यावर रागावतो, तर अशा वेळी मी काय करावे?

**दादाश्री :** तुम्ही तर शुद्धात्मा झाला आहात. आता तुम्हाला कुठे राग येतो? राग तर 'चंदुभाई'ला येतो. म्हणून तुम्ही 'चंदुभाई'ला सांगावे 'आता दादा मिळाले आहेत, आता तरी राग कमी करा ना?'

**प्रश्नकर्ता :** पण त्या सेक्रेटरींमध्ये अजिबात सुधारणा होत नाही. तर त्यासाठी काय करावे? सेक्रेटरींना काही सांगावे तर लागेलच ना? नाही तर त्या तशाच चुका परत परत करत राहतील! शिवाय त्या कामही बरोबर करत नाहीत.

**दादाश्री :** मग तुम्ही 'चंदुभाई'ला सांगावे की, 'त्यांना जरा रागवा.' पण समभावाने निकाल करून रागवा. नाटकीय पद्धतीने रागवावे की, 'असे करत राहिलात तर तुमची सर्विस कशी राहणार?', असे सर्व सांगावे.

**प्रश्नकर्ता :** पण मग असे सांगितल्यावर त्यांना दु:ख तर होईलच ना? आणि तुम्ही तर सांगितले आहे की कोणालाही दु:ख द्यायचे नाही.

**दादाश्री :** दु:ख होणार नाही, कारण तुम्ही नाटकीय पद्धतीने बोललात तर त्यांना दु:ख होणार नाही, फक्त त्यांच्या मनात जागृती येईल, व त्यांचा निश्चय बदलेल. म्हणजे तुम्ही दु:ख देत नाही. दु:ख केव्हा होईल? तर तुमचा हेतू जर दु:ख देण्याचा असेल, की 'मी त्यांना सरळ करायला हवे', तरच त्यांना दु:ख होईल.

मग असे सांगितल्यानंतर लगेच चंदुभाईला सांगावे की, 'यांना

जरा कडक शब्द बोलले गेले, हा दोष झाला, म्हणून प्रतिक्रमण करा.' त्यासाठी मग मनात माफी मागून घ्यावी. म्हणजे सांगायचे पण आणि प्रतिक्रमण पण करायचे. दोन्ही सोबतीने करायचे, संसार व्यवहार तर चालवावा लागेल ना!

## ज्ञानानंतर डिस्चार्ज द्वेष

**प्रश्नकर्ता :** नोकर नीट काम करत नसेल म्हणून त्याला काढून टाकले तर काय त्याचा दोष लागेल? की ते व्यवस्थित आहे?

**दादाश्री :** तो दोष नाही, जिथे राग-द्वेष नाहीत, तिथे समोरासमोर पुद्‌गलाची मस्ती आहे. राग-द्वेष आहेत तिथे बंधन आहे. ज्ञान मिळाल्यानंतर राग-द्वेष राहत नाहीत. आणि जर राहिले तर त्याचा गुन्हा लागेल. परंतु तो डिस्चार्ज द्वेष आहे, म्हणून फार मोठा गुन्हा लागत नाही.

कोणतीही क्रिया रागाने होत असते किंवा द्वेषाने होत असते. परंतु ज्ञानानंतर राग-द्वेष होत नाहीत. राग-द्वेष नाहीत, तिथे पुद्‌गल समोरासमोर आपटतात. त्याला पाहणारा 'ज्ञाता- द्रष्टा', तोच आत्मा! त्यात जर तन्मयाकार झाला, तर मार खाईल. तन्मयाकार केव्हा होतो? जर त्यात खूप खोल उतरला असेल, तर तन्मयाकार होतो. पण नंतर तुम्ही चंदुभाईला प्रतिक्रमण करायला सांगावे. म्हणजे सारे साफ होऊन जाईल.

रागाचे 'ज्ञाता-द्रष्टा' राहिल्याने राग साफ होऊन निघून जाईल. ते परमाणू शुद्ध होऊन निघून जातील. एवढेच तुमचे कर्तव्य.

**प्रश्नकर्ता :** रागावल्यानंतर प्रतिक्रमण केले, तर त्याला पुरुषार्थ म्हणायचा की पराक्रम म्हणायचे?

**दादाश्री :** त्याला पुरुषार्थ म्हणतात, पराक्रम नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग पराक्रम कशाला म्हणतात?

**दादाश्री :** पराक्रम तर पुरुषार्थाच्याही पुढे आहे, आणि हा काही पराक्रम नाही. हे तर आत आग होत आहे त्यावर औषध लावतात. यात

पराक्रम कुठे आहे? या सर्वांना जाणणे, आणि जाणणाऱ्यालाही जाणणे त्याला पराक्रम म्हणतात. आणि प्रतिक्रमण करणे याला पुरुषार्थ म्हणतात. शेवटी प्रतिक्रमण करता करता शब्दांचा भडिमार कमी होत जाईल, आपोआपच सर्व कमी होत जाईल. नियमानेच सारे कमी होत जाईल, नैसर्गिकपणे सर्व बंद होईल. प्रथम अहंकार जाईल, आणि नंतर बाकी सर्व जाईल. आपापल्या घरी जातील. आत थंडगार वाटेल! आता आत थंडगार वाटते ना?

**प्रश्नकर्ता :** बिलकुल, दादा.

**दादाश्री :** हो, मग ठीक आहे. हेच पाहिजे आपल्याला.

## विविध गुणस्थानकात कमी जास्त कषाय

**प्रश्नकर्ता :** गुणस्थानक विषयी समजावून सांगा ना.

**दादाश्री :** प्रथम तीन गुणस्थानक मोक्षासाठी कामाचे नाहीत, तिथे ते चालणार नाहीत. त्यात तर फक्त, मंदिरात ये-जा करतात, बस एवढेच. भटकत राहतात. जेव्हा आत समकित होते, सम्यक्दर्शन उघडल्यानंतरचा चौथा गुणस्थानक कामी लागतो. समकित उघड झाल्यानंतर. म्हणून हे लोक प्रथम तीन गुणस्थानकातच भटकत राहतात. चौथ्यामध्ये प्रकाश होतो. म्हणजे समकित झाल्यानंतर तो पुढे प्रगती करतो. नंतर चौथ्यातून पाचव्यामध्ये येतो. जास्त प्रतिक्रमण करत, करत सहाव्यामध्ये येतो. बस, तेच प्रतिक्रमण करत करत पुढे जातो.

## अनंतानुबंधी कषाय

शास्त्रकारांनी काय लिहिले आहे की, एखादा माणूस या ताईंना अशी दोनच वाक्ये बोलला की त्यामुळे तिचे मन अतिशय दुखावले गेले. तो असे बोलला की आयुष्यभर मनाचे घाव भरून निघणार नाहीत. याला शास्त्रकारांनी काय म्हटले आहे? तर 'अनंतानुबंधी क्रोध', अनंत जन्मांपर्यंत भटकवत ठेवेल असा हा क्रोध.

अन्य कोणत्या प्रकारचा क्रोध असेल, तर ते वर्षभर एकमेकांशी

बोलत नाहीत. पण एका वर्षानंतर ते घाव भरून निघतात. क्रोधाचा विसर पडतो आणि घाव भरून निघतात. म्हणजे एका वर्षाची मुदत असलेला क्रोध. हा कुठल्या प्रकारचा क्रोध म्हणायचा? तर 'अप्रत्याख्यानी क्रोध', म्हणजे 'असा क्रोध की ज्याच्यासाठी पश्चात्ताप केला नव्हता, प्रतिक्रमण केले नव्हते, म्हणून क्रोध झाला' असे म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** एकदा जो क्रोध झाला होता, तोच क्रोध परत निघाला, असे म्हणू शकतो का?

**दादाश्री :** नाही, असे नाही. क्रोध झाल्यानंतर जर प्रतिक्रमण केले नाही, तर परत त्याच वेगाने तो बाहेर पडतो. क्रोध झाल्यावर प्रतिक्रमण केले नाही, तर तो वर्षभराचा म्हणायचा आणि जर त्यानंतर प्रतिक्रमण केले असेल, तर पंधरा दिवसाचा म्हणायचा. पंधरा दिवसानंतर परत दोघे बोलू लागतात, सगळे काही विसरून जातात, याला काय म्हणतात? तर 'प्रत्याख्यानी' क्रोध असे म्हणतात.

आयुष्यभरासाठी संबंध तुटतात. तो आहे 'अनंतानुबंधी क्रोध.' या मोठ्या शिलाखंडामध्ये एक किंवा दोन फुटाची फट पडली तर त्यात मग कितीही वस्तू पडत राहिल्या तरी पण ती फट तशीच राहते, कायमसाठी तशीच राहते.

या आधी वर्षभरासाठी कोणता सांगितला? अप्रत्याख्यानी. उदा. शेतजमिनीला भेगा पडल्या तर त्या वर्षभरात भरून येतात.

मग त्यानंतरचा पंधरा दिवसाचा क्रोध कुठला? तर तो म्हणजे 'प्रत्याख्यानी.' त्यात जशी वाळूवर एक रेषा ओढली, आज समुद्राच्या वाळूवर एक रेषा ओढली, तर ती किती वेळ टिकेल?

**प्रश्नकर्ता :** लगेचच. वारा आला की लगेच मिटेल!

**दादाश्री :** वारा येताच एक होते. एक तास, दोन तासही लागू शकतात, तर तो आहे प्रत्याख्यानी क्रोध. आणि चौथा, म्हणजे पाण्यात रेषा ओढली, तर ती लगेच मिटते. तर हा जो पाण्यातील रेषेसारख्या क्रोध आहे, त्याला 'संज्वलन क्रोध' म्हटले आहे. या सर्व महात्म्यांना

पाण्यातील रेषेसारखा नसतो. सर्वांचा पंधरा दिवसानंतर जुळून येतो. कित्येकांचा मात्र पाण्यातील रेषेसारखाही असतो.

बुद्धी कबूल करेल अशी ही गोष्ट आहे ना, या शास्त्रकारांची?

**प्रश्नकर्ता :** आत्मा कबूल करेल अशी गोष्ट आहे.

**दादाश्री :** तो आत्मा म्हणजे कोणता आत्मा? व्यवहार आत्मा, प्रतिष्ठित आत्मा. हा सारा बुद्धीचा खेळ आहे. आणि तो कोणता आत्मा? तर व्यवहार आत्मा. मूळ आत्मा तर त्यालाही जाणतो, सर्व काही जाणतो.

## अप्रत्याख्यानावरण कषाय

**प्रश्नकर्ता :** जर एकदा अनंतानुबंधी तुटले तर काय तो खालच्या कक्षेत जातो, म्हणजे हळूहळू कमी होत जातो?

**दादाश्री :** तो तर वाढूही शकतो, परंतु जेव्हा अप्रत्याख्यान येते तेव्हा जे कषाय होतात, त्यांच्यासाठी कधीही प्रतिक्रमण व प्रत्याख्यान केलेले नसतात. म्हणजे जे काही कषाय होतात, ते प्रत्याख्यान केले नव्हते म्हणून होतात. मग प्रतिक्रमण-प्रत्याख्यान करण्याची सुरुवात होते. तो मग प्रतिक्रमण, प्रत्याख्यान करत राहतो, पाचव्या गुणस्थानकात, त्याचे फलस्वरूप तो सहाव्या गुणस्थानकात प्रवेश करतो. सहाव्यामध्ये काय असतात? प्रत्याख्यानावरण कषाय!

## प्रत्याख्यानावरण कषाय

प्रत्याख्यानावरण म्हणजे काय? तर प्रतिक्रमण-प्रत्याख्यान करूनही कषाय होतात. ते तर कितीतरी थरवाले असतात. थोडे थरवाले निघून गेले, पण जास्त थरवाले प्रत्याख्यान आवरण, लाखों प्रतिक्रमणे केली तरी जात नाहीत.

**प्रश्नकर्ता :** ते कोणते दोष?

**दादाश्री :** त्यांना प्रत्याख्यानावरण म्हणतात, प्रत्याख्यान केले आहे तरीही ते जात नाहीत.

**प्रश्नकर्ता :** त्याचे काय कारण?

**दादाश्री :** खूपच खोल, जाड! पाच पाच हजार थर असतात. जसे कांद्याच्या पाकळ्या असतात ना, आपण एक-एक करून काढत गेलो तरीही दिसतच राहतात ना? म्हणजे हे एक प्रकारचे आवरण आहे. (असे दोष) सर्वांमध्ये एक, दोनच असतात, जास्त नसतात.

**प्रश्नकर्ता :** ते वारंवार येत राहतील?

**दादाश्री :** हो, ते वारंवार येत राहतील.

**प्रश्नकर्ता :** पण कधी ना कधी तर निघून जातील ना?

**दादाश्री :** जाऊ लागतील, हिशोब संपत चालला आहे म्हणून कमीच होत आहेत, म्हणजे निघण्यासाठी अडचण नाही. निघतील तर खरे, परंतु आज काय त्रास आहे? तर प्रतिक्रमण करतो, प्रत्याख्यान करतो, तरी पण परत परत येतात?

म्हणजे प्रत्याख्यान केल्यामुळे अप्रत्याख्यान आवरण मिटले, पण आता प्रत्याख्यानाचे आवरण आले त्याचे काय?

**प्रश्नकर्ता :** त्याचेही आवरण येते?

**दादाश्री :** हो, तू साबणाने मळ काढलास, पण साबणाचा मळ बसला, त्याचे काय? ते झाले प्रत्याख्यानावरण. म्हणजे असे करता, करता, ते अधिक अधिक स्वच्छ होत जाते ना, ते 'प्रत्याख्यानावरण!', प्रत्याख्यान केले असेल तरीही दोष झाला, तर त्याला 'प्रत्याख्यानावरण कषाय' म्हणतात, कारण सामूहिक प्रतिक्रमण केले होते ना, म्हणून.

## संज्वलन कषाय

निरंतर प्रतिक्रमण-प्रत्याख्यान होत असतात, त्यांना 'प्रत्याख्यानावरण' म्हणतात. तो आहे सहावा गुणस्थानक. पूर्वींच्या अप्रत्याख्यानाचे आता प्रत्याख्यान करतो. साधू महाराजांचा सहावा निश्चयाचा आणि व्यवहाराचा गुणस्थानक केव्हा म्हटला जाईल? तर जेव्हा क्षणोक्षणी प्रतिक्रमण-

प्रत्याख्यान असेल तेव्हा. पूर्वीच्या प्रत्याख्यानाचा आता उदय आल्यामुळे त्यांना त्याग वर्तत असतो.

म्हणजे सहावा गुणस्थानक कोणाला म्हणावे? कषाय कार्यकारी होतात, रूपकामध्ये दिसतील असे कार्यकारी होतात. रूपकाची गोष्ट तर वेगळी आहे, पण कार्यकारी कषाय दिसू लागतात. आता प्रतिक्रमण केल्यानंतरही कार्यकारी होतात, म्हणजे पच्चखाणी प्रतिक्रमण केले आहे, तरीही अजून हे बाकी राहिले आहे. ही गाठ मोठी असल्यामुळे त्याला प्रत्याख्यानी म्हणतात. प्रत्याख्यान आवरण आहे. आणि जर आत उदय होतो पण कार्यकारी होत नसेल, तर त्याला 'संज्वलन कषाय' म्हणतात. म्हणजे थोबाडीत वगैरे मारत नाहीत, परंतु प्रत्याख्यानावरणमध्ये आत दु:ख होते, वेदना होतात. पण समाधी वाटते. ते तर जेव्हा अनुभव होईल तेव्हा कळेल की 'हे काय आहे?', म्हणजे ही गोष्ट वेगळ्या प्रकारची आहे.

'क्रोध-मान-माया-लोभ' प्रत्याख्यानी असतात. म्हणजे दुसऱ्यांना ते कळत नाहीत. कोणा बुद्धिशालीलाही बुद्धीने हे कळणार नाही की ते आता क्रोधित झाले आहेत. फक्त ते स्वत:च जाणतात. असे कषाय 'प्रत्याख्यानी' असतात. म्हणजे पाच महाव्रतधारींबद्दल तर काय बोलावे? जर या काळात असे कोणी असतील तर खूपच झाले! ते प्रत्याख्यानी कषाय निघून गेले की मग फक्त संज्वलन कषाय राहतात.

## सहाव्यापासून नवव्या गुणस्थानकांची स्थिती

व्यवहार गुणस्थानक सर्वांचे बदलत राहते. कोणी चौथ्यामध्ये येतो, कोणी पाचव्यामध्ये येतो, तर कोणी सहाव्यामध्ये येतो. अगोदर अप्रत्याख्यान होते, अप्रतिक्रमण होते. तर आता आलोचना झाल्या, प्रतिक्रमणे झाली, प्रत्याख्याने झाली! त्यामुळे मग त्यांची अप्रत्याख्यान आवरणे पण निघून जातात.

व्यवहारात अजून ज्यांच्या मोठ्या फाइली आहेत, ते अजून सहाव्या गुणस्थानकात आहेत असे म्हणायचे.

व्यवहारात सहावे गुणस्थानक कशाला म्हणतात? तर स्त्री-पुरुष वगैरे सर्व सोडून दिले त्याला नाही, तर अप्रत्याख्यान आवरण शिल्लक नसेल त्याला म्हणतात. प्रत्याख्यान केले तरी पण तेच तेच दिसत राहते. म्हणजे पुन्हा कांद्याचे थर दिसतात. त्याला प्रत्याख्यान आवरण म्हणतात. जेव्हा कधी तासभर बसला असेल तेव्हा तर अप्रमत येते, ते म्हणजे सातवे गुणस्थानक! आणि मग कधी तरी आठवे अपूर्व गुणस्थानक येते. तेव्हा तर इतका आनंद-आनंद वाटतो ना! पण नववे गुणस्थानक ओलांडू शकत नाही. कारण जोपर्यंत स्त्री परिग्रह आहे तोपर्यंत नववे गुणस्थानक ओलांडता येत नाही.

## परिणामस्वरूपात सुद्धा कषाय रहितता

या देहात जरासुद्धा 'क्रोध' असता कामा नये. म्हणजे क्रोधाचा परमाणू नसावा. लोभाचा परमाणू नसावा, मानाचा परमाणू, कपटाचा परमाणू, असे कुठलेही परमाणू शिल्लक नसावेत, त्यानंतर त्याला भगवंत म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** कषायांची शून्यता, पूर्ण शून्यता असली पाहिजे?

**दादाश्री :** ते कषाय तर समजा की गेलेच, कषाय गेल्यानंतर त्याचा परमाणू देखील राहता कामा नये. म्हणजे परिणाम स्वरूपातही राहता कामा नये. कषाय निघणे म्हणजे काय? जर ते कॉजेस (कारण) स्वरूपानेसुद्धा निघून गेले, तर त्यांना 'कषाय निघणे' असे म्हणतात, पण त्याचा परिणाम पण निघून जातो. शरीरात परिणाम राहत नाही. आता तुमचे 'कॉजेस' स्वरूपात तर निघून गेले आहेत. पण परिणाम स्वरूपात बाकी आहेत. कोणत्या तरी जागी चिकटलेले असते.

**प्रश्नकर्ता :** डिस्चार्ज पण संपलेले असते का?

**दादाश्री :** हो, ती दशा मी पाहिली आहे, म्हणून तर हे मूळ स्वरूप उत्पन्न होते, अनुभव येतो, नाही तर होत नाही. आत्मा दिसत नाही; कषायांचा अभाव, तिथेच आत्मा आहे.

**प्रश्नकर्ता :** आणि तो टोटल (संपूर्ण) अभाव!

**दादाश्री :** तो होऊ शकत नाही, या काळात ती गोष्ट अशक्य आहे, आणि सुषमकाळात तर काहीच अशक्य नसते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे कषायांच्या उद्‌भव स्थानातही नसतात. जिथे त्याचा उद्‌भव होतो, तिथे देखील नसतात?

**दादाश्री :** तिथेही नसते.

## कषायसहित प्ररूपणा, ती आहे नरकाची निशाणी

**प्रश्नकर्ता :** म्हणजे कषाय अजिबात नसतात, असे?

**दादाश्री :** तेव्हाच तर हे ज्ञान उद्‌भवते! म्हणून जेवढेही महाराज गादीवर बसले आहेत, ते जेव्हा विचारतात, तेव्हा मी त्यांना सांगतो 'महाराज साहेब, मी विनंती करतो की आपण कधी प्रवचन करू नका.' तेव्हा ते विचारतात, 'का आम्हाला काय अडचण आहे?' मी म्हणालो 'नरकात जायचे असेल तर करा, हे नरकात जाण्याचे सर्वात मोठे लक्षण आहे.' बोला आता, ही जोखीम त्यांना कशी समजेल? स्वत:च चूक करणारी व्यक्ती ही चूक कशी शोधून काढेल?

**प्रश्नकर्ता :** 'स्वत:ची' चूक दिसतच नाही ना?

**दादाश्री :** जर दिसत नसेल तर मग ती 'चूक' सोडणारच नाही ना? नरकात जाण्यासारखी चूक आहे. कषायसहित प्ररुपणा (निरूपणा) ही नरकात जाण्याची निशाणी आहे. म्हणून कषायसहित व्याख्यान देऊ नये. कोणते कषाय? तर याचा नियम आहे की, प्रत्याख्यानावरण कषाय असतील, त्यांना व्याख्यान देण्याचा अधिकार आहे. परंतु ज्यांना अनंतानुबंधी कषाय आहेत, समकित झाले नाही म्हणजे अनंतानुबंधी कषाय असणारच. त्यांना जर असे विचारले की तुम्हाला 'समकित झाले आहे का', तर म्हणतात 'नाही, नाही झाले.' म्हणजे समकित झाले नाही, आणि अनंतानुबंधी असूनही उपदेश देणे, त्याला मिथ्यात्वी म्हणतात.

मिथ्यात्वी म्हणजे?, 'पॉइजनस' (विष). म्हणून भगवंतांनी काय म्हटले आहे, तीर्थंकरांची वाणी जर मिथ्यात्वीने वाचली तर 'पॉइजन'

होऊन जाते. आणि मिथ्यात्वीची वाणी, मिथ्यात्वी पुस्तके, धर्म पुस्तके जर समकित जीवाने वाचली तर त्याचे अमृत होऊन जाते. कारण सापाच्या तोंडात दूध गेले, तर ते पॉइजन होऊन जाते. सध्या इथे सर्व ठिकाणी नरकात जाण्याची निशाणी आहे, असे जर बोललो तर ते मारतील, हिंसा वाढेल, म्हणून आम्ही काही बोलत नाही. असे शब्द की जे समोरच्याला समजणारच नाहीत, मग तिथे बोलण्याचा शौक कोण करेल? त्यांनी विचारले तर मी उत्तर देईन. एका बाईंने सोडूनही दिले, आणि मग त्या ज्ञान घ्यायला आल्या. त्या महासती म्हणाल्या 'आम्ही दोन वेळ व्याख्यान देतो, आणि आम्ही असेच करत असतो. आम्ही नरकात जाण्याची तयारी केली आहे. म्हणूनच आम्हाला त्यांना उपदेश देण्याची इच्छा होते. (त्यांनी मला विचारले) तुमच्याकडून ज्ञान घेतल्यानंतर आम्ही उपदेश देऊ शकतो का?' मी म्हणालो, 'हो, देऊ शकता.' मग त्यांनी ज्ञान घेतले. असे सर्व गादीधारकांनी ज्ञान घेतले आहे, आणि त्याचा खूप चांगला परिणाम येत असतो.

## समकित दृष्टीनेही भेदली जातात आवरणे

**प्रश्नकर्ता :** ज्ञायक स्वभावीचे जेव्हा संसारी उदय येतात, तेव्हा तो त्यात उदयवश होत नाही का?

**दादाश्री :** नाही, उदयांचा तो ज्ञाता असतो. उदयाचा 'ज्ञाता' असेल तेव्हाच 'ज्ञायक स्वभाव', म्हटले जाते. आणि उदयाचा ज्ञाता नसेल तेव्हा 'उदयवश' म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** दादा, एकदा ज्ञायक स्वभावात आल्यानंतर परत तो उदयवश होऊ शकतो?

**दादाश्री :** जेव्हा खूप चिकट उदय येतात तेव्हा तर उदयवश होणारच ना! म्हणून याला 'प्रत्याख्यानावरण' असे लिहिले आहे. मी फार विचार करायचो की, 'ओहोहो! हे प्रत्याख्यानावरण कषाय, म्हणजे नक्की कोणत्या प्रकारचे कषाय असतील? ज्ञान व्हायच्या आधी मी खूप विचार करत असे. कारण त्या लोकांनी काय म्हटले आहे? तर अविरत

कषाय, म्हणजे अनंतानुबंधी कषाय, नंतर अप्रत्याख्यानी. प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान केले नसेल अशा कषायांना काय म्हणतात? 'अप्रत्याख्यानी.'

**प्रश्नकर्ता :** म्हणजे अनंतानुबंधीमधून अप्रत्याख्यानीमध्ये येतात, नंतर प्रत्याख्यानीमध्ये येतात. तर ह्या प्रक्रियेत येण्याची जी स्थिती आहे, ती समकित दृष्टीच्या कारणाने आहे का?

**दादाश्री :** समकितच. समकित दृष्टीमुळेच तो पुढे प्रगती करत राहतो.

## जीवित गेला आणि मृत राहिला

आम्हा सर्वांमध्ये या चार प्रकारच्या कषायांपैकी एकही कषाय नसतो. कषाय मुक्त झालो आहोत. मनुष्य चिंतारहित होऊच शकत नाही, क्रमिक मार्गात तर कोणीच चिंतारहित होऊ शकत नाही, ज्ञानीसुद्धा चिंतारहित नसतात. त्यांना आत आनंद असतो, आणि बाहेर चिंता असते. व्यवहारात त्यांना या गोष्टीबद्दल अग्रसोच (भविष्याचे विचार) असते की भविष्यात काय होईल? आणि 'आम्हाला' अग्रसोच नसते. आम्ही 'व्यवस्थित'वर सोडले आहे. कारण अग्रसोच कुठवर असते? तर विचार करणारा जीवित असेल तोपर्यंत आणि तुमचा विचार करणारा तर जीवित नाही ना? विचार करणारा कोण आहे?

**प्रश्नकर्ता :** 'चंदुभाई'!

**दादाश्री :** हो, म्हणजे अहंकार जीवित आहे, अहंकार दोन प्रकारचे एक कर्माच्या 'कर्ता' स्वरूपात, आणि दुसरा कर्माच्या 'भोक्ता' स्वरूपात.

**प्रश्नकर्ता :** हो, तो कर्ता स्वरूपातला अहंकार तर गेला.

**दादाश्री :** कर्तारूपी अहंकार जिवंत अहंकार आहे. आणि भोक्तारूपी अहंकार मृत आहे, आणि मृत अहंकार दुसरे काही करू शकत नाही. आणि जर जीवितचे नाव घेतले तर तो काहीही करील. म्हणजे तो (जीवित) गेला आणि (मृत) राहिला.

## कर्त्याच्या गैरहजेरीत कर्मे संपतात

म्हणजे क्रोध होतो, मग म्हणतो, 'हे, दादा भगवान! तुम्ही तर मनाई केली आहे आणि माझ्याकडून तर हे होऊन गेले, त्याबद्दल मी माफी मागतो', त्यामुळे मग क्रोध पुसला जातो.

**प्रश्नकर्ता :** पण असे होता कामा नये ना?

**दादाश्री :** हो.

**प्रश्नकर्ता :** त्वरित प्रतिक्रमण केले पाहिजे?

**दादाश्री :** हो, त्यामुळे क्रोध नष्ट होतो. कशामुळे नष्ट होतो? तर प्रतिक्रमण केल्याने. सर्व कर्मे नष्ट होतात. कर्त्याच्या गैरहजेरीमुळे पूर्णपणे नष्ट होतात. कर्त्याच्या गैरहजेरीत आपण ही फळे भोगत आहोत. कर्त्याच्या गैरहजेरीत भोक्ता आहोत, म्हणून कर्मे नष्ट होतात आणि जगातील लोक कर्त्याच्या हजेरीत भोक्ता आहेत, म्हणून त्यांनी जरी प्रतिक्रमण केले तरी कर्मे हलकी होतात पण पूर्णपणे नष्ट होत नाहीत. कर्मे फळ दिल्याशिवाय राहत नाहीत, आणि तुमची कर्मे तर नष्टच होऊन जातात. 'हे दादा भगवान, असे होता कामा नये.'

## सर्वविरती गुणस्थानक

'शूट-ऑन-साइट' (पाहताक्षणीच संपविणे) ज्यांच्या हातात आला, त्याला बाकी काय राहिले? आणि द्वेष निघून गेला, मग काय राहिले? द्वेष गेला म्हणजे काय? चार कषायांमधून दोन कषाय निर्मूल झालेत. निर्मूल झाले म्हणजे काय? तर क्रोध निर्मूल झाला पण क्रोधाचे परमाणू नाही. म्हणून 'चंदुभाई'ला राग येतो, पण त्याला स्वत:ला ते आवडत नाही. म्हणजे द्वेष तर पूर्णपणे निघून गेला. कपट आणि लोभ थोडेफार राहिले आहेत. ते जेव्हा संपतील तेव्हा वीतराग होणार. ते मग चारित्र मोहनीयमध्ये जाणार. प्रत्येकाचे विभाजन केल्यानंतर सारे काही वेगवेगळे होईल.

'सर्वविरती' कशाला म्हणतात? कोणत्याही जीवाचा दोष दिसत

नाही. कोणी शिव्या देत असेल, तरी त्याचा दोष दिसत नाही, त्याचे नाव 'सर्वविरती!' याहून अधिक मोठे सर्वविरती पद नसते.

कोणाचे दोष दिसेनासे झाले की समजायचे सर्वविरती पद आहे, संसारात राहूनसुद्धा! असे हे अक्रम विज्ञानाचे सर्वविरती पद वेगळ्या प्रकारचे आहे. संसारात राहून, सुगंधी तेल डोक्याला लावूनही, कानात सुगंधी अत्तराचा बोळा घालून फिरत असतो पण त्याला कोणाचाही दोष दिसत नाही.

'अक्रम'मध्ये सर्वविरती पद त्याला म्हणतात, की कोणाचा किंचितमात्रही दोष दिसत नाही. तेव्हापासून सर्वविरती पद आहे, असे मानून चाला. भलेही मग कानात अत्तराचा बोळा घातला असेल, त्याला माझी हरकत नाही, पण कोणत्याही जीवाचा दोष दिसत नाही, साप चावला तरी सापाचाही दोष दिसत नाही, असे आहे आपले हे विज्ञान.

**प्रश्नकर्ता :** मग 'अक्रम'च्या या पदामध्ये 'प्रतिक्रमण' असे काही राहतच नाही ना?

**दादाश्री :** नंतर प्रतिक्रमण राहतच नाही. पण तुम्हाला (कोणाचे) दोष दिसत नाहीत असे तुम्ही मानू नका, त्यापेक्षा प्रतिक्रमण करणे चांगले! त्यात तुमचे काय नुकसान आहे? असे काही नवीन शोधून काढले तर मग तो उलट दिशेने चालू लागेल.

वीतद्वेष झाला त्याला एकावतारी म्हणतात. वीतद्वेषामध्ये जो कच्चा राहिला, त्याचे दोन-चार जन्म होतील.

## ज्ञाता-द्रष्टा, तिथे कषाय शून्यता

ज्ञानी पुरुषांनी दिलेले प्रतिक्रमण असेल तर दोष निघून जातात, नाही तर एरवी दोष जात नाहीत. अनंत जन्म प्रतिक्रमण करत राहिला, तर त्याने पुण्य बांधले जाईल. हे साधू, आचार्य प्रतिक्रमण बोलतात, त्यामुळे दोष संपत नाहीत, पण पुण्य बांधले जाते. आणि ज्ञानी पुरुषांनी दिलेले प्रतिक्रमण, ते तर 'शूट-ऑन-साइट' असते, दोष होताक्षणीच

प्रतिक्रमण होते. या सगळ्यांना एवढी अधिक जागृती असते की दोष झाल्याबरोबरच ते दिसू लागतात, हजारो दोष दिसतात, दोष उत्पन्न झाले की लगेच दिसू लागतात, कारण सर्व कषायभाव विरघळून गेलेले असतात.

कषायभावामुळे अजागृती आहे.

**प्रश्नकर्ता :** ते तर दुसऱ्यांच्याप्रती अतिक्रमण होत नसेल आणि कोणाला कोणाबद्दल कषाय होत नसतील तरच. पण त्याशिवाय शंभर टक्के ज्ञाता-द्रष्टा कसे राहता येईल?

**दादाश्री :** असे नाही, जरी कोणाबद्दल विचारातही अतिक्रमण होत नसेल, तरी पण मन तर कोणत्या ना कोणत्या कषायात असतेच, रागात नसेल तर द्वेषात असते. जोपर्यंत ज्ञाता-द्रष्टा राहत नसेल तोपर्यंत कषाय होतच राहतील.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे मनात कोणताही विचार चालत असेल तर त्यात कोणता ना कोणता कषाय असतोच ना?

**दादाश्री :** असतोच असतो, परंतु ज्या विचारांना आपण पाहू शकतो, त्या विचारांमध्ये कषाय नसतात.

**प्रश्नकर्ता :** हे सारे वावटळ येऊन, निघून गेल्यानंतरच कळते.

**दादाश्री :** नाही, त्याला पाहता आले तर कळेल. पण तोपर्यंत मात्र कषायच म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** पंधरा वीस मिनिटे झाल्यानंतर दिसू लागतात.

**दादाश्री :** कषाय आपली जागृती बंद करून टाकतात, म्हणजे ज्ञाता-द्रष्टापणात राहू देत नाहीत. आपल्याला जरी वाईटात वाईट विचार येत असतील पण आपण त्या विचारांना पाहत राहिलो तर कषायाचा कोणताही भाग आम्हाला शिवू शकत नाही.

## क्रोधाचा अभाव तिथे वर्तते क्षमा

लोक म्हणतात, महावीर भगवंतांनी तर खूप कष्ट सोसले, खूप

दु:ख सहन केले, खूप तप केले. असे कष्ट सोसल्यामुळे मोक्ष होत नाही. ही कशी गोष्ट आहे, लोक तर म्हणतात की 'कोणी कितीही भयंकर दोष केला असेल, तरीही भगवंत त्याला क्षमा करतात.' भगवंत कधीच क्षमा करत नाहीत. सर्वांना क्षमा दिसते, कारण क्षमेचा अर्थ काय आहे? क्षमा अशी कोणती वस्तूच नाही. क्रोधाचा अभाव म्हणजेच क्षमा. म्हणजे क्षमा करावी लागत नाही. परंतु हे आपल्या साधू वगैरेना समजत नाही, म्हणून म्हणतात की 'भगवंत तर किती क्षमा राखतात'! वास्तवात क्षमा असे काही नसतेच. अहंकार करून जो म्हणतो की 'जा, तुला माफ करतो', ती वेगळी गोष्ट आहे. लोक त्याला क्षमा समजतात पण ती स्थूल भागात आहे. 'क्रोधाचा अभाव म्हणजेच क्षमा.'

## कषाय पराधीनतेमुळे, प्रतिक्रमण स्वाधीनतेमुळे

हे 'अक्रम' विज्ञान एवढे स्वीकार करते की 'क्रोध-मान-माया-लोभ' बंद झाले असतील, तरच संयम आहे. आणि जर ते झालेच, तर प्रतिक्रमण करावे. कारण ते अतिक्रमण आहेत. विषय, म्हणजे अतिक्रमण नाही, पण कषाय हे अतिक्रमण आहे. त्या अतिक्रमणासाठी प्रतिक्रमण शिकवले आहे. अतिक्रमणामुळे हे जग उभे झाले आहे, आणि प्रतिक्रमणामुळे ते बंद होईल. कषायांच्या व्यवहाराने जग उभे झाले आहे, विषयांच्या व्यवहाराने नाही. कषायांच्या व्यवहाराने हे जग उभे झाले आहे, त्याला अतिक्रमण म्हणतात, आणि प्रतिक्रमण केले तर सर्व धुतले जाते. कषाय होतात ते पराधीनतेमुळे होतात, आणि त्याचे प्रतिक्रमण करणे हे स्वाधीनतेमुळे होत असते. अर्थात पुरुषार्थ प्रतिक्रमण केल्याने होतो.

तुमचा अहंकार आणि मान आता जात आहे की नाही, कमी होत आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** कमी होत आहे.

**दादाश्री :** हो, तर तो सारा माल आता जाऊ लागला आहे, बारा महिन्यानंतर निघू लागतो, हा माल कमी झाला आहे, म्हणून तुम्ही आत्मा झालात.

**प्रश्नकर्ता :** क्रोध-मान-माया-लोभ, हे सर्व डिस्चार्ज आहे, म्हणजे ते येतील तर खरे, पण आता त्यांना पाहिल्यावर स्वत: वेगळे कसे राहू शकतो?

**दादाश्री :** जागृती जर कमी, डिम (मंद) झाली तर मग त्यांनी काय करावे? तर माझ्या आज्ञेतच राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. माझ्या आज्ञेत राहण्याचा प्रयत्न करतच राहावे. नाही तर, बेसावध झालात आणि आज्ञेत राहिला नाहीत, तर मग जिथे होता, तिथेच राहाल.

तू आज्ञेत राहण्यासाठी किती प्रयत्न करतोस?

**प्रश्नकर्ता :** खूप.

**दादाश्री :** तुम्हालाही क्रोध-मान वगैरे सर्व दिसते का?

**प्रश्नकर्ता :** होऊन झाल्यानंतर दिसते.

**दादाश्री :** त्याला काही हरकत नाही. होऊन गेल्यानंतरच दिसेल ना? होत असतानाही दिसते, आणि होऊन गेल्यानंतरही दिसते.

**प्रश्नकर्ता :** आणि कधीतरी असेही होते, की दोष होत असतानाही दिसते, आणि तरीही हा करत राहतो.

**दादाश्री :** नाही, तो थांबणार नाही, थांबवणे हा गुन्हा आहे. कारण चालत असलेल्या फिल्मला पाहत राहायचे आहे. मग जरी मारामारी करत असेल की अहिंसा करत असेल, किंवा हिंसा करत असेल तरीही. पाहणाऱ्याला काही त्रास नाही. मारामारी होत असताना जर रडू लागला की, 'असे करू नका, असे करू नका' तर मात्र त्रास आहे. अहो, ही फिल्म तर आधीच भरलेली (चित्रिकरण केलेली) आहे, म्हणून पाहणाऱ्याला काही हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** परंतु जेव्हा त्याप्रमाणे होत असते तेव्हा आपल्याला कळतेच ना? आतून रागावतोसुद्धा की, हे जे तू करत आहेस ते बरोबर नाही, तरी पण तो ऐकत नाही, करतच राहतो.

**दादाश्री :** त्याला हरकत नाही, कारण 'पाहणारा' शुद्ध आहे, आणि जे पाहतो ते चांगले किंवा वाईट आहे, पण ते सापेक्ष दृष्टीने आहे. आम्हा पाहणाऱ्याला 'चांगले, वाईट' असे काही नसते. पाहणाऱ्याला तर सर्व समानच आहे. लोकांच्या मनात हे चांगले-वाईट, आहे, पण भगवंताकडे चांगले-वाईट असे काही नाही, समाजासाठी चांगले-वाईट आहे. भगवंत तर काय म्हणतात, 'जर पाहिले' तर त्यापासून वेगळा झाला, तो वेगळा आणि हे वेगळे!

म्हणजे काय आहे की, अज्ञानतेने, समज नसल्यामुळे बांधलेल्या हिशोबाला 'पाहून' त्याचा निकाल करा. म्हणजे तुम्ही वेगळे आणि ते वेगळे, न 'पाहता' बांधलेल्या हिशोबाला 'पाहून' संपवला तर मुक्त!

ही टाकी रिकामी होत, होत, होत शेवटी जेव्हा पूर्ण रिकामी होऊ लागेल ना, तेव्हा तुम्हाला शरीर अगदी हलके हलके वाटेल. इथेच मुक्त झालात असे वाटेल.

आता ही टाकी कशामुळे रिकामी होईल? कारण त्यातून बाहेर तर निघत राहते, पण आत नवीन काही भरले जात नाही. आणि ज्या टाकीत काही भरले जात नसेल त्या टाकीत मग काय उरेल?

**प्रश्नकर्ता :** काहीच उरणार नाही.

**दादाश्री :** मग ती लवकर रिकामी होऊन जाईल.



# [ 15 ]
# भाव अहिंसेच्या मार्गावर

## अंतिम प्रतिक्रमणानंतर देणेघेणे संपते

**प्रश्नकर्ता :** मोक्षाला जाण्यापूर्वी, एखाद्या जीवाशी काही देणेघेणे शिल्लक असेल, आणि आम्ही जर त्याचे प्रतिक्रमण करत राहिलो तर तो आम्हाला सोडून देईल का ?

**दादाश्री :** हो.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला माहीत नसतील असे सर्व जीव ?

**दादाश्री :** सर्वांसाठी एकत्रितपणे, जेवढे लिहिले आहे तेवढेच, (म्हणायचे), दुसरे काही नाही.

**प्रश्नकर्ता :** पण त्यासाठी काय म्हणायला हवे ?

**दादाश्री :** ज्या ज्या जीवांना माझ्याकडून कुठलेही दु:ख दिले गेले असेल, त्या सर्व जीवांनो मला क्षमा करा.

**प्रश्नकर्ता :** जीवमात्र ?

**दादाश्री :** हो, जीवमात्र.

**प्रश्नकर्ता :** त्यात मग वायुकाय, तेउकाय असे सर्व जीव येतात का ?

**दादाश्री :** असे सर्व म्हटल्यावर त्यात सर्व येतील.

## दु:ख न देण्याची भावना

**प्रश्नकर्ता :** अजाणता एखाद्या जीवाची हिंसा झाली, तर काय करावे?

**दादाश्री :** अजाणता हिंसा झाली, पण लक्षात आल्यावर तुम्हाला 'असे होता कामा नये', असा ताबडतोब पश्चात्ताप व्हायला हवा. आणि पुन्हा असे होऊ नये यासाठी जागृती ठेवायची. असा उद्देश तुम्ही बाळगायला हवा. भगवंतानी म्हटले होते, 'कोणालाही मारायचे नाही, अशी ठाम भावना ठेवा.' कोणाही जीवाला किंचितदेखील दु:ख द्यायचे नाही, अशी भावना दररोज पाच वेळा करा. मन-वचन-काया या द्वारे कोणाही जीवाला किंचितदेखील दु:ख न होवो असे सकाळी पाच वेळा म्हणून प्रापंचिक व्यवहार सुरू करावे. मग तुमची जबाबदारी कमी होते. कारण तुम्हाला भावना करण्याचा अधिकार आहे. क्रिया आपल्या सत्तेत नाही.

## अजाणतेपणे झालेल्या चुकीमुळे पाप लागते का?

सध्या मनात जे काही उलट-सुलट भाव होतात ती सर्व पूर्वी पडलेली बीजे आहेत. तुम्हाला आता किड्याला मारायची इच्छा नाही, तरीही किडा तुमच्या पायाखाली चिरडला गेला, तर समजा की हे पूर्वी पडलेले बी आहे. अशा वेळी जागृत राहून प्रतिक्रमण करून घ्यावे.

जो किडा तुमच्या पायाखाली चिरडला गेला, तो कसे शत्रुत्व करील, ते तुम्हाला कसे कळेल? चुकीमुळे चिरडला गेला तरीही तो खूप मोठे शत्रुत्व करील! कारण किड्याचे पण संसारी नातेवाईक, बायका-मुले असे सगळे ऋणानुबंधी असतातच ना? ते तर असेच समजणार या भाऊसाहेबांनी जाणूनबुजून मारले आहे, खून केला आहे. तुम्हाला वाटते की हे अजाणता घडले आहे पण त्यांना तर माझ्या घरचा माणूस मेला, त्याचा खून झाला असेच वाटणार ना? त्याचाही संसार आहेच ना? जिथे जाल, तिथे संसार तर आहेच ना?

**प्रश्नकर्ता :** चुकून झाले तरी पण पाप तर लागतेच ना?

**दादाश्री :** चुकून विस्तवावर हात ठेवला तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** हात भाजणार.

**दादाश्री :** मग लहान बाळाचा हात भाजणार नाही का?

**प्रश्नकर्ता :** भाजणार.

**दादाश्री :** त्याचाही भाजणार. म्हणजे कोणी सोडत नाही. अजाणता करा किंवा जाणता करा, कोणी सोडत नाही.

## त्याला अजागृती म्हणतात

**प्रश्नकर्ता :** ज्ञान घेतल्यावर एखाद्या महात्म्याला डास चावले, आणि तो उठून रात्री डास मारू लागला, तर याला काय म्हणावे?

**दादाश्री :** त्याचे भाव बिघडले असे म्हणावे. याला ज्ञानाची जागृती म्हणता येत नाही.

**प्रश्नकर्ता :** त्याला हिंसक भाव म्हणायचे का?

**दादाश्री :** हिंसक भाव एवढेच नव्हे, तर तो ज्ञान घेतल्यापूर्वी जसा होता तसा परत झाला. पण नंतर प्रतिक्रमण केले तर ते सर्व धुतले जाईल.

**प्रश्नकर्ता :** पुन्हा दुसऱ्या दिवशी पण तो तसाच करू लागला तर?

**दादाश्री :** अरे, अगदी शंभर वेळा केले तरी प्रतिक्रमणाने ते धुतले जाते.

## 'त्यामुळे' निकाचित कर्मे पण हलकी होतात

**प्रश्नकर्ता :** मागील जन्माची 'निकाचित' कर्मे या जन्मी भोगावी लागतात. पण या जन्मी 'निकाचित कर्मे' घडली तर?

**दादाश्री :** ती तर पुढील जन्मी भोगावी लागतात. त्याचे 'फळ' त्वरित मिळत नाही. ती कर्मे पिकल्याशिवाय फळ देत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे ती कर्मे नष्ट होतच नाही ना? ती भोगावीच लागतात ना?

**दादाश्री :** थोडीशी फिकट होतात, हलकी होतात. त्याच्यासाठी जर सतत पश्चात्ताप करत राहिले तर हलकी होतात. त्यांचा अर्धा रस निघून जातो. त्याच्यात जे कडू रस मिसळलेले असतात ते मग निघून जातात. 'निकाचित' म्हणजे अवश्य भोगावीच लागतात. दुसरा कोणताच उपाय नाही, पण त्यांना फिकट, हलकी करू शकतो.

**प्रश्नकर्ता :** भोगताना काही फरक पडतो का?

**दादाश्री :** हो, एखाद्याला काही लागले असेल तर तो सहन करू शकत नाही, आणि एखाद्याला तेवढेच लागले असेल तरी तो पट्टी बांधून शांतपणे हिंडत-फिरत असतो.

**प्रश्नकर्ता :** महावीरांच्या कानात जेव्हा 'बरु' (जंगली रोपट्यांची टोकदार फांदी) ठोकले...

**दादाश्री :** ते निकाचित होते.

**प्रश्नकर्ता :** ते तर 'भगवंत' होते, मग त्यांना ते हलके झाले असेल ना?

**दादाश्री :** नाही, हलके झाले नव्हते.

**प्रश्नकर्ता :** मग आमच्यासारख्या सामान्य माणसांचे हलके कसे होईल?

**दादाश्री :** तुम्ही हलके केले तर हलके होऊ शकते. परंतु ते तर महान पुरुष होते, म्हणून ते हलके करत नाहीत. ते तर राजा होते, त्यांनी त्याच्या कानात (गरम) शिसे ओतायला लावले आणि नंतर प्रतिक्रमण पण केले नव्हते ना!

**प्रश्नकर्ता :** पण त्यांनी तर जाणूनबुजून शिसे ओतायला लावले होते, पण आम्ही जर ढेकूण किंवा अशा किड्यांना सुया टोचून मारले असेल तर...

**दादाश्री :** असे कधी सुया टोचतात का? अशी कशी माणसे तुम्ही? मग सुयांनी माणसाला का मारत नाही? (ढेकणालाच का?)

त्यांना आई-वडील नाहीत म्हणून? त्याचे रक्षण करायला त्याला मुले-बाळे नाहीत म्हणून?

**प्रश्नकर्ता :** आता त्यासाठी काही तरी मार्ग दाखवा. अशी तर खूप पापे आम्ही केली आहेत, त्यासाठी काय करावे लागेल?

**दादाश्री :** प्रतिक्रमण करा, प्रतिक्रमण! (कल्पनेने) एका वाटीत ढेकूण ठेवून, मग त्याला पाहून प्रतिक्रमण वगैरे करून, मग त्याला खाऊ घालून सोडून द्या.

**प्रश्नकर्ता :** एवढी सारी पापे केली आहेत, त्यामुळे आतून खूप रडू येते. म्हणजे वास्तवात या सगळ्या आठवणी येतात, दररोज दिसतात.

**दादाश्री :** प्रतिक्रमण करून (ओझे) हलके करा. त्यावेळी कोणाला तरी विचारून करायला हवे होते ना!

**प्रश्नकर्ता :** पण दुसरा कोणी भेटलाच नाही ना!

**दादाश्री :** घरी विचारायचे होते. गावकऱ्यांना विचारायचे होते.

**प्रश्नकर्ता :** घरात तर आमचा मारण्याचाच कार्यक्रम चालू होता.

**दादाश्री :** असे? दोघे जण सोबतीने?

**प्रश्नकर्ता :** हो, ती पण मारत होती आणि मी पण मारत होतो.

**दादाश्री :** रोज दोनशे-पाचशे मारत असाल, नाही का?

**प्रश्नकर्ता :** हो, जितके असत, तितके मारत असू. पण दादा भेटल्यानंतर मात्र मारले नाही.

**दादाश्री :** मारण्याचा विचारसुद्धा मनात आणू नका. एखादा जीव आवडत नसेल तर त्याला बाहेर नेऊन सोडून या. तीर्थंकर भगवंतांनी 'मार' शब्दच काढून टाकायला सांगितले होते. 'मार' या शब्दाचा उच्चार पण करू नका, असे म्हटले आहे. 'मार' या शब्दात खूप जोखीम आहे. इतके अधिक अहिंसक, परमाणू इतके अधिक अहिंसक असावेत!

**प्रश्नकर्ता :** नाही तर भावात बदल होतो का?

**दादाश्री :** हो, कोणालाही किंचितदेखील दुःख होता कामा नये, कारण या जगात कोणीही दोषी नाहीच.

## भावहिंसा आणि द्रव्यहिंसा

**प्रश्नकर्ता :** भावहिंसा आणि द्रव्यहिंसा याचे फळ एकाच प्रकारचे असते का?

**दादाश्री :** भावहिंसेचा फोटो दुसरा कोणी पाहू शकत नाही. आणि सिनेमासारखा हा जो सिनेमा चालत आहे, आणि आपण त्याला पाहू शकतो, ती सगळी द्रव्यहिंसा आहे. भावहिंसा सूक्ष्मरूपात असते (ती दिसत नाही). आणि द्रव्यहिंसा तर प्रत्यक्ष दिसते. मन-वचन-काया यांनी जगात जी दिसत आहे ती सर्व द्रव्यहिंसा आहे. तुम्ही असे म्हणा की या जीवांना वाचविले पाहिजे. मग ते वाचतील किंवा न वाचतील, याला तुम्ही जबाबदार नाही. तुम्ही असे म्हणा की, 'या जीवांना वाचविले पाहिजे', तुम्हाला फक्त एवढेच करायचे आहे. मग हिंसा झाली, तरी त्याला तुम्ही जबाबदार नाही! हिंसा झाली तर त्याबद्दल पश्चात्ताप करा, प्रतिक्रमण करा. मग तुमची जबाबदारी संपली.

## शेतकऱ्यांसाठी स्पेशल प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** तुमच्या पुस्तकात वाचले आहे की, 'मन-वचन-काया यांनी कोणत्याही जीवाला किंचितदेखील दुःख होऊ नये.' पण आम्ही तर शेतकरी आहोत. आम्ही जेव्हा तंबाखूचे पीक घेतो, तेव्हा आम्हाला प्रत्येक रोपट्याचे शेंडे म्हणजे त्याची मान तोडावीच लागते. म्हणजे त्यामुळे त्या रोपट्याला तर दुःख झालेच ना? त्याचे पाप तर लागेलच ना? आम्ही तर अशी लाखो रोपट्यांची शेंडे तोडून टाकतो. मग या पापाचे निवारण कशा प्रकारे करावे?

**दादाश्री :** त्यासाठी तर मनात असे वाटायला हवे की 'असा व्यवसाय माझ्या वाट्याला का बरे आला?' बस एवढेच. रोपट्याची शेंडे कापून टाका पण मनात मात्र 'असा व्यवसाय माझ्या वाट्याला का

आला?' असा पश्चात्ताप झाला पाहिजे. असे करता कामा नये. मनात असे वाटायला हवे, एवढे पुरे आहे.

**प्रश्नकर्ता :** पण हे पाप तर आहेच ना?

**दादाश्री :** ते तर आहेच, पण ते तुम्ही बघू नका. जे पाप होत आहे, त्या पापाला बघत बसू नका. असे व्हायला नको होते असे तुम्ही निश्चित करा. निश्चय केला पाहिजे. हा व्यवसाय का मिळाला? दुसरा चांगला व्यवसाय मिळाला असता तर आपण असे केले नसते. असा पश्चात्ताप तुम्हाला करावा लागला नसता. जोपर्यंत हे माहीत नसते तोपर्यंत पश्चात्ताप होत नाही. पूर्वी खुश होऊन रोपटी उपटून फेकून देत होता. समजले ना तुम्हाला? आता आम्ही सांगितल्याप्रमाणे करा ना, मग तुमची सर्व जबाबदारी आमच्यावर. रोपटे उपटून फेकून देता, त्याला हरकत नाही. पश्चात्ताप मात्र व्हायला हवा की असे काम माझ्या वाट्याला का आले?

**प्रश्नकर्ता :** हो, आता समजले. या शेतकऱ्यांच्या तुलनेत व्यापारी जास्त पापे करतात, आणि व्यापाऱ्यांच्या तुलनेत हे घरी बसलेले लोक खूप जास्त पापे करतात. पाप तर मनाने होते, शरीराने नाही.

**दादाश्री :** माझे बोलणे तुम्ही नीट समजून घ्यावे. इतर लोकांना समजण्याची गरज नाही. तुम्ही तुमच्यासाठी हे समजून घ्या. इतर लोक जे समजतात ते त्यांच्यासाठी बरोबरच आहे.

**प्रश्नकर्ता :** कापसावर औषध फवारावे लागते, तर काय करावे? त्यात हिंसा तर आलीच ना?

**दादाश्री :** नाइलाजामुळे जे कार्य करावे लागते ते प्रतिक्रमणाच्या अटीवरच करावे.

तुम्हाला हा प्रापंचिक व्यवहारात कसे वागावे हे समजत नाही. ते आम्ही तुम्हाला शिकवू. मग नवीन पापे लागणार नाहीत.

शेतात शेती करताना पाप तर होणारच. पण त्याचबरोबर त्या पापासाठी तुम्हाला औषध (उपाय) देतो की 'असे असे म्हणा.' त्यामुळे

पापे कमी होतील. आम्ही पाप धुण्यासाठी औषध देतो. औषध द्यायला नको का? शेतात जाता म्हणजे नांगरणी वगैरे करता, म्हणजे पापे तर होणारच. आत किती तरी जीव मारले जातात. हा ऊस कापला तर काय त्याला पाप म्हणायचे नाही? ते पण बिचारे जीवच आहेत ना? पण त्यासाठी काय करावे हे आम्ही तुम्हाला समजावतो, जेणेकरून तुम्हाला दोष कमी लागतील. आणि तुम्ही भौतिक सुखे पण चांगल्या प्रकारे उपभोगाल.

शेतीवाडी करताना जीवजंतू मारले जातात, त्याचा दोष तर लागणारच ना? म्हणून शेतीवाडी करणाऱ्यांनी दररोज पाच-दहा मिनिटे देवाजवळ अशी प्रार्थना करायला हवी की, 'हे दोष झाले, त्याबद्दल मी माफी मागत आहे.' शेतकरीबंधूंना आम्ही असे सांगतो की तुम्ही जो व्यवसाय करता, त्यात जीवजंतू मरतात, तर त्यासाठी अशा प्रकारे प्रतिक्रमण करत जा. तुमच्याकडून जी चूक होत आहे त्याला माझी हरकत नाही, पण त्यासाठी तुम्ही याप्रकारे प्रतिक्रमण करत जा.

## हिंसेसाठी प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** काल मी गाडी चालवित होतो तेव्हा गाडी खाली कबूतर आले, त्यामुळे मला खूप दु:ख झाले.

**दादाश्री :** दु:ख तर चंदुभाईला झाले ना? तेव्हा चंदुभाईला सांगावे पश्चात्ताप कर, प्रतिक्रमण कर.

**प्रश्नकर्ता :** सर्व काही केले.

**दादाश्री :** केले ना? मग ठीक आहे.

**प्रश्नकर्ता :** पण ते कुठून आले, कसे आले हे कळलेच नाही.

**दादाश्री :** त्याचे असे आहे, की त्याच्या काही गुन्ह्यामुळे ते मरणारच होते. पण ते मारणाऱ्याला शोधत होते, की इथे कोणी हिंसक जनावर आहे का? तर हे चंदुभाई असे भाववाले आहेत, म्हणजे ते मारणाऱ्याला शोधत होते.

ज्याने असा निश्चय केला आहे की 'मला कोणत्याही जीवाला मारायचे नाही', तर ते त्याच्याजवळपास देखील जाणार नाही. मारायचे आहे असा भाव नसतो, पण गाडीखाली आले तर मरेल सुद्धा, मग त्यात आम्ही काय करू शकतो? असे बोलण्यामुळे त्याला तसेच संयोग मिळतात. ज्याला वाचविण्याची इच्छा असते त्याला तसे संयोग मिळतात. जसा भाव तसा तुमचा हिशोब! म्हणजे मग तुमच्या भावानुसार असे घडले. जैन असून घाई करता आणि मध्ये कोणी आले तर 'मी काय करू?' असे म्हणता.

कुठली ही परिस्थिती असो, पण अशी स्ट्राँग पॉलिसी असली पाहिजे की नाही, काहीही झाले तरी मला त्याला मारायचे नाहीच.

आता, आम्ही इथे प्रतिक्रमण करवून घेऊ, तेव्हा तुमचे सर्व साफ होऊन जाईल. हे सर्व तर जे मोठे जीव आहेत ते दिसतात पण दुसरे छोटे जीव तर किती तरी मारले जातात.

त्या सगळ्यांसाठी 'चंदुलाल'कडून प्रतिक्रमण करवून घ्यावे.

**प्रश्नकर्ता :** मनात असे आले होते की 'व्यवस्थित' प्रमाणे त्याचाही अशाच तऱ्हेचा हिशोब होता, असे नाही का?

**दादाश्री :** हिशोब तर आहेच, त्याचा हिशोब आणि तुम्ही निमित्त. पण आपले महात्मा असे निमित्त होत नाहीत. ते गाडी चालवीत असतील तरी निमित्त बनत नाहीत, किंवा त्यांच्या मनात असे भाव देखील होत नाहीत की 'मला कोणालाही मारायचे आहे.'

आणि तुम्ही तर उलट घाई करता आणि म्हणता, 'कोणी मध्ये आला तर मी काय करू?'

**प्रश्नकर्ता :** यासाठी मनाचे विचार कसे बदलावेत?

**दादाश्री :** आता असे काहीही करायचे नाही. आता तर तुम्ही चंदुभाईकडून सतत प्रतिक्रमण करून घ्यावे. पण आता सर्व स्वच्छ झाले ना?

**प्रश्नकर्ता :** हो, झाले. तुम्ही ते वाक्य सांगितले होते ना की, 'कोणत्याही जीवमात्राला मन-वचन-काया याद्वारे दु:ख न होवो.' सकाळी एवढे बोलले की भागेल की नाही भागणार?

**दादाश्री :** ते वाक्य पाच वेळा म्हणावे, पण ते अशा तऱ्हेने बोलावे, पैसे मोजताना तुमची स्थिती कशी असते, त्याप्रकारे बोलावे. रुपये मोजताना चित्त जसे (एकाग्र) असते, जसे अंत:करण असते, तसेच हे वाक्य बोलताना असले पाहिजे.



# [ 16 ]
# दुःखदायी वैराची वसूली

## वैरभावासाठी प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** माझ्या एक ओळखीचा माणूस आहे, तो म्हणतो की त्याचा भाऊ त्याला मारू इच्छितो. मग माझ्या मनात लगेच विचार आला की ह्यांच्याशी मी कशाला वैरभाव ठेवू ?

**दादाश्री :** हो, तो सरळ वैर धरील. आपण वैर धरले आणि त्याला कळले की हा माणूस माझ्याशी वैर ठेवत आहे, तर मग तो पण वैर निर्माण करील. म्हणजे पुढच्या जन्मात दंश करून मारील.

**प्रश्नकर्ता :** पण त्याला तर हे माहीतच नाही की कोणी वैर ठेवले आहे ?

**दादाश्री :** म्हणजे या ठिकाणी तो वैर ठेवत नाही, तुम्हीच एका बाजूने (एकतर्फी) वैर निर्माण करीत आहात. दोन्ही बाजूने वैर असेल तर त्याला वैर म्हटले जाते. आणि वैर असेल तर तो वैर वसूल करतो. आणि इथे तर आत आपोआपच वैर निर्माण होते. स्वतःच ते निर्माण केले आहे. आता तुम्ही काय कराल ?

**प्रश्नकर्ता :** हा विचार आला म्हणून तर त्याचे इतके चर्वितचर्वण (तीच तीच चर्चा करणे) झाले.

**दादाश्री :** पण फक्त विचारच आला होता ना, आणखी काही इच्छा तर नव्हती ना? नंतर प्रतिक्रमण केले होते का?

**प्रश्नकर्ता :** माझ्याकडून प्रतिक्रमणे होत नाहीत.

**दादाश्री :** ती तर करायलाच हवीत. त्याशिवाय कसे चालेल?

**प्रश्नकर्ता :** इतका वेळ चर्वितचर्वण केले म्हणजे ते प्रतिक्रमणच झाले ना?

**दादाश्री :** स्वत:चा भाऊ आला तर काय त्याला मारण्याचा विचार येतो का कोणाला?

**प्रश्नकर्ता :** पण नंतर मी त्यावर खूप विचार केले की हे वैर कोण निर्माण करत आहे, का करत आहे, तर हे सगळे प्रतिक्रमणातच मोडेल ना?

**दादाश्री :** चर्वितचर्वण केले.

कोणीतरी बांधत आहे, असे तर तुम्हाला वाटले ना? कोणी काही करते का?

**प्रश्नकर्ता :** स्वत: स्वत:लाच सारे काही करतो.

**दादाश्री :** मग काय? जाणता-अजाणता एखाद्याच्या अहंकाराला डिवचले तर तो वैर निर्माण करतो. आणि मग त्या वैराचा जो परिणाम होतो, तो असे दु:ख देतो की आयुष्य नकोनकोसे होते. कोणत्याही जीवाला त्रास देता कामा नये. तो जर तुम्हाला त्रास देत असेल तर तो तुमचा हिशोब आहे. म्हणून तो जमा करून घ्या आणि नवीन 'देणे' बंद करा, जर तुम्हाला यातून सुटायचे असेल तर. तुम्ही काय ठरवले आहे?

**प्रश्नकर्ता :** तो, जे काही देतो, ते हिशोबाप्रमाणेच देतो.

**दादाश्री :** हो, बरोबर. आपल्याला आता हा सरळ मार्ग मिळाला आहे. आता उपाधी नाहीत, काळज्या कमी झाल्या आहेत, आणि इतर

काहीच नाही. मग आता तुम्ही ठरवल्यानुसार करू शकता. आणि प्रतिक्रमणे केलीत तर मग कितीही (मोठे) वैर असले तरी याच जन्मात तुम्ही त्यातून सुटू शकता. प्रतिक्रमण हाच एकमेव उपाय आहे.

## चिकट फाइलींच्या बाबतीत प्रतिकारभाव

**प्रश्नकर्ता :** ऑफिसमध्ये माझ्या तीन-चार चिकट फाइली (गाढ ऋणानुबंध असलेल्या व्यक्ती, किंवा संयोग) आहेत. त्या जेव्हा मला उकसवतात तेव्हा फणा काढण्याचा भाव माझ्या मनात येतो.

**दादाश्री :** असे? अजूनही पहिल्यासारखे भाव येतात, मग फणा काढता की नाही काढत?

**प्रश्नकर्ता :** तर असे भाव अहंकाराने दाबून ठेवावे की मग क्रियेत येऊ द्यावे?

**दादाश्री :** आपण त्यांना दाबायचेही नाही आणि क्रियेतही येऊ द्यायचे नाही. जे काही होत आहे ते फक्त 'पाहायचे.' तेव्हा 'चंदुभाई' काय करत आहेत, ते फक्त पाहायचे, बस! एवढेच तुमचे कर्तव्य, 'ज्ञाता-द्रष्टा' राहण्याचे कर्तव्य, आणि 'चंदुभाई' कोणत्या आधाराने वागतील? तर 'व्यवस्थित शक्ती'च्या आधारे वागतील. हा आहे 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एव्हिडेन्स'च्या आधारे फाइलींचा समभावाने निकाल. दुसरा काही त्रास नाही. सगळे 'कम्प्लीट' (पूर्ण) आहे.

## असे संपतात वैराचे तंत

**प्रश्नकर्ता :** माझ्याकडून हे वैर संपत नाही, वैराचा जो तंत (दोर) आहे जो वाणीद्वारे निर्माण झालेला आहे, त्याला तोडायचे म्हटले तर त्याचे इतके थर जमा झाले आहेत की ते काही केल्या संपतच नाहीत, आणि नंतर जेव्हा 'दादांचे स्मरण' करून अतिक्रमणाचे प्रतिक्रमण केले तर प्रतिक्रमण मध्येच थांबते, आणि वैराची मुळे शिल्लकच राहतात. उलट ती मुळे जास्तच जोर करतात. म्हणून असे वाटते की मुळे अजून नष्ट कशी होत नाहीत?

**दादाश्री :** कारण त्यांना दाबून दाबून खूप 'कॉम्पॅक्ट' केले होते म्हणून. जसे कापसाचे गाठोडे असते ना, ते गाठोडे जर उघडले तर कापूस खोलीभर पसरतो. त्याच प्रमाणे हा माल 'कॉम्पॅक्ट' करून (दाबून दाबून) भरलेला आहे. म्हणून तुम्हाला सतत प्रतिक्रमण करत राहावे लागेल, तरच ते वैर संपेल.

**प्रश्नकर्ता :** पण कितीही प्रयत्न केले तरी प्रतिक्रमण करण्यात अडथळे येतात. असे वाटते की वैराची मुळे त्याहून जास्त जोर करीत आहेत. म्हणून ती 'पुरुषार्थाला' पण दमवितात.

**दादाश्री :** त्याचे असे आहे की कितीही जोर केला तरी रात्री आपण झोपून जावे. भगवंतांनी सांगितले आहे की दिवसा काम करा पण रात्री झोपा. म्हणजे जेव्हा आपल्या आतील बंद होते तेव्हा त्यालाही बंद करा. त्यावर असा जास्त जोर लावायचा नाही.

**प्रश्नकर्ता :** जोर म्हणजे माझ्या म्हणण्याचा अर्थ असा आहे की प्रतिक्रमण आमच्या हातात येण्यापूर्वीच ती मुळे त्याला अडवतात. म्हणून आमचा पुरुषार्थ तिथेच अडकून बसतो.

**दादाश्री :** पुरुषार्थ अडकतो त्याला कारण आहे. तेव्हा मग आपण प्रतिक्रमण बंद करावे. थोडा वेळ रिलीफ (विश्रांती) घेतल्यानंतर पुन्हा प्रतिक्रमण चालू करावे. पण थोडी विश्रांती घ्यावी. कारण अनंत जन्मांची ही सर्व अतिक्रमणे आहेत. अतिक्रमणांशिवाय आपण करतच काय असतो? आपल्या हातून अतिक्रमणांशिवाय दुसरे काही घडतच नसते कधी. एक तर प्रेम करतो, राग (मोह, आसक्ती) करतो ते पण अतिक्रमण आहे. किंवा मग द्वेष करतो, ते देखील अतिक्रमणच आहे. या दोनही गोष्टी अतिक्रमण आहेत. आणि जिथे अतिक्रमण आहे तिथे प्रतिक्रमण अवश्य करायला हवे. जिथे प्रतिक्रमण नाही, तिथे मोक्षाचा मार्गही नाही. प्रतिक्रमण 'शूट ऑन साइट' झाले पाहिजे. तरच ती अतिक्रमणे मिटतील.

**प्रश्नकर्ता :** यात खूप पुरुषार्थ करावा लागतो.

**दादाश्री :** पुरुष झालात, त्यामुळे पुरुषार्थ करू शकता.

**प्रश्नकर्ता :** मग त्यातून मुक्त राहण्यासाठी कोणता पुरुषार्थ केला पाहिजे?

**दादाश्री :** मन काय करत आहे, चित्त काय करत आहे, ते पाहत राहावे, तोच त्याचा पुरुषार्थ आहे.

## त्यामुळे सर्व वितळेल

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्यामुळे कसेही शत्रुत्व असो वैरभाव असो, ईर्ष्या असो, ते सर्व वितळू शकते का?

**दादाश्री :** अतिक्रमणातून हे सर्व जग उत्पन्न झाले आहे. सर्व प्रकारचे दुर्गुण अतिक्रमणातून उत्पन्न झाले आहेत आणि प्रतिक्रमणाने सर्व धुतले जातात. फक्त या दोनच गोष्टी आहेत.

**प्रश्नकर्ता :** त्यामुळे त्याचे हृदयपरिवर्तन होते का?

**दादाश्री :** अगदी संपूर्ण हृदयपरिवर्तन होते. आणि ती व्यक्ती मग तुम्हाला शोधत शोधत तुमच्या घरी येईल. इतके सर्व होऊ शकते.

प्रतिक्रमणाचा अर्थ काय? तर स्वत:चे दोष पाहणे. तुम्ही जर दुसऱ्यांचेच दोष पाहत राहिलात तर मग सर्व पुढे पुढे चालतच राहील. म्हणून दुसऱ्यांचे दोष पाहूच नये, तरच वैर संपेल.

## तर मग बंधन चालूच राहील

**प्रश्नकर्ता :** जर तो आम्हाला भेटणारच नसेल तर मग प्रतिक्रमण करण्याची गरजच काय आहे?

**दादाश्री :** प्रतिक्रमणाचा अर्थ हा आहे की 'जे काही घडून गेले' आहे त्याचेच प्रतिक्रमण करत आहोत. जे 'होणार आहे' त्याचे प्रतिक्रमण करत नाहीत. जे घडून गेले आहे त्याचे आपण प्रतिक्रमण करीत आहोत, त्यामुळे आपण त्या (वैर) भावातून सुटलो. आपण सोडत आहोत, पण ते सोडत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** समजा, आपण प्रतिक्रमण केले नाही, तर वैराची परतफेड करण्यासाठी तर जावे लागेल ना?

**दादाश्री :** नाही, परतफेड करण्याची गरज नाही. पण तुम्ही बंधनात अडकून राहता. समोरच्या व्यक्तीशी आपले काहीच देणेघेणे नाही.

**प्रश्नकर्ता :** पण परतफेड तर करावीच लागेल ना?

**दादाश्री :** तुम्हीच बंधनात आहात, म्हणून तुम्ही प्रतिक्रमण करायला हवे. प्रतिक्रमणाने (वैर) मिटेल. म्हणून तर तुम्हाला हे हत्यार दिले आहे ना, प्रतिक्रमण!

आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान या द्वारेच सगळे हिशोब चुकते होतात. नाही तर वैराने तर वैरच वाढते. दुसऱ्यांचा विरोध केला तर वैर वाढणार नाही का?

**प्रश्नकर्ता :** हो, वाढणारच.

**दादाश्री :** असा अनुभव घेतला आहे ना? वैराने वैर वाढते, म्हणूनच आपण कसेही करून, माफी मागूनही आपली सुटका करून घ्यावी.

## याप्रकारे निर्लेप राहता येते

**प्रश्नकर्ता :** आपण प्रतिक्रमण करून वैर सोडले, परंतु जर समोरच्याने वैर सोडले नाही तर!

**दादाश्री :** महावीर भगवंतांवर पुष्कळ लोक राग (मोह, आसक्ती) करत होते आणि पुष्कळ लोक त्यांचा द्वेषही करत होते. पण त्याच्याशी महावीरांना काय देणेघेणे? वीतरागांना काहीच चिकटत नाही. वीतराग तर शरीराला तेल चोपडल्याशिवाय बाहेर वावरत असतात, आणि बाकी सर्व लोक शरीराला तेल चोपडून फिरतात. तर त्या तेल चोपडलेल्यांना सगळीकडून धूळ चिकटणारच. तुम्हाला आज्ञेत राहायचे आहे ना? मग तुम्हाला धूळ चिकटणार नाही. यासाठी आज्ञेत राहायचे आहे. तेल चोपडले तर धूळ चिकटणारच ना?

देहरूपी जो चिकटपणा आहे त्याला तेल म्हणतात. त्या देहरूपी चिकटपणामुळे त्याला धूळ चिकटते. जर तो चिकटपणाच नसेल तर धूळ कशी चिकटेल? माझ्यावर देखील लोक राग-द्वेष करत राहतात. माझी प्रशंसा पण करतात आणि कोणाला पटले नाही तर मला शिव्या पण देतात, वाकडे-तिकडे पण बोलतात. कारण सगळे स्वतंत्र आहेत. आणि अधोगतीत जाण्याची जबाबदारी त्यांची स्वतःची आहे. स्वतःच्या जबाबदारीवर माणूस वाटेल ते करू शकतो. आपण त्यांना कसे अडवू शकतो? अरे, मारेल सुद्धा! काय नाही करणार? समज नसल्यामुळे काहीही करील. आणि समजदार लोक तर नावदेखील घेत नाहीत. वकील असतो तो गुन्हे करायला घाबरतो की नाही?

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जे राग-द्वेष आहेत, ते व्यक्तीवर अवलंबून असतात का?

**दादाश्री :** ते स्वतःचेच असतात. स्वतःच तेल चोपडून चिकट करतो, मग आपण काय करू शकतो?

तरीही एवढे मात्र निश्चितच आहे की जर आपल्या घरातील कोणी व्यक्ती असेल, तर त्याच्यासाठी चंदुभाईला सांगावे, 'चंदुभाई, प्रतिक्रमण करत राहा.' पूर्वीचे समोरासमोरचे घर्षण आहे, आणि हा घर्षण परिणाम आहे, हा अहंकार परिणाम नाही. 'हा' ज्ञान परिणाम आहे. म्हणून आपण इतके सांगावे की हे पूर्वीचे (घर्षण) आहे, तेव्हा तू त्यासाठी प्रतिक्रमण कर.

**प्रश्नकर्ता :** दोन व्यक्तींमध्ये जे वैरभाव, राग-द्वेष निर्माण होतात, त्यातून मी प्रतिक्रमण करून सुटतो, परंतु जर समोरच्या व्यक्तीने वैर सोडले नाही, तर मग ती व्यक्ती परत पुढच्या जन्मात राग-द्वेषाचा हिशोब पूर्ण करील का? कारण त्याने तर वैर ठेवलेलेच आहे ना?

**दादाश्री :** बरोबर आहे. त्याला आपल्यापेक्षा जास्त दुःख झाले असेल, आणि आपण त्याचे दुःख विसरून जातो, पण तो मात्र पुढील जन्मापर्यंत विसरत नाही, म्हणून आपल्याला प्रतिक्रमणे करावी लागतात. जितके जास्त दुःख त्याला झाले असेल, त्याप्रमाणात समजले ना?

**प्रश्नकर्ता :** जर ते वैर मिटले तर तो आपल्या प्रतिक्रमणाचा परिणाम आहे असे आपण म्हणू शकतो का?

**दादाश्री :** हो, प्रतिक्रमणाने त्याचे वैर कमी होऊन जाईल. एका वेळेस कांद्याचा एक थर जाईल. दुसऱ्या वेळी दुसरा, म्हणजे वैराचे जितके थर असतील तितके निघून जातील. समजले ना आता?

**प्रश्नकर्ता :** हो, महावीर भगवंतांवर खूप लोक राग-द्वेष करत, पण त्यांना कशाचाच स्पर्श होत नसे.

**दादाश्री :** अरे, अपार राग-द्वेष करत असत. मारहाण पण करीत आणि राग (मोह) देखील करीत. त्यांना उचलून घेऊन जात असत.

**प्रश्नकर्ता :** हो, पण त्यांच्यावर काहीच परिणाम होत नसे. ना?

**दादाश्री :** त्यांचा तर यात उपयोगच नव्हता ना? या देहात त्यांचा उपयोगच नव्हता ना! या देहाचे जे काय करायचे असेल ते करा. देहाचे मालकीपण नव्हतेच, त्यात उपयोगच नव्हता. आतमध्ये मालकीभाव तर नव्हताच पण उपयोग देखील नव्हता.

या टेबलाला जर तू मारले, तोडले तर त्यात टेबलाचे काही देणेघेणे नाही. 'यु आर रिस्पोन्सिबल' (तू जबाबदार आहेस) त्याचप्रमाणे त्यांना त्यांचा देह वेगळा दिसत होता!

आठवायचे नसते पण तरी पण आठवत राहते त्याचे कारण 'प्रतिक्रमण दोष' शिल्लक आहे म्हणून.

## त्यात भूतकाळाची आठवण येत नाही

**प्रश्नकर्ता :** काल सत्संगात असा विषय निघाला होता की भूतकाळाची आठवण करू नका आणि वर्तमानात राहा. आता मला समजले की भूतकाळ आठवायचा नाही, पण मन आणि चित्तासमोर तर भूतकाळातील दृश्ये एकदम तशीच्या तशी दिसू लागतात. म्हणून भूतकाळ असा दंश करतो की रोमारोमात भूतकाळच जागृत होतो. मग असे वाटते हा भूतकाळाचा विसर कसा पडेल?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की तुमची ही क्रिया वैर संपवण्यासाठी होत आहे. तुम्हाला भूतकाळ आठवला की मग प्रतिक्रमण सुरू होईल. भूतकाळ आठवल्याशिवाय तर भूतकाळाचा हिशोब दिसणारच नाही ना! बाकी असे, तुमच्यासारखे तर क्वचितच कोणाला होत असते. सगळ्यांनाच काही असे होत नाही. म्हणून इतरांना 'वर्तमानात राहा' असे आम्ही सांगतो.

जो बुद्धिमान असेल, ज्याला 'ज्ञान' समजत नसेल, तोसुद्धा भूतकाळाची आठवण काढत नाही. भूतकाळाची आठवण का काढायची नाही? तर ज्याच्यावर उपाय नाही, त्याचा संकल्प (पण) नाही. भूतकाळ म्हणजे ज्यावर उपाय नाही अशी गोष्ट. म्हणून आम्ही काय सांगतो की, तुम्हाला 'ज्ञान' मिळाले आहे तेव्हा आता भूतकाळ उकरून काढू नका (आठवू नका). मूर्ख लोक देखील भूतकाळाची आठवण ठेवत नाहीत. मग तुम्हाला तर 'ज्ञान' मिळाले आहे, आणि भविष्यकाळ 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात सोपवला आहे, तेव्हा आता वर्तमानात राहा. 'व्यवस्थित शक्ती' वर आता तुमचा विश्वास आहे ना? मग आता तुम्हाला भविष्यासाठी काहीही करण्याची गरज राहिली नाही. आणि ही जी तुम्ही भूतकाळाची आठवण काढता, ते तर तुम्ही तुमच्या फाइल्सचा निकाल लावत आहात. त्याला भूतकाळ उकरणे असे म्हणत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** हो, मग ठीक आहे.

**दादाश्री :** लोक उगाचच दुसऱ्या माणसांच्या इतर गोष्टीत भूतकाळ उकरत बसतात. 'फाइल्स'चा निकाल करण्यासाठी भूतकाळात जावे लागते. कारण आता आपल्याला दुकान रिकामे करायचे आहे, म्हणून आपल्याला आता काय करायला हवे? दुकानात भरलेला माल विकून टाकला पाहिजे आणि नवीन माल खरेदी करता कामा नये. तरी पण इतका विवेक ठेवला पाहिजे की जर मालाची विक्री होत नसेल, साखर संपली असेल, तर परत दुसरी साखर आणली पाहिजे, म्हणजे दुकान विवेकपूर्वक रिकामे करायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** भूतकाळाची आठवण काढायची नाही, असे म्हटल्यावर प्रतिक्रमण करायची काय गरज आहे?

**दादाश्री :** जो प्रतिक्रमण करतो त्याला भूतकाळापासून काहीच त्रास नाही. प्रतिक्रमण म्हणजे तर आपण अतिक्रमणाला संपवून त्याचा निकाल करत आहोत. भूतकाळ उकरायचा (आठवायचा) नाही म्हणजे काय? तर परवा एखाद्या व्यक्तीशी भांडण झाले तर ते आपण मनातच ठेवतो, पण प्रतिक्रमण करण्यासाठी त्याची आठवण आली तर त्यात काही हरकत नाही. परंतु ते मनात ठेवायचे नाही. त्याचा बोजा आपल्यावर राहील. असे आपल्याला करायचे नाही. भूतकाळ उकरणे म्हणजे, काही माणसे भूतकाळाच्या आठवणी काढून रडत बसतात ते. परवाच एकुलता एक मुलगा मरण पावला आणि आज त्याची आठवण काढून रडत असेल तर त्याला 'भूतकाळ उकरणे' असेच म्हणणार, नाही का?

प्रतिक्रमणे तर करावीच लागतील ना? आणि ती प्रतिक्रमणे तर भूतकाळात घडलेल्या गोष्टींसाठीच असतात ना? भविष्यकाळासाठी तर प्रत्याख्याने असतात. प्रत्याख्यान होवोत किंवा करावी लागोत पण 'भविष्यकाळ' तर पूर्णपणे 'व्यवस्थित'वर सोपवता ना? मग तुम्ही वर्तमानात राहिले पाहिजे. बस, आमचे विज्ञान एवढेच सांगते की, 'वर्तमान वर्ते सदा सो ज्ञानी जगमांही.' अत: हे 'ज्ञान' मिळाल्यावर तुम्ही सदैव वर्तमानात राहिले पाहिजे. ज्यावेळी जसा योग असेल त्यावेळी वर्तमानातच राहिले पाहिजे. एक क्षणदेखील 'वर्तमान' हरवणार नाही, 'आम्ही' सदैव वर्तमानातच राहतो. 'आम्ही' आमच्या स्वरूपात राहतो आणि हा 'पटेल' सदैव वर्तमानात राहतो!

प्रतिक्रमण करण्यासाठी भूतकाळ आठवावाच लागतो. ज्या गोष्टी आपण विसरलेलो असू, त्या गोष्टींना पुन्हा आठवून, आणि जर आज पुन्हा त्याबद्दल अतिक्रमण झाले, तर ते आठवून त्यासाठी प्रतिक्रमण करावे लागते. त्याशिवाय तर चालणारच नाही ना? प्रतिक्रमण हा आपला मुख्य मार्ग आहे! आणि 'ज्ञान' घेतल्यानंतर, 'आत्मा' प्राप्त झाल्यानंतर प्रतिक्रमणे करायची नसतात. पण आपला हा अक्रम मार्ग आहे, म्हणजे कर्मे संपविल्याशिवायच आत्मा प्राप्त केला आहे.

## फटाके तर फुटतच राहतील

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करत असतानाच जर अतिक्रमण झाले तर काय करावे?

**दादाश्री :** तर मग थोड्या वेळाने करा. आपण फटाके विझवायला गेलो, तेवढ्यातच दुसरा फटाका फुटला, तर आपण थोडा वेळ परत मागे यायला हवे. थोड्या वेळाने आपण विझवू. फटाके तर फुटतच राहतील, त्यालाच संसार म्हणतात.

## प्रतिक्रमण करता-करताच अतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** खूप वेळा असे होते की प्रतिक्रमण करण्यासाठी बसलो, तर प्रतिक्रमण करता-करताच दुप्पट अतिक्रमण होऊन जाते. उलट त्या व्यक्तीचे दोष जास्त प्रकर्षाने दिसू लागतात. मग प्रतिक्रमण एका बाजूला राहते आणि अतिक्रमणच सुरू होते, कर्माचा हा असा उदय कसा होतो?

**दादाश्री :** असे जर झाले तर तेव्हा आपण प्रतिक्रमण बंद करावे. बंद करून नंतर पुन्हा पाहावे, पुन्हा आपले प्रतिक्रमण चालू करावे.

कित्येकांच्या बाबतीत थोडेसे प्रतिक्रमण केल्याने त्यांच्या वहीखात्यातील हिशोब मिटतात. आणि कित्येकांना तर खूप वेळा प्रतिक्रमणे करावी लागतात, तेव्हा कुठे हिशोब पूर्ण मिटतात. कारण हिशोबाच्या वहीत खूप हिशोब लिहिलेले असतात!

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असा झाला की वारंवार प्रतिक्रमणे करायला हवीत?

**दादाश्री :** होय, हाच पुरुषार्थ आहे!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे असे प्रतिक्रमण करता करता जे अतिक्रमण सुरू होते आणि तो चिकटपणा पुन्हा लागायला सुरुवात होते, तर त्यात काही चूक तर होत नाही ना?

**दादाश्री :** नाही, अशा वेळी आपण (प्रतिक्रमण) थांबवले पाहिजे. आपल्याला खीर तर उकळायचीच आहे, पण ती जर उतू जायला लागली तर आपण चुलीतील लाकडे जरा बाहेर ओढायची. नंतर पुन्हा लाकडे आत ढकलायची, आणि तरीही उतू जात असेल तर म्हणावे की ते तर महाउपकारी आहेत, आता परत या भानगडीत कशाला पडतोस? ते तर महाउपकारी आहेत, असे म्हणावे.

**प्रश्नकर्ता :** महाउपकारी म्हटल्यावर थोडा वेळ शांत राहतो. पण थोडा वेळ गेल्यानंतर तो परत चढून बसतो.

**दादाश्री :** पण तरीही जास्त चिकट होणार नाही, हे पण आश्चर्य आहे ना! इतका सुधारला आहे ते पण चांगलेच आहे ना? जबरदस्त कषाय आहेत आणि हिशोब खूप आहेत, अपार आहेत.

## ते प्रतिक्रमण आहे की अतिक्रमण?

**प्रश्नकर्ता :** एका व्यक्तीसाठी मी दोन-दोन, तीन-तीन दिवस प्रतिक्रमण करतो. ते संपतच नाही. तेव्हा मी खूप थकून जातो, अतिशय थकून जातो. मग मला वाटते सोड आता, मला हे प्रतिक्रमण करायचेच नाही. प्रतिक्रमण चालू आहे की अतिक्रमण तेच कळेनासे होते. पण एवढे मात्र आहे की त्यानंतर शांती मिळाली असे वाटते.

**दादाश्री :** प्रतिक्रमण केल्यावर जबरदस्त शांती मिळते. कधीच अनुभवली नसेल अशी शांती लाभते.

**प्रश्नकर्ता :** पण एकाच व्यक्तीचे प्रतिक्रमण तीन-तीन दिवस चालले तर काय करणार?

**दादाश्री :** ते फारच गुंतागुंतीचे आहे. त्याच्या वहीत खूप हिशोब आहेत. असे वहीखातेवाले कधी मागे फिरत नाहीत, पण तरी फिरले हे पण एक मोठे आश्चर्यच आहे ना!

**प्रश्नकर्ता :** मला फक्त एवढेच समजून घ्यायचे आहे की मी चुकीच्या मार्गावर तर नाही ना?

**दादाश्री :** नाही. तुम्ही चुकीच्या रस्त्यावर कुठे आहात? तुम्ही तर सुरक्षित रस्त्याने चालला आहात.

**प्रश्नकर्ता :** बस, आम्हाला तेवढी शक्ती द्या.

**दादाश्री :** हो, ती शक्ती तर आम्ही देतच असतो. पण तुम्ही इथे याल तर ती वाढेल.

मला खात्री झाली आहे ना, म्हणून मी आता त्यांच्यात लक्ष देत नाही. जोपर्यंत सेफसाइड (सुरक्षितता) झाली नव्हती, तोपर्यंत मी लक्ष ठेवत असे. आता तो पूर्ण सेफसाइडवर आहे, कधी ना कधी त्याचे (मोक्षाचे) काम पूर्ण होईल.

## वैराच्या चिकटपणानुसार धुवावे

**प्रश्नकर्ता :** आमचे एखाद्या जीवाशी वैर असेल, आम्ही त्याचे प्रतिक्रमण केले, पण त्याच जीवाचे परत परत प्रतिक्रमण का करावे लागते?

**दादाश्री :** हो, पण प्रतिक्रमण करावे. दोष एवढा मोठा होता की प्रतिक्रमणाने त्याचा फक्त एक थर गेला, अजून लाखो थर बाकी आहेत. त्यातले थर कमी कमी होत जातात. जोपर्यंत ते संपत नाहीत तोपर्यंत प्रतिक्रमण करत राहावे. एखाद्या व्यक्तीसाठी महिने-दोन महिने प्रतिक्रमण केल्यावर संपूर्ण हिशोब मिटतो. हिशोब चुकता होतो. तर एखाद्या व्यक्तीबरोबर आयुष्यभर हिशोब चालू राहतो. ग्रंथी खूप मोठी असते. कांदा कसा असतो? त्याचा एक थर काढला तरी कांदा पुन्हा जसाच्या तसाच दिसतो ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** त्याचप्रमाणे या दोषाचेही थर असतात. पण एक वेळ प्रतिक्रमण केले तर एक थर जातोच जातो. म्हणजे त्यासाठी तुम्हाला पुन्हा प्रतिक्रमण करावे लागणार नाही. दोषाच्या एका थरासाठी एकदाच प्रतिक्रमण करावे लागते.

## स्वबंधनातून स्वतःच सुटायचे

त्या ॲक्सिडेंटमधून ते वाचतील अशी शक्यता नव्हती, तरी पण वाचले. त्या ॲक्सिडेंटमधून तर वाचले पण कषाय मार्गात जो जबरदस्त ॲक्सिडेंट होत असतो त्यातून सुद्धा वाचले, आणि कषाय मार्गापासून (पूर्ण) मुक्त झाले.

**प्रश्नकर्ता :** आणि मी जर या कषाय मार्गानेच पुढे जात राहिलो, तर निश्चितच ॲक्सिडेंट होईल, असे त्याच्या डोक्यात ठामपणे फिट झाले आहे.

**दादाश्री :** हो, निश्चित होणार, असे ठाम फिट झाले आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जर स्वत:च प्रतिक्रमण करत राहिला तरच स्वत:ची सुटका होईल. त्यांना असे वाटते की जसे या भावांच्या, इतर सर्व व्यक्तींच्या मनात जितके उलटे (भाव) निर्माण होत असतात, तसेच त्या लोकांनाही होत असतील की आपण याला बरोबर तावडीत घ्यावे. तर मग मी जर प्रतिक्रमण करीत राहिलो तर त्या लोकांच्या मनात माझ्याबद्दल जी अढी आहे, त्याचे काय? ते काय मला पुन्हा बंधनात टाकतील?

**दादाश्री :** नाही, तुम्ही तुमच्या बंधनातून सुटा. आणि तो त्याच्या बंधनातून सुटेल. अन्यथा बंधन सुटणारच नाही. हा तर न्याय आहे, महावीर भगवंतांचा न्याय आहे. नाही तर महावीर सुटलेच नसते ना! कुठला ना कुठला बंध राहिलाच असता आणि ते सुटलेच नसते. तुम्ही जिथे जिथे बांधलेले आहात त्यातून तुम्ही सुटा.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे स्वत:च स्वत:चे सोडवायचे. प्रतिक्रमण करून स्वत:च स्वत:ची बंधने सोडायची.

**दादाश्री :** हो, सोडायची.

## वैरीबद्दल नसावा एक पण चुकीचा विचार

तो वाकडा वागेल, अपमान करील तरीही आम्ही त्याचे रक्षण

करू. एक गृहस्थ माझे विरोधक झाले होते. तेव्हा मी या सर्वांना सांगितले, (त्यांच्याबद्दल) अजिबात वाईट विचार करू नका. जर वाईट विचार आले तर लगेच प्रतिक्रमण करा. ते भाऊ चांगले आहेत, पण असे लोक कशाच्या आधीन आहेत? ते सर्व कषायांच्या आधीन आहेत, आत्म्याच्या आधीन नाहीत. जो आत्म्याच्या आधीन असेल तो असे उलट उत्तर देणारच नाही. म्हणजे कषायांच्या आधीन असलेल्या माणसाने जरी कुठलाही गुन्हा केला तरी त्याला माफ करावे. तो बिचारा स्वत:च्या आधीनच नाही! तो जेव्हा कषाय करतो, तेव्हा आपण दोरी शांत ठेवली पाहिजे. (हलवता कामा नये). नाही तर, तो सगळे उलटेच करील. कषायांच्या आधीन म्हणजे उदयकर्माच्या आधीन. जसा उदय येईल तसा तो वागेल.

## पार्श्वनाथांचा समत्वयोग

**प्रश्नकर्ता :** आता ह्या गोष्टीची सुरुवात कशी झाली होती की पार्श्वनाथ भगवंतांना हे माहीतच नव्हते आणि त्याने (कमठने) वैर ठेवले होते. आणि त्या वैरामुळे सतत त्यांची भेट होई, आणि तो त्यांचे काही ना काही नुकसान करतच राही. म्हणजे असेही घडतेच ना? की स्वत:ला माहीतच नसते आणि तो वैरभाव ठेवत राहतो. आणि मग असे दहा जन्मांपर्यंत चालले.

**दादाश्री :** त्याचे असे आहे, आपण जेवढे नुकसान केले असेल तेवढे तो करणार. म्हणून आता यापुढे कुणाचे नुकसान करू नका.

**प्रश्नकर्ता :** पण पार्श्वनाथ भगवंतांना तर याची माहिती सुद्धा नव्हती ना?

**दादाश्री :** त्या सर्वांना कसे कळणार? तो कसले फळ देत आहे हे कसे कळणार? म्हणजे आपण दिलेले तेच तो परत करत आहे, हे निश्चित आहे. पार्श्वनाथ भगवंतांना तर हे कळतच होते की 'मी जे दिले होते तेच आता हे लोक मला परत करत आहेत.' जर आतमध्ये बेचैनी वाढली, तर कर्मे संपायचा वेळ पण वाढत जातो.

पार्श्वनाथ भगवंतांची बेचैनी वाढत नव्हती, म्हणून दहा जन्मात ते सर्व संपून गेले.

**प्रश्नकर्ता :** तरी पण दहा जन्म चालले ते काय कमी म्हणायचे का?

**दादाश्री :** हे दहा जन्म, ते किती जन्मांच्या आधारावर आहेत, हे तुला माहीत आहे का?

**प्रश्नकर्ता :** ते काही माहीत नाही.

**दादाश्री :** एका केसाइतके म्हणायचे. दहा जन्म म्हणजे एका केसा इतकेही नाही.

**प्रश्नकर्ता :** ओहो! अनंत जन्मांसमोर दहा जन्म म्हणजे काहीच नाही. म्हणून त्यांनी प्रत्येक जन्मात समता बाळगली होती.

**दादाश्री :** तेव्हा ते संपले. पहिल्या दोन-तीन जन्मात जरा कच्चा पडतो, चिडतो, त्यामुळे थोडे वाढत जाते. एकदम समता राहील असे हे जग नाही. ज्ञानींना पण राहत नाही. हे 'अक्रम विज्ञान' तर वेगळ्याच प्रकारचे आहे, म्हणून 'समता' राहू शकते.



# [ 17 ]
# कार्याच्या कारण स्वरुप अभिप्रायाचे वारण

## एका जन्माचीच प्रतिक्रमणे

**प्रश्नकर्ता :** निरंतर, पदोपदी, रात्रंदिवस प्रतिक्रमण करा, असे जे सांगितले आहे, तर ती एका जन्मातील दोषांसाठीच प्रतिक्रमणे करायची आहेत ना?

**दादाश्री :** प्रतिक्रमण म्हणजे काय? तर आपला अभिप्राय असता कामा नये. प्रतिक्रमण (केले) म्हणजे आपण आपला अभिप्राय बदलला आहे. आता आपला अभिप्राय राहिला नाही. आपल्याकडून एखादे चुकीचे कार्य झाले, तर त्या कार्यासाठी 'हेच बरोबर आहे' असा आपला अभिप्राय होता. तर 'हेच बरोबर आहे' हा अभिप्राय सोडण्यासाठी आपण प्रतिक्रमण करावे की, 'मी याची माफी मागतो, आणि मी पुन्हा असे करणार नाही.' अर्थात प्रतिक्रमण फक्त अभिप्राय सोडण्यासाठी आहे.

**प्रश्नकर्ता :** पण तुमची भेट झाली तेव्हापासून 'अभिप्राय' तर सुटलेच आहेत ना?

**दादाश्री :** हो, ते बरोबर आहे, पण तरीही प्रतिक्रमण तर केले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** काही पूर्वग्रह असेल, किंवा गाढ अभिप्राय असेल, तर वारंवार प्रतिक्रमण करून तो धुतला जाईल का?

**दादाश्री :** हो, धुतला जाईल.

**प्रश्नकर्ता :** जितक्या वेळा अभिप्राय किंवा पूर्वग्रह समोर येतो, तितक्या वेळा त्याचे प्रतिक्रमण करत राहायचे?

**दादाश्री :** सतत प्रतिक्रमण करत राहिलात तर धुतले जाईल सर्व. पूर्वग्रह का होतात? तर 'त्यावरच लेप लावत गेले' सतत अतिक्रमणच करत राहिले, तर आता प्रतिक्रमण केले तर धुतले जाईल. अतिक्रमण केलेत, आणि त्याचीच पुनरावृती करत राहिलात म्हणजे पूर्वग्रह उत्पन्न होतात. इथे एवढे सारे लोक आहेत, पण हाच का वाट्याला आला?

## चोराला क्षमा करू शकता, पण त्याची संगत बाळगू नये

आपल्या रागामुळे जर समोरच्याला दु:ख झाले असेल किंवा समोरच्याचे नुकसान झाले असेल तर तुम्ही चंदुभाईला सांगावे 'चंदुभाई! प्रतिक्रमण कर, माफी माग.' समोरचा जर सरळ नसेल आणि आपण त्याच्या पाया पडलो, तर तो उलट आपल्यालाच टपल्या मारतो आणि म्हणतो, 'आता कसा आला वळणावर?' आले मोठे वळणावर आणणारे. अशा लोकांबरोबर डोकेफोड करू नये. पण तरी त्यांचा गुन्हा माफ केलाच पाहिजे. तो तुमच्याकडे चांगल्या भावाने किंवा वाईट भावाने कसाही आला असेल, पण त्याच्याबरोबर कसे वागावे हे आपण ठरवायचे आहे. समोरच्या व्यक्तीचा स्वभाव जर वाकडा असेल तर अशा माणसाबरोबर डोकेफोड करायची नसते. जो प्रकृती स्वभावाने चोर आहे, दहा वर्षे आपण त्याची चोरी पाहत आलो आहोत, आणि तो जर येऊन तुमच्या पाया पडला तर काय आपण त्याच्यावर विश्वास ठेवावा? विश्वास ठेवता कामा नये. त्याने चोरी केली तर आपण त्याला माफ करावे, म्हणावे जा, आता तू मुक्त आहेस. आता आमच्या मनात तुझ्याबद्दल कोणताही अभिप्राय राहणार नाही. पण त्याच्यावर विश्वास ठेवू नये आणि त्याची संगत पण ठेवू नये. हे माहीत असून सुद्धा संगत

ठेवली आणि विश्वास ठेवला नाही, तर तो गुन्हा आहे. खरे म्हणजे सोबत ठेवूच नये, आणि जर ठेवली तर त्याच्याबद्दल पूर्वग्रह असता कामा नये. जे होईल ते बरोबर, असा भाव ठेवावा.

## अभिप्रायांसाठी अमोघ शस्त्र

**प्रश्नकर्ता :** तरी पण वाईट अभिप्राय बनलाच तर काय करावे?

**दादाश्री :** तसे झाले तर माफी मागायची. ज्या व्यक्तीबद्दल वाईट अभिप्राय झाला आहे, त्या व्यक्तीचीच माफी मागायची.

**प्रश्नकर्ता :** चांगला अभिप्राय द्यायचा की नाही?

**दादाश्री :** कोणताच अभिप्राय द्यायचा नाही, आणि जर दिला गेला तर आपण तो पुसून टाकावा. तुमच्याजवळ पुसून टाकायचे साधन आहे, 'अमोघ शस्त्र' आहे. आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान रूपी 'अमोघ शस्त्र.'

**प्रश्नकर्ता :** जिथे आमचे राग-द्वेष नाही, जिथे आमचा स्वार्थ नाही, कोणत्याच व्यक्तीशी संबंध नाही, अशा बाबतीत अभिप्राय दिला तरी प्रतिक्रमण करायला हवे का?

**दादाश्री :** काहीच संबंध नसताना अभिप्राय द्यायची आवश्यकताच नाही. आणि द्यायचा असेल तर प्रतिक्रमण करावे लागेल. त्याचा संबंध असो किंवा नसो, तुमच्या हातात अभिप्राय देण्याचा हक्कच नाही. तो तुमचा स्वच्छंदीपणा आहे. म्हणून आपणच तो मिटवला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** उदाहरणार्थ हिटलरने समाजाचे खूप अहित केले असा अभिप्राय आम्ही दिला तर त्यात काय चूक आहे?

**दादाश्री :** आपण तिथे हात घालताच कामा नये. प्रयोजनाशिवाय हात घालूच नये. हिटलरशी आपल्याला काहीच देणेघेणे नाही. तरी जर बोलले गेले, तर ते 'व्यवस्थित'. नंतर आपण ते पुसले पाहिजे. शब्द तर निघून जातात. तसे तर आम्ही देखील बोलतो की भाऊ, पोळी

चांगली आहे, आंबे चांगले आहेत. असे बोलतो पण आम्ही ते लगेच पुसून टाकतो. संयोगवश कोणाला मदत करायच्या इच्छेने आम्ही म्हणतो की चांगले बनवले आहे. तरी पण आम्ही ते पुसून टाकतो. अभिप्राय दिला की ताबडतोब धुऊन टाकतो. धुण्याचे साधन मिळाले आहे ना!

**प्रश्नकर्ता :** धुण्याचे कोणते साधन आहे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण.

## प्रतिक्रमणाने बदलतात अभिप्राय

तुम्ही समोरच्या व्यक्तीत जितके गुण पाहता आणि मग तुमचा अभिप्राय बसतो की हा गुण तर उत्तम आहे. मग तसे गुण तुमच्यात उत्पन्न होऊ लागतात. अभिप्राय बदलला पाहिजे. समोरच्या व्यक्तीत जर दोष दिसला तर तसाच दोष तुमच्यातही उत्पन्न होतो.

**प्रश्नकर्ता :** चुकूनदेखील एखाद्या व्यक्तीत दोष दिसले तर ताबडतोब प्रतिक्रमण करावे. मग काही झंझटच नाही.

**दादाश्री :** हो, प्रतिक्रमण करून घ्यावे. त्यासारखा दुसरा उपायच नाही!

तुमच्या मनात मगनभाईबद्दल वाईट विचार आले तर तुमच्या चेहऱ्यावर त्याचा परिणाम होतो, आणि मगनभाईला तुमच्या चेहऱ्यावरचे भाव कळतात. तर मग त्यासाठी तुम्ही म्हणावे की, 'मगनभाई माझे खूप उपकारी आहेत, खूप उपकारी आहेत.'

## असे काढावे गाढ अभिप्राय

**प्रश्नकर्ता :** गाढ अभिप्राय कसे काढावे?

**दादाश्री :** जेव्हापासून निश्चित केले की काढायचे आहेत तेव्हापासून ते निघणे सुरू होतात. जास्त गाढ असतील त्यांना जर दररोज दोन-दोन तास खणले तर ते निघून जातील. 'आत्मा' प्राप्त झाल्यावर 'पुरुषार्थ' धर्म प्राप्त झाला आहे, आणि पुरुषार्थ धर्म पराक्रमापर्यंत पोहोचू

शकतो, तो कुठलीही *अटकण* असेल (जे बंधन रूप असते) तिला उपटून फेकू शकतो. पण कोणत्या कारणामुळे हे उत्पन्न झाले आहे, ते एकदा समजले पाहिजे. मग त्यासाठी प्रतिक्रमण करावे.

आता तुम्ही अभिप्राय देता का?

**प्रश्नकर्ता :** नाही, बिलकुल नाही.

**दादाश्री :** मग बस, शेवट झाला.

## अभिप्राय देताना सावध राहा

अभिप्राय बनणार नाहीत याकडे लक्ष द्या. त्यासाठी जास्तीत जास्त लक्ष दिले पाहिजे. बाकी काही अडचण नाही. कोणाचे काही पाहण्यापूर्वीच अभिप्राय बनतात, संसार जागृती एवढी जास्त आहे की अभिप्राय बनतातच. म्हणून अभिप्राय बनताच आपण तो सोडून द्यायला हवा. अभिप्रायाच्या बाबतीत खूप सावध राहण्याची आवश्यकता आहे. म्हणजे अभिप्राय तर बनतील, पण बनताक्षणीच आपण ते पुसून टाकावेत. प्रकृती अभिप्राय बनवत राहते आणि प्रज्ञाशक्ती अभिप्रायातून सोडवत राहते. प्रकृती अभिप्राय बनवत राहील. काही काळ बनवतच राहील, पण आपण ते अभिप्राय सोडत जावे. ही सर्व भानगड अभिप्रायाचीच आहे.

'हे भाऊसाहेब असेच आहेत' असा जर आमचा अभिप्राय बनला असेल तर ते भाऊसाहेब जेव्हा जेव्हा इथे येतील तेव्हा तेव्हा त्यांना आमचा मनोभाव बदललेला दिसेल. त्यांना आमच्यात समता दिसणार नाही. मग आम्हाला पाहताक्षणीच ते समजून जातील की दादांच्यात काही तरी बदल झाला आहे. म्हणजे अभिप्रायामुळे असा परिणाम होतो. आणि अभिप्राय सोडला की मग काहीच नाही. माझा कोणाबद्दल काहीच अभिप्राय नाही त्यामुळे माझ्यात कायम समता राहते. प्रकृती आहे त्यामुळे अभिप्राय बनतच राहणार, सतत बनणार. पण बनल्यानंतर आपण ते सोडत राहावे.

**प्रश्नकर्ता :** जे अभिप्राय बनतात, ते कसे सोडवावे?

**दादाश्री :** अभिप्राय सुटण्यासाठी आपण असे करायला हवे की आपण म्हणावे, 'या भाऊसाहेबांबद्दल माझा असा अभिप्राय बनला आहे, तो चुकीचा आहे. मी असे करता कामा नये.' असे म्हटले की तो अभिप्राय सुटतो. आपण जाहीर करायला हवे की 'हा अभिप्राय चुकीचा आहे, या भाऊंसाहेबांबद्दल, असा अभिप्राय कसा बनवू शकतो? हे तू काय करत आहेस?' अशा प्रकारे त्या अभिप्रायाला चुकीचा म्हटल्यावर तो सुटेल.

## गुणाकार केल्यावर लगेच भागाकार करा

असे आहे की, एखाद्या रकमेला साताने गुणले तर लगेच साताने भागावे लागते, तरच पूर्वीची रक्कम जशीच्या तशी राहते. आपल्याला रक्कम जशीच्या तशी ठेवायची आहे ना? आपल्याला समजते की कितीने गुणाकार झाला आहे, तर लगेच तितक्या रकमेने भागून टाकावे. आपल्याला समजते की इथे तर खूप मोठ्या रकमेने गुणाकार झाला आहे, तर आपण तेवढ्याच मोठ्या रकमेने भागाकार करावा, गुणाकार तर होतच राहणार, पण आपल्याकडे भागाकाराचे शस्त्र आहेच ना? आपण आता 'पुरुष' झालो आहोत आणि 'पुरुषार्थ' हा आपला धर्म आहे! ती व्यक्ती समोर आली की आपण अभिप्राय दिल्याशिवाय राहतच नाही. पण अभिप्राय बनताच लगेच आपण 'ही चांगली गोष्ट नाही, असे कशासाठी?' असे म्हणून भागाकार केला की आपण सुटलो. अभिप्राय तर बनणारच आणि अभिप्राय बनला म्हणजे तो फळ देणारच, त्याचे फळ देऊनच जाणार.

**प्रश्नकर्ता :** फळ देणार म्हणजे दु:ख देऊन जाणार का?

**दादाश्री :** फळ देणार म्हणजे तुम्ही एखाद्या व्यक्तीविषयी अभिप्राय बांधला तर त्याच्या मनावर नैसर्गिकपणे (आपोआपच) असा परिणाम होतच असतो. त्या समोरच्या व्यक्तीलाही समजते की ह्यांचे आपल्याबद्दल असे भाव आहेत. परंतु जर आपण आपले अभिप्राय मिटवून टाकले तर आपल्या मनावर त्याचा परिणाम होणार नाही.

अभिप्राय दिल्यावर लगेच साताने भागून टाकले तर परिणाम होण्यापूर्वीच तो अभिप्राय नष्ट होईल. म्हणजे कोणतीही गोष्ट व्यर्थ जात नाही, आणि त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहत नाही. सगळे माझ्याशी (दादांशी) वेगळेवेगळे वागतात पण माझा कोणाबद्दलच अभिप्राय बनत नाही. मला माहीत असते की असेच होणार! कलियुगात सासू अशीच असणार, असे सुनेला माहीतच असते ना? असते की नसते? मग त्यात कशाला अभिप्राय बनवावे? कलियुग आहे म्हणजे असेच होणार.

असे आहे की, आवडती वस्तू मिळते त्याचे नाव पुण्य आणि नावडती वस्तू मिळते त्याचे नाव पाप! म्हणजे पापाच्या उदयाच्या वेळी आपल्याला नावडती वस्तू मिळते. नावडते संयोग मिळतात, हा कसला उदय म्हणायचा? तर पापाचा. त्याने जरी कडूपणा दिला तरी पण तो जास्त वेळ टिकणार नाही, परंतु जर सासूबद्दल अभिप्राय बाळगला तर त्याचा परिणाम सासूवर दीर्घकाळ टिकतो. म्हणून कोणाबद्दलच अभिप्राय बनवू नये. कारण तो तर आत्माच आहे, मग त्याच्यासाठी अभिप्राय बनवायचाच कशाला? तो आत्माच आहे मग बाहेरचे काही बघूच नका.

## वस्तू सोडायच्या नाहीत, अभिप्राय सोडावे

**प्रश्नकर्ता :** समजते तर तसे खूप, पण त्यानुसार (आचरण) होत नाही, त्याचे काय?

**दादाश्री :** त्याला काही हरकत नाही. समज असणेच जरूरी आहे. समजले म्हणजेच त्याचा अभिप्राय वेगळा झाला आणि म्हणून तो त्यातून मोकळा झाला. चंदुभाई काही चुकीचे कार्य करत असतील आणि त्यांनी 'मला हे पसंत नाही, मी असे करता कामा नये.' असे म्हटले, की लगेच तो अभिप्राय वेगळा झाला, आणि जर हा (नवीन) अभिप्राय कायम राहिला तर चंदुभाई त्यातून मुक्त होईलच. अभिप्रायापासूनच मुक्त करायचे आहे. वस्तूंपासून नाही. वस्तू आपोआप सुटल्या तर ठीकच आहे, पण त्यांना निराधार करायचे आहे. म्हणजेच अभिप्रायातून मुक्त व्हायचे आहे. म्हणून आम्ही प्रतिक्रमण शिकवले आहे ना! प्रतिक्रमण

म्हणजे अभिप्रायातून मुक्त झाला. त्याचे यथार्थ प्रतिक्रमण केल्याने अभिप्रायातून मुक्त होईल. आणि तू आता 'पश्चात्ताप पण करत आहेस.'

प्रतिक्रमण केले नाही तर तुमचा अभिप्राय कायम राहतो, आणि त्यामुळे तुम्ही बंधनात अडकता. जो दोष झाला त्यात तुमचा अभिप्राय कायम राहिला. प्रतिक्रमण केले की तुमचा तो अभिप्राय दूर झाला. अभिप्रायांपासून 'मन' उत्पन्न झाले आहे. माझा कोणत्याही व्यक्तीबाबत किंचितदेखील अभिप्राय नाही. कारण एकदा पाहिल्यानंतर पुन्हा मी अभिप्राय बदलत नाही. एखाद्या व्यक्तीने संयोगवश चोरी केली, आणि मी ती स्वत: बघितली तरी मी त्याला चोर म्हणणार नाही. कारण ती संयोगांमुळे झाली आहे. आणि जगातील लोक जो पकडला जातो त्यालाच चोर म्हणतात. हे संयोगांमुळे झाले की कसे? का कायमच चोर होता? जगातील लोक असा विचार करत नाहीत. मी तर जो कायमच चोर आहे त्यालाच चोर म्हणतो. संयोगवशात चोरी केलेल्याला मी चोर म्हणत नाही. म्हणजेच मी एक अभिप्राय दिल्यानंतर दुसरा अभिप्राय देतच नाही. कोणाही व्यक्तीबद्दलचा अभिप्राय मी आजपर्यंत बदललेला नाही.

## अभिप्राय बदलल्यामुळे सहमती संपते

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण तर जो अभिप्राय दिला जातो त्यासाठीच करावे लागते ना?

**दादाश्री :** तुम्ही जो अभिप्राय दिला, तो पूर्वीच्या हिशोबामुळे दिला. आणि जर आता प्रतिक्रमण केले तर मग तुम्ही पुन्हा अभिप्राय बनवत नाही. त्याप्रमाणे तुम्ही 'या गोष्टीशी मी सहमत नाही', असे म्हटले तरी अभिप्राय संपतील. पूर्वी बनवलेला अभिप्राय या वेळी नष्ट होईल. आणि एकदा हे समजले की मग कुठेच ढवळाढवळ होत नाही. तुमच्याकडून चुकीचे प्रोटेक्शन (समर्थन) झाले तर ते सुधारा. बस, आणखी काहीच करायची गरज नाही. काही चूक झाली, कोणाचे नुकसान झाले, असे घडले तर त्याचे प्रतिक्रमण केले की झाले. त्या गोष्टीचे निराकरण झाले.

प्रतिक्रमण याचा अर्थ काय? तर ही जी चूक होत आहे तिच्याशी मी सहमत नाही. प्रतिक्रमण इटसेल्फ प्रुव (स्वतःच ते सिद्ध) करते की, या चुकीशी तुम्ही सहमत नाही. प्रथम तुम्ही त्या दोषाशी सहमत होता, 'असेच करायला हवे' असे तुम्हाला वाटत होते. पण आता तुम्ही सहमत नाही. अभिप्राय बदललात म्हणजे झाले. हे जग केवळ अभिप्रायामुळे कायम आहे.

## हे ताबडतोब कळायलाच हवे

तुझे तर सगळे सहमतीनेच चालते ना? सहमत होऊनच चालते ना?

**प्रश्नकर्ता :** आजचा अभिप्राय वेगळा होऊन जातो.

**दादाश्री :** आजचा तुझा अभिप्राय कुठे वेगळा होता? तिथे त्या 'भाई' बरोबर भांडत होतास ना!

**प्रश्नकर्ता :** पण नंतर अभिप्राय बदलला होता.

**दादाश्री :** पण किती वेळाने? सहा-आठ महिन्यांपर्यंत अजागृती? एक-दोन तासात जागृती यायला हवी. पण कचऱ्यासारखा माल भरलेला आहे. किती भरपूर कचरा भरून ठेवला आहे असे मी म्हणतो, तुला नाही का असे वाटत?

**प्रश्नकर्ता :** तुमचे म्हणणे बरोबर आहे.

**दादाश्री :** चूक आहे हे किती तासात कळले पाहिजे?

**प्रश्नकर्ता :** दोन तासात!

**दादाश्री :** दोन तास, चार तास किंवा फार तर बारा तासात तरी कळायला हवे की ही चूक झाली. याउलट आम्ही तुम्हाला सांगतो तरी तुम्हाला चूक झालेली कळत नाही. अजूनही कित्येक बाबतीत चूक होते पण तुम्हाला समजून येत नाही. मला समजते की हा वाकडा चालला. मला कळते की नाही?

**प्रश्नकर्ता :** कळते ना.

**दादाश्री :** तरी पण आम्ही चालवून घेतो. कारण आम्ही जाणतो की आता ठीक होईल.

## हिंसकभाव समूळ नष्ट होण्याची गरज आहे

हा संसार नीट समजून घ्यायला हवा. आम्ही जेव्हा बोलतो, त्याचवेळी आमचे बोलणे आणि हा अभिप्राय दोन्ही वेगवेगळे असतात. दोन्ही अभिप्राय एकत्रच चालत असतात.

आपल्या सगळ्यांमध्ये हिंसकभाव असताच कामा नये. जरी एखाद्या व्यक्तीने आपल्याला मारून टाकले तरी 'त्याची चूक आहे' असा अभिप्राय होता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** हो, 'त्याची चूक आहे' असे वाटताच कामा नये.

**दादाश्री :** जरी त्याने मारले तरी 'ह्याने माझी हिंसा केली' असे म्हणता कामा नये. माझे उदयकर्म आणि त्याचे उदयकर्म समोरासमोर भांडत आहेत. मी जाणणारा आहे आणि तोसुद्धा जाणणारा आहे. जरी तो जाणणारा राहत नसेल, त्याने दारू प्यालेली असेल, तरी मला त्याचे काही देणेघेणे नाही, पण मी तर जाणणारा आहे.

## पुद्गल परमाणू काय म्हणतात?

जे खूप जागृत आहेत, त्यांना प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. पण ज्यांची जागृती कमी आहे त्यांना आम्ही प्रतिक्रमण करायला सांगतो.

**प्रश्नकर्ता :** जागृती कमी असेल तर प्रतिक्रमण करावेच लागेल का?

**दादाश्री :** हो, अभिप्राय बदलण्यासाठी प्रतिक्रमण करावेच लागेल. 'हा आमचा अभिप्राय नाही.' आता आम्ही ह्या अभिप्रायात नाही. अभिप्रायामुळे आम्ही बंधनात होतो, पण आता हा अभिप्राय आम्ही सोडून दिला आहे. आता आमचा अभिप्राय त्याविरुद्ध आहे. कोणाला

शिवी द्यावी, कोणाला दु:ख द्यावे, असा आमचा अभिप्राय नाही. कोणावर रागावणे, हा अभिप्राय आता आमचा अभिप्राय नाही. म्हणजे आम्ही त्याला शुद्ध करून परमाणू काढून टाकले. शुद्ध केल्यामुळे परमाणू 'विश्रसा' होतात. संवर (नवीन कर्मे बांधणे बंद होणे) राहते. कर्मबंध पडत नाही आणि विश्रसा होते. प्रत्यक्षात सर्व जीवमात्रात विश्रसा होतच असते, पण त्यांना (नवीन) कर्मबंध बांधून विश्रसा होते. मात्र इथे कर्मबंध न पडता विश्रसा होते.

तुम्ही शुद्ध झाला आहात आणि आता चंदुभाईला शुद्ध करणे हे तुमचे कर्तव्य आहे. ते पुद्‌गल काय म्हणते, 'भाऊ, आम्ही तर शुद्धच होतो. भाव करून तुम्हीच आम्हाला बिघडविले आणि या स्थितीपर्यंत आम्हाला पोहोचवले, नाही तर आमच्यात पू, हाडे असे काहीही नव्हते. आम्ही शुद्धच होतो. तुम्ही आम्हाला बिघडविले. म्हणून तुम्हाला आमच्यापासून मुक्ती हवी असेल, मोक्ष हवा असेल, तर फक्त स्वत:ला शुद्ध करून काहीही निष्पन्न होणार नाही. जेव्हा तुम्ही आम्हाला शुद्ध कराल तेव्हाच तुमची सुटका होईल.' तुम्हाला समजत आहे ना, मी काय म्हणत आहे?

**प्रश्नकर्ता :** होय, दादा.

**दादाश्री :** म्हणून आम्ही कोणती आज्ञा दिली आहे? तर याचा समभावाने निकाल करा. हो, आणि शुद्धच पाहा. आणि जर कोणाला आवडणार नाही असे काही तरी चंदुभाईकडून झाले, तर त्याने अतिक्रमण केले म्हणून प्रतिक्रमण करावे. म्हणजे आपण असे सांगू इच्छितो की 'आम्ही त्या अभिप्रायाच्या विरोधात आहोत, आम्ही आमचा अभिप्राय बदलला आहे. आता आम्ही पूर्वीच्या अभिप्रायामध्ये नाही.' अभिप्राय बदलला की ते शुद्ध झाले. अभिप्राय जर तोच राहिला तर मूळचा बिघाड तसाच राहील. हे सर्व अभिप्राय बदलण्यासाठी आहे!

## तशा दृष्टीने अभिप्राय सुटतात

**प्रश्नकर्ता :** मग पूर्णपणे अभिप्रायरहित कसे होऊ शकतो?

**दादाश्री :** तुम्हाला अभिप्रायरहित ज्ञानच दिले आहे. रियल व्ह्यू पॉइंटने तो 'शुद्धात्मा' आहे आणि रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंटने तो 'चंदुभाई' आहे. आणि रिलेटिव्ह सर्व कर्माच्या आधीन असल्यामुळे 'चंदुभाई' पण निर्दोष आहे. जर 'तो' स्वतःच्या आधीन असता तर त्याला दोषी मानले असते. पण 'तो' तर बिचारा एका भोवऱ्यासारखा आहे. म्हणून 'तो' निर्दोष आहे. 'तसा तो शुद्धात्मा आहे आणि बाहेरून निर्दोष आहे.' मग सांगा, तिथे अभिप्रायरहितच राहायला हवे ना!

## भयंकर कर्मबंधन

**प्रश्नकर्ता :** मनुष्यांना दिवस-रात्र इतकी सर्व कर्मबंधने होत असतात की एका जन्माच्या कर्मांची *निर्जरा* (आत्मप्रदेशातून कर्मे वेगळी होणे) व्हायला अनंतकाळ लागतो, मग माणूस सुटणार कसा?

**दादाश्री :** कोण म्हणते असे? लोकांना कर्मबंधने होतील, पण तुम्हाला (आत्मज्ञान प्राप्त झालेल्या महात्म्यांना) कर्मबंधने कशी होतील?

**प्रश्नकर्ता :** मी लोकांबद्दलच बोलत आहे.

**दादाश्री :** त्या लोकांना तर इतकी सारी कर्मबंधने पडतात की सकाळी सात वाजल्यापासून तो सायकल घेऊनच हिंडतो, विमानाने हिंडतो, रात्री अकरा वाजेपर्यंत हिंडतो तरी कर्मे पुरी होत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** मग त्या लोकांची दशा काय होत असेल? कारण एका दिवसातच इतकी कर्मे बांधली जातात की ती एका वर्षात देखील संपणार नाहीत.

**दादाश्री :** हो, मग अशी कर्मे बांधता बांधता काय होईल? या मनुष्य देहाची पाच इंद्रिये संपतील आणि ते चार इंद्रियात जातील, चारातून तीनमध्ये, तीनांतून दोन आणि दोनांतून एकेंद्रियमध्ये जातील. इतकी भयंकर कर्मे ते बांधत आहेत.



# [ 18 ]
# विषय विकार जिंकतो तो राजांचा राजा

## आता 'अटकण'मधून सुटायचे आहे

आता आतून एकदम 'क्लिअर' (स्वच्छ) व्हायला हवे. हे 'अक्रम ज्ञान' मिळाले आहे, तेव्हा आता जर स्वत:ला निरंतर सुखात राहायचे असेल तर राहू शकता, असे 'ज्ञान' आपल्याजवळ आहे. तर आता आपल्याला ह्या बंधनातून कसे सुटता येईल, त्यापासून कसे मुक्त होता येईल याचे उत्तर मिळवायला हवे. त्यासाठी आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करूनही त्याचे समाधान आणावे. यापूर्वी जोपर्यंत सुख नव्हते तोपर्यंत माणूस बंधनातच होता ना! पण आता कायमचे सुख मिळाल्यावर का बरे बंधन? खरे सुख का उत्पन्न होत नाही? या बंधनांमुळे खरे सुख उत्पन्न होत नाही!

## विषयविकारांपासून अवश्य सावध राहा

**प्रश्नकर्ता :** दादा, आता आम्हाला समजते की आम्ही चूक करत आहोत, तरी पण चुका होतातच.

**दादाश्री :** मग प्रतिक्रमणे होतात की नाही?

**प्रश्नकर्ता :** होतात, पण चंदुभाई जेव्हा चूक करतो तेव्हा त्याला थांबता येत नाही. मग ताबडतोब प्रतिक्रमण होते. पण तो एका सेकंदात तर बाजी पलटूनच टाकतो.

**दादाश्री :** इतर सर्व गोष्टीत चुका झाल्या तरी हरकत नाही. फक्त विषयविकार ही एकच गोष्ट अशी आहे की जी सर्व काही नष्ट करू शकते. म्हणून आम्ही फक्त विषयविकार संबंधित गोष्टीतच सावध राहायला सांगतो.

चुका अजूनही दिसत नाहीत. त्याचे काय कारण आहे की जेवण जास्तीत जास्त काय नुकसान करते तर दोन-तीन तास आळस वाढतो, पण नंतर कमी होतो. पण विषयाचे तसे नाही. विषयाची नशा संपूर्ण दिवस, चोवीस तास चालूच असते. म्हणून त्याला चूक दिसतच नाही. जेव्हा विषयातून निवृत्ती होईल, तेव्हाच चुका दिसणे सुरू होईल. खऱ्या चुका, मोठ्या चुका ज्यांना सूक्ष्म (चुका) असे म्हणतात अशा चुका दिसतील. म्हणजे फक्त हाच आधार अडचणरूप आहे. ज्याला जेवढी घाई आहे त्याप्रमाणात त्याने प्रतिक्रमण करावे. त्यात असेच केले पाहिजे असे काही नाही.

## काही जणांबद्दलच आकर्षण का वाटते?

**प्रश्नकर्ता :** मनात ठाम ठरविले आहे की कोणत्याही मुलाबद्दल मनात वाईट विचार येऊ नयेत, आणि मला वाईट विचार तर येत नाहीत पण त्या मुलाचा चेहरा सारखा दिसत राहतो. मी प्रतिक्रमण करते पण तरी तो (चेहराच) दिसत राहतो, अशा वेळी मी काय करू?

**दादाश्री :** चेहरा दिसत राहतो त्याला हरकत नाही. आपण फक्त पाहत राहावे. सिनेमात पाहतो तेव्हा आपल्याला दु:ख होते का? म्हणजे (चेहरा) तर दिसणारच. आतून शुद्ध झाल्यावर उलट अधिक दिसू लागते. स्पष्ट दिसू लागते. जे दिसते त्याला आपण पाहत राहावे, प्रतिक्रमण करून पाहत राहावे, बस!

**प्रश्नकर्ता :** त्याच्याबद्दल आकर्षण होते ते चांगले वाटत नाही. म्हणून मी त्यासाठी प्रतिक्रमण करते. तरी पण तो आणखी जास्त दिसू लागतो.

**दादाश्री :** दिसतो ते ठीक आहे. आणि दिसलाच पाहिजे ना.

जर दिसला नाही तर ते व्यर्थ आहे. दिसला नाही तर प्रतिक्रमण झाले असे म्हणता येणार नाही. दिसला की मग प्रतिक्रमण करू शकतो, आणि प्रतिक्रमण केल्याने ते (आकर्षण) हळूहळू कमी होत जाते. जर गाठ मोठी असेल तर ती एकदम कमी होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** मला त्याचा चेहरा दिसतो आणि त्याच्याबद्दल वाईट विचार आले तर ते चुकीचे नाही का?

**दादाश्री :** नाही, अजिबात चुकीचे नाही. तू स्ट्रॉँग (दृढ) आहेस, तरी पण जर चुकीचे विचार आले तर त्याला पाहा की अजूनही त्याच्याबद्दल वाईट विचार येत आहेत. जर तू स्ट्रॉँग आहेस तर कोणी तुझे नावही घेणार नाही. हा जो माल भरलेला आहे, तो बाहेर येत आहे. दुसऱ्या एखाद्या मुलाबद्दल माल भरलेलाच नाही तर त्याच्याबद्दल वाईट विचार येणारच नाहीत. इतके सारे मुलगे आहेत, त्या सर्वांबद्दल काही वाटते का? जो माल भरलेला आहे तोच बाहेर येत आहे. या भरलेल्या मालाला तू ओळखतेस की नाही? एवढे मुलगे आहेत, पण सर्वांबद्दल विचार येतात का? एखाद्याला पाहिले आणि त्याच्यावर दृष्टी बसली तरच विचार येतात.

## ज्ञानींनी सांगितलेला मार्ग

जेव्हा मी विचारतो की 'अजूनही तुझ्या मनात वाईट विचार येतात का?' तर म्हणतो, 'हो, अजूनही तसे होते.' सत्तरी उलटली, आता तरी शांतपणे बस. अरे, सारे दिवाळे निघाले, आता तरी शांतपणे बस ना! कसा माणूस आहे? दुकानाचे पार दिवाळे निघाले, तरी शांतपणे बसत नाही?

**प्रश्नकर्ता :** जर असा चुकीचा विचार आला, तर अशा वेळी माणसाने काय करावे?

**दादाश्री :** येऊ दे ना. विचार आला तर हारतुरे घेऊन म्हणा, बरे झाले, तू आलास, आम्हाला आवडले. एवढा आनंद तर होणारच ना! शोकमग्न विचार येण्यापेक्षा असे चांगले विचार येत आहेत!

समजा, एखाद्या माणसाला बघून दुसऱ्या एखाद्या माणसाच्या मनात वाईट विचार आला, तर का आला? कारण मोह भरलेला होता, त्यामुळे त्याला संयोग मिळाला. संयोग का मिळतो? आपण काही त्यांना बोलवायला गेलो नव्हतो, पण तरी तो माणूस भेटतो, आणि भेटला की मोहामुळे त्याचे जे परमाणू असतात ते अवस्था दाखवितात, पर्याय दाखवितात, तर अशा वेळी आपण काय करायला हवे? कोणामुळे हा वाईट विचार आला? ज्या कोणामुळे वाईट विचार आला त्यासाठी तुम्ही प्रतिक्रमण करावे. त्या मुलीच्या शुद्धात्म्याला, मन-वचन-काया यांचे योग, भावकर्म-नोकर्म, यापासून भिन्न, असे हे प्रकट शुद्धात्मा भगवान, या मुलीबद्दल माझ्या मनात वाईट विचार आला म्हणून दादा भगवान यांच्या साक्षीने मी आलोचना करीत आहे की 'माझ्या मनात वाईट विचार आला.' असे जाहीर करणे म्हणजे आलोचना. म्हणजे मला तिथे बोलवण्याची गरज नाही. तिथे तुमच्या चिंतवनात (ध्यानात) मला समोर ठेवावे आणि प्रतिक्रमण करावे. त्याच शुद्धात्म्याला असे म्हणावे की मला कोणाही देहधारीबद्दल असे विचार येऊ नयेत अशी शक्ती द्या आणि असे जे विचार माझ्या मनात आले त्यासाठी मी क्षमा मागतो. पुन्हा कधीही कोणाही देहधारी व्यक्तीबद्दल विषयाचा विचार सुद्धा येणार नाही, अशी मला शक्ती द्या. पुन्हा असा विचार करायची माझी इच्छा नाही, याला प्रत्याख्यान असे म्हणतात.

पुन्हा दोष करण्याची इच्छा नाही तरीही दोष होतील. जर आत (माल) भरलेला असेल तर तो परत बाहेर येईलच. पण अशा प्रत्येक वेळी प्रत्याख्यान करावे लागेल. जितक्या वेळा प्रत्याख्यान केले, तेवढे कांद्याचे थर कमी झाले. पुन्हा दुसरा थर येईल. छोट्या कांद्याचे थर जास्त असतात की मोठ्या कांद्याचे?

**प्रश्नकर्ता :** मोठ्या कांद्याचे जास्त असतात.

**दादाश्री :** हो, ज्याचा कांदा मोठा असेल, त्यातून खूप पाकळ्या निघतील. पण निघायला सुरुवात तर झाली आहे. म्हणजेच आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान या द्वारेच मोक्ष आहे. या जगात जर का

मोक्षाचा मार्ग असेल तर तो हाच आहे. आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान. आणि ते ज्ञानी पुरुषाद्वारा शिकवलेलेच पाहिजे. दुसऱ्या कोणी शिकवले असेल तर त्याचा उपयोग नाही.

म्हणजेच आपल्या मनात कोणाबद्दलही विचार आला तर त्याचे आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान करावे. ते तर अवश्य करायलाच हवे.

**प्रश्नकर्ता :** दादा, वारंवार दृष्टी (नजर) एकाच ठिकाणी खेचली जाते. याचा अर्थ इंटरेस्ट (रुचि) असेल तेव्हाच असे होणार ना? असेच म्हणायचे ना?

**दादाश्री :** इंटरेस्टच आहे ना? इंटरेस्टशिवाय तर दृष्टी खेचली जाणारच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** हो, पण इंटरेस्ट वाटल्यामुळे 'बी' पडेल की नाही?

**दादाश्री :** हे पुन्हा वेड्यासारखे बोललात. 'इंटरेस्ट'शिवाय तर दृष्टी खेचली जाणारच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** आत रुची आहेच. दृष्टी गेल्यावर त्याचे प्रतिक्रमण होते. परत रात्र झाल्यावर दृष्टी तिकडेच जाते. रुची उत्पन्न होते त्याचे प्रतिक्रमण होते आणि ते प्रकरण संपते. परत पाच-दहा मिनिटे त्याचा परिणाम होत राहतो. मग वाटते की ही काय गडबड आहे?

**दादाश्री :** मग त्याला परत धुवावे, बस एवढेच करावे.

**प्रश्नकर्ता :** बस, एवढेच? मनात दुसरे काही ठेवायचे नाही?

**दादाश्री :** तुम्ही हा माल भरला आहे, आणि जबाबदारी तुमची आहे. म्हणून तुम्ही ते 'पाहत' राहायचे. 'धुण्यात' मात्र कसर पडता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** कपडा (दोष) धुतला गेला, असे केव्हा म्हणता येईल?

**दादाश्री :** तुम्हाला स्वत:लाच ते जाणवेल की मी धुतले आहे. प्रतिक्रमण करता त्यावरून.

**प्रश्नकर्ता :** आतमध्ये खेद वाटला पाहिजे का?

**दादाश्री :** खेद तर वाटलाच पाहिजे ना? जोपर्यंत याची पूर्ण तड लागत नाही तोपर्यंत खेद वाटलाच पाहिजे. तुम्हाला फक्त एवढेच पाहत राहायला हवे की (चंदुभाईला) खेद वाटत आहे की नाही? तुम्ही तुमचे काम करा, तो त्याचे काम करील.

**प्रश्नकर्ता :** खूपच चिकट आहे, दादा! त्यात आता थोडा-थोडा फरक पडत चालला आहे.

**दादाश्री :** जसा दोष भरला आहे, तसाच निघेल. पण बारा वर्षात किंवा दहा वर्षात, पाच वर्षात ते पूर्ण रिकामे होईल. सगळ्या टाक्या साफ करून टाकेल. त्यानंतर सगळे स्वच्छ! मग मजा करा!

**प्रश्नकर्ता :** एकदा 'बी' पडले की मग ते रूपकात तर येणारच ना?

**दादाश्री :** 'बी' तर पडणारच! ते रूपकात येईल पण जोपर्यंत ते घट्ट रुजत नाही, तोपर्यंत थोडे कमी-जास्त होऊ शकते. म्हणजे मरण्यापूर्वी तो साफ होऊ शकतो.

म्हणूनच आम्ही विषयविकारी दोष असलेल्याला सांगत असतो की विषयसंबंधी दोष झाले असतील, अन्य दोष झाले असतील, तर तू रविवारी उपास कर आणि दिवसभर विचार करून करून त्या दोषांना धूत रहा. जर त्याने असे आज्ञापूर्वक केले तर कमी होत जाईल.

## प्रत्यक्ष आलोचना केल्याने त्वरित सुटता येते

**प्रश्नकर्ता :** कधी तरी माझी दृष्टी पडते तेव्हा वाटते अरेरे! दृष्टी का पडली? प्रतिक्रमण करावे लागणार. कंटाळा येतो.

**दादाश्री :** कंटाळा तर येणारच ना! पण दृष्टी जात असते. आपल्याला पाहायचे नसेल तरी पण दृष्टी तिथे जातेच. म्हणून 'पुरुषार्थ' करायचा, आणि प्रतिक्रमण करण्याचीही गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** काही गोष्टींचा इतका राग येतो की असे वाटते की हे काय होत आहे? काही समजतच नाही?

**दादाश्री :** मागच्या जन्मी प्रतिक्रमण केले नाही म्हणून या जन्मी परत नजर जाते. आता प्रतिक्रमणे केलीत की मग परत नजर जाणार नाही, पुढील जन्मात.

**प्रश्नकर्ता :** कधी कधी तर प्रतिक्रमण करायचा खूप कंटाळा येतो. एकदम इतकी सारी प्रतिक्रमणे करावी लागतात.

**दादाश्री :** होय, हा अप्रतिक्रमणाचा दोष आहे. त्यावेळी प्रतिक्रमणे केली नाहीत म्हणून आज असे झाले. आता प्रतिक्रमण केल्याने पुन्हा दोष उत्पन्न होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** परंतु कित्येकदा खूप प्रतिक्रमण केल्यावरही परत प्रतिक्रमण करावे लागले तर तेव्हा खूप राग येतो. असे का होते?

**दादाश्री :** आतून 'बिघडता' कामा नये. जर आतल्या आत बिघडले तर त्याच वेळी प्रतिक्रमण करून धुऊन टाकावे. नाही तर दादांकडे प्रत्यक्ष येऊन सांगावे की माझे मनोभाव बिघडले होते. दादा, मला तुमच्यापासून काहीच लपवायचे नाही. असे केल्याने सगळे संपून जाईल. आम्ही तुम्हाला इथेच औषध देऊ. इतर कुणाच्या बाबतीत दोष झाला असेल तर आम्ही धुऊन देऊ पण जेव्हा इथे 'ज्ञानी पुरुष' आले आहेत तेव्हा जर तुमच्याकडून दोष झाला तर मग कोण धुणार? म्हणूनच आम्ही म्हणतो, 'बघा हं... कोणीही आपले मनोभाव बिघडवू नका.'

## संसार परिभ्रमणाचे मूळ कारण

विषयविकार एवढी एकच गोष्ट या जगात आहे, जी बंधनकारक आहे. त्यामुळेच जग उत्पन्न झाले आहे. पूर्ण जग यातूनच उत्पन्न झाले आहे आणि त्यात सर्व उभे झाले आहे. म्हणून प्रथमच अभिप्राय असा बदलायला हवा की इतर कोणतेही अभिप्राय शिल्लक राहूच नयेत. रोज सामायिक करून, प्रतिक्रमण करून हा अभिप्राय पक्का करायला हवा.

**प्रश्नकर्ता :** माणसांनी प्रतिक्रमण करून अभिप्राय बदलायला हवेत का?

**दादाश्री :** हो.

मी ब्रह्मचर्यावर आठशे पानांचे पुस्तक लिहिले आहे, ते तुम्ही वाचले आहे का? त्याला 'वन्डर ऑफ द वर्ल्ड' (जगातील आश्चर्य) असे म्हणतात. ब्रह्मचर्य पालन करायचे असेल तर हे साधन दिले आहे.

## प्रतिक्रमणाचा सब्स्टिट्यूट (पर्याय)

**प्रश्नकर्ता :** तुम्ही जे म्हटले आहे की सकाळच्या वेळी एवढे म्हणावे, 'या मन-वचन-काया द्वारे कोणाही जीवाला किंचितदेखील दुःख न होवो, न होवो, न होवो' एवढे म्हटले तर पुरे आहे का?

**दादाश्री :** असे पाच वेळा म्हणायचे आहे, पण अशा प्रकारे म्हणायचे की पैसे मोजताना जशी स्थिती असते तशा प्रकारे म्हणावे.

**प्रश्नकर्ता :** त्याचप्रमाणे विषयविकाराच्या प्रतिक्रमणासाठी सकाळी पाच वेळा असे म्हटले तर चालेल का? कारण अशी प्रतिक्रमणे किती वेळा करणार? नजर तर खूप वेळा ओढली जातेच.

**दादाश्री :** हो, चालेल, चालेल. पण कसे बोलावे? पैसे मोजताना चित्त जसे (एकाग्र) असते, तसे ठेवायला हवे. बोलतेवेळी पैसे मोजताना अंत:करण जसे असते तसे असायला हवे.

## त्यासाठी तर रोज हजार-हजार वेळा प्रतिक्रमण

सध्या फक्त डोळ्यांना सांभाळावे. पूर्वी तर लोक खूपच कडक होते, डोळे फोडून घेत असत. आपल्याला डोळे फोडायचे नाहीत. तो मूर्खपणा आहे, आपल्याला नजर दुसरीकडे न्यायची आहे.

तरी पण नजर गेलीच तर प्रतिक्रमण करावे. एक मिनिट देखील प्रतिक्रमण चुकवायचे नाही. खाण्या-पिण्यात चूक झाली तर चालेल. या

जगात सर्वात मोठा रोग हाच आहे. यामुळेच जग उभे आहे. याच्याच मुळावर संसार उभे आहे. हेच मूळ आहे.

समजदारीने काम पूर्णत्वाला न्यायचे आहे. आता काळ्या बाजारातून माल खरेदी केला तर तो काळ्या बाजारातच विकावा लागेल, पण आपण (चंदुभाईला) सांगावे की प्रतिक्रमण कर. पूर्वी प्रतिक्रमण करत नव्हता म्हणून कर्मांची तळी भरली आहेत, प्रतिक्रमण केले म्हणून शुद्ध झाले. यासाठी तर पाचशे-पाचशे, हजार-हजार प्रतिक्रमणे केली तर काम पूर्ण होईल.

## बिनहक्काचे उपभोगू नये

हक्काचे खाल्ले तर मनुष्यजातीत येतो. बिनहक्काचे खाल्ले तर पशुयोनीत जातो.

**प्रश्नकर्ता :** आम्ही तर बिनहक्काचे खाल्ले आहे.

**दादाश्री :** खाल्ले आहे तर प्रतिक्रमण करा, अजूनही देव वाचवेल. अजूनही देवळात जाऊन पश्चात्ताप करा. बिनहक्काचे खाल्ले असेल तर पश्चात्ताप करा, अजून जिवंत आहात. जोपर्यंत या देहात आहात तोपर्यंत पश्चात्ताप करा.

**प्रश्नकर्ता :** फक्त पश्चात्ताप करून काय होणार?

**दादाश्री :** तुम्हाला ते समजत असेल तर करा. ज्ञानी पुरुषांनी सांगितलेले ऐकायचे असेल तर ऐका, ऐकायचे नसेल तर तुमची मर्जी. तुम्हाला ऐकायचे नसेल तर त्यावर काही उपाय नाही. अजूनही पश्चात्ताप केलात तर गाठी सैल होतील आणि त्यातून तुम्ही राजीखुशीने केले आहे. तुम्ही नरकगती निश्चित केली आहे. बिनहक्काचे खाल्ले आणि ते सुद्धा जर राजीखुशीने केले असेल तर तो नरकगतीत जातो आणि पश्चात्ताप केला तर जनावरगतीत येतो. नाही तर भयंकर नरक योनी भोगावी लागेल. अजूनही लोकांचे बिनहक्काचे खायचे असेल तितके खाऊ शकता.

**प्रश्नकर्ता :** या सर्वांतून सुटण्याचा सर्वश्रेष्ठ उपाय काय?

**दादाश्री :** बिनहक्काचे जे खाल्ले आहे त्यासाठी पश्चात्ताप करा. बिनहक्काचे खायचा विचार जरी आला तरी पश्चात्ताप करा. दिवसभर पश्चात्तापच करीत राहा. असे खाता कामा नये. माझ्या हक्काचे असेल तरच माझ्या कामाचे आहे. स्वत:च्या हक्काची पत्नी, स्वत:च्या हक्काची मुले, स्वत:चे घर, ते सर्व तुमचे. पण दुसऱ्यांच्या हक्काचे आपण कसे घेऊ शकतो? मग तर जनावर होऊन सुद्धा सुटका होणार नाही, नरकगतीचे अधिकारी झाले आहेत हे लोक, भयंकर दु:खात अडकले आहेत. अजूनही सावध व्हायचे असेल तर होऊ शकता. 'ज्ञानी पुरुष' काय म्हणतात की आम्ही तुम्हाला पश्चात्ताप रूपी शस्त्र दिले आहे. प्रतिक्रमण करत राहा.

हे भगवंता, समज नसल्यामुळे, वाईट बुद्धीमुळे, कषायांनी प्रेरित होऊन मी जे दोष केले आहेत, भयंकर दोष केले आहेत, त्या सर्वांसाठी मी क्षमा मागत आहे. कषायांच्या प्रेरणेमुळे तुम्ही हे दोष केले आहेत, तुम्ही स्वत: केलेले नाहीत. अजूनही करायचे असतील तर करा, करायचे नसतील तर तुमची मर्जी.

## हव्यासामुळे येते भयंकर आवरण

ज्या गोष्टींबद्दल हव्यास वाटतो. त्या सर्व गोष्टींना बाजूला सारा, त्यांना आठवू नका. आणि जर आठवल्या तर प्रतिक्रमण करा, तर सुटाल. बाकी, शास्त्रकारांनी त्यावर काहीही उपाय सांगितलेला नाही. सर्वांवर उपाय असतो, हव्यासावर उपाय नसतो. लोभावर उपाय असतो. लोभी व्यक्तीचे जेव्हा खूप मोठे नुकसान होते, तेव्हा त्याचा लोभ सर्राट पळून जातो!

**प्रश्नकर्ता :** पुन्हा 'ज्ञानात' (ज्ञानविधीत) बसला तर हव्यास जाईल का?

**दादाश्री :** नाही जाणार. 'ज्ञानात' बसल्याने काही हव्यास जाणार नाही. तो स्वत: जेव्हा आज्ञेत राहण्याचा प्रयत्न करील आणि निरंतर

आज्ञेतच राहायचे आहे असा निश्चय करील आणि आज्ञाभंग झाल्यावर प्रतिक्रमण करील, तेव्हा काम होईल.

## अजूनही सावध व्हा ! सावधान !! सावधान !!!

**प्रश्नकर्ता :** मला तर भीती वाटते, आपण आत्ताच म्हणालात की सत्तर टक्के लोकांना चार पायवाले व्हायचे आहे, तर मग आमच्यासाठी काही अवकाश आहे की नाही?

**दादाश्री :** नाही, नाही, आता अवकाश नाही. म्हणून आता तरी सावध व्हा जरा...

**प्रश्नकर्ता :** महात्म्यांविषयी बोलत आहे.

**दादाश्री :** महात्मे जर का आमच्या आज्ञेत राहतील, तर कोणी त्यांचे नावही घेऊ शकणार नाही, या जगात.

**प्रश्नकर्ता :** आता काटेकोर राहू, पण आपण आता आमच्याकडे लक्ष द्या.

**दादाश्री :** हो, हे निश्चित झाले ना. आम्ही तुमच्याकडे चांगल्या प्रकारे लक्ष देऊ.

सध्याच्या या विचित्र काळात सत्तर टक्के तर मी भीत भीत म्हणत आहे, लोकांना वाईट वाटू नये म्हणून. लोकांच्या मनात धास्ती बसेल म्हणून. पण टक्केवारी तर याहून खूप जास्त आहे. कारण जास्त बुद्धीने कमी बुद्धीवाल्यांना छळले आहे. त्याचे फळ नरकगती आहे. जनावरगती नव्हे तर नरकगती. बोला आता, काय करणे शिल्लक ठेवले असेल? या लोकांनी काहीही बाकी ठेवलेले नाही. म्हणून तर मी लोकांना सांगतो, अजूनही सावध व्हायचे असेल तर व्हा. अजूनही माफी मागू शकता, माफी मागण्याचा मार्ग आहे.

एखाद्या नातेवाईकाला आपण मोठे पत्र लिहिले, आणि त्यात शिव्या लिहिल्या असतील, खूप शिव्या दिल्या असतील, पूर्ण पत्र शिव्यांनीच भरले असेल, आणि मग खाली असे लिहिले की आज

बायकोशी भांडण झाले आहे, त्यामुळे तुमच्या बद्दल बरे-वाईट लिहिले गेले आहे पण मला माफ करावे. तर मग तो सर्व शिव्या खोडून टाकील की नाही? म्हणजे तो शिव्या वाचील, शिव्यांचा स्वीकार करील पण नंतर माफ पण करील! जग हे असे आहे. म्हणून तर आम्ही सांगतो की माफी मागा, आपल्या इष्टदेवतेची माफी मागा आणि अशी कुणाची माफी मागत नसाल तर माझ्याकडे मागा. मी तुम्हाला माफ करीन. पण अतिशय विचित्र काळ येत आहे आणि त्यात चंदुभाई पण वाटेल तसा वागत आहे. याला काहीच अर्थ नाही ना! जबाबदाऱ्यांनी भरलेले जीवन! अजूनही सावध व्हायचे असेल तर व्हा. ही शेवटची हमी देत आहोत. भयंकर दु:खे! अजूनही प्रतिक्रमणरूपी हत्यार देत आहोत. प्रतिक्रमण कराल तर वाचण्याचा काही तरी उपाय आहे. आणि आमच्या आज्ञेनुसार कराल तर तुमचे कल्याण झपाट्याने होईल. पापे तर भोगावीच लागतील पण इतकी जास्त नाहीत.

कधी न कधी तरी समजायला हवे ना? हे सर्व पूर्णपणे समजायला हवे ना? मोक्षाकडे यायला हवे ना?

हजारो लोकांच्या हजेरीत जर कोणी म्हटले 'चंदुभाईंना अजिबात अक्कल नाही' तर त्याला आशीर्वाद द्यावेसे वाटायला हवेत की, अहोहो! मला तर हे माहीतच होते की चंदुभाईला अक्कल नाही, पण हे तर त्यांनाही माहीत आहे, तेव्हा वेगळेपण राहील!

या चंदुभाईंना आम्ही रोज हाक मारतो की, 'या चंदुभाई, या' मग एखाद्या दिवशी हाक मारत नाही, त्याचे कारण काय? तर तेव्हा त्यांच्या मनात विचार येईल की आज मला पुढे बोलावले नाही. आम्ही त्यांना चढवतो, पाडतो, चढवतो, पाडतो, असे करत करत ते ज्ञान प्राप्त करतात. आमच्या या सर्व कृती ज्ञान प्राप्तीसाठी असतात. आमची प्रत्येक कृती ज्ञान प्राप्त करण्यासाठी असते. प्रत्येकासाठी वेगवेगळ्या कृती असतात, हे सर्व ज्याची त्याची प्रकृती बघून केले जाते. असे करावे लागते. प्रकृती निघून जायला हवी ना. प्रकृती तर काढावीच लागेल. परकी वस्तू किती वेळ आपल्याजवळ ठेवायची?

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे, प्रकृती निघून गेल्याशिवाय गत्यंतरच नाही.

**दादाश्री :** हो. आमची तर निसर्गाने काढली, ज्ञानाने काढली आणि तुमची आम्ही काढू तेव्हाच जाईल ना, आम्ही निमित्त आहोत ना!

तुमची बरीच प्रकृती संपली आहे. अजूनही रात्री प्रतिक्रमणे करावी लागतात ना,

तेवढ्या चुका अजून शिल्लक आहेत. म्हणजे त्या सर्व संपवायच्या आहेत. चूक झालेली कळते ना नंतर?

**प्रश्नकर्ता :** हो, ताबडतोब कळते.

**दादाश्री :** नंतर कळते. मग प्रतिक्रमणे करत राहता. सर्व रात्र त्यातच जाते.

## 'तो' आहे प्रगतीचा मार्ग

**प्रश्नकर्ता :** तसे तर आता एक-दोन वर्षांपासून पूर्वीपेक्षा थोडे कमी झाले असे वाटते. पूर्वी जितकी प्रतिक्रमणे करावी लागत त्यापेक्षा आता खूप कमी करावी लागतात.

**दादाश्री :** पूर्वी तर कळतच नसे.

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** तुम्ही तर प्रतिक्रमण करतच नव्हता ना, कारण (तेव्हा) तुम्ही असेच मानत होता की ही त्याचीच चूक आहे.

**प्रश्नकर्ता :** नंतर दोन-तीन वर्षे प्रतिक्रमण चालू राहिले. गेली एक-दीड वर्षे त्याचे प्रमाण कमी होत चालले आहे. प्रमाण कमी झाले आहे तरी पण चूक झाली तर प्रतिक्रमण करायला हवे का?

**दादाश्री :** हो, चुका तर होणारच शेवटपर्यंत. हा देहच चुकांनी भरलेला आहे.

**प्रश्नकर्ता :** पण आता लेव्हल (पातळी) खाली आली आहे.

**दादाश्री :** आपण 'पाहायचे' आणि 'जाणायचे.' जशा जशा चुका कमी होतात, तशी तशी आपल्याला जागृती यायला लागते की चूक झाली आहे. म्हणून आता रात्रभर प्रतिक्रमण करत राहावे. मग आपण दुसऱ्याला दोष लावायचा नाही. आपण मागे वळावे. पूर्वी तुम्ही मागे वळत नव्हता. आता तर तुम्ही या ज्ञानाने पाहा की त्यांची ही सारी पत्रे तुमच्याकडे येत आहेत, पण मग त्यांना सुद्धा त्यांच्या चुका दिसू लागतात. म्हणजे ते ही प्रतिक्रमण करीतच असतील. तुम्ही हे समजूनच घ्यावे की 'माझ्यासाठी तर हेच ठीक आहे, मला पत्रे आली तरी हरकत नाही.' पत्र लिहिणे, ही त्यांची प्रकृती आहे, आणि जो प्रतिक्रमण करतो, तो आत्मा आहे. पाहा ना, अजूनही पत्र लिहिणे चालूच आहे. तीच प्रकृती आहे, आणि मग स्वतः प्रतिक्रमण पण करतात, तो आत्म्याचा भाग आहे!

## अतिक्रमणाची अंतिम पराकाष्ठा

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमणाची अंतिम पराकाष्ठा काय आहे?

**दादाश्री :** अतिक्रमणाची पराकाष्ठा तर वासुदेवांमध्ये आणि प्रतिवासुदेवांमध्ये असते. त्यांच्याहून जास्त कोणी करू शकत नाही. आणि तसा नरक देखील कोणी भोगत नाही, सातवा नरक! अगदी अंतिम प्रकारचे अतिक्रमण! जाळतात, मारतात, सर्वनाश करून टाकतात. इतर लोक तर असे करतच नाहीत ना!

थोडक्यात एवढेच समजायचे आहे की कोणा शत्रुबद्दलदेखील भाव बिघडता कामा नये. आणि समजा बिघडलाच तर प्रतिक्रमण करून सुधारून टाकावा. कमतरतेमुळे भाव बिघडतात. तर त्याला प्रतिक्रमणाने सुधारून घ्या. असे करत करत ती गोष्ट सिद्ध होईल. (काम पूर्ण होईल.)



# [ 19 ]
# खोटे बोलण्याची सवय असणाऱ्यांना

## कर्म आणि कर्मफळ

आता तुम्ही दिवसभरात एकही कर्म बांधता का? आज कोणकोणती कर्मे बांधली? जी जी कर्मे बांधाल ती तुम्हाला भोगावी लागतील. कारण तुमचीच जबाबदारी आहे. यात ईश्वराची अजिबात जबाबदारी नाही.

**प्रश्नकर्ता :** समजा आम्ही खोटे बोललो असू, तर त्याला पण कर्म बांधले असेच म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** निश्चितच! पण खोटे बोलण्यापेक्षा खोटे बोलण्याचा भाव करता, याला भारी कर्मे म्हटले जाते. खोटे बोलणे हे तर कर्मफळ आहे. खोटे बोलण्याचे भाव, खोटे बोलण्याचा निश्चय, तोच कर्मबंधन घडवितो. समजले का तुम्हाला? हे वाक्य तुम्हाला मदत करील का? काय मदत करील?

**प्रश्नकर्ता :** खोटे बोलणे बंद व्हायला हवे.

**दादाश्री :** नाही. खोटे बोलण्याचा अभिप्रायच सोडून द्यायला हवा. आणि जर खोटे बोलले गेले तर असा पश्चात्ताप करायला हवा. की 'काय करू? असे खोटे बोलता कामा नये.' पण यामुळे खोटे बोलणे बंद होणार नाही, पण खोटे बोलण्याचा अभिप्राय मात्र बंद होईल.

'आजपासून खोटे बोलणार नाही, खोटे बोलणे हे महापाप आहे, भयंकर दु:ख देणारे आहे, आणि खोटे बोलणे हेच बंधन आहे.' असा अभिप्राय तुमच्याकडून झाला की मग खोटे बोलण्याचे पाप तुमच्याकडून बंद होईल. पूर्वी जोपर्यंत असे भाव बंद केले नव्हते तोपर्यंत त्या भावांची जी 'रिॲक्शन' (प्रतिक्रिया) असेल, तेवढीच शिल्लक राहील. तेवढा हिशोब तुम्हाला मिळेलच, आणि तेवढे खोटे तुम्हाला अनिवार्यपणे बोलावे लागेल, तर त्याचा तुम्ही पश्चात्ताप करा. आणि आता जरी तुम्ही पश्चात्ताप केला तरी देखील जे खोटे बोललात त्या कर्मफळाचे फळ तर तुम्हाला मिळणारच आणि ते भोगावेच लागणार. लोक तुमच्या घराबाहेर पडून तुमची निंदा करतील. म्हणतील, 'हे चंदुभाई, एवढे शिकले सवरले असून असे खोटे बोलतात? हे त्यांना शोभते का? ही काय त्यांची लायकी आहे?' म्हणजेच पश्चात्ताप केलात, तरी निंदेचे फळ तर भोगावेच लागेल आणि जर त्या आधीच ते पाणी बंद केले असेल, 'कॉजेस्'च जर बंद केले असतील तर 'कॉजेस'चे फळ आणि त्या फळाचे फळ पण येणार नाही.

म्हणजेच आम्ही काय म्हणतो? खोटे बोलले गेले तरी 'असे बोलता कामा नये' असे म्हणून तुम्ही खोटे बोलण्याच्या विरोधी तरी झालात ना? हो, मग खोटे बोलणे तुम्हाला चांगले वाटत नाही असे निश्चित झाले. तुमचा अभिप्राय खोटे बोलण्याचा नाही ना, मग तुमच्या जबाबदारीचा 'एन्ड' (शेवट) होतो.

**प्रश्नकर्ता :** पण ज्याला खोटे बोलायची सवयच लागली आहे, त्याने काय करावे?

**दादाश्री :** तर मग त्याने त्याबरोबर प्रतिक्रमण करण्याची सवय पण लावून घ्यावी. आणि जर तो असे प्रतिक्रमण करत असेल तर मग त्याची जबाबदारी आम्ही घेतो.

म्हणजेच अभिप्राय बदला! खोटे बोलणे म्हणजे जीवनाचा शेवट होण्यासारखे आहे. जीवनाचा शेवट करणे आणि खोटे बोलणे, या दोन्ही गोष्टी सारख्या आहेत, असे 'डिसाईड' (निश्चित) करावे लागेल. आणि शिवाय सत्याचा आग्रह ही धरू नये.

## रिलेटिव्ह धर्मात

'रिलेटिव्ह धर्म' कसा असला पाहिजे की खोटे बोलले गेले तर बोलले गेले पण नंतर प्रतिक्रमण करायला हवे.

**प्रश्नकर्ता :** आम्ही रोज असे म्हणतो की हे चुकीचे आहे, असे बोलायचे नव्हते तरी पण बोलले जाते. असे का होते? करायचे नाही (असे म्हणून) देखील असे का होते?

**दादाश्री :** त्याचे कारण तुम्ही गरजेपेक्षा जास्त अक्कल घेऊन आला आहात. म्हणून आम्ही एकही दिवस असे म्हटले नाही की असे करता कामा नये. जर असे म्हटले असते तर लगेच त्या क्षणी सावध झाला असता. असे करू नये असे कधी म्हटले आहे का आम्ही?

**प्रश्नकर्ता :** आणि नंतर जोपर्यंत झोप येत नाही तोपर्यंत आम्ही प्रतिक्रमणच करत राहतो. म्हणजे मला असे वाटते की मी चूक करत आहे, म्हणून मग प्रतिक्रमणे करावीच लागतात.

**दादाश्री :** चूक केली की प्रतिक्रमणे करावीच लागतील ना!

**प्रश्नकर्ता :** पण त्याऐवजी चूकच केली नसती तर, यात वेळ...

**दादाश्री :** पण असे चालणार नाही. तुम्हाला आतून त्याबद्दलची रुची काढावी लागेल की 'हे' चुकीचे होत आहे, असे होता कामा नये. पण तुम्हाला आवडणाऱ्या गोष्टी असल्यावर रस वाटतो. जर ती गोष्ट नावडती झाली तर मग काहीच त्रास होणार नाही. एखादी वस्तू तुम्हाला आवडत नाही, पण खावी लागली आणि तुम्ही ती खाल्ली तर हरकत नाही.

## रियल धर्मात आल्यावर

**प्रश्नकर्ता :** आम्ही जेव्हा काही चुकीचे काम करत असू तेव्हा 'माझ्याकडून असे न होवो' असा भाव असायला हवा की, ज्ञाता-द्रष्टा पदात राहायला हवे?

**दादाश्री :** ज्ञाता-द्रष्टा राहायला हवे आणि शिवाय प्रतिक्रमण करायला सांगितलेच आहे ना?

**प्रश्नकर्ता :** पण भाव तर असता कामा नये ना?

**दादाश्री :** भाव होणार नाही. तुम्ही चंदुभाईंना जागृत करा, की प्रतिक्रमण करा, अतिक्रमण का केलेत? साधारणपणे पूर्ण दिवस क्रमणच होते. अतिक्रमण सर्व दिवसभर होत नाही. तासाभरात एक-दोन वेळा होते. त्याचे आपण प्रतिक्रमण करावे.

आपल्या साऱ्या उणीवा ओळखता यायला हव्यात. आता तुम्ही स्वत: तर निर्बल राहिलेले नाहीत. तुम्ही आता आत्मा झाला आहात, पण अज्ञान दशेत याचे मूळ उत्पादक तर तुम्हीच होतात ना? म्हणून तुम्हाला शेजाऱ्याप्रमाणे असे म्हणायचे की, 'चंदुभाई, प्रतिक्रमण करा.'

प्रतिक्रमण तर तुम्ही खूपच करा. तुमच्या वर्तुळात ज्या 50-100 व्यक्ती असतील, ज्यांना ज्यांना तुम्ही कधी त्रास दिला असेल त्या सर्वांसाठी, जेव्हा वेळ मिळेल तेव्हा तास-तासभर बसून, एकेकाला आठवून आठवून प्रतिक्रमण करा. जितक्यांना त्रास दिलेला आहे, तो सर्व धुवावा तर लागेलच ना? त्यानंतरच ज्ञान प्रकट होईल.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, ज्यांनी मला त्रास दिला आहे त्यांनाच मी त्रास दिला आहे.

**दादाश्री :** तुम्हाला ज्यांनी त्रास दिला त्याचे तो भोगील. ती तुमची जबाबदारी नाही. जो त्रास देतो त्याला जबाबदारीची जाणीव नाही. या जन्मात तो चपाती खात आहे पण पुढील जन्मात त्याला गवत खावे लागेल, त्याची त्याला काळजी नाही!

## ते पाप-पुण्यावर आधारित आहे

**प्रश्नकर्ता :** काही लोक खोटे बोलतात, तरी ते खरे आहे असे मानले जाते आणि काही लोक खरे बोलतात तरी ते खोटे बोलतात असे लोक समजतात. हे काय पझल (कोडे) आहे?

**दादाश्री :** ते त्याच्या पाप-पुण्याच्या आधारावर होते. जेव्हा त्याच्या पापाचे उदयकर्म चालू असते तेव्हा तो खरे बोलला तरी लोक त्याला खोटे मानतात आणि त्याच्या पुण्याचे उदयकर्म चालू असते तेव्हा तो खोटे बोलला तरी लोक खरे मानतात. वाटेल ते खोटे बोलला तरी पण ते खपून जाते.

**प्रश्नकर्ता :** मग त्यात त्याचे काहीच नुकसान नाही का?

**दादाश्री :** नुकसान तर आहेच, पण ते पुढल्या जन्माचे. या जन्मात तर त्याला मागच्या जन्माचे फळ मिळाले आहे. आणि तो जे आज खोटे बोलत आहे त्याचे फळ त्याला पुढील जन्मी मिळेल. आज तर त्याने 'बी' पेरले आहे. हे जग म्हणजे चौपट राजाची अंधेर नगरी नाही की वाटेल ते केले तरी चालेल!

**प्रश्नकर्ता :** जाणूनबुजून चुकीचे काम केले आणि म्हटले की नंतर प्रतिक्रमण करू, तर चालेल का?

**दादाश्री :** नाही, जाणूनबुजून करू नये. पण चूक झाली तर प्रतिक्रमण करू शकतो.

तुम्ही एखाद्या व्यक्तीला बोलता, 'तुम्ही खोटारडे आहात', आता 'खोटारडे' म्हटल्यावर इतके सारे 'सायन्स' आतमध्ये दिसते, त्याचे इतके सारे पर्याय उत्पन्न होतात की तुम्हाला दोन तास तरी त्या व्यक्तीबद्दल प्रेम वाटणारच नाही. इतके सारे पर्याय उत्पन्न होतात. म्हणून काही बोलण्यापूर्वीच... बोललाच नाहीत तर उत्तमच म्हणा, पण जर बोललात तर मात्र प्रतिक्रमण करा. बोलूच नका असे तर आम्ही म्हणू शकत नाही. कारण ते 'व्यवस्थित'च्या ताब्यात आहे, पण बोलले गेले तर प्रतिक्रमण करा. आपल्याजवळ हे साधन आहे. तुम्ही प्रतिक्रमण करता की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

## हे 'दुकान' रिकामे करायचे आहे

**प्रश्नकर्ता :** मग हे जीवन जगायचे तरी कसे?

**दादाश्री :** कसे जगत आहोत ते पाहावे.

**प्रश्नकर्ता :** मग चूक की बरोबर हा निर्णय कसा घ्यायचा?

**दादाश्री :** 'चंदुभाई' करणारे आहेत, त्यांना पाहत राहावे.

**प्रश्नकर्ता :** 'चंदुभाई' ने जर काही चुकीचे केले तर हरकत नाही का?

**दादाश्री :** 'चंदुभाई' जे करत आहेत ते सर्व 'डिस्चार्ज' स्वरूप आहे. त्यात बदल होऊ शकत नाही. 'डिस्चार्ज'मध्ये तुम्ही बदल करू शकत नाही. इफेक्ट (परिणामा)मध्ये बदल होऊ शकत नाही हे तुम्ही ऐकले आहे ना? परीक्षा देण्यात बदल होऊ शकतो, पण त्याचा रिजल्ट आपण बदलू शकतो का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** म्हणजेच तो परिणाम आहे.

**प्रश्नकर्ता :** पण (चंदुभाईने) जर काही चुकीचे केले तर पुढच्या जन्मी परत त्रास होईल ना?

**दादाश्री :** नाही. तुम्ही फक्त 'चंदुभाई'ला असे सांगा की 'प्रतिक्रमण कर.' जर चांगले केले असेल तर पुढच्या जन्मी ते येऊन मिळेलच. चांगले-वाईट, आपल्याला कोणाशीच काही देणेघेणे नाही. आपल्याला निकाल लावायचा आहे. हे दुकान रिकामे करायचे आहे. माल चांगला असो की वाईट असो, दुकानातून सर्व काढून टाकायचे आहे. आता हा सर्व परिणाम आहे.

## आज्ञा पाळण्याचा फक्त निश्चयच

**प्रश्नकर्ता :** तुम्ही ज्या पाच आज्ञा दिल्या आहेत, त्याच्या आधारावरच जीवन जगत राहायचे, असे नाही का?

**दादाश्री :** पाच आज्ञांचे पालन करावे. त्यामुळे आत्म्याचे संरक्षण होते, या ज्ञानाचे संरक्षण होते. आज्ञा कठीण नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** नाही, कठीण तर आहेतच. तुम्ही जे समभाव ठेवायला

सांगितले आहे, कोणावर रागवायचे नाही. कोणाला बोलायचे नाही. (हे कठीण आहे.)

**दादाश्री :** नाही, तुम्हाला तर फक्त मनात निश्चय करायचा आहे की 'मला समभावाने निकाल करायचा आहे.' एवढेच. तुम्ही दुसरे काही पाहायचे नाही. झाला की नाही ते पाहायचे नाही.

**प्रश्नकर्ता :** मग जसे होईल तसे?

**दादाश्री :** तुम्हाला त्या भानगडीत पडायचेच नाही. खरे-खोटे असे काही नसतेच. भगवंतांकडे सत्य-असत्य दोन्हीही नसतात. ही सगळी येथील सामाजिक व्यवस्था आहे. हिंदूंचे सत्य, मुस्लिमांसाठी असत्य असते आणि मुस्लिमांचे सत्य, हिंदूंसाठी असत्य असते. भगवंतांकडे खरे-खोटे असे काहीच नसते. भगवंत एवढेच सांगतात की, तुमच्याकडून कोणाला दु:ख झाले तर प्रतिक्रमण करा. तुमच्याकडून कोणाला दु:ख होता कामा नये. तुम्ही 'चंदुभाई' आहात हे तर या जगाचे सत्य आहे. आणि भगवंतांसाठी तुम्ही 'चंदुभाई' पण नाहीत. येथील सत्य भगवंतांकडे असत्य आहे.

संसार चालत राहणार, संसाराचा स्पर्श होणार नाही, संसार नडणार नाही आणि तरी काम होईल, असे आहे. फक्त आमच्या आज्ञांची आराधना करायची आहे. 'चंदुभाई' खोटे बोलला तरी आपल्याकडे (अक्रम मार्गात) हरकत नाही. खोटे बोलल्यामुळे समोरच्याचे नुकसान झाले. म्हणून आपण 'चंदुभाई'ला 'प्रतिक्रमण कर' असे सांगावे. खोटे बोलणे हा प्रकृतीचा गुण आहे, त्यामुळे तो खोटे बोलल्याशिवाय राहणारच नाही. त्याला माझी हरकत नाही. पण खोटे बोलल्यानंतर प्रतिक्रमण केले नाही तर मात्र माझी हरकत आहे. खोटे बोलल्यानंतर प्रतिक्रमणाचे जे भाव निर्माण होतात आणि त्यामुळे जे ध्यान वर्तते (घडते) ते धर्मध्यान आहे. लोक धर्मध्यान काय आहे याचा शोध घेत फिरतात. जर खोटे बोललात, तर दादांची माफी मागावी, आणि माझ्याकडून पुन्हा खोटे बोलले जाऊ नये यासाठी शक्ती मागाव्यात.



# [ 20 ]
# जागृती, वाणी बोलताना

## वाणीमुळे जास्त कर्मबंधन

मनाचा इतका त्रास नाही, पण वाणीचा (बोलण्याचा) त्रास आहे. कारण मन गुप्तपणे चालत असते, पण वाणीमुळे समोरच्याच्या हृदयावर थेट आघात होतो. म्हणून या वाणीमुळे ज्या ज्या व्यक्तींना दु:ख झाले आहे, त्या सर्वांची मी क्षमा मागतो, या प्रमाणे प्रतिक्रमण करू शकता.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्यामुळे वाणीमुळे झालेले सर्व दोष माफ होतील ना?

**दादाश्री :** दोष राहतील, पण जळलेल्या सुंभासारखे दोष राहतील. म्हणजे प्रतिक्रमण केल्यामुळे पुढील जन्मी तुम्ही जरा 'असे' झटकल्यावर सर्व गळून पडेल. त्यातील सर्व सत्वच उडून जाईल.

कर्त्याचा आधार असेल तरच कर्मबंधन होते. आता तुम्ही 'कर्ता' राहिले नाहीत. म्हणून जी मागील कर्मे आहेत, ती फळ देऊन जातील. नवीन कर्मबंधने होणार नाहीत.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, मग समोरच्या व्यक्तीवर काय परिणाम होईल?

**दादाश्री :** ते पाहण्याची आपल्याला गरज नाही. प्रतिक्रमण केले की मग आपल्याला पाहायचे नाही. जास्त प्रतिक्रमण करावे.

**प्रश्नकर्ता :** समजा, त्याला काही बोललो, तर मी त्याला दु:ख दिले असेच म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** हो, पण ते दु:ख तर तुमच्या इच्छेविरूद्ध झाले ना, म्हणून तुम्ही प्रतिक्रमण करायला हवे. हाच त्याचा हिशोब असेल आणि तो फेडला गेला.

**प्रश्नकर्ता :** पण मी जर काही बोललो तर त्याच्या मनाला वाईट तर वाटेलच ना?

**दादाश्री :** हो, वाईट तर वाटणार. चूक झाली तर चूक वाटणारच ना! जो हिशोब आहे तो तर चुकवावाच लागणार ना! त्याला काही पर्याय नाही.

**प्रश्नकर्ता :** नियंत्रण राहत नाही म्हणून वाणीद्वारे बोलले जाते ना?

**दादाश्री :** हो, बोलले तर जाते. पण जे वाणीद्वारे बोलले जाते त्यासाठी तुम्ही प्रतिक्रमण करावे. बस, बाकी काही नाही. पश्चात्ताप करावा आणि पुन्हा असे करणार नाही असा निश्चय करावा.

आणि मग फावल्या वेळी त्या व्यक्तीसाठी प्रतिक्रमण करत राहावे. त्यामुळे दोष 'हलके' होतील. ज्या ज्या कठीण फाइल्स् आहेत त्यांनाच नरम करायच्या आहेत, अशा कठीण फाइल्स् फक्त दोन-चारच असतात, जास्त नसतात, ना?

## व्यवहाराला, व्यवहार स्वरूप ठेवा

**प्रश्नकर्ता :** जर एखादी व्यक्ती रागावून बोलली तर ते अतिक्रमण नाही का?

**दादाश्री :** त्याला अतिक्रमणच म्हणणार ना?

**प्रश्नकर्ता :** कोणाला दु:ख होईल असे शब्द तोंडून निघाले आणि त्याबद्दल प्रतिक्रमण केले नाही, तर काय होईल?

**दादाश्री :** असे शब्द त्याच्या जिव्हारी लागतील, त्याला दु:ख होईल. समोरचा दु:खी झाला तर ते तुम्हाला आवडेल काय?

**प्रश्नकर्ता :** त्याने कर्मबंधन होते का?

**दादाश्री :** ते नियमाविरुद्धच आहे ना? त्याला नियमाविरुद्धच म्हणणार ना? नियमाविरुद्ध काही होताच कामा नये. आमच्या आज्ञा पाळल्यात तर त्याला धर्म बोलले जाईल. आणि प्रतिक्रमण करण्यात नुकसान तरी काय आहे? माफी मागा आणि 'पुन्हा असे करणार नाही' असा भाव पण मनात ठेवा, बस एवढेच थोडक्यात करायचे आहे. यात भगवंत काय करणार? यात कशाला न्याय शोधत बसता? जर व्यवहाराला व्यवहार समजाल, तर न्याय समजून जाईल! शेजारी 'वाकडे' का बोलला? कारण तुमचा व्यवहार तसा होता. आणि तुम्ही उलट बोलला ते समोरच्याच्या व्यवहाराच्या आधीन होते. पण तुम्हाला तर मोक्ष हवा आहे, म्हणून तुम्ही त्यासाठी प्रतिक्रमण करावे.

**प्रश्नकर्ता :** पण बाण तर सुटला, त्याचे काय?

**दादाश्री :** ते व्यवहाराधीन घडले.

**प्रश्नकर्ता :** जर अशीच परंपरा राहिली तर शत्रुत्व वाढेल ना?

**दादाश्री :** नाही, म्हणून तर आपण प्रतिक्रमण करतो. प्रतिक्रमण फक्त मोक्षाला जाण्यासाठीच नाही, तर समोरच्याने शत्रुत्व बाळगू नये यासाठी परमेश्वराला केलेला फोन आहे. प्रतिक्रमणात कच्चे पडलात तर शत्रुत्व बांधले जाईल. चूक लक्षात आली की ताबडतोब प्रतिक्रमण करा. मग त्यामुळे शत्रुत्व बांधले जाणारच नाही. समोरच्याला जरी शत्रुत्व करावेसे वाटले तरी तसे होणार नाही. कारण तुम्ही समोरच्याच्या आत्म्यालाच थेट फोन करता. व्यवहार निरुपाय (अनिवार्य) आहे. जर तुम्हाला मोक्ष हवा असेल तर प्रतिक्रमण करा. ज्याला स्वरूप ज्ञान झालेले नाही, त्याने जर व्यवहाराला-व्यवहार स्वरूप ठेवायचे असेल तर समोरचा वेडेवाकडे बोलला ते बरोबरच आहे असे समजावे. परंतु जर मोक्षाला जायचे असेल तर मात्र त्याबरोबर त्याचे प्रतिक्रमण करा, नाही तर शत्रुत्व निर्माण होईल.

## प्रतिक्रमणाचा आधार घ्या

**प्रश्नकर्ता :** जेव्हा समोरचा वेडेवाकडे बोलतो, तेव्हा आपल्या ज्ञानामुळे समाधान तर वाटत राहते, पण मुख्य प्रश्न असा आहे की जेव्हा माझ्याकडून काही कडू शब्द बोलले जातात, तेव्हा जर मी ह्या वाक्याचा आधार घेतला तर मला चुकीचे लाइसन्स मिळते ना?

**दादाश्री :** या वाक्याचा आधार तुम्ही घेऊच शकत नाही ना! त्यासाठी तर तुम्हाला प्रतिक्रमणाचा आधार दिला आहे. समोरच्या व्यक्तीला दु:ख वाटेल असे बोलले गेले असेल तर प्रतिक्रमण करावे.

समोरचा माणूस जरी वाटेल ते बोलला, पण त्या वेळी जर 'वाणी ही पर आहे आणि पराधीन आहे' ही गोष्ट स्वीकारली तर तुम्हाला समोरच्या व्यक्तीमुळे दु:ख होणारच नाही ना!

आता तुम्हीच जर वाईट बोललात, आणि मग त्यासाठी प्रतिक्रमण केलेत तर मग तुम्हाला त्याचे दु:ख राहणार नाही. या प्रकारे सर्व निवारण होऊन जाते. वाणीद्वारे जे बोलले जाते त्याचे तुम्ही 'ज्ञाता-द्रष्टा' आहात, पण वाणीमुळे ज्याला दु:ख दिले गेले आहे त्यासाठी 'बोलणाऱ्याकडून' तुम्ही प्रतिक्रमण करवून घेतले पाहिजे.

## इच्छा नसते तरी पण होऊन जाते

**प्रश्नकर्ता :** मी मनात असे ठरवतो की याच्याबरोबर बोलायचे नाही, भांडायचे नाही, तंटा करायचा नाही, आणि तरीही असे काही तरी घडते की परत भांडण होते, वाद होतोच. क्लेश होतात, सगळे काही होते. तर मी काय करू की हे सगळे थांबेल?

**दादाश्री :** आता हे शेवटच्या टप्प्यावर आहे. म्हणजे तो रस्ता जेव्हा संपत आला असेल ना, तेव्हा आपला भाव नसतानाही जर चूक घडली, तर अशा वेळी तुम्ही काय करायला हवे? पश्चात्ताप करायला हवा बस, एवढ्यानेच दोष धुतला जाईल. चूक झाली तर हा एवढाच उपाय आहे, दुसरा कोणताही उपाय नाही. जेव्हा (कार्य) संपत आले

असेल तेव्हा आतून वाईट करण्याची भावना नसेल तरी पण वाईट घडूनच जाते. कार्य जेव्हा संपत आलेले असेल तेव्हा (असे घडते). नाही तर जर कार्य अजून अपूर्ण असेल, तर आत भाव पण होतात आणि काम पण होते, दोन्ही होतात. अर्थात कार्य जर पूर्ण असेल, कार्य शिल्लक असेल, तर करण्याचे भाव पण होतात, तुम्हाला वाईट करण्याचे भाव पण होतात आणि वाईट कृत्येही होतात. जर वाईट करण्याचे भाव नसतील आणि वाईट कृत्ये घडली, तर तुम्ही समजून जावे की आता नक्कीच याचा शेवट जवळ आला आहे. त्या वरूनच शेवटाची पण माहिती मिळते. यालाच म्हणतात 'कमिंग इव्हेन्टस् कास्ट देअर शेडॉज बिफोर' (काही घडायचे असेल तर त्याची पूर्व सूचना अगोदरच मिळते.)

## टोकले जाते, त्याचे काय?

**प्रश्नकर्ता :** तुम्ही वाणीला परसत्ता म्हणता, वाणी पराधीन आहे असे म्हणता. तर आम्ही एखाद्या व्यक्तीला वाईट बोलायचेच नाही असा जर निश्चय केला, कितीही चिकट फाइल (गाढ ऋणानुबंध असलेली व्यक्ती किंवा संयोग) असेल, तर काय खरोखरच तो कोड छोटा होतो का?

**दादाश्री :** जेव्हा वाईट बोलले जाते तेव्हा चंदुभाईंना सांगावे, 'चंदुभाई, प्रतिक्रमण करा' आणि शिवाय 'आता पुन्हा असे वाईट बोलू नका' असेही सांगायला हवे. असे करत करत सर्व ठीक होईल. पण सांगावे तर लागणारच. जर 'चंदुभाईला' टोकले नाही तर याचा अर्थ तुमचाही अभिप्राय तोच आहे! अभिप्राय वेगळाच असायला हवा.

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा असे होते की आम्ही स्वत:ला टोकले की मग तो सुधारतो. मग पुन्हा अशी चूक होत नाही. आणि कित्येक वेळा असेही होते की कितीही ठाम निश्चय करून स्वत:वर रागावले, प्रत्याख्यान केले तरी तशी चूक पुन्हा होतेच.

**दादाश्री :** चूक होते, कारण हा पूर्वकर्माचा दोष आहे. ती तुमचीच पूर्वीची कमतरता आहे! यात कोणाही बाहेरच्याचा हात नाही! मग निरावरण पण तुम्हालाच करायला हवे ना?

## आत्मार्थासाठी खोटे बोलणे हेच महासत्य

**प्रश्नकर्ता :** परमार्थासाठी जर थोडे खोटे बोलले तर त्यामुळे दोष लागतो का?

**दादाश्री :** परमार्थ म्हणजे आत्म्यासाठी जे काही करावे लागते, त्यामुळे दोष लागत नाही. देहासाठी जे काही करता, चांगले केले तर गुण लागेल आणि वाईट केले तर दोष लागेल. आत्म्यासाठी जे काही करता, त्याला काहीच हरकत नाही. तुम्ही आत्म्याला परमार्थ म्हणता ना? हो, मग आत्महेतू असेल, त्यासाठी जी जी कार्ये असतील, त्यात दोष लागत नाही. आपल्या निमित्ताने समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले तर मात्र दोष लागतो!

## व्यवहार अनिवार्य

**प्रश्नकर्ता :** आम्ही समोरच्या व्यक्तीला काही सांगितले, आमच्या मनात तर तसे काही नसते, पण तरीही त्याला असेच वाटते की, 'हे बरोबर बोलत नाहीत, चुकीचे बोलत आहेत' तर याला अतिक्रमण झाले असे म्हणायचे का?

**दादाश्री :** त्याला जर दु:ख झाले असेल तर तुम्ही प्रतिक्रमण करायला हवे. त्यात तुम्हाला असे काय कष्ट पडणार आहेत? कोणाला दु:खी करून आपण सुखी होऊ शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात खूप वेळा असे बोलावे लागते, करावे लागते. नाही तर लिथार्जीपणा (आळस) येतो आणि समोरच्या व्यक्तीमध्ये पण आळस येतो.

**दादाश्री :** व्यवहारात तुम्ही खुशाल करा, पण तुम्ही प्रतिक्रमण करायलाच हवे. व्यवहार तर करावाच लागतो. त्याला उपायच नाही, ते अनिवार्य आहे, व्यवहार अनिवार्य आहे. सर्व जग व्यवहार 'ऐच्छिक' आहे असे समजते. पण 'अक्रम विज्ञाना'ने हे स्पष्ट केले आहे की, व्यवहार अनिवार्य आहे. केवळ 'आम्हीच' असे सांगितले की 'इट हॅपन्स' (तो घडून जातो).

**प्रश्नकर्ता :** जर प्रतिक्रमणाचा परिणाम होत नसेल तर त्याचा अर्थ आम्ही पूर्ण भावपूर्वक प्रतिक्रमण केले नाही असा आहे, की समोरच्या व्यक्तीची आवरणे जास्त आहेत असा आहे.

**दादाश्री :** तुम्ही समोरच्या व्यक्तीचा विचार करायचाच नाही. तो तर वेडासुद्धा असेल. आपल्या निमित्ताने त्याला दु:ख होता कामा नये. बस!

**प्रश्नकर्ता :** म्हणेजच कोणत्याही कारणाने त्याला दु:ख झाले तर त्याचे दु:ख दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**दादाश्री :** त्याला दु:ख झाले तर निश्चितच समाधान करायला हवे. ती आपली रिस्पॉन्सिबिलिटी (जबाबदारी) आहे. कोणालाही दु:ख होऊ नये यासाठीच तर आपले सर्व आयुष्य आहे.

आता यापुढे करणार नाही. पण पूर्वी ज्या गोष्टी होऊन गेल्या आहेत, त्यासाठी काही तरी उपाय करावा लागेल ना?

**प्रश्नकर्ता :** समजा, तसे करूनही त्याचे समाधान झाले नाही तर मग आपली जबाबदारी किती?

**दादाश्री :** प्रत्यक्ष जाऊन जर शक्य असेल तर डोळ्यांनी नम्रता दाखवावी. माफी मागून देखील जर त्याने टपली मारली तर समजावे की तो माफी मागण्यालायक नाही. तरीही निकाल तर करायचाच आहे. माफी मागून देखील जर त्याने टपली मारली तर समजावे की आपली चूक तर झालीच आहे पण ही व्यक्ती माफी मागण्याच्या लायकीची नाही, म्हणून त्याच्यासमोर झुकणे बंद करावे.

## हेतू सोन्यासारखा आहे, पण दिसण्यात चूक वाटते

तुमच्यामुळे लोक दु:खी होतात का?

**प्रश्नकर्ता :** हो, होतात.

**दादाश्री :** नंतर लगेच समजून येते का?

**प्रश्नकर्ता :** नंतर लगेच समजते.

**दादाश्री :** असे होय? मग तुम्ही काय करता?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करतो.

**दादाश्री :** (एखाद्यावर) रागावल्यानंतर प्रतिक्रमण करायला काय हरकत आहे? हेतू चांगला आहे ना, बस एवढेच तर पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** हेतू चांगला आहे, तरी प्रतिक्रमण का करायला हवे?

**दादाश्री :** प्रतिक्रमण तर करायलाच हवे, त्याला दु:ख होतेच ना, आणि व्यवहारात लोक काय म्हणतील, बघा, ही बाई नवऱ्याला कशी उठसूट रागावते! म्हणून नंतर प्रतिक्रमण करावे लागते. (जे दोष) डोळ्यांनी दिसतात त्यासाठी प्रतिक्रमण करायला हवे. आतमध्ये तुमचा हेतू जरी शुद्ध सोन्यासारखा असो, पण त्याचा काय उपयोग? अशा हेतूने काही होत नाही. हेतू जरी सोन्यासारखा असला तरी आम्हालाही प्रतिक्रमण करावे लागते. चूक झाली की प्रतिक्रमण करायलाच हवे. आता सगळ्या महात्म्यांची जगत् कल्याण करण्याची भावना आहे, त्यांचा हेतू चांगलाच आहे. पण एवढ्याने भागत नाही. प्रतिक्रमण तर अवश्य करावेच लागते. कपड्यावर डाग पडला तर तुम्ही तो धुऊन काढता ना? तसेच हे कपड्यावरचे डाग आहेत.

हे कोणी जीवित बोलत नाहीत, हे सगळे टेपरेकॉर्डर बोलत आहेत. नंतर त्यांना पश्चात्ताप पण होतो. म्हणजेच तो बोलला नाही, याची तुम्हाला खात्री पटली ना? आता तुम्ही 'त्याला पश्चात्ताप होवो' असे काही तरी करण्याची गरज आहे. त्याऐवजी 'असे का म्हणालास?' असे विचारले तर पश्चात्ताप करायचे सोडून तो परत आपल्याला सुनावील. चूक कुठे होते? त्याला पश्चात्ताप वाटावा असे करायचे आहे. (ते आपण करत नाही.)

जेव्हा 'आमची' टेपरेकॉर्ड वाजते आणि त्यात जर काही चूक झाली तर 'आम्ही' लगेच त्याबद्दल पश्चात्ताप करतो. त्याशिवाय चालणारच नाही.

## असे रागवा, की समोरच्याला दु:ख वाटणार नाही

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात जर कोणी चुकीचे वागत असेल तर टोकावे लागते. त्यामुळे त्याला दु:ख होते, मग त्याचा 'निकाल' कसा करावा?

**दादाश्री :** व्यवहारात टोकावे लागते, पण ते अहंकारपूर्वक घडते. म्हणून त्याचे प्रतिक्रमण करावे.

**प्रश्नकर्ता :** जर टोकले नाही तर ते डोक्यावर बसतील?

**दादाश्री :** टोकावे तर लागतेच, पण टोकता यायला हवे. नीट बोलता येत नाही, नीट व्यवहार जमत नाही म्हणून अहंकारपूर्वक टोकले जाते. म्हणून नंतर प्रतिक्रमण करावे. तुम्ही समोरच्याला रागावलात, तर त्याला वाईट तर वाटणारच, पण त्यासाठी प्रतिक्रमण करत राहिलात तर सहा महिन्यांनी, बारा महिन्यांनी तुमची वाणी अशी निघेल की समोरच्याला ती गोड वाटेल. आता तर 'टेस्टेड' (परीक्षण केलेली) वाणी पाहिजे. 'अनटेस्टेड' वाणी बोलायचा अधिकार नाही. या प्रकारे प्रतिक्रमण केलेत तर कितीही बिनसले असेल तरी ते सुरळीत होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** पण आपल्याला खूप वेळा समोरच्याच्या हितासाठी त्याला टोकावे लागते, अडवावे लागते, तर तेव्हा त्याला दु:ख तर होतच असणार ना?

**दादाश्री :** हो, समोरच्याला दु:ख झाले तर तुम्ही सांगावे, 'अरे, चंदुभाई प्रतिक्रमण करा! अतिक्रमण का केले? पुन्हा कधी असे बोलणार नाही, आणि जे बोलले गेले त्यासाठी पश्चात्ताप करीत आहे.' याप्रमाणे प्रतिक्रमण करायला हवे.

सांगण्याचा अधिकार आहे पण (नीट) सांगता यायला हवे. आणि हा तर भाऊ आला तर त्याला पाहताच म्हणू लागतो 'तू असा आहेस, तसा आहेस' याला अतिक्रमण म्हणतात आणि म्हणून त्याचे प्रतिक्रमण करावे लागते.

## विनयपूर्वक उलट बोलणे

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्याला वाईट वाटेल याचा विचार आपण करू नये, आपल्याला बोललेच पाहिजे.

**दादाश्री :** असे बोलता कामा नये. दु:ख होईल असे कशासाठी बोलायला हवे?

**प्रश्नकर्ता :** पण तो जर चुकीचे बोलत असेल किंवा चुकीचे करत असेल तरी पण आपण काही बोलता कामा नये?

**दादाश्री :** बोलावे. पण तुम्ही असे म्हणू शकता की 'असे झाले नाही तर चांगले, असे व्हायला नको.' असे म्हणू शकता. पण तुम्ही त्याचे बॉस (वरिष्ठ) असल्यासारखे बोलता म्हणून त्यांना वाईट वाटते. वाईट शब्दही विनयपूर्वक बोलता आले पाहिजेत.

**प्रश्नकर्ता :** वाईट बोलताना विनय कसा काय राहू शकेल?

**दादाश्री :** राहू शकेल, त्यालाच तर विज्ञान म्हणतात. कारण हे सर्व 'ड्रॅमॅटिक' (नाटकी) आहे ना! इथे लक्ष्मीचंद पण म्हणतो, 'मी राजा भर्तृहरी आहे, ही माझी राणी आहे.' मग 'भिक्षा दे ना मैया पिंगळा' असे म्हणत डोळ्यातून पाणी पण काढतो. तेव्हा 'अरे, तू तर लक्ष्मीचंद आहेस ना? तू खरेखरे रडत आहेस का?' (असे विचाराल) तर म्हणेल, 'मी कशाला खरेखरे रडू? हा अभिनय तर मला करावाच लागतो. नाही तर माझा पगार कापून घेतील' ज्ञान मिळाल्यावर या प्रकारे सगळा अभिनय करायचा आहे, हे तर नाटक आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले तरी पण आपल्याला 'कर्मबंधन' होत नाही? असे?

**दादाश्री :** आपल्या निमित्ताने दु:ख होईल असे करता कामा नये. तरी पण त्याला दु:ख झाले तर ते त्याचे स्वत:चे दु:ख आहे. आपल्या निमित्ताने दु:ख होऊ नये एवढी खबरदारी घेतली पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** तरी पण आवेशात येऊन जर काही बोलले गेले तर?

**दादाश्री :** असे बोलले गेले तर मग प्रतिक्रमण करायला हवे.

## 'जोक'चेही प्रतिक्रमण करावे लागते

कोणाबरोबर आवाज चढवून बोललात, अरे! कोणावर जरा 'जोक' (विनोद) केला आणि ती व्यक्ती जर भोळी असेल तर सहन करून घेते पण तिला आतून दु:ख तर होतेच. याला अतिक्रमण म्हणतात. आम्ही सुद्धा 'जोक' करतो पण निर्दोष 'जोक' करतो. आम्ही त्याचा रोग घालवून त्याला शक्तिशाली बनविण्यासाठी 'जोक' करतो. जरा गंमत वाटते, आनंद वाटतो आणि त्याचबरोबर तो पुढे प्रगती करतो. तो 'जोक' कुणाला दु:खी करत नाही. अशी गंमत करायला हवी की नको? त्याला पण समजते की 'दादा' गंमत करत आहेत. 'मस्करी' करत नाहीत, गंमत करत आहेत.

जर आम्हीसुद्धा कोणाची गंमत केली तर आम्हाला त्यासाठी प्रतिक्रमण करावे लागते. आमचे पण असे काही चालत नाही.

**प्रश्नकर्ता :** ती तर गंमत असते. असे तर करू शकतो ना!

**दादाश्री :** नाही, पण त्यासाठी देखील आम्हाला प्रतिक्रमणे करावी लागतात. तुम्ही केली नाहीत तर एकवेळ चालेल पण आम्हाला करावीच लागतात. नाही तर आमचे हे ज्ञान, ही जी टेपरेकॉर्ड (वाणी) निघत असते ना, तिचा प्रभाव कमी होईल.

**प्रश्नकर्ता :** तुमची प्रतिक्रमणे तर 'ऑन द स्पॉट' (लगेचच) होतात ना?

**दादाश्री :** हो, त्यावेळी माझे भाव वाईट नसतात पण तोही 'हास्य' नावाचा कषायच आहे. मस्करी नाही तरी पण 'हास्य' नामक कषाय झालाच. ती व्यक्ती भोळी आहे म्हणून तिला पुन्हा पुन्हा डिवचत राहता? पण आम्ही त्यासाठी प्रतिक्रमण करतो.

आम्हाला पण थोडी गंमत वाटते. डिवचल्यावर जरा गंमत वाटते. पण हे लोक मजबूत होतील हे आम्हाला माहीत आहे म्हणून अशी गंमत चालू देतो.

**प्रश्नकर्ता :** पण या भाऊंची थट्टा केली तर त्याचे प्रतिक्रमण कशासाठी?

**दादाश्री :** हो, त्याला करुणेचे प्रतिक्रमण म्हणतात, त्याला पुढे नेण्यासाठी. पुष्कळ जण आम्हाला विचारतात की 'आम्हाला का बोलत नाही?' मी त्यांना सांगतो, 'तुम्हाला असे बोलण्याची गरज नाही', त्यांना पुढे नेण्याची गरज नाही, ते आपले आपणच पुढे जातील असे आहात. ते समजपूर्वक 'ग्रास्पिंग' (ग्रहण) करू शकतील असे आहेत. पण आम्हाला प्रतिक्रमण करावे लागते! हे आश्चर्यच आहे ना!

## थट्टा-मस्करी करणे ही पण एक मोठी जोखीम

तशी मी सर्व प्रकारची थट्टा-मस्करी केली होती. सर्व प्रकारची थट्टा-मस्करी कोण करू शकतो? ज्याचा ब्रेन (मेंदू) खूप तेज असतो, तोच करतो. मी तर मजेत सगळ्यांची चेष्टा करत असे, चांगल्या चांगल्या लोकांची, मोठ्या-मोठ्या वकिलांची, डॉक्टरांची चेष्टा करत असे. आता असा हा 'अहंकार' चुकीचाच आहे ना? म्हणजे आपण आपल्या बुद्धीचा दुरुपयोगच केला ना! 'मस्करी करणे' म्हणजे 'बुद्धी'चीच खूण आहे ना?

**प्रश्नकर्ता :** मला तर अजूनही थट्टा-मस्करी करावीशी वाटते.

**दादाश्री :** थट्टा-मस्करी करण्यात खूप मोठी जोखीम आहे. बुद्धीमध्ये थट्टा करण्याची शक्ती असतेच पण त्याची जोखीम पण तेवढीच आहे. आम्ही आयुष्यभर जोखीमच ओढवून घेतली होती, जोखीमच ओढवून घेत होतो.

**प्रश्नकर्ता :** थट्टा करण्यात कसली जोखीम आहे? कोणत्या प्रकारची जोखीम आहे.

**दादाश्री :** कोणाला थोबाडीत मारण्यात जेवढी जोखीम आहे, त्याच्या अनंत पटीने जोखीम थट्टा करण्यात आहे. त्याची बुद्धी कमी पडते म्हणून तुम्ही तुमच्या बुद्धीने त्याच्यावर कुरघोडी करता. मग अशा वेळी (आतील) भगवंत म्हणतील, 'याला कमी बुद्धी आहे याचा तुम्ही गैरफायदा घेत आहात?' म्हणजे इथे तुम्ही भगवंतालाच प्रतिद्वंदी बनवलेत. त्याला थोबाडीत मारली असती तर त्याला लगेच समजले असते म्हणून तो स्वत:च मालक झाला असता. पण इथे तर त्याची बुद्धी कमी पडते, त्याला समजतच नाही, म्हणून तुम्ही त्याची मस्करी करता तेव्हा तो स्वत: मालक होतच नाही. पण तेव्हा (आतील)भगवंत समजतात, अरेरे, याची बुद्धी कमी आहे म्हणून तू त्याला फसवतोस? 'ये मग, बघ आता.' ते मग आपली हाडेच खिळखिळी करतील.

**प्रश्नकर्ता :** आम्ही अशाच गोष्टी खूप केल्या होत्या.

**दादाश्री :** पण मग अजूनही तुम्ही त्यासाठी प्रतिक्रमण करू शकता! मी पण तसेच करत होतो ना! पण ते खूप चुकीचे होते. माझी तिच भानगड होती! बुद्धी अंतरायवाली होती, मग ती काय करणार? विरोध तर करीलच ना! म्हणजे बुद्धी जास्त वाढली त्याचाच हा लाभ (!) ना! म्हणूनच थट्टा-मस्करी करणाऱ्याला विनाकारण दु:ख भोगावे लागते.

कोणी फेंगडे चालत असेल आणि आपण जर त्याला हसलो, त्याची टिंगल-टवाळी केली तर भगवंत म्हणतील, 'घे, आता त्याचे फळ भोग.' जगात कोणाचीही थट्टा-मस्करी करू नये. अशी मस्करी केल्यामुळेच जगातील सर्व हॉस्पिटल्स निर्माण झाली आहेत. हे जे मोडके-तोडके पाय वगैरे आहेत ना, ते सर्व थट्टा-मस्करी केल्याचेच परिणाम आहेत. म्हणजे आम्हालाही थट्टा-मस्करी केल्याचे हे फळ मिळाले आहे.

म्हणून आम्ही म्हणतो, मस्करी करणे ही फार चुकीची गोष्ट आहे. याला तर भगवंताची मस्करी केली असेच म्हटले जाईल. जरी गाढव असला तरी पण आफ्टर ऑल (अखेर) तो कोण आहे?

'भगवंत'च आहे. प्रत्येक जीवमात्र 'भगवंत' आहे! म्हणून कोणाचीही मस्करी करू नये! तुम्ही त्याला हसाल तेव्हा भगवंत म्हणतील 'हो, ये आता, तुझा पण हिशोब पूर्ण करतो.'

**प्रश्नकर्ता :** त्याचा उपाय म्हणून आता प्रतिक्रमणे करावीच लागतील ना?

**दादाश्री :** हो, करावीच लागतील! गत्यंतरच नाही.

**प्रश्नकर्ता :** दादा, तुमच्या साक्षीने जाहीर करून, माफी मागून प्रतिक्रमण करतो, असे सांगितले तर?

**दादाश्री :** 'दादा, तुमच्या साक्षीने' एवढे बोललात तरी पुरेल. 'वाणीच्या दोषामुळे ज्या ज्या लोकांना दुःख दिले आहे त्या सर्वांची मी क्षमा मागतो' असे म्हटले तर ते पोहोचते.

## मग प्रतिपक्षीभाव शिल्लक राहत नाही

या दूषमकाळात वाणीमुळेच जास्त बंधने आहेत. सुषमकाळात मनामुळे बंधने होती. जर हे शब्द नसते ना, तर मोक्ष अगदी सहज मिळाला असता. म्हणून कोणाबद्दल एक अक्षरही बोलू नये. कोणाला चुकीचा म्हणणे म्हणजे स्वतःच्या आत्म्यावर धूळ उडवण्यासारखे आहे. 'काहीही बोलणे' म्हणजे खूप मोठी जोखीम आहे. काही वाईट बोलले की आतमध्ये एक आवरण येते, वाईट विचार केला तरी पण तसेच आवरण येते. म्हणून या उलट बोलण्याबद्दल, उलट विचार करण्याबद्दल प्रतिक्रमण केले पाहिजे, तर त्यातून सुटता येते. सर्व सामान्य प्रकारे व्यवहारात बोलायला हरकत नाही. पण कोणाही देहधारीबद्दल जर उलट-सुलट बोललात तर आतमध्ये ते रेकॉर्ड होईल! जगातील लोकांची टेप तयार करायची असेल तर कितीसा वेळ लागतो? जरासे डिवचले की लगेच प्रतिपक्षीभाव टेप होऊ लागतात. आणि 'तू तर इतका कमकुवत आहेस की डिवचण्या अगोदरच तू बोलू लागशील.'

**प्रश्नकर्ता :** वाईट बोलायचे तर नाही पण वाईट भाव देखील होता कामा नये ना?

**दादाश्री :** वाईट भाव होता कामा नयेत, हे बरोबर आहे. कारण जे भावात आहे ते शेवटी बोलण्यात आल्यावाचून राहत नाही. म्हणून जर बोलणे बंद झाले तर (वाईट) भाव पण बंद होतील. हे भावच तर बोलण्यामागचे पडसाद आहेत. प्रतिपक्षीभाव उत्पन्न झाल्याशिवाय राहतच नाहीत ना! आम्हाला प्रतिपक्षीभाव उत्पन्न होत नाहीत. तुम्हालाही तिथपर्यंत पोहोचायचे आहे. तुमच्यातला हा कमकुवतपणा जायलाच हवा, त्यानंतर मग प्रतिपक्षीभाव उत्पन्न होणारच नाहीत. आणि जर कधी झालेच तर आपल्याकडे प्रतिक्रमणाचे हत्यार आहे, त्याने ते मिटवावे. जरी कारखान्यात पाणी गेले तरी जोपर्यंत ते बर्फ होत नाही तोपर्यंत हरकत नाही. एकदा बर्फ झाले तर मग आपल्या हातात काहीच राहत नाही.

घरात सासू सुनेवर ओरडते तेव्हा तिला वाटते, की 'हे तर कोणी ऐकलेच नाही ना! हे तर असेच चालत आहे!' लहान मुलांसमोर आई-वडील भांडतात, काहीही बोलतात. त्यांना वाटते 'या लहान मुलाला काय कळणार?' अरे, पण त्याच्या आत टेप होत आहे त्याचे काय? तो मोठा होईल तेव्हा ती टेप बाहेर काढील!

## असे धुवावे वाणीचे दोष

**प्रश्नकर्ता :** ज्याला टेप करायचे नसेल त्याच्यासाठी काय उपाय आहे?

**दादाश्री :** कुठलेही स्पंदन होऊ द्यायचे नाही. फक्त पाहतच राहायचे आहे. पण असे शक्य नाही ना! हे सुद्धा मशीन आहे आणि पराधीन आहे. म्हणून आम्ही दुसरा उपाय सांगतो की टेप होताक्षणीच लगेच ती पुसून टाकली तर चालेल. प्रतिक्रमण हे पुसून टाकण्याचे साधन आहे. यामुळे एक-दोन जन्मांत बदल होऊन बोलणे सर्व बंद होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** शुद्धात्म्याचे 'लक्ष' बसल्यानंतर सतत प्रतिक्रमणे होतच राहतात.

**दादाश्री :** त्यामुळे तुमची जबाबदारी संपते. काही बोलल्यावर लगेच प्रतिक्रमण केल्यामुळे जोखीमच राहत नाही ना! कडक बोलावे पण ते राग-द्वेषरहित बोलावे. कडक बोलले गेले की लगेच प्रतिक्रमण विधी करावा.

मन-वचन-काया यांचे योग, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्म, चंदुभाई व चंदुभाईच्या नावाच्या सर्व मायेपासून पूर्णपणे भिन्न अशा 'शुद्धात्म्या'चे स्मरण करून म्हणावे, 'हे शुद्धात्मा भगवान, मी आवाज चढवून बोललो ती चूक झाली. त्यासाठी मी माफी मागत आहे, आणि अशी चूक पुन्हा करणार नाही असा निश्चय करत आहे. अशी चूक पुन्हा कधी होता कामा नये, यासाठी मला शक्ती द्या.' 'शुद्धात्म्या'ची किंवा 'दादां'ची आठवण काढून म्हणणे की, 'ही चूक झाली आहे' म्हणजे आलोचना, आणि ती चूक धुणे म्हणजे प्रतिक्रमण, आणि अशी चूक पुन्हा करणार नाही असा निश्चय करणे म्हणजे प्रत्याख्यान.

**प्रश्नकर्ता :** आपली इच्छा नसतानाही क्लेश झाले, वाईट शब्द बोलले गेले तर अशावेळी काय करावे?

**दादाश्री :** एखादे कार्य पूर्ण होत आले असेल तेव्हा इच्छा नसली तरी ते कार्य होत राहते. मग ते कार्य झाल्यानंतर पश्चात्ताप-प्रतिक्रमण करायला हवे.

**प्रश्नकर्ता :** मस्का लावणे, हो ला हो म्हणणे याला सत्य म्हणायचे का?

**दादाश्री :** त्याला सत्य म्हणता येणार नाही. मस्का लावणे असे काही नसतेच. तो त्याचा स्वतःचा शोध आहे. स्वतःची चूक लपविण्यासाठी तो दुसऱ्याला मस्का लावतो.

समोरच्याला पटेल अशी वाणी असावी.

**प्रश्नकर्ता :** समोरच्या व्यक्तीला कसे वाटेल असा जर विचार करत बसलो तर शेवट कधी होईल?

**दादाश्री :** त्याचा विचार तुम्हाला करायची गरज नाही. तुम्ही फक्त चंदुभाईला म्हणावे की प्रतिक्रमण कर, बस, फक्त एवढेच म्हणावे.

हे 'अक्रम विज्ञान' आहे त्यामुळे प्रतिक्रमण ठेवावे लागले आहे.

## याच जन्मात वाणी सुधारते

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्यावर आमची वाणी याच जन्मात चांगली होईल का?

**दादाश्री :** त्यानंतर काही वेगळ्याच प्रकारे घडून येईल! आमची वाणी उच्चतम प्रकारची निघत आहे याचे कारण प्रतिक्रमण हेच आहे. आणि निर्विवाद वाणी आहे याचेही कारण प्रतिक्रमण हेच आहे. नाही तर वाद-विवादच झाले असते. सगळीकडे विवादवाली वाणीच असते. व्यवहार शुद्धीशिवाय स्याद्‌वाद वाणी (शब्द) बाहेर पडणारच नाही. प्रथम व्यवहार शुद्धी व्हायला हवी.



# [ 21 ]
# अशा प्रकारे प्रकृती दोष सुटतात

## अंतराय, पूर्वी केलेल्या चुकांच्या परिणामस्वरूप

**प्रश्नकर्ता :** आपण लक्ष्यापासून ढळतो, ती आपली चूक समजावी की अंतराय?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की जे अंतराय आले आहेत ते सर्व आपणच उत्पन्न केले आहेत. म्हणजेच सर्व चुका आपल्याच आहेत. अंतराय का आले? पण आता सर्व अंतराय हळूहळू संपू लागतील. म्हणून चुकीबद्दल खेद करत बसू नये.

**प्रश्नकर्ता :** अंतराय आपल्याच चुकांचे परिणाम आहेत का?

**दादाश्री :** पूर्वी ज्या चुका केल्या होत्या त्याचे हे सर्व परिणाम आहेत. ते अंतरायांद्वारेच भोगावे लागतील ना?

**प्रश्नकर्ता :** मग त्याच्याबद्दल खेद करायचा नाही ना?

**दादाश्री :** नाही, नाही, वाईट कशाला वाटून घ्यायचे? आत्म्यामध्ये वाईट वाटणे हा गुणच नाही! जागृती थोडी जास्त असायला हवी, त्या वेळी शुद्धात्मा, शुद्धात्मा असे म्हटले तर जागृती येईल.

**प्रश्नकर्ता :** खेद करण्याऐवजी प्रतिक्रमण करू शकतो?

**दादाश्री :** माणसाकडून इतकी सारी प्रतिक्रमणे होऊ शकत

नाहीत. सगळ्यांमध्ये एवढे सामर्थ्य नसते. सगळ्यांनी तर व्यवहाराप्रमाणे केले तरी खूप झाले. जास्त प्रतिक्रमणे करणे शक्य होत नाही. दिवसभर अनेक प्रकारची कामे करायची असतात.

## येथील विषसुद्धा प्रतिक्रमणासारखे

**प्रश्नकर्ता :** हे जे कायम दुःख चालू असते, याचा फायदा कसा घ्यावा?

**दादाश्री :** या दुःखाबद्दल जर विचार करू लागाल तर दुःखासारखे वाटणार नाही. जर दुःखाचे यथार्थ प्रतिक्रमण केले तर दुःख आहे असे वाटणारच नाही. हे दुःख आहे, हे दुःख आहे, विचार न करताच असे थोपवले गेले आहे. म्हणजेच याला विरोध करू नये. चुकूनही विरोध केला, तर प्रतिक्रमण करावे लागेल. विरोधाचा विचार आला तरी प्रतिक्रमण करावे लागेल.

या सत्संगाचे विष पिणे चांगले आहे, पण बाहेरचे अमृत पिणे वाईट आहे. कारण हे विष प्रतिक्रमणयुक्त आहे. आम्ही सर्व विषाचे पेले पिऊन महादेव झालो आहोत.

दुसऱ्यांना जर (आपल्यामुळे) जर अडचण झाली तर प्रतिक्रमण करायला हवे.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान घेतल्यानंतर निःस्वार्थपणे कपट करणाऱ्यांना कर्मबंधन होते का?

**दादाश्री :** हो, पण प्रतिक्रमण केले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** फसवले गेल्यावरही प्रतिक्रमण करायला हवे का?

**दादाश्री :** हो, आपल्याला प्रतिक्रमण करायलाच हवे. महाराजांचा दोष नाही. ते त्यांच्या जागी आहेत. तुम्ही त्या दुकानात गेलात ही तुमची चूक आहे. आपणच त्यांना छेडले म्हणून प्रतिक्रमण करायला हवे. आपण प्रतिक्रमण करायला हवे. आपल्याकडून गुन्हा होता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** आम्ही प्रतिक्रमण करतो पण समोरचा तर कर्म बांधतोच ना?

**दादाश्री :** आपण मात्र मनातल्या मनात प्रतिक्रमण करून घ्यावे. मग समोरच्याचे बघण्याची आपल्याला गरज नाही.

## ज्ञानी पुरुषांच्या प्रतिक्रमणांची सूक्ष्मता

**प्रश्नकर्ता :** तुमच्याकडे यायचा खूप वेळा विचार करतो पण येणे होत नाही.

**दादाश्री :** तुमच्या हातात कुठे सत्ता आहे? तरीही यावेसे वाटते पण येणे होत नाही यासाठी मनात खंत वाटत राहायला हवी. आपण चंदुभाईंना सांगावे, 'चंदुभाई प्रतिक्रमण करा ना, लवकर मार्ग निघेल. जाता येत नाही यासाठी प्रतिक्रमण करा, प्रत्याख्यान करा.' अशी चूक घडली आहे, पण आता पुन्हा चूक करणार नाही.

आता जे भाव मनात येत आहेत, ते जास्त वेळा का येत आहेत आणि तरी (त्याप्रमाणे) कृती का होत नाही? भाव अशामुळे येत आहेत की 'कमिंग इव्हेन्ट्स कास्ट देअर शॅडोज बिफोर!' (ज्या घटना घडणार आहेत त्याची स्पंदने अगोदरच पोहोचतात.)

**प्रश्नकर्ता :** ही जी सारखी काळजी वाटते, तिचे प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** काळजी वाटते ती आपल्या अहंकारामुळे. मी काही याचा कर्ता नाही. म्हणून 'दादा भगवान क्षमा करा.' काही तरी तर करावेच लागेल ना? आपले काही चालते का?

**प्रश्नकर्ता :** जर खूप थंडी आहे, खूप थंडी आहे असे आम्ही म्हटले, म्हणजे आम्ही निसर्गाच्या विरुद्ध बोललो, तर त्यासाठी प्रतिक्रमण करायला हवे का?

**दादाश्री :** नाही, प्रतिक्रमण जिथे राग-द्वेष होत असेल, फाइल

असेल तिथेच करावे. कढी खारट असेल तर कढीचे प्रतिक्रमण करायचे नाही पण ज्याच्याकडून मीठ जास्त पडले त्याच्यासाठी प्रतिक्रमण करावे. प्रतिक्रमणामुळे समोरच्या व्यक्तीची परिणती बदलते.

लघवी करायला गेलो, तेव्हा एक मुंगी वाहून गेली तर आम्ही प्रतिक्रमण करतो. आम्ही उपयोग चुकत नाही. ती वाहून गेली, हे 'डिस्चार्ज' आहे पण त्यावेळी अतिक्रमणाचा दोष का झाला? जागृती मंद का झाली? त्याचा दोष लागतो.

वाचताना पुस्तकाला नमस्कार करून म्हणावे, 'दादा, मला पुस्तक वाचण्याची शक्ती द्या.' आणि जर कधी चूक झाली तर लगेच उपाय करावा. दोन वेळा नमस्कार करून म्हणावे, 'दादा भगवान माझी इच्छा नव्हती तरी पण माझ्या हातून चूक झाली त्यासाठी मी माफी मागतो आणि आता पुन्हा असे करणार नाही.'

वेळेवर विधी करणे विसरलो आणि नंतर आठवण झाली तर प्रतिक्रमण करून मग विधी करावा.

आम्ही जर दोघांना वेगळे केले तर त्याचा दोष लागतो, म्हणून आम्ही प्रतिक्रमण करतो.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही तर ते कर्ताभावाने करत नाही, तरी पण?

**दादाश्री :** कुठल्याही भावाने केले तरी समोरच्याला दु:ख होईल असे केले म्हणून प्रतिक्रमण करावे लागते.

'डिस्चार्ज'मध्ये जी अतिक्रमणे झाली, त्यासाठी आपण प्रतिक्रमण करतो. समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले असेल अशा डिस्चार्जचे प्रतिक्रमण करावे. येथील महात्म्यांसाठी किंवा दादांसाठी काही चांगले केले तर त्यासाठी प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. पण बाहेर कोणाचे काही चांगले केले तर त्याचे प्रतिक्रमण करावे लागते, कारण उपयोग चुकलात यासाठी प्रतिक्रमण करावे लागेत.

## यथार्थ प्रतिक्रमण पोहोचतात

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केले तर ते समोरच्या व्यक्तीपर्यंत पोहोचते का?

**दादाश्री :** समोरच्या व्यक्तीपर्यंत पोहोचते. ती व्यक्ती थोडी नरम होत जाते. त्याला कळो ना कळो, त्याचा आपल्याबद्दल असलेला भाव नरम होत जातो. आपल्या प्रतिक्रमणांचा तर खूपच परिणाम होतो. तासभर जर केले तर समोरच्या व्यक्तीत पूर्ण बदल होऊन जातो, जर नीट प्रतिक्रमणे झाली असतील तर. आपण ज्यांच्यासाठी प्रतिक्रमण करतो ते आपले दोष तर बघत नाहीत उलट त्यांना आपल्याबद्दल मान उत्पन्न होतो.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणे केली तर नवीन (कर्म) 'चार्ज' होणार नाही का?

**दादाश्री :** जर आत्मा कर्ता बनला तर कर्मबंधन होते. आत्मा प्रतिक्रमण करत नाही. चंदुभाई प्रतिक्रमण करतील आणि तुम्ही त्याचे 'ज्ञाता-द्रष्टा' राहावे.

निज स्वरूपाची प्राप्ती झाल्यानंतर खरी प्रतिक्रमणे होतात. प्रतिक्रमण करणारा हवा आणि प्रतिक्रमण करविणारा पण हवा.

आपले प्रतिक्रमण म्हणजे काय? रहाट उघडल्यावर दोरखंडाचे जेवढे तुकडे झाले असतील त्यांना जोडून स्वच्छ करणे हेच आपले प्रतिक्रमण!

**प्रश्नकर्ता :** चारित्र्यमोह बघण्यात चूक होते का? आम्ही रोजच प्रतिक्रमण करतो आणि तरीही तीच तीच चूक पुन्हा करतो ना?

**दादाश्री :** ज्या चुका रोज रोज होतात त्या ओळखता आल्या पाहिजेत. तेच ठीक. प्रतिक्रमण करून सुद्धा संपत नाहीत. पण एक एक थर सुटत जातो.

तासभर प्रतिक्रमण केले तरी स्वसत्तेचा अनुभव येईल. प्रतिक्रमण जर ताबडतोब नगद होऊ लागली तर भगवंतपद प्राप्त होईल असे आहे.

एकाएका प्रतिक्रमणात रूप भरलेले आहे, आणि अप्रतिक्रमण ते कुरूपपणाचे चिन्ह आहे. (अतिक्रमण दु:ख वाढवते आणि प्रतिक्रमण केल्यामुळे आनंदाचा अनुभव येतो.)

## जिवंत प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण समूहात बसून करायला हवे का?

**दादाश्री :** असे काही नाही. एकटे केलेत तरी चालेल. झोपता झोपता केलेत तरी चालेल, मनात केले तरी चालेल.

प्रतिक्रमण कसे असते? जिवंत असते.

हे तर मृत प्रतिक्रमण. एकही दोष कमी झाला नाही, उलट दोषच वाढवलेत. प्रतिक्रमणे चालूच राहतात. कित्येक जण आठ-आठ वर्षे प्रतिक्रमण करतात आणि तरी त्यांचा एकही दोष कमी होत नाही.

## प्रतिष्ठित आत्मा हाच झाला प्रतिक्रमण आत्मा

**प्रश्नकर्ता :** झोपेतून उठताच लगेच प्रतिक्रमण सुरू होते.

**दादाश्री :** म्हणजे हा प्रतिक्रमण आत्मा झाला. शुद्धात्मा तर आहेच पण हा प्रतिष्ठित आत्मा तो आता प्रतिक्रमण आत्मा होऊन गेला. लोकांना कषायी आत्मा आहे. जगात असे कोणीच नाही की जे एक सुद्धा प्रतिक्रमण करू शकतील.

जसजसे नगद प्रतिक्रमण होऊ लागते तसतसे सगळे स्वच्छ होऊ लागते. अतिक्रमण होताच आपण नगद प्रतिक्रमण करतो त्यामुळे मन आणि वाणी शुद्ध होऊ लागतात.

प्रतिक्रमण म्हणजे 'बी' भाजून पेरणे.

आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान म्हणजे रोजचा ताळेबंद (हिशोब) काढणे.

जितके दोष दिसले तितकी कमाई झाली. तितकी प्रतिक्रमणे करावीत.

## 'या प्रकारच्या' प्राकृतिक दोषांची जबाबदारी नसते

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण होऊ शकत नाही हा प्राकृतिक दोष आहे की अंतराय कर्म आहे?

**दादाश्री :** हा प्राकृतिक दोष आहे. आणि तो प्रत्येक वेळी होत नाही. काही वेळा दोष होतो आणि काही वेळा होत नाही. प्राकृतिक दोषांच्या बाबतीत प्रतिक्रमण होत नसेल तर हरकत नाही. आपण फक्त एवढेच पाहायचे की आपले भाव काय आहेत? दुसरे काहीच पाहण्याची गरज नाही. तुमची प्रतिक्रमण करण्याची इच्छा आहे ना?

**प्रश्नकर्ता :** हो, अगदी पूर्णपणे.

**दादाश्री :** असे असूनही प्रतिक्रमणे होऊ शकत नसतील तर तो प्रकृतीदोष आहे. प्रकृती दोषाला तुम्ही जबाबदार नाही. प्रकृती कधी कधी बोलते आणि कधी कधी बोलत नाही. ती बाजासारखी आहे. वाजेल तर वाजेल, नाही तर नाही पण वाजणार! याला अंतराय म्हणत नाहीत.

## निकाचित कर्मासाठी खोल प्रतिक्रमणाची आवश्यकता

**प्रश्नकर्ता :** समभावाने निकाल करण्याचा दृढ निश्चय असूनही खूप वेळा वाद उभे राहतात, ते कशामुळे?

**दादाश्री :** किती बाबतीत असे होते? शंभरएक ठिकाणी?

**प्रश्नकर्ता :** नाही, एका ठिकाणीच असे होत असते.

**दादाश्री :** तर मग ते निकाचित कर्म आहे. ते निकाचित कर्म कसे धुता येईल? तर आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान यांनी. त्यामुळे कर्मबंधन सैल होते. त्यानंतर 'ज्ञाता-द्रष्टा' पदात राहू शकता. मात्र त्यासाठी निरंतर प्रतिक्रमण करावे लागेल. जितक्या 'फोर्स' ने कर्म निकाचित झाले असेल, तितक्याच 'फोर्सने' प्रतिक्रमण केले तर ते धुतले जाईल.

## जुन्या चुकांचे ओझे

**प्रश्नकर्ता :** पूर्वी जे घडून गेलेले असते त्याचे ओझे जाणवते.

**दादाश्री :** पूर्वीचे ओझे आपण एका बाजूला ठेवून द्यायला हवे. आपण ओझे का बाळगावे? अजूनही जर आपल्याला स्पर्श होत असेल तर ओझे वाटते.

**प्रश्नकर्ता :** ज्या जुन्या चुका असतात, त्यांचा बोजा वाटतो.

**दादाश्री :** किती वर्षांपूर्वीच्या?

**प्रश्नकर्ता :** एक, दोन महिन्यांपूर्वीच्या.

**दादाश्री :** त्यात अशा कोणत्या मोठ्या चुका आहेत? त्याच्यासाठी प्रतिक्रमण करावे, दुसरे काय करणार?

**प्रश्नकर्ता :** आम्ही प्रतिक्रमण तर करतो पण चूक 'एक्झॅक्ट' दिसतच राहते.

**दादाश्री :** ती तर प्रकृती दिसत असते. प्रकृती जात नाही. ती कांद्यासारखी असते. एक चूक निघाली तर परत दुसरी निघते, तिसरी निघते, तीच चूक परत परत निघत राहते पण प्रतिक्रमण तर करावेच लागेल.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण तर करतो, परंतु जोपर्यंत स्वतः यापासून वेगळा होत नाही तोपर्यंत ओझे राहतेच.

**दादाश्री :** त्याशिवाय गत्यंतरच नाही. आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान या शिवाय दुसरा मार्गच नाही. अतिक्रमणामुळे हे उत्पन्न झाले आहे आणि प्रतिक्रमणामुळे त्याचा नाश होऊ शकतो, बस, एवढेच.

**प्रश्नकर्ता :** आम्ही जर ठाम ठरवले की भविष्यात असे करायचे नाही, पुन्हा अशी चूक करायचीच नाही. 100 टक्के असा भाव ठेवला, तरी पण अशी चूक होऊ शकते का? ते आपल्या हातात आहे का?

**दादाश्री :** चूक तर पुन्हा पुन्हा होते. तुम्ही आता इथे एक चेंडू आणला आणि माझ्या हातात दिला, मी तो इथून फेकला. मी तर एकच काम केले, एकदाच तो चेंडू फेकला. म्हणून जर मी म्हटले की आता माझी इच्छा नाही. (चेंडू) तू थांब तर तो थांबेल का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग काय होईल?

**प्रश्नकर्ता :** तो चार-पाच वेळा उड्या मारीलच.

**दादाश्री :** म्हणजे आपल्या हातातून सुटले आणि निसर्गाच्या हातात गेले. मग निसर्ग जेव्हा थांबवेल तेव्हा ते थांबेल, म्हणजे हे सर्व असे आहे. आपल्या ज्या चुका आहेत, त्या मग निसर्गाच्या हातात जातात.

**प्रश्नकर्ता :** जर निसर्गाच्या हातात जात असतील तर मग प्रतिक्रमण करून कसा फायदा होतो?

**दादाश्री :** खूप फायदा होतो. प्रतिक्रमणामुळे समोरच्या व्यक्तीवर खूप परिणाम होतो, इतका परिणाम होतो की जर आपण त्या व्यक्तीसाठी एक तास प्रतिक्रमण केले तर त्या व्यक्तीमध्ये एक नव्याच प्रकारचा बदल होतो. खूप मोठा बदल होतो. मात्र प्रतिक्रमण करणाऱ्या व्यक्तीने हे ज्ञान घेतलेले असले पाहिजे. शुद्ध झालेल्या, 'मी शुद्धात्मा आहे' याचे भान असलेल्या व्यक्तीच्या प्रतिक्रमणाचा खूप परिणाम होतो. प्रतिक्रमण तर आपले सर्वात मोठे शस्त्र आहे!

## प्रकृती सुधारू शकते का?

'ज्ञान' घेतलेले नसेल तर प्रकृतीचे दिवसभर उलटेच चालू असते आणि आता तर सर्व सुरळीत चालते. तुम्ही समोरच्याला सुनावता, पण आतमध्ये म्हणता, 'नाही, नाही, असे करता कामा नये. सुनावण्याचा विचार आला त्यासाठी प्रतिक्रमण करा.' आणि ज्ञान घेण्यापूर्वी तर तुम्ही चार गोष्टी सुनावतही होता आणि वर असेही म्हणत की अजून थोडे सुनवायला हवे.

मनुष्याचा स्वभाव असा आहे की जशी प्रकृती तसा तो बनतो. जेव्हा प्रकृती सुधारत नाही तेव्हा तो म्हणतो, 'सोड आता ही झंझट', अरे, प्रकृती सुधारत नाही तर काही हरकत नाही, तू आपल्या आतमध्ये सुधारणा कर ना! मग आपली 'रिस्पोन्सिबिलिटी' (जबाबदारी) राहत

नाही! असे हे 'सायन्स' आहे! बाहेर काहीही होवो, त्याची 'रिस्पोन्सिबिलिटी' नाही. एवढे समजून जाल तर उलगडा होईल. मी काय म्हणत आहे ते तुम्हाला समजत आहे का?

**प्रश्नकर्ता :** हो, समजत आहे.

**दादाश्री :** काय समजत आहे?

**प्रश्नकर्ता :** फक्त पाहावे, त्याबरोबर तद्रूप व्हायचे नाही.

**दादाश्री :** असे नाही. तद्रूप झाले तरी लगेच आपण म्हणावे, 'नाही, असे होता कामा नाही.' हे सर्व चूक आहे. प्रकृती तर काहीही करील, कारण ती बेजबाबदार आहे. पण असे बोलल्यामुळे तुम्ही जबाबदारीतून मोकळे होता. आता यात काही अडचण आहे का?

**प्रश्नकर्ता :** काहीच अडचण नाही, पण जेव्हा क्रोध येतो तेव्हा भान राहत नाही.

**दादाश्री :** आपले ज्ञान असे आहे की ते भानावर ठेवते. त्यामुळे मग तो प्रतिक्रमण करतो, सगळे काही करतो. तुम्हाला भान असते की नसते?

**प्रश्नकर्ता :** असते, दादा.

## त्याला प्रत्याख्यान म्हणतात

**प्रश्नकर्ता :** जर चुकीबद्दल मन:पूर्वक प्रतिक्रमण केले, खूप चांगले केले, पण निश्चय चांगला केला नसेल तर?

**दादाश्री :** निश्चय हा प्रत्याख्यानासारखाच आहे. निश्चय करणे ही उत्तम गोष्ट आहे. निश्चय केला नाही आणि फक्त प्रतिक्रमण केले तर ती चूक तर संपली, पण ती पुन्हा होईल, तेव्हा पुन्हा संपवावी लागेल. आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान. प्रत्याख्यान म्हणजे पुन्हा करणार नाही. प्रत्याख्यानाचा अर्थ आहे की पुन्हा असे करणार नाही. अर्थात असा निश्चय करतो ही फार चांगली गोष्ट आहे.



# [ 22 ]
# चिकट फाइलींचा निकाल

## हिशोब असेल त्यानुसार चुकता केला जातो

**प्रश्नकर्ता :** त्यांच्या फाइल नं 1 ला अजून राग (मोह, आसक्ती) आहे ना? त्यामुळेच सगळे होत असते.

**दादाश्री :** कसला राग आहे?

**प्रश्नकर्ता :** हा माझा भाऊ आहे. त्याच्याविरुद्ध कोणी बोलले तर त्याच्यासमोर थोडेसे...

**दादाश्री :** तो सर्व तर भरलेला माल आहे, त्यामुळे असे होते. पण नंतर जर त्याने प्रतिक्रमण केले तर त्याला शुद्ध उपयोग असे म्हणतात. शुद्ध उपयोग कशाला म्हणतात? प्रतिक्रमण करणे याला शुद्ध उपयोग म्हणतात. शुद्ध उपयोगाच्या हेतूने प्रतिक्रमण करतो ना? त्यात त्याचा काय हेतू आहे? शुद्ध उपयोगाचा. तुमची दोन नंबरची फाइल देखील जोरदारच आहे ना?

**प्रश्नकर्ता :** आम्ही ती जोरदार आहे असे मानतच नाही. ती जोरदार नाहीच. आणि आम्ही जर फाइल बद्दलच बोलत बसलो तर आम्हालाच दोष लागेल ना?

**दादाश्री :** लागेल! फाइलबद्दल बोलावेच का? आपल्याला

तिच्याशी काय देणेघेणे? ती फाइल आहे. कर्माच्या उदयानुसार हिशोब चुकता होत असतो. जेवढा ऋणानुबंध आहे तितका तो चुकता केला जातो.

## चिकट कर्मांसाठी प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** समभावाने निकाल करता करता सुद्धा अतिक्रमण होते.

**दादाश्री :** त्यासाठी प्रतिक्रमणाचे औषध दिले आहे ना! अरे, काही होत नसेल तरी हरकत नाही. आलोचना केली नाही तरी मी त्यांना माफ करतो. कारण मला समजते की आजकाल लोकांना चैनच पडत नाही, असे लोक काय आलोचना करणार? त्या ऐवजी त्यांना प्रतिक्रमण करू दे ना!

**प्रश्नकर्ता :** पण त्यात प्रत्याख्यान पण करावे लागते ना?

**दादाश्री :** अरे, प्रत्याख्यान पण नाही केले तरी चालेल. आजकालची ही सदैव बेचैन माणसे! अतिक्रमण केले तर प्रतिक्रमण (तरी) करतील.

आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान पूर्ण जमत नसेल, तर फक्त प्रतिक्रमण केले तरी खूप झाले. चिकट फाइलींसाठी वारंवार प्रतिक्रमण करत राहिले, दोषांसाठी प्रतिक्रमण करत राहिले तर त्याचे डिझाइन तर राहील, पण नुसते हात लावताच ते विस्कटून जाईल, गळून पडेल. वारंवार प्रतिक्रमण केल्यामुळे त्यांच्यात जो चिकटपणा होता तो उरणार नाही. चिकटपणा पूर्णपणे नष्ट होईल. नाही तर एरवी हाताने घासून-घासून देखील तो चिकटपणा जाणार नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे चिकट कर्मांचा क्षय करण्यासाठी प्रतिक्रमणे करायला हवीत?

**दादाश्री :** दुसरा काही उपायच नाही. आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यानाशिवाय उपायच नाही. आलोचना म्हणजे 'दादां'ची आठवण करून, 'माझ्याकडून अशी चूक झाली आहे आणि अशी चूक मी पुन्हा करणार नाही.' एवढे प्रत्याख्यान एक वेळा करावे, बस! हाच उपाय, दुसरा उपायच नाही.

## समभावाने निकाल करण्याचा भावच करावा

पुष्कळ जण मला म्हणतात, 'दादा, समभावाने निकाल करण्याचा प्रयत्न करतो, पण तसे होतच नाही!' अशांना मी म्हणतो, 'अरे बाबा, समभावाने निकाल करायचा आहे असे नाही! तुला समभावाने निकाल करण्याचा भावच बाळगायचा आहे. समभावाने निकाल होईल की नाही हे तुझ्या आधीन नाही. तू फक्त माझी आज्ञा पाळ ना! त्यामुळे तुझी बहुतेक सर्व कामे होऊन जातील, आणि जर झाली नाही तर ते निसर्गाच्या आधीन आहे.'

आमची फक्त एवढीच इच्छा आहे की, 'मला समभावाने निकाल करायचा आहे.' एवढा निश्चय तू कर. मग तसे झाले की नाही झाले ते पाहण्याची आम्हाला गरज नाही. हे नाटक बघत किती वेळ बसावे? याचा शेवट कधी होईल? आपण तर पुढे चालत राहायचे. कदाचित समभावाने निकाल होणारही नाही. होळी पेटली तर पेटली, नाही तर पुढे जाऊन पेटवूया. असे भांडत बसून ती थोडीच पेटेल? आपण काड्या पेटवल्या, दुसरे काही पेटवले, मग नंतर आपले काय काम? तेव्हा सोडा आता आणि पुढे चालू लागा.

संसारी लोकांना मी ज्ञान दिले आहे, मी काही त्यांना बुवा व्हायला सांगितलेले नाही, पण ज्या फाइल्स आहेत त्यांचा समभावाने निकाल करायला सांगितले आहे, आणि प्रतिक्रमण करायला सांगितले आहे. एवढेच दोन उपाय सांगितले आहेत. या दोन गोष्टी केल्यात तर तुमच्या दशेत कोणी अडचणी आणू शकणार नाही. उपाय सांगितले नसते तर किनाऱ्यावर उभे राहताच येणार नाही ना! किनाऱ्यावर धोका आहे.

## त्यासाठी प्रतिक्रमणाची आवश्यकताच नाही

**प्रश्नकर्ता :** इतर सर्व फाइलींचा तर आम्ही समभावाने निकाल करू शकतो पण या फाइल नं 1 चा समभावाने निकाल कसा करावा ते जरा सविस्तर समजावून सांगा ना? कारण सगळी ढवळाढवळ फाइल नं 1 चीच तर आहे.

**दादाश्री :** त्या ढवळाढवळींना पाहिल्यानेच त्या संपतील, फाइलच्या रूपाने पाहिल्यानेच. मग वाकडी-तिकडी कशीही असो, पण त्याला फाइलबरोबर जास्त कटकट होणारच नाही, पाहिल्यानेच सर्व निघून जाईल. समोरच्या फाइलने जर दावा लावला तर प्रतिक्रमण करावे लागते. पण यात तर दावा करणारा कोणीच नाही ना? दावा करणारा कोणी नाही म्हणून पाहिल्यानेच ते सर्व निघून जाईल. मनात वाईट विचार आले, उलट-सुलट विचार आले, बुद्धी वाईट झाली, हे सगळे फक्त पाहत राहावे. जे काही कार्य करत असेल त्याबद्दल हरकत नाही, आपण फक्त ते पाहत राहावे.

हा तर सगळ्यात सरळ मोक्षमार्ग आहे, सगळ्यात सोपा मोक्ष!

**प्रश्नकर्ता :** पाहत राहावे म्हणजे त्याच्याशी सहमत व्हायचे नाही, असा अर्थ का?

**दादाश्री :** सहमत व्हायचा प्रश्नच नाही. पाहणारा सहमत नसतोच. होळीला पाहणारा भाजतो का कधी?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** प्रचंड मोठी होळी पेटली असेल पण तिला डोळ्यांनी पाहिले तर डोळ्यांना काही होईल का?

**प्रश्नकर्ता :** पण दादा, माझ्याकडून ढवळाढवळ झाली आणि मी ती पाहिली आणि जाणली, पण त्यामुळे समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले तर मला त्या व्यक्तीसाठी प्रतिक्रमण करावे लागेल ना?

**दादाश्री :** त्याचे प्रतिक्रमण तर करावेच लागेल. अतिक्रमण का केलेत? समोरची व्यक्ती दु:खी होईल असे काहीच करता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** माझी मुलगी रोज प्रतिक्रमण करते पण तिच्यात सुधारणा दिसत नाही.

**दादाश्री :** कारण खूप माल भरलेला आहे, जबरदस्त माल भरलेला आहे. प्रतिक्रमण करते हाच पुरुषार्थ आहे.

**प्रश्नकर्ता :** पुष्कळ माल भरलेला आहे असे म्हणणे म्हणजे समर्थन केल्यासारखे होत नाही का?

**दादाश्री :** नाही, नाही, यात समर्थनाचा प्रश्नच नाही! समर्थन होतच नाही. सारे जग प्रतिक्रमण करत नाही. एक तर दु:ख देतात आणि म्हणतात 'मी बरोबरच केले आहे.'

## समोरच्याचीच चूक दिसते

**प्रश्नकर्ता :** दादा, खूप वेळा मला असे वाटते की माझी काहीच चूक नाही. कधी तरी माझी चूक आहे याची मला जाणीव होते आणि खूप वेळा माझी काहीच चूक नाही, 'त्यांचीच' चूक आहे असे वाटते.

**दादाश्री :** तुला असे वाटते? प्रतिक्रमण करताना असे वाटते?

**प्रश्नकर्ता :** पण मग जेव्हा 'त्याची' बेचैनी-अशांती वाढते तेव्हा वाटते की आपल्या निमित्ताने असे होता कामा नये.

**दादाश्री :** पण 'माझी चूक झाली' असे समजून प्रतिक्रमण करायला हवे.

**प्रश्नकर्ता :** पण मला माझी चूक आहे असे वाटतच नाही. त्यांचीच चूक आहे असे वाटते.

**दादाश्री :** चूक असल्याशिवाय कोणी दु:खी होतच नाही! आपली चूक असते म्हणूनच दुसरा दु:खी होतो.

**प्रश्नकर्ता :** मला तर असेच वाटते की त्यांची प्रकृतीच तशी आहे म्हणून त्यांना तसे वाटते.

**दादाश्री :** प्रकृतीला अशी गृहीत धरू नये. हे इतर सगळे लोक म्हणतात की चांगली प्रकृती आहे आणि फक्त तूच म्हणतेस की वाईट प्रकृती आहे. पण तोही ऋणानुबंध आहे, हिशोब आहे.

**प्रश्नकर्ता :** मला असे वाटते की त्यांना कटकट करायची सवयच झाली आहे.

**दादाश्री :** पण ते असे करतात त्यात तुझीच चूक आहे. चूक तुझीच आहे. माझ्याकडून माझ्या आई-वडिलांना दुःख का दिले गेले? यासाठी प्रतिक्रमण करायला हवे. दुःख होता कामा नये. आता मी त्यांना सुख देईन असे मनात यायला हवे. माझ्याकडून अशी कोणती चूक झाली की आई-वडिलांना दुःख झाले?

## तेव्हा संसार सुटतो

जेव्हा (दुसऱ्यांचे) दोष दिसणे बंद होते, तेव्हा संसार सुटतो. आपल्याला कोणी शिव्या दिल्या, कोणी नुकसान केले, मारले तरी त्याचा दोष दिसत नाही, तेव्हा संसार सुटतो. नाही तर संसार सुटत नाही.

दुसऱ्यांचे दोष दिसणे आता बंद झाले आहे का?

**प्रश्नकर्ता :** हो दादा. कधी तरी दोष दिसले तर मी लगेच प्रतिक्रमण करतो.

## सत्संगामुळे चुका संपतात

जर आपल्या चुका संपत नसतील, तर त्या सत्संगाचा काही उपयोग नाही. सत्संगाचा अर्थच चुका संपणे. आपल्या निमित्ताने कोणाला दुःख होता कामा नये. जर दुःख झाले तर ती आपलीच चूक आहे आणि ती चूक आपण सुधारावी. आणि जर चूक समजत नसेल तर ते आपले उदयकर्म आहे, म्हणून सतत माफी मागावी. समोरची व्यक्ती समंजस असेल तर प्रत्यक्ष माफी मागावी आणि माफी मागितल्यामुळे तो उलट डोक्यावर बसणार असेल तर मनात माफी मागावी.

**प्रश्नकर्ता :** संसारात फाइलींचा समभावाने निकाल करताना कधी कधी इतका गोंधळ उडतो की प्रतिक्रमण-सामायिक करण्याचा विचारच मनात येत नाही. त्याला *पोल* (बेपर्वाई) म्हणायचे का?

**दादाश्री :** त्याला *पोल* म्हणत नाहीत. आपली इच्छा असते पण आपण करत नाही त्याला *पोल* म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** ज्या चुका झाल्या आहेत त्यांची कधी ना कधी प्रतिक्रमणे करावी लागतीलच ना?

**दादाश्री :** काही हरकत नाही. चुका ओळखल्या तरी खूप झाले. प्रतिक्रमण तर तुमच्यामुळे कोणाला जास्त दु:ख झाले असेल तेव्हा करावे.

आपला हा अक्रम मार्ग आहे, हा कर्म संपवल्याशिवायचा मार्ग आहे, म्हणून अशी निर्बलता आल्याशिवाय राहत नाही. आता जेव्हा कधी कुणाला अशी मानसिक निर्बलता उत्पन्न झाली तेव्हा फक्त मनाचे प्रतिक्रमण करावे. त्यासाठी खोलवर प्रतिक्रमण करण्याची गरज आता उरली नाही आणि प्रतिक्रमण केल्यावर ते शुद्ध होईल. परंतु जो माल भरलेला आहे, तो बाहेर पडल्याशिवाय तर राहणारच नाही ना! निर्बलता उत्पन्न झाली तरी पण जो मन-वचन-कायेने प्रतिक्रमण करतो तो दोषी नाही. प्रतिक्रमण करत असल्यामुळे तो दादांच्या आज्ञेतच आहे. पण त्याला ताबडतोब एवढी शक्ती कुठून मिळणार? म्हणजेच अतिक्रमण तर होईल. पण मग त्यासाठी प्रतिक्रमण करत राहायचे. तरी पण आपले ज्ञान असे आहे की ते आपल्याला कोणत्याही संयोगातून वाचवू शकते, तेव्हाच त्याला ज्ञान म्हणतात. आपला हा वीतराग मार्ग आहे. यात जोपर्यंत आवडती गोष्ट असते तोपर्यंत क्रमण होते. पण नावडते घडले की ते प्रतिक्रमण करून धुऊन टाकावे.

## आज्ञा भंग झाल्या? तर प्रतिक्रमण करा

मार्ग हा आहे की 'दादांच्या आज्ञेत राहायचे आहे', असा निश्चय करून दुसऱ्या दिवसापासून सुरू करा. आणि जिथे जिथे आज्ञेत राहता आले नसेल त्यासाठी प्रतिक्रमण करा. समभावाने निकाल करून घरातील प्रत्येक सदस्याला संतुष्ट करा. तरी पण जर घरातील लोक आरडाओरडा करत असतील (असंतुष्ट असतील) तर ते तुम्ही पाहत राहा. तुमचा मागील हिशोब आहे. म्हणून ते असंतुष्ट आहेत. आणि हा निश्चय तर तुम्ही आजच केला आहे. अत: घरच्या सर्व लोकांना प्रेमाने जिंका. मग तुमचे तुम्हालाच कळेल की आता सर्व ठीक चालले आहे. तरी पण जेव्हा घरातील लोक स्वत: असे म्हणतील, तेव्हाच मानता येईल. शेवटी तर घरातील लोक त्याच बाजूने असतात.

## स्वतः 'जज' आणि 'चंदू' आरोपी

कसेही पुद्‌गल निघत असेल, कोणाशी भांडत असेल, कोणाशी मारामारी करत असेल, तरीदेखील तुम्ही ते पाहत राहिले तर तुमची जबाबदारी नाही. कोणी म्हणेल की ज्ञान घेतल्यानंतरही हा मारामारी का करतो? तर तुम्ही त्याला काय सांगाल? पूर्वी ज्या भावाने कर्मबंधन पडले होते त्याच भावाने आता निर्जरा होत आहे. (निर्जरा आत्मप्रदेशांतून कर्माचे वेगळे होणे). तेव्हा त्या निर्जरेला पाहत राहा. तरीही निर्जरा होत असताना मात्र कोणावर अतिक्रमण होता कामा नये, याची खबरदारी घ्यायला हवी. अतिक्रमण केले म्हणून प्रतिक्रमण करा. प्रतिक्रमण चंदुभाईने करायचे आहे. तुम्हाला काहीच करण्याची आवश्यकता नाही. जजने (न्यायाधीशाने) काहीच करायचे नाही. जो आरोपी आहे, त्याच्याकडूनच करून घ्यायचे आहे. जो खातो तोच आरोपी. जो खातो तोच संडासाला पण जातो. जज तर खात नाही, संडासालाही जात नाही, तो तर फक्त जजमेंट देत राहतो. आरोपीचा गुन्हा हा माझाच गुन्हा आहे असे जज कधीच म्हणत नाही. आपले महात्मा जर कधी असे म्हणाले तरी ती चूकच म्हणायची ना? खूप सूक्ष्म गोष्ट आहे. सूक्ष्म रूपात आहे.

जो कचरा माल भरलेला आहे. त्याची निर्जरा होत राहते. पण नवीन आवक होत नसल्यामुळे हलके वाटू लागले आहे. संध्याकाळी पुन्हा जड वाटते, दुसऱ्या दिवशी पुन्हा हलके वाटते, पुन्हा संध्याकाळी जड वाटते, पुन्हा हलके वाटते. असे करत करत निर्जरा होत होत माल रिकामा होतो.

## टाकी रिकामी कधी होईल?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणामुळे मोक्ष मिळतो का? आता मोक्षासाठी प्रतिक्रमण करण्याची गरज आहे का?

**दादाश्री :** अतिक्रमण केले असेल तरच प्रतिक्रमणाची गरज आहे. नाही तर प्रतिक्रमणाची गरज नाही. अतिक्रमण करण्याचा स्वभाव असेल तरच प्रतिक्रमण करावे. आणि असा स्वभाव देखील किती दिवस राहतो? कितीही उपद्रवी व्यक्ती असली तरी अकरा ते चौदा वर्षांपर्यंतच त्याची

टाकी भरलेली राहते. नंतर तर ती रिकामीच झालेली असते. भरलेली टाकी किती दिवस चालेल? टाकी भरलेली असेल पण त्यात जर नवीन काही भर टाकली नाही तर ती किती दिवस चालेल? तरी पण अतिक्रमण झाले असेल तर प्रतिक्रमण करणे चांगले आहे.

## ढवळाढवळ 'व्यवस्थित' आहे का?

तुझ्याकडून खूप ढवळाढवळ होते ना?

**प्रश्नकर्ता :** कधी तरी होते.

**दादाश्री :** कधी तरी कोणी मेला तर?

**प्रश्नकर्ता :** ढवळाढवळ होते ती 'व्यवस्थित'च्या आधीन आहे ना?

**दादाश्री :** 'जे घडून गेले' ते व्यवस्थितच्या आधीन आहे, पण जे अजून व्हायचे आहे ते व्यवस्थितच्या आधीन नाही. जे होऊन गेले त्याची काळजी करू नका. त्यासाठी प्रतिक्रमण करा. चूक झाली तर ज्याने ती चूक केली, त्याला सांगा की, 'प्रतिक्रमण कर.' चंदुभाईने केले आहे, म्हणून चंदुभाईला सांगा की, 'तू प्रतिक्रमण कर.'

**प्रश्नकर्ता :** आम्ही व्यवस्थितच्या ताब्यात सोडून देतो, मग आम्हाला कोणता पुरुषार्थ करायचा आहे?

**दादाश्री :** 'चंदुभाई' काय करत आहे हे पाहत राहणे, हाच आपला पुरुषार्थ. चंदुभाईचा पुतळा दिवसभर काय काय करत आहे, हे पाहत राहणे हाच पुरुषार्थ!

हे पाहत असताना मधूनच तुम्ही 'काय हो चंदुभाई, तुम्ही मुलाशी इतके कठोर का वागलात? म्हणून तुम्ही प्रतिक्रमण करा.' असे तुम्ही चंदुलालला सांगू शकता. तुम्ही अतिक्रमण केले म्हणून आता प्रतिक्रमण करा. असे अधूनमधून करू शकता.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण तर होऊनच जाते.

**दादाश्री :** मी तेच म्हणत आहे ना! प्रतिक्रमण होऊनच जाते.

अतिक्रमणाबरोबर प्रतिक्रमण पण आपोआपच होत असते. म्हणून पाहत राहायचे आहे. प्रतिक्रमण होत आहे ते आपण पाहत राहावे.

## 'काय घडले', ते पाहत राहा

आपल्या या अक्रम मार्गात भावकर्म तर नाहीच. आपण तर भावकर्मातून मुक्त झालो आहोत. भावकर्म-द्रव्यकर्म-नोकर्म यातून मुक्त झालेले शुद्धात्मा आहोत. म्हणजे तुम्ही शुद्धात्मा आणि हे 'चंदुभाई', दोन्ही वेगळे आहात. प्रकृतीला पाहत राहणे याला पुरुष म्हणतात. पुरुष होऊन जो पुरुषार्थ करतो, त्याला मोक्षाचा पुरुषार्थ म्हणतात.

भले कसलेही कृत्य केले आणि परिणामी त्याचे भयंकर फळ मिळाले, तरीही त्यावेळी 'व्यवस्थित'च्या ज्ञानात राहत असेल तर त्याला प्रतिक्रमण करण्याची गरज नाही.

व्यवस्थितचा अर्थ काय? 'चंदुभाई काय करत आहे, ते पाहतच राहणे.' तोच व्यवस्थितचा अर्थ. 'चंदुभाई'ने कोणाचे दोन लाखांचे नुकसान केले ते पण पाहत राहावे. असे का केले? असा विचार करून आपण त्यात तन्मयाकार व्हायचे नाही. पण त्यासाठी प्रतिक्रमण करावे. प्रत्यक्षात हे सगळ्यांना समजत नाही. 'व्यवस्थित' म्हणजे जे घडले तेच करेक्ट, पण त्याला पाहत राहिलात तर तुम्ही मुक्त!

## प्रतिक्रमण करताच समोरच्यावर परिणाम

**प्रश्नकर्ता :** जेव्हा संयोगांबरोबर तन्मयाकार होतो, तेव्हा प्रतिक्रमण करण्यासाठी अवकाश मिळत नाही.

**दादाश्री :** अवकाश तर जेव्हा समोरच्या संयोगाला (व्यक्तीला) दुःख होत असेल, तेव्हा आपण चंदुभाईला सांगावे, 'चंदुभाई, प्रतिक्रमण करा, नाही तर ही व्यक्ती वैर निर्माण करील. या व्यक्तीबरोबर अतिक्रमण झाले आहे असे वाटत आहे. त्याचा चेहरा आपल्याकडे बघून संतापलेला वाटत आहे, म्हणून प्रतिक्रमण करा.' तेव्हा चंदुभाई विचारतील 'एक प्रतिक्रमण करू का?' तेव्हा म्हणावे 'नाही, चांगले पाच-पंचवीस-पन्नास वेळा करा, म्हणजे मग उद्या त्याचा चेहरा चांगला दिसेल.' आपण

प्रतिक्रमण करतो आणि दुसऱ्या दिवशी त्या व्यक्तीचा चेहरा चांगला दिसतो. एकदा असे करून बघ. तुला असा अनुभव आला आहे का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** असे होय? मग असा अनुभव चाखूनसुद्धा तू असाच राहिला आहेस?

**प्रश्नकर्ता :** आम्ही ही जी प्रतिक्रमणे करतो, ती समोरच्या व्यक्तींपर्यंत पोहोचतात का?

**दादाश्री :** त्याला तसे कळत नाही. त्याला कळो न कळो, पण त्याच्यावर परिणाम होतोच. त्याचे आपल्याबद्दलचे वाईट भाव नरम होत जातात.

आणि जर आपण मनातून त्याच्यावर चिडत राहिलो तर त्याप्रमाणे त्याच्या मनातील वाईट भाव पण जास्त तीव्र होऊ लागतात. त्यालाही वाटत राहते की यांच्याबद्दल माझे भाव इतके वाईट का होऊ लागले आहेत?

**प्रश्नकर्ता :** त्या फाइल्स परत दुसऱ्या जन्मात आपल्याला येऊन चिकटणार तर नाहीत?

**दादाश्री :** कशाला? दुसऱ्या जन्मात कशाला? आपण इथल्या इथेच इतके सारे प्रतिक्रमण करून घ्यावे. सवड मिळाली की त्याच्यासाठी सतत प्रतिक्रमण करत राहावे.

## घरातील फाइलींचे प्रतिक्रमण

आता तुझ्याकडून ही प्रतिक्रमणे केली जातात का?

**प्रश्नकर्ता :** हो, केली जातात.

**दादाश्री :** असे होय?

**प्रश्नकर्ता :** घरातील फाइलीच तर मुख्य आहेत ना दादाजी?

**दादाश्री :** तुझ्या घरात किती फाइल्स आहेत?

**प्रश्नकर्ता :** या दोनच फाइली आहेत. सगळ्यात जास्त प्रतिक्रमणे यांच्यासाठीच करायची आहेत.

**दादाश्री :** तुला एकच मुलगा आहे ना?

**प्रश्नकर्ता :** हो. मुख्य म्हणजे त्या मुलासाठीच प्रतिक्रमण करतो, आणि फाइल नंबर-2, त्याची तर सर्वात जास्त प्रतिक्रमणे!

**दादाश्री :** असे होय?

**प्रश्नकर्ता :** हो, (मुलासाठी) खूप प्रतिक्रमणे केली म्हणून मुलगा आता शांत झाला आहे. अगदीच शांत झाला आहे आणि आता पूर्ण सहकार्य करत आहे.

मी माझ्या भावासाठीही खूप प्रतिक्रमणे केली, त्यामुळे सर्वांमध्ये परिवर्तन झाले आहे. मी रोजच प्रतिक्रमण करतो.

**दादाश्री :** प्रतिक्रमण केल्याने समोरच्या व्यक्तीची परिणती बदलते. असे अनुभवास आल्यानंतर लोक हे सोडतील का? 'दिस इज दि कॅश (रोख) बँक.' प्रतिक्रमणाला त्वरित फळ देणारी 'कॅश बँक' असे म्हणतात. तुम्हाला खूप जास्त प्रतिक्रमणे करावी लागतात ना?

**प्रश्नकर्ता :** खास करून घरच्या लोकांसाठीच जास्त प्रतिक्रमणे करावी लागतात.

**दादाश्री :** किती प्रतिक्रमणे होऊ शकतात?

**प्रश्नकर्ता :** पन्नास-शंभर होऊ शकतात. माझ्या घरी एक-दोन खूप चिकट फाइली आहेत. त्यांच्यासाठी करतो.

## 'असे' प्रतिक्रमण करा

**प्रश्नकर्ता :** मनाने, वाणीने, वर्तनाने, खोटे बोलण्याने (इतरांना) जी सारी दुःखे पोहोचली आहेत, त्यासाठी आपल्या साक्षीने सर्व प्रतिक्रमणे केली, तर ते सारे दोष धुतले जातील ना?

**दादाश्री :** प्रतिक्रमण केले असे कधी म्हणता येईल? की तुम्ही

उघडपणे प्रतिक्रमण करा, त्याच्यासमोर करा किंवा एकट्याने करा, पण जेव्हा प्रतिक्रमण बोलेल (समोरच्यावर परिणाम दिसेल) तेव्हा समजा की तुम्ही प्रतिक्रमण केले. हो, आम्ही पण एकट्याने प्रतिक्रमण करतो पण ते प्रतिक्रमण तिसऱ्या दिवशी बोलते तेव्हा आमच्या लक्षात येते (की समोरच्यावर त्याचा परिणाम झाला). तुम्ही मनातल्या मनातच अशी प्रतिक्रमणे करा की त्यांना कळणार नाही, पण तरी त्यामुळे त्यांच्या मनात तुमच्याबद्दल आकर्षण निर्माण होईल.

## प्रतिक्रमणाचा परिणाम शुद्धात्म्यापर्यंत पोहोचतो का?

**प्रश्नकर्ता :** आम्ही जे प्रतिक्रमण करतो, त्या प्रतिक्रमणाच्या परिणामामागे हाच मूळ सिद्धांत आहे ना, की आपण समोरच्या व्यक्तीच्या शुद्धात्म्याला पाहतो आणि म्हणून त्याच्याबद्दल आपले जे वाईट भाव आहेत ते कमी होतात?

**दादाश्री :** आपले वाईट भाव संपतात. हे सर्व आपल्यासाठीच आहे. समोरच्याशी काही देणेघेणे नाही. समोरच्याला शुद्धात्मा स्वरूपात पाहण्यामागे हाच हेतू आहे की आपण शुद्ध दशेत, जागृत दशेत आहोत.

**प्रश्नकर्ता :** मग त्याच्या मनात आपल्याबद्दल जे वाईट भाव आहेत ते कमी होतात ना?

**दादाश्री :** नाही, कमी होत नाहीत. तुम्ही प्रतिक्रमणे केलीत तर होतात. नुसते 'शुद्धात्मा' पाहून होत नाहीत तर प्रतिक्रमण केलीत तर होतात.

**प्रश्नकर्ता :** आम्ही प्रतिक्रमण करतो तेव्हा समोरच्याच्या आत्म्यावर त्याचा परिणाम होतो का?

**दादाश्री :** होतो ना, परिणाम होतो.

(शुद्धात्मा) पाहूनसुद्धा फायदा होतो, पण लगेच होत नाही. मग हळूहळू होतो! कारण शुद्धात्म्याच्या रूपात कोणी पाहिलेलेच नाही. केवळ चांगली व्यक्ती किंवा वाईट व्यक्ती अशा प्रकारेच पाहिले आहे.

## वाघसुद्धा हिंसक भाव विसरतो

**प्रश्नकर्ता :** आप्तसूत्रात म्हटले आहे की 'जर आपण वाघासाठी प्रतिक्रमण केले तर वाघसुद्धा आपला हिंसक भाव विसरतो.' तर ते काय आहे?

**दादाश्री :** हो, वाघ आपला हिंसक भाव विसरतो म्हणजे आपली वाघाची भीती निघून जाते.

**प्रश्नकर्ता :** आपली भीती निघून जाते हे बरोबर, पण त्याच्या आत्म्यावर काही परिणाम होतो का?

**दादाश्री :** काहीच होत नाही. आपली भीती गेली की तो (हिंसक भाव) गेला.

**प्रश्नकर्ता :** पण त्याचा हिंसक भाव निघून जातो असे तुम्ही म्हणालात ना?

**दादाश्री :** हो, हिंसक भाव निघून जातो.

**प्रश्नकर्ता :** तो कसा जातो?

**दादाश्री :** आपली भीती गेली की हिंसक भाव संपतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे याचा अर्थ असा झाला ना, की त्याच्या आत्म्यावर परिणाम झाला?

**दादाश्री :** आत्म्यावर सरळ परिणाम होतो. आत्म्यावर तर परिणाम होतोच होतो. संपूर्ण परिणाम होतो.

जर वाघासाठी प्रतिक्रमण केले तर वाघ पण आपल्या म्हणण्यानुसार काम करील. वाघात आणि माणसात काहीच फरक नाही. फरक तुमच्या स्पंदनांचा आहे. त्या स्पंदनांचा त्याच्यावर परिणाम होतो. जोपर्यंत तुमच्या मनात 'वाघ हिंसक आहे' हा भाव राहील तोपर्यंत तो हिंसकच राहील. आणि जर तुमच्या मनात 'वाघ हा शुद्धात्मा आहे' असा भाव राहील, तर तो शुद्धात्माच आहे आणि तो अहिंसक होईल. सर्व काही घडू शकते.

## मूळ शुद्धात्म्यापर्यंत पोहोचते

एकदा जर आंब्यांच्या झाडावर माकडे आली आणि त्यांनी आंबे तोडले तर आपले परिणाम कुठपर्यंत बिघडतात? असे वाटते की त्यापेक्षा तर आंब्याचे झाड कापून टाकलेलेच बरे. इतके टोकाला आपण पोहोचतो. तर आता भगवंतांच्या साक्षीने निघालेली ही वाणी कधी वाया जाईल का? म्हणजे हे सर्व असे आहे. जर परिणाम बिघडले नाहीत तर मग काहीच होत नाही. सगळे शांत होते, बंद होते.

हे सर्व आपलेच परिणाम आहेत. तुम्ही आजपासून कोणाबद्दल स्पंदन करणे, कोणाबद्दल किंचितही विचार करणे बंद करा. जर कोणाबद्दल विचार आले तर लगेच प्रतिक्रमण करून धुऊन टाका, म्हणजे पूर्ण दिवस कोणाच्याही स्पंदनाशिवाय गेला! अशा प्रकारे दिवस गेला तरी खूप झाले, हाच पुरुषार्थ आहे.

आपण समोरच्याच्या कोणत्या आत्म्याबद्दल बोलत आहोत? आपण कोणाचे प्रतिक्रमण करतो हे तुम्हाला माहीत आहे का? प्रतिष्ठित आत्म्याचे (प्रतिक्रमण) करत नाही, तर त्याच्या मूळ शुद्धात्म्याचे प्रतिक्रमण करतो. त्याच्या शुद्धात्म्याच्या उपस्थितीत, त्याच्याबरोबर जो दोष घडला त्यासाठी आपण प्रतिक्रमण करतो. म्हणजे आपण त्याच्या शुद्धात्म्याची क्षमा मागतो. त्याच्या प्रतिष्ठित आत्म्याशी आपले काहीच देणेघेणे नाही.

## अशुद्ध पर्यायांचे शुद्धीकरण

हे ज्ञान मिळाल्यावर नवीन पर्याय अशुद्ध होत नाहीत, जुन्या पर्यायांना मात्र शुद्ध करावे, आणि समता राखावी. समता म्हणजे वीतरागता. नवीन पर्याय बिघडणार नाहीत, नवीन पर्याय शुद्धच राहतील. जुने पर्याय अशुद्ध होतात, त्यांचे शुद्धीकरण करावे. आमच्या आज्ञेत राहिल्यामुळे जुन्या पर्यायांचे शुद्धीकरण होते, आणि समतेत राहावे.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, ज्ञान घेण्यापूर्वी या जन्माचे जे पर्याय बांधले गेले आहेत, त्यांचे निराकरण कसे करावे?

**दादाश्री :** जोपर्यंत तुम्ही जिवंत आहात तोपर्यंत पश्चात्ताप करून

त्यांना धुऊन टाकावे. परंतु त्यातील थोडेच धुतले जातील, पूर्णपणे निराकरण होणार नाही. पण सैल तर निश्चितच होतील. सैल झाली म्हणजे पुढच्या जन्मी जरा असा हात लावल्याबरोबर लगेच गाठ सुटेल!

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आपले ज्ञान मिळण्यापूर्वी जर नरकाची कर्मबंधने झाली असतील तर नरकात जावे लागेल ना?

**दादाश्री :** हे ज्ञानच असे आहे की सर्व पापे भस्मीभूत होतात, कर्मबंधने संपतात. नरकात जाण्यायोग्य व्यक्तींनी पण जिवंत असतानाच सर्व प्रतिक्रमणे करून घेतली तर त्यांची कर्मे धुतली जातील. पोस्टात पत्र टाकण्यापूर्वी जर तुम्ही असे लिहिले की वरचे वाक्य लिहिताना जरा माझे डोके ठिकाणावर नव्हते, तर त्याचा परिणाम होत नाही.

**प्रश्नकर्ता :** प्रायश्चित्त केल्यामुळे कर्मबंध सुटतात का?

**दादाश्री :** हो, सुटतात. काही ठराविक प्रकारचे कर्मबंध असे आहेत की त्या कर्मांचे प्रायश्चित्त केल्याने त्याच्या घट्ट गाठी सैल होतात. आपल्या प्रतिक्रमणात खूप शक्ती आहे. दादांना हजर ठेवून केलेत तर तुमचे काम होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** जन्मापासून ते मृत्यूपर्यंत मन-वचन-काया हे सर्व निर्जरा स्वरूपात आहे परंतु जर निर्जरा चालू असताना नवीन भाव निर्माण झाले तर त्याला अतिक्रमण म्हणायचे का?

**दादाश्री :** हो, त्या भावांचे तुम्ही शुद्धीकरण करा.

## हा न्याय म्हणजे जबरदस्त न्याय

कर्मांच्या धक्क्यांमुळे जितके जन्म व्हायचे असतील तितके होतील, कदाचित एक-दोन जन्म, पण त्यानंतर मात्र सीमंधर स्वामींपाशीच जावे लागेल. इथे पूर्वीचा जो हिशोब बांधला गेला आहे, थोडा चिकट (गाढ) झालेला हिशोब, तो आता संपून जाईल. त्याला तर गत्यंतरच नाही ना! हा तर रघा सोनाराचा तराजू (धर्मकाटा) आहे. न्याय, जबरदस्त न्याय, चोख न्याय, शुद्ध न्याय, प्युअर न्याय! त्यात पोलंपोल चालतच नाही.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्यामुळे कर्मांचे धक्के कमी होतात का?

**दादाश्री :** हो कमी होतात ना! लवकर सुटका होते.

## मृतात्म्यासाठी प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** एखाद्या व्यक्तीचा मृत्यू झालेला आहे, अशा व्यक्तीकडून क्षमा मागायची असेल तर ती कशी मागता येईल?

**दादाश्री :** त्याचा मृत्यू झाला असेल, परंतु जर त्याचा फोटो तुमच्याजवळ असेल, त्याचा चेहरा आठवत असेल तर करू शकता. चेहरा आठवत नसेल, पण नाव माहीत असेल तर नाव घेऊन सुद्धा करू शकता, तरी देखील ते त्याच्यापर्यंत पोहोचेल.

ज्या व्यक्तीबरोबर तुमचा गुंता निर्माण झाला असेल आणि त्या व्यक्तीचा मृत्यू झाला तर त्या व्यक्तीला आठवून गुंता धुऊन टाकायला हवा. असे केल्याने गुंता सुटेल आणि स्वच्छ होऊन निकाल होईल. आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करून गुंता सोडवावा. कारण जिवंत व्यक्तींची पण आठवण येते आणि मृत व्यक्तींची पण आठवण येते. ज्याची आठवण येते, त्यांच्यासाठी प्रतिक्रमण करायला हवे. कारण तुम्हाला हे माहीत आहे की प्रत्यक्षात 'तो' जिवंतच आहे, मरत नाही. यात त्याच्याही आत्म्याचे हित आहे. आणि तुम्ही प्रतिक्रमण करता त्यामुळे तुम्ही त्या गुंत्यातून सुटता.

ह्या शंभर रुपयांच्या कप-बशा आहेत, तर जोपर्यंत त्यांचा तुमचा हिशोब आहे, ऋणानुबंध आहे, तोपर्यंत त्या जिवंत राहतील. पण हिशोब संपल्यावर त्या कप-बशा फुटून जातील. फुटून गेल्या ते 'व्यवस्थित', त्यानंतर त्यांची आठवण करायची नाही. ही माणसे देखील कप-बशाच आहेत ना? असे वाटते की ती मरण पावली आहेत, पण ती मरत नाहीत, परत इथेच येतात. म्हणून तर आपण मृतांसाठी प्रतिक्रमण केले तर ते त्यांना पोहोचते. ते जिथे असतील, तिथे त्यांना ते पोहोचते.

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** मन-वचन-काया, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्म, मृत व्यक्तीचे नाव आणि त्याच्या नावाने असलेली सर्व माया, यापासून संपूर्ण वेगळा असलेल्या त्याच्या शुद्धात्म्याची आठवण करावी, आणि मग असे आठवावे की 'मी अशा चुका केल्या होत्या' (आलोचना). त्या चुकींचा मला पश्चात्ताप होत आहे, त्या चुकांसाठी मला क्षमा करा (प्रतिक्रमण), आणि 'अशा चुका पुन्हा करणार नाही, असा दृढ निश्चय करतो.' असे ठरवावे, (प्रत्याख्यान). 'तुम्हाला' चंदुभाईचे ज्ञाता-द्रष्टा राहायचे, आणि जाणायचे की चंदुभाईनी किती प्रतिक्रमणे केली, किती वेळा केली आणि किती चांगल्या प्रकारे केली.

## महात्म्यांची ती सर्व कर्मे निकाली

**प्रश्नकर्ता :** दादाजी, ज्ञान मिळाल्यावर सुद्धा कधी कधी मनात वाईट भाव येतात, तर काय करावे? असे का होते, दादाजी?

**दादाश्री :** हे पण कर्मामुळेच होत आहे. त्यात तुम्ही कर्ता नाहीत. विनाकारण स्वत:ला 'कर्ता' मानून तुम्ही त्रास करून घेत आहात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे असे वाईट भाव आले तरी फक्त पाहतच राहावे?

**दादाश्री :** वाईट म्हणता तीच मोठी जोखीम आहे. वाईट असे काही नसतेच. समोरच्याला दु:ख झाले तर, 'चंदुभाई, तुम्ही दु:ख का दिलेत? तर आता प्रतिक्रमण करा.' असे म्हणावे. भगवंतांकडे चांगले-वाईट असे काही नसते. हे सर्व समाजासाठी आहे.

महात्म्यांना भाव-अभाव होतात, पण ती सर्व निकाली कर्मे आहेत. भावकर्मे नाहीत. क्रोध-मान-माया-लोभ-राग-द्वेष आणि भाव-अभाव, ही सर्व निकाली कर्मे आहेत. त्यांचा समभावाने निकाल करायचा आहे. या कर्मांचा निकाल प्रतिक्रमणामुळे होईल. असाच निकाल होणार नाही.



# [ 23 ]
# मन शोक करते तेव्हा

## मानसिक प्रतिकाराचे काय?

**प्रश्नकर्ता :** जेव्हा कोणी आमचा अपमान करतो, तेव्हा कदाचित वाणीने प्रतिकार होत नसेलही, पण मनाने तर प्रतिकार चालूच असतो.

**दादाश्री :** त्या वेळी काय घडते त्याची हरकत नाही. अरे, शरीराने ही प्रतिकार झाला तरी हरकत नाही. कारण जितकी शक्ती असेल त्यानुसार व्यवहार होत असतो. ज्याच्यात संपूर्ण शक्ती उत्पन्न झालेली असते, त्याच्या मनाचा प्रतिकारसुद्धा बंद होऊन जातो. तरी आम्ही काय म्हणतो? जर मनाने प्रतिकार झाला, वाणीने प्रतिकार झाला आणि शरीरानेसुद्धा प्रतिकार झाला तर अशावेळी तिन्ही प्रकारचा कमकुवतपणा उत्पन्न होतो. म्हणून तेव्हा तिन्ही प्रकारचे प्रतिक्रमण करावे लागेल.

**प्रश्नकर्ता :** विचारांचे प्रतिक्रमण केले पाहिजे का?

**दादाश्री :** नाही, विचारांना पाहावे. त्यासाठी प्रतिक्रमणे करायची नसतात. जर कोणाबद्दल खूपच वाईट विचार आले, तर त्यासाठी मात्र प्रतिक्रमण करायला हवे. म्हणजे जेव्हा कोणाचे नुकसान करण्याचे विचार आले तरच करावे. असे सहज विचार आले, गायीचे, म्हशीचे वगैरे सर्व विचार आले तर ते आपल्या ज्ञानाने संपून जातील. ज्ञानपूर्वक पाहिले तर संपून जातील. त्या विचारांना फक्त पाहावे, त्यासाठी प्रतिक्रमणे

करायची नसतात. परंतु जर तुमचा बाण कोणाला लागला असेल (कोणाला दु:ख झाले असेल) तरच प्रतिक्रमण करावे.

तुम्ही इथे सत्संगाला येता आणि इथे जर काही लोक असे उभे असतील, तेव्हा जर तुमच्या मनात असा विचार आला की हे सगळे इथे का उभे आहेत? म्हणजेच जर तुमचे मनोभाव बिघडले तर त्या चुकीसाठी ताबडतोब प्रतिक्रमण करायला हवे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे असे मनोभाव बिघडले तरी पण प्रतिक्रमण करायला हवे?

**दादाश्री :** हो, मनात थोडासा अभाव आला, असे तसे विचार आले, मनात किंचितसा तिरस्कार आला तरी पण प्रतिक्रमण करायला हवे. मन बिघडले असे कधी म्हणायचे? फक्त मनच बिघडते असे नाही, तर संपूर्ण अंत:करण बिघडते. सर्व पार्लमेंटचा प्रस्ताव पास झाला की मग 'विरोधी' विचार येऊ लागतात. 'समोरच्याला असे करीन, तसे करीन', असे वाटू लागते. फक्त मनामुळे हे होत नाही. मन तर ज्ञेय आहे, वीतरागी स्वभावाचे आहे. मनोभाव बिघडले तर प्रतिक्रमण करावे. अंत:करणाच्या पार्लमेंटचा ठराव पास होणे आणि मन बिघडणे या दोन वेगवेगळ्या गोष्टी आहेत. आता जर त्यासाठी प्रतिक्रमण कराल तर मन पण शांत होईल. सगळ्या गोष्टींसाठी सतत प्रतिक्रमण करवून घेत राहावे!

**प्रश्नकर्ता :** दुपारी प्रतिक्रमण करवून घेतले होते.

**दादाश्री :** तरी पुन्हा पुन्हा करवीत राहावे. जितकी प्रतिक्रमणे करशील तितका तू आतून मजबूत होशील. जर वाईट विचार आले तर डाग पडेल, म्हणून विचार बिघडवू नका. एवढे समजून घ्या. आपल्या या सत्संगात तर 'विचार बिघडू नयेत' याकडे खास लक्ष द्यावे. विचार बिघडले तर सर्व काही बिघडले. मी पडेन असा विचार आला की पडलाच. म्हणून विचार येताक्षणीच ताबडतोब प्रतिक्रमण करा, आत्मस्वरूप व्हा. जर तुमच्या मनाला काही बोचेल असे असेल तर त्यासाठी प्रतिक्रमण करायला हवे. तुम्ही मला हार घातला, याचे प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. हे पण 'क्रेडिट' आहे, खूप मोठे 'क्रेडिट' आहे.

## भाव बिघडतात तेव्हा

तुम्ही आता येथे आलात आणि इथे खूप गर्दी आहे असे पाहून काहींच्या मनात असे विचार येतात की आताच हे कुठून आले? म्हणजे मनात असे विचार येतात पण बाहेरून मात्र ते असे म्हणतात, 'या, या, बसा.' आता उलट विचार आला तर त्याला अतिक्रमण म्हणतात. त्यासाठी प्रतिक्रमण करायला हवे.

बाहेर कसेही असो, मात्र आतील भाव बिघडता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** आत आणि बाहेर, दोन्ही ठिकाणी उत्तम असेल तर?

**दादाश्री :** ते तर सर्वात उत्तम! आणि कधी आतील भाव बिघडले तर प्रतिक्रमण करावे.

## सामूहिक प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणे कर्मफळाची करायची आहेत की सूक्ष्माची?

**दादाश्री :** सूक्ष्माची करायची आहेत.

**प्रश्नकर्ता :** विचारांची की भावांची?

**दादाश्री :** भावांची. विचारांच्या मागे भाव असतातच. अतिक्रमण झाले तर प्रतिक्रमण केलेच पाहिजे. मनात वाईट विचार आला, या ताईबद्दल वाईट विचार आला तर लगेच 'विचार चांगला असायला हवा' असे म्हणून तो विचार बदलला पाहिजे. मनात विचार आला की हा नालायक आहे, तर लगेच असा विचार का आला? त्याची लायकी-नालायकी पाहण्याचा अधिकार तुम्हाला नाही. सरसकट म्हणायचे असेल तर 'सगळे चांगले आहेत' असे म्हणावे. 'चांगले आहेत' असे म्हटले की मग कर्म दोष लागत नाही, मात्र नालायक आहे असे म्हटले तर त्याला अतिक्रमण म्हणावे लागेल, आणि त्यासाठी निश्चितच प्रतिक्रमण करावे लागेल.

म्हणून जर कधी परत असे विचार आले, तर तो भरलेला माल

आहे, त्यामुळे असे विचार तर येणार हे समजून घ्या. जसा स्टॉक असेल तसाच माल बाहेर पडत राहणार. एखाद्या व्यक्तीला अजिबात समज नसते पण ती मनात असे मानते की मी फार समंजस आहे. कारण तसाच स्टॉक होता. पण त्यामुळे त्याचे काही नुकसान होत नाही. त्यासाठी त्याला प्रतिक्रमण करायची गरज नाही.

विचार तर येणारच पण त्यांचे निर्माल्य करून टाकावे. प्रतिक्रमण करावे. विचार निर्जीव असतात.

त्याच्या शुद्धात्म्यापर्यंत कसे पोहोचेल? तुम्ही असे म्हणावे, 'देहधारी नगीनभाई, नगीनभाईची माया, नगीनभाईच्या मन-वचन-काया यांचे योग, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्म, याहून भिन्न असे हे प्रकट शुद्धात्मा! ही तार तुमच्यापर्यंत पोहोचू दे. तुमच्याबद्दल मी असे विचार केले त्याबद्दल मी तुमची माफी मागतो आणि प्रतिक्रमण करतो. आता पुन्हा मी असे करणार नाही.'

अढी असल्याशिवाय विचार येत नाहीत. विचार येताक्षणीच लगेच प्रतिक्रमण करायला हवे. म्हणून एकत्रित प्रतिक्रमणे करायला हवीत. या दहा मिनिटात मला जेवढे विचार आले, त्या सगळ्यांचे मी एकत्रित प्रतिक्रमण करीत आहे.

## याला म्हणतात समभावाने निकाल

**प्रश्नकर्ता :** काही दोष असे असतात की समजा एखादी व्यक्ती आपल्या समोर येऊन उभी राहते, आणि तिला बघताच ही व्यक्ती बेकार आहे, असे भाव आमच्या मनात येतात. तर त्यासाठी लगेच प्रतिक्रमण करायला हवे का? आणि जर प्रतिक्रमण करायचे राहून गेले तर?

**दादाश्री :** राहून गेले तरी हरकत नाही. जे राहिले असेल त्यासाठी वर्षभरानंतर एकदम केले तरी चालेल. तीन महिन्यात, सहा महिन्यात केले तरी चालेल, पण त्याचा दुरुपयोग करू नये की वर्षभरानंतर करायचेच आहे तर नंतर एकदमच करू. तुम्ही जर प्रतिक्रमण करण्याचे विसरले असाल तर नंतर एकदम करू शकता.

एखादा मूर्ख माणूस समोर दिसला तर दुरून पाहताच कळते, की फाइल येत आहे आणि तिचा समभावाने निकाल करायला हवा. असे आतून सावध केले जाते की विसरायला होते? आधीच सावध केले जाते ना? तुला देखील सावध केले जाते? म्हणजेच सगळ्यात मोठा धर्म हा आहे की समभावाने निकाल करणे, आणि आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान करणे. तरी देखील एखाद्याबद्दल आतून वाईट पौद्‌गलिक भाव निघाले तर 'त्याला' (चंदुभाईला) प्रतिक्रमण करायला सांगायला हवे. जिथे जिथे डाग पडले असतील ते सर्व धुऊन टाकावे, स्वच्छ करून टाकावे. नवीन डाग पडू द्यायचे नाहीत, यालाच म्हणतात 'समभावे निकाल' करणे.

## समोरच्या व्यक्तीचे भाव बिघडतात तेव्हा

**प्रश्नकर्ता :** समजा, आमचे काहीच भाव बिघडलेले नाहीत, पण समोरच्याशी बोलताना त्याच्या चेहऱ्यावरून कळते की त्याचे आपल्याबद्दलचे भाव बिघडले आहेत तर त्यासाठी आम्ही कोणत्या प्रकारचे प्रतिक्रमण करावे?

**दादाश्री :** तुम्ही प्रतिक्रमण करायला हवे. कारण तुमच्यात काही तरी दोष आहेत म्हणून त्याचे भाव बिघडत आहेत. भाव बिघडता कामा नयेत. भाव शुद्धच राहायला हवेत.

**प्रश्नकर्ता :** दोघे जण गप्पा मारत असतात, आणि त्यात कोणी तिसरी व्यक्ती अचानक येते, आता ती व्यक्ती तर काहीच बोलत नाही, नुसतीच उभी असते, तरी पण त्यावेळी त्या दोघांपैकी कोणातरी एका व्यक्तीचे भाव बिघडतात, त्याच्या चेहऱ्यावरील रेखा बदलतात, ते पाहून मला असे वाटते की ह्याचे भाव का बरे बिघडले? तर याचे प्रतिक्रमण कशा प्रकारे करावे?

**दादाश्री :** समोरच्याचे भाव का बिघडले असे जे आपण पाहतो तोच गुन्हा आहे. त्या गुन्ह्यासाठी तुम्ही प्रतिक्रमण करायला हवे. समोरच्याचा चेहरा जर तुम्हाला संतापलेला वाटला तर ती तुमची चूक

आहे. तेव्हा त्याच्या 'शुद्धात्म्या'ला आठवून त्याचे नाव घेऊन त्याची माफी मागत राहिलात तर या ऋणानुबंधातून सुटू शकाल.

## तेव्हा वीतराग होऊ शकाल

जेव्हा नावडत्या गोष्टी स्वच्छ मनाने सहन करू शकाल, तेव्हा वीतराग व्हाल.

**प्रश्नकर्ता :** स्वच्छ मन म्हणजे काय?

**दादाश्री :** स्वच्छ मन म्हणजे समोरच्या व्यक्तीबद्दल वाईट विचार न येणे. म्हणजे काय? तर निमित्तालाच दोषी मानून त्याच्याबरोबर भांडण करायला न जाणे. आणि समजा त्याच्याबद्दल जरा वाईट विचार आला तरी लगेच प्रतिक्रमण करून दोष धुऊन टाकणे.

**प्रश्नकर्ता :** मन स्वच्छ होणे ही तर अगदी शेवटच्या पायरीची गोष्ट झाली ना? आणि जोपर्यंत मन पूर्णपणे स्वच्छ होत नाही तोपर्यंत सतत प्रतिक्रमण करत राहावे लागेल ना?

**दादाश्री :** हो. हे बरोबर आहे, पण मन काही बाबतीत स्वच्छ झालेले असते आणि काही बाबतीत स्वच्छ झालेले नसते, या साऱ्या पायऱ्या आहेत. ज्या बाबतीत स्वच्छ झालेले नसेल, अशा बाबतीत प्रतिक्रमण करावे लागते.

## बाह्य संयोग आले तरच विचार येतात

आतमध्ये निर्माण झालेल्या गाठीमधून विचार येतात. 'एविडन्सेस्' (पुरावे) मिळताच विचार येतात. एरवी अगदी ब्रह्मचाऱ्यासारखा दिसतो, पण रस्त्यात संयोग मिळताच मनात विषयविकार उत्पन्न होतात!

**प्रश्नकर्ता :** असे जे विचार येतात ते वातावरणामुळेच ना? संयोगिक पुराव्याच्या आधारानेच त्याचे संस्कार, त्याची मित्रमंडळी वगैरे सर्व मिळते ना?

**दादाश्री :** हो, बाहेरून 'एव्हिडेन्सेस्' मिळावे लागतात. त्याच्या आधारानेच मनातील गाठी फुटतात, नाही तर नाही.

**प्रश्नकर्ता :** त्या विचारांना पकडण्यासाठी प्रेरणा कोण देते?

**दादाश्री :** हे सगळे नैसर्गिकच आहे. पण त्याबरोबरच हेही समजले पाहिजे की ही चुकीची बुद्धी आहे, असे समजल्यावर तो त्या गाठीचे छेदन करील. या जगात फक्त ज्ञान हाच एक प्रकाश आहे. हे माझ्यासाठी हितकारी नाही, हे जेव्हा समजू लागेल, असे ज्ञान जेव्हा प्राप्त होईल, तेव्हाच तो या गाठी छेदून टाकील.

तुम्हाला शुद्धात्म्याचे वहीखाते स्वच्छ ठेवायचे आहे. म्हणून रात्री चंदुभाईला सांगावे की (दिवसभर) ज्यांचे ज्यांचे दोष पाहिले त्यांच्याबरोबरचे वहीखाते स्वच्छ करून टाका. मनातील भाव बिघडले तरी प्रतिक्रमणाने सर्व शुद्ध होऊन जाईल. दुसरा कोणताच उपाय नाही. इन्कमटॅक्सवाला पण दोषी वाटणार नाही, असे प्रतिक्रमण केल्यानंतरच रात्री झोपावे. संपूर्ण जगाला निर्दोष पाहून मगच चंदुभाईला झोपी जायला सांगावे.

## मनाने केले, तरी पण पोहोचते

तुम्ही कोणाशी भांडण केले तर त्याला अतिक्रमण म्हणतात. त्या अतिक्रमणासाठी प्रतिक्रमण केलेत तर पश्चात्ताप होऊन त्याचा निकाल होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण समोरासमोर व्हायला हवे ना?

**दादाश्री :** नंतर प्रतिक्रमण झाले तरी हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** मी तुमची अवहेलना केली असेल, अशातना केली असेल, तर मला प्रत्यक्ष तुमच्या समोर येऊन प्रतिक्रमण केले पाहिजे ना?

**दादाश्री :** समोर येऊन केलेत तर चांगलीच गोष्ट आहे. पण जर ते शक्य झाले नाही, आणि नंतर केले तरी पण तेवढेच फळ मिळेल.

**प्रश्नकर्ता :** पण त्याला कसे पोहोचणार?

**दादाश्री :** ते कसे पोहोचते ते सर्व आम्ही जाणतो! ते तुम्हाला बुद्धीने समजेल असे नाही. ते तर फक्त आम्हा 'ज्ञानी पुरुषां'नाच समजते. म्हणून आम्ही सांगतो तेवढे तुम्ही करावे. बाकीच्या भानगडीत, बुद्धीत तुम्ही पडू नका. समजा ते भेटले नाहीत तर तुम्ही काय करणार? असेच बसून राहणार? भेटलेच नाहीत तर काय करणार? ही जी आम्ही सांगत आहोत ती एक प्रोसेस (प्रक्रिया) आहे.

## या काळात विराधक जास्त आहेत

आम्ही त्यांना काय म्हणालो, 'तुमच्या मनात दादांच्याबद्दल वाईट विचार येतात म्हणून तुम्ही त्याचे प्रतिक्रमण करत राहा.' कारण त्यात त्या बिचाऱ्याचा काय दोष? स्वभावच विराधक आहे. आजकाल सगळ्यांचाच स्वभाव विराधक असतो. दूषमकाळात विराधक जीवच असतात. आराधक जीव सर्व निघून गेले. आणि हे जे उरले आहेत, त्यात पण सुधारणा होऊ शकतील असे बरेच जीव आहेत, अजूनही यात खूप उत्तम आत्मे आहेत!

## तीर्थंकर आणि ज्ञानी पुरुषांबद्दल

आमच्याबद्दल वाईट विचार आला तर प्रतिक्रमण करा. मन तर 'ज्ञानी पुरुषां'चे देखील मूळ उपटू शकते. मन काय करू शकत नाही? पोळलेले मन समोरच्याला पण पोळून काढते. पोळलेले मन तर महावीर भगवंतांना पण पोळून काढते.

**प्रश्नकर्ता :** 'जे (मोक्षाला) निघून गेले ते तर कुणाचे भले करू शकत नाहीत.' (असे बोलले) तर महावीरांबद्दल केलेला अवर्णवाद त्यांच्यापर्यंत पोहोचतो का?

**दादाश्री :** नाही, ते स्वीकारत नाहीत. म्हणून रिटर्न विद थॅन्कस्, दुप्पट होऊन परत येईल. म्हणून स्वत:च स्वत:साठी वारंवार माफी मागत राहावी. जोपर्यंत तुम्हाला तुमचे शब्द आठवत राहतील तोपर्यंत माफी

मागत राहा. महावीरांचा अवर्णवाद केला असेल तर वारंवार माफी मागत राहा, तर लगेच (दोष) मिटून जाईल. सोडलेला बाण त्यांच्यापर्यंत पोहोचतो पण ते त्याचा स्वीकार करत नाहीत.

## ते परिणाम आहेत अशातनांचे

**प्रश्नकर्ता :** आमच्या गावात चाळीस जैन मंदिरे असूनही अशी कोणती अशातना झाली आहे, किंवा अशी कोणती कारणे आहेत की ज्यामुळे या गावाचा अभ्युदय (उत्कर्ष) होत नाही?

**दादाश्री :** होईल, अभ्युदय होईल. आणि आता अभ्युदय होण्याची वेळ आलीच आहे.

**प्रश्नकर्ता :** काही अशातना झाली आहे का?

**दादाश्री :** अशातना झाल्याशिवाय असे काही होणारच नाही ना, अशातनाच झाल्या आहेत. दुसरे काय?

**प्रश्नकर्ता :** त्यांचे निवारण करण्याचा काही उपाय?

**दादाश्री :** त्यासाठी तर तुम्ही पश्चात्ताप करा, प्रतिक्रमण करा, पण खरे प्रतिक्रमण, बरे का? तरच त्याचे निवारण होईल, नाही तर कोणत्याच प्रकारे त्याचे निवारण होणार नाही. अशातना झाली आहे म्हणून पश्चात्ताप करायचा आहे. असा पश्चात्ताप केला तर काही बदल होईल. पण सर्वांनी मिळून एकत्र पश्चात्ताप, प्रतिक्रमण केले तर बदल होईल. एकट्याने करून असा कितीसा बदल होईल?



# [ 24 ]
# जीवनप्रवाहात बुडणाऱ्यांना तारते हे ज्ञान

## जे आठवते ते स्वच्छ होण्यासाठी

**प्रश्नकर्ता :** आठवण करून मागचे दोष पाहता येतात का?

**दादाश्री :** खरे म्हणजे मागील दोष उपयोगानेच पाहिले जाऊ शकतात, आठवण करून पाहता येत नाहीत. आठवण करण्यासाठी तर डोके खाजवावे लागते. आवरण आलेले असते म्हणून तर मुद्दाम आठवावे लागते ना! या मगनभाईशी तुमचे भांडण झाले तर मगनभाईचे प्रतिक्रमण करताना मगनभाई लगेच हजर होतील. फक्त तसा 'उपयोग'च ठेवायचा आहे. आपल्या मार्गात आठवण करणे हा प्रकारच नाही. आठवण करणे हे तर मेमरी (स्मृती)च्या आधीन आहे. जे काही आठवते ते प्रतिक्रमण करविण्यासाठी. स्वच्छ करविण्यासाठी.

ही आठवण स्वतःच म्हणते की 'आम्हाला काढून टाक, धुऊन टाक.' जर आठवण आली नसती तर खूप गडबड झाली असती. ती जर आली नाही तर तुम्ही काय स्वच्छ करणार? कुठे राग-द्वेष आहे हे तुम्हाला कसे कळणार? आठवण येते ती स्वतःच 'निकाल' करून घेण्यासाठी येते. चिकटपणा (राग-द्वेष) धुऊन काढण्यासाठी येते. जर आठवण आली तर तिला धुवा, स्वच्छ करा, तर ती धुतली जाईल आणि मग विस्मृत होईल. तुम्ही तिथे चिकटलेले आहात म्हणून तर आठवण

येते. तर आता ते स्वच्छ करा, त्याच्यासाठी पश्चात्ताप करा, आणि पुन्हा असे होणार नाही असा दृढ निश्चय करा. एवढे केले की ती संपून जाईल म्हणजे पुन्हा आठवणार नाही. कोणाची एक वेळ आठवण आली तर त्याचे एक वेळ प्रतिक्रमण करावे लागेल, पण जथ्यात तर जितक्या वेळा आठवण येईल, तितक्या वेळा प्रतिक्रमण करावे लागेल.

'या जगातील कोणतीही विनाशी वस्तू मला नको आहे' असे तुम्ही ठरविले आहे ना? तरी पण आठवण का येते? म्हणून प्रतिक्रमण करा. प्रतिक्रमण केल्यावरही परत आठवण झाली तर समजावे की तक्रार अजून चालूच आहे! म्हणून त्यासाठी पुन्हा प्रतिक्रमण करावे.

**प्रश्नकर्ता :** दादा, जोपर्यंत त्याचे बाकी आहे तोपर्यंत प्रतिक्रमण होतच राहते, त्याला बोलवावे लागत नाही.

**दादाश्री :** हो, बोलवावे लागत नाही. आपण ठरवले आहे म्हणून आपोआपच होत राहते.

## प्रत्याख्यान केले गेले नाहीत, त्यामुळे इच्छा बाकी राहतात

राग-द्वेष यामुळे आठवण येते. जर आठवण आली नसती, तर पडलेली गाठ आपण विसरून गेलो असतो. तुम्हाला कोणा फॉरीनच्या (परदेशी) लोकांची आठवण येत नाही पण मृत व्यक्तींची आठवण का येते? हा हिशोब आहे आणि तो राग-द्वेषामुळे आहे. त्यासाठी प्रतिक्रमण केले तर आसक्ती संपून जाईल. इच्छा होतात याचे कारण प्रत्याख्यान केले नाहीत. आणि आठवणी येतात त्याचे कारण प्रतिक्रमणे केली नाहीत.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण तर मालकीभावाचे करायचे असतात ना?

**दादाश्री :** मालकीभावाचे प्रत्याख्यान करावे आणि दोषांसाठी प्रतिक्रमण करावे.

## तरी पण अतिक्रमण चालूच आहे

**प्रश्नकर्ता :** पूर्वी जे दोष झाले होते त्यांची तीव्रता आता कमी झालेली आहे. काही गोष्टी आता कमी आठवतात. त्यामुळे प्रतिक्रमण

करते वेळी त्या सर्व गोष्टींचा विसर पडलेला असतो तर मग त्या कशा आठवतील? एकदा तुम्ही म्हणाला होतात की रोज शंभर-शंभर किंवा त्यापेक्षाही जास्त वेळा प्रतिक्रमणे करावी लागतील. आता त्या सर्व गोष्टी तर आम्ही विसरून गेलो आहोत, आणि दोष तर बांधले गेले आहेत, ते आता कसे आठवतील?

**दादाश्री :** असे काही करायची गरज नाही. पुष्कळसे दोष आम्ही ज्ञान देतो तेव्हा ताबडतोब जळून जातात. तेव्हा कुठे तुम्हाला हे ज्ञान हजर होते. म्हणजे बहुतेक सर्व जळून खाक झालेले असते. एखादा मोठा गुन्हा झाला असेल आणि तो आठवला तर त्यासाठी प्रतिक्रमण करा. बाकी काही करायची गरज नाही. जे आठवत नाही त्यासाठी काहीच करायचे नसते.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करून सुद्धा तो गुन्हा पुन्हा पुन्हा आठवत राहिला तर त्याचा अर्थ असा आहे का की अजून आम्ही त्यातून मुक्त झालेलो नाही.

**दादाश्री :** कांद्याची एक पाकळी निघाली तर दुसरी आपोआपच पुढे येते. याचप्रमाणे या गुन्ह्यांचेही खूप थर असतात. म्हणजे एकदा प्रतिक्रमण केलेत तर एक थर दूर होईल असे करत करत शंभर प्रतिक्रमणे केलीत तर तो संपूर्ण नष्ट होईल. काही दोष पाच प्रतिक्रमणे केल्यावर नष्ट होतात. काही दहा प्रतिक्रमणे केल्यावर आणि काही शंभर केल्यावर नष्ट होतात. ज्याचे जितके थर असतील तितकी प्रतिक्रमणे होतील. खूप जास्त वेळा प्रतिक्रमणे करावी लागत असतील तर याचा अर्थ गुन्हा पण तेवढा मोठा आहे.

**प्रश्नकर्ता :** कित्येकदा असे होते की चूक झाल्यावर समजते, त्याचे प्रतिक्रमण पण होते, होतच राहते पण तरीही तशाच चुका परत-परत होतात.

**दादाश्री :** तसे झाले तरी पण वारंवार प्रतिक्रमण करतच राहायचे आहे. कारण त्याचे थर आहेत. एक थर गेला, दुसरा थर गेला, म्हणजे

यात त्या चुकीचा दोष नाही आणि चूक करणाऱ्याचाही दोष नाही, तर त्याचे थरच जास्त आहेत म्हणून असे घडते.

**प्रश्नकर्ता :** असे स्वभावामुळे घडते की जागृती कमी आहे म्हणून?

**दादाश्री :** नाही, नाही, नाही. हजारो जन्म हेच करत आला असाल तर थर तेवढेच जास्त असतील. जर पाचच जन्म असे केले असेल तर तेवढे. आणि तरीही पुन्हा होईल, कारण कांद्याची एक पाकळी निघाली तर कांदा संपला का? (नाही). परत त्याचा दुसरा थर येतो, तिसरा येतो, असे करत करत, कितीतरी थरांचे दोष आहेत. दहा थरांचे दोष दहा वेळा प्रतिक्रमण करून संपतील. पन्नास थरांचे दोष पन्नास वेळा प्रतिक्रमण करून संपतील. प्रतिक्रमण केले की त्याचे फळ अवश्य मिळतेच. अवश्य साफ होईल.

अतिक्रमणाचे प्रतिक्रमण व्हायलाच हवे. इथे आल्यावर तुम्ही कोणतेही अतिक्रमण केले नाही म्हणून तुम्हाला प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. अतिक्रमण केले तरच प्रतिक्रमण करायचे असते.

## आठवणीसाठी प्रतिक्रमण : इच्छेसाठी प्रत्याख्यान

**प्रश्नकर्ता :** आठवण येते त्याचे प्रतिक्रमण करायला हवे आणि इच्छा झाली तर त्याचे प्रत्याख्यान करायला हवे. हे जरा समजवा ना.

**दादाश्री :** आठवण येते म्हणजे समजावे की ह्या इथे जरा जास्त चिकटपणा आहे. तर अशा वेळी वारंवार प्रतिक्रमण करत राहिल्याने सर्व सुटून जाईल.

**प्रश्नकर्ता :** जितक्या वेळा आठवण येईल, तितक्या वेळा प्रतिक्रमण करायला हवे का?

**दादाश्री :** हो, तितक्या वेळा करायला हवे. तुम्ही करण्याचे भाव ठेवा. असे आहे की आठवण येण्यासाठी वेळ तर हवा ना! तर यासाठी वेळ मिळेल. रात्री आठवणी येत नाहीत का?

**प्रश्नकर्ता :** ते तर काही संयोग असतील तर.

**दादाश्री :** हो, संयोगांमुळेच.

**प्रश्नकर्ता :** आणि इच्छा असतील तर?

**दादाश्री :** इच्छा होणे, म्हणजे स्थूल वृत्ती होणे. पूर्वी आपण जे भाव केले होते, ते भाव आता पुन्हा उत्पन्न होतात तर अशा वेळी प्रत्याख्यान करायला हवे.

**प्रश्नकर्ता :** दादा त्या वेळी तुम्ही म्हटले होते की, 'आता ही वस्तू मला नको आहे' असे प्रत्येक वेळी म्हणावे.

**दादाश्री :** ही वस्तू माझी नाही, मी ती समर्पित करत आहे. अज्ञानतेमुळे मी या सर्वांना बोलावले होते पण आज या माझ्या नाहीत. म्हणजेच मी मन-वचन-कायेने हे सर्व समर्पित करीत आहे. आता मला काहीच नको आहे. अज्ञानदशेत मी या सुखाला बोलावले होते पण आज हे सुख माझे नाही. म्हणून ते मन-वचन-कायेने समर्पित करीत आहे. आता मला काहीच नको. ज्याच्यात सुख मानले होते त्या सर्वांना आपण बोलाविले होते, पण आता तर आपली दृष्टी बदलून गेली आहे. म्हणून आता आपल्याला ती सुखे मिथ्याभास वाटू लागली आहेत. खरे सुख तर नाहीच, पण मिथ्या सुखही नाही, मिथ्याचाही भास आहे!

## शॉर्ट प्रतिक्रमण

या अक्रम विज्ञानाचा हेतूच शूट ऑन साइट (पाहताक्षणीच संपविणे) प्रतिक्रमणाचा आहे. याच पायावर हे विज्ञान उभे आहे. चूक कोणाचीच होत नाही. तुमच्या निमित्ताने जर समोरच्या व्यक्तीचे नुकसान झाले तर द्रव्यकर्म-भावकर्म-नोकर्म यापासून मुक्त अशा त्याच्या शुद्धात्म्याला आठवून प्रतिक्रमण करावे.

**प्रश्नकर्ता :** पण प्रत्येक वेळी इतके सारे बोलायला हवे का?

**दादाश्री :** नाही, असे काही नाही. शॉर्ट (थोडक्यात) करू शकता. समोरच्याच्या शुद्धात्म्याला हजर करून त्याला फोन लावावा की 'अशी चूक झाली आहे, मला क्षमा करा.'

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण तर आम्ही कुठेही शूट ऑन साइट करतो, तर काय स्थिरपणे बसून करण्याची आवश्यकता नाही?

**दादाश्री :** स्थिरपणे बसून केले नाही तरी चालेल पण शूट ऑन साइट प्रतिक्रमण केले पाहिजे. दोष होताच ताबडतोब. नाही तर नंतर जर विसरलात तर एखादे वेळी राहून जाणे शक्य आहे. (म्हणून शूट ऑन साइट प्रतिक्रमण करावे).

## मग दुसऱ्या जन्मात चिकटत नाहीत

**प्रश्नकर्ता :** दिवसभरात किती प्रतिक्रमणे करायची?

**दादाश्री :** जितके दोष करता, तितकीच प्रतिक्रमणे, जास्त नाही. शूट ऑन साइट. दोष झाला की लगेच शूट करा. दादा भगवान यांचे नाव घेऊन लगेच शूट करा. शूट होऊन जाईल. चहा पिता पिता, आंघोळ करता करताही प्रतिक्रमण केले जाऊ शकते. जिथे देहधर्म आहे, मनोधर्म आहे, आणि बुद्धीधर्म आहे तिथे (योग्य) स्थान बघावे लागते. पण आपण तर आत्मधर्मात आहोत, म्हणजे देहधर्म, इत्यादी बघण्याची गरजच नाही, आपण कुठेही प्रतिक्रमण करू शकतो.

प्रतिक्रमण करून करून जितक्या चुका संपवल्या तितका मोक्ष जवळ आला.

**प्रश्नकर्ता :** या फाइली पुढच्या जन्मात परत चिकटणार नाहीत ना?

**दादाश्री :** कशाला? आपण पुढच्या जन्मापर्यंत ठेवायच्याच कशाला? इथल्या इथेच सर्व प्रतिक्रमणे करून घ्यायची. सवड मिळताच त्यांचे प्रतिक्रमण करत राहायचे.

म्हणजे वारंवार प्रतिक्रमण करवून घ्यायचे. चला, यांच्यासाठी प्रतिक्रमण करा, असे म्हणायचे. व्यवहारात जेव्हा जेव्हा आपल्याकडून होऊ शकेल अशी स्थिती असेल तेव्हा तेव्हा म्हणायचे, 'चला, प्रतिक्रमण करा.'

## घरच्यांसाठी आणि नातेवाईकांसाठी प्रतिक्रमण

दुसरी गोष्ट, म्हणजे घरच्या लोकांसाठी रोज प्रतिक्रमण करायला

हवे. तुमची आई, वडील, भाऊ, बहीण, कुटुंबीय सर्वांचे रोजच प्रतिक्रमण करायला हवे. कारण त्या तुमच्या खूप चिकट फाइल्स आहेत.

जर एक तास कुटुंबीयांसाठी प्रतिक्रमण कराल, तुमच्या कुटुंबातील सर्वांना आठवून जवळच्यांपासून ते दूरचे सर्व भाऊ, त्यांच्या पत्नी, काका, काकांची मुले, वगैरे सर्व, एक कुटुंब असेल, तर दोन-चार पिढ्यांपर्यंतच्या सर्वांना आठवून प्रत्येकासाठी जर एक एक तास प्रतिक्रमण कराल ना, तर आतील भयंकर पापे जळून भस्मीभूत होतील, आणि त्या लोकांची मने तुमच्याबद्दल साफ होऊन जातील. म्हणून आपल्या जवळच्यांना, सर्वांनाच आठवून आठवून प्रतिक्रमण करायला हवे. आणि जर रात्री झोप येत नसेल तर या प्रकारे सेट करून ठेवले तर ते चालू होईल. अशी सेटिंग तुम्ही करता की नाही? अशी ही व्यवस्था, ही फिल्म सुरू झाली तर त्यावेळी खूप आनंद वाटेल. तो आनंद कशातच सामावणार नाही!

**प्रश्नकर्ता :** होय, खरी गोष्ट आहे.

**दादाश्री :** कारण आपण जेव्हा प्रतिक्रमण करत असतो ना, तेव्हा आत्म्याचा संपूर्ण शुद्ध उपयोग असतो. म्हणून मध्ये कोणाचाच हस्तक्षेप नसतो.

प्रतिक्रमण कोण करतो? चंदुभाई करतात. कोणाचे प्रतिक्रमण करतात? तर नातेवाईकांना आठवून आठवून प्रतिक्रमण करतात. आत्मा पाहणारा आहे, तो फक्त पाहत राहतो. आणि इतर कसलाही हस्तक्षेप नसल्यामुळे खूप शुद्ध उपयोग राहतो.

आज रात्री तुमच्या सर्व कुटुंबीयांसाठी प्रतिक्रमण करा. जर वेळ कमी पडला तर परत उद्या रात्री पण करा. अजून वेळ कमी पडला तर परवा रात्री करा. आणि एवढेच नाही तर तुमच्या गावातील सर्व ओळखी-पाळखीच्या लोकांना आठवून आठवून प्रतिक्रमणे करायला हवीत. गावात कोणाला जरासा धक्का लागला असेल, कोणाविषयी अढी निर्माण झाली असेल, तर ते सर्व साफ करायला हवेतच ना? सगळे हिशोब साफ करायला हवेत.

**प्रश्नकर्ता :** खूप वर्षांपूर्वी ज्या गोष्टी घडून गेल्या असतील, त्या आता आम्हाला आठवतही नाहीत, तर? त्यांचे काय?

**दादाश्री :** ज्या आठवत नसतील त्या? तर मग त्या राहिल्या तशाच! त्यासाठी मग सामायिक करायचे, तेव्हा त्या आठवतील.

**प्रश्नकर्ता :** सामायिकमध्ये आठवतील?

**दादाश्री :** हो, (सामायिकमध्ये) कित्येक लोकांना तर वयाच्या पाच वर्षापर्यंतचे सर्व आठवते.

## ग्रंथी छेदल्यावर निर्ग्रंथ दशा

**प्रश्नकर्ता :** आम्ही लहानपणी, तारुण्यात ज्या चुका केल्या आहेत किंवा त्यानंतर केल्या आहेत, त्या सर्व एका पाठोपाठ एक अशा दिसतात.

**दादाश्री :** आता त्यासाठी दररोज एक तास वेळ मिळेल तेव्हा करा. रोज तर वेळ मिळत नाही, म्हणून दोन दिवसात एक वेळा तरी सामायिक करा. त्यात विषय विकाराचे दोष पाहावे. एक दिवस सामायिकमध्ये हिंसेचे दोष पाहावे. तुम्ही आळीपाळीने ते सर्व दोष पाहण्याचे सामायिक करत राहावे. आणि ह्या 'दादां'ची कृपा आहे म्हणून तर तुम्हाला सामायिकमध्ये सर्व प्रकारचे दोष दिसतील. अगदी लहानपणापर्यंतचे सर्व दोष तुम्हाला दिसतील, आणि दोष दिसले की ते धुतले जातील. हे दोष धुतले गेल्यानंतरदेखील सगळ्यात मोठी गाठ पकडून ठेवावी. ती गाठ तर तुम्ही सामायिकमध्ये रोजच पाहावी. म्हणजेच असे करत करत सामायिक करत जा.

**प्रश्नकर्ता :** ही मोठी गाठ आहे हे कसे समजणार?

**दादाश्री :** मोठी गाठ म्हणजे, जिचे विचार वारंवार येतात ती मोठी गाठ. एकीकडे लिंबू ठेवले आहे, एकीकडे संत्रे ठेवले आहे आणि एकीकडे कांदा ठेवला आहे, त्या सगळ्यांचा वास येईल, पण ज्याचा जास्त वास येईल, तो माल जास्त भरलेला आहे हे समजून घ्या. म्हणजेच आपल्याला आतून समजते. पुष्कळ विचार येतात, विचारावर विचार,

विचारावर विचार येऊ लागले तर समजावे की, 'अरे, हा माल खूप जास्त आहे.' म्हणजे अशी नोंद करून ठेवा. की ही पहिली, ही दुसरी, अशा किती गाठी आहेत, ते सर्व पाहावे. नंतर रोज त्यांना उपयोगात घ्यावे. एकदा पाहिले-जाणले आणि प्रतिक्रमण केले की एक थर गेला. असे काही जणांचे शंभर, काही जणांचे दोनशे आणि काही जणांचे पाचशे-पाचशे थर असतात. पण ते सर्व संपतात. आता तर मोक्षाला जायचे आहे तर निर्ग्रंथ होऊन जावे लागते. निर्ग्रंथ म्हणजे आतील सगळ्या ग्रंथी संपल्या. आता बाहेरच्या ग्रंथी राहिल्या आहेत, बाहेरच्या ग्रंथी आणि त्यासुद्धा 'चंदुभाई'ला आहेत.

**प्रश्नकर्ता :** दादा, तुम्ही अमेरिकेला जाण्यापूर्वी तुमच्या हजेरीत एक वेळा प्रतिक्रमण करूया का?

**दादाश्री :** हो, आज संध्याकाळीच करवून घेतो. माझ्या हजेरीत करूया. मी तिथे बसेन! सगळ्यांनी माझ्या उपस्थितीतच करायचे. असे प्रतिक्रमण पूर्वी एकदा करविले होते, माझ्या उपस्थितीतच केले होते, मी स्वतःच करवून घेतले होते. पुष्कळ वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे. 'विषयविकार' संबंधीचेच प्रतिक्रमण करविले होते. ते करता करता सर्व इतके खोल उतरत गेले की नंतर घरी गेल्यावरही त्यांचे प्रतिक्रमण बंद होत नव्हते. झोपताना बंद होत नव्हते, खातानाही बंद होत नव्हते, मग नंतर मला ते बंद करावे लागले!!! सगळे त्यात इतके अडकले होते की त्यांचे प्रतिक्रमण झोपेतही बंद होईना. आणि खाता-पिताना पण बंद होईना! निरंतर प्रतिक्रमण, रात्रं-दिवस आपोआपच चालू होते. प्रतिक्रमण केल्यावर 'बंद करा, आता दोन तास झाले', असे म्हणून देखील ते प्रतिक्रमण चालूच राहत होते. बंद करायला सांगूनही ते बंद होत नव्हते. कारण मशिनरी सगळी सुरू झाली होती. आतमध्ये ते चालूच राहत होते.

**प्रश्नकर्ता :** दादा, असे म्हणतात की प्रतिक्रमणामध्ये मागील दोष जे उफाळून वरती येतात, ते इतके उफाळत राहतात की कितीही प्रयत्न केले तरी त्यांना आवर घालता येत नाही.

**दादाश्री :** हो, सर्व उफाळतच राहते.

## पूर्व जन्मांतील दोषांचे प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण विधीमध्ये पूर्व जन्मांतील दोषांची आलोचना कशी करतात?

**दादाश्री :** प्रतिक्रमण विधी, म्हणजे पूर्व जन्मांतील जे दोष असतात ते या जन्मात प्रकट होतात, तेव्हा त्याची आलोचना करायची असते. या जन्मात जे प्रकट होतात ते सर्व पूर्व जन्मातील दोषच असतात. पूर्व जन्मात जे दोष होतात, ते आयोजन रूपात असतात आणि नंतर जेव्हा ते प्रकट होतात तेव्हा आपल्याला कळते की पूर्व जन्मी हा दोष केला होता. असे इथे आपल्याला दिसते आणि अनुभवास येते.

**प्रश्नकर्ता :** काही दोष असेही असतात का की जे या जन्माला 'बायपास' करून एकदम पुढल्या जन्मात येतात, किंवा लवकर येतात?

**दादाश्री :** नाही, नाही. असे नसतात. आंब्याचे झाड कधी मोहोर आल्याशिवाय एकदम पिकलेला आंबा देतो का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** त्याचप्रमाणे इथे पण प्रथम मोहोर येतो. सगळे विधिवत् आहे, अविधिवत् काही नाही, येथे थापेबाजी नाही. म्हणजेच मागील जन्मात मोहोर येतो आणि या जन्मात हापूस आंबा तयार होतो. मग तो कडू किंवा गोड फळ देतो.

**प्रश्नकर्ता :** फळ कधी-कधी उशीरा येत नाही का? एका जन्मानंतर?

**दादाश्री :** नाही, असे नाही.

**प्रश्नकर्ता :** सर्व फळे ह्याच जन्मात येतात?

**दादाश्री :** हो, ह्याच जन्मात येतात. कारण पुढच्या जन्माची काय खात्री? कदाचित पुढच्या जन्मी तो गाढव झाला असेल आणि कर्मे माणसाची असतील! त्यामुळे मनुष्यरूपातच सगळी फळे येतात.

## दररोज एक तास काढा

**दादाश्री :** तुम्ही तुमच्या मोठ्या भावासाठी प्रतिक्रमण केले होते का?

**प्रश्नकर्ता :** असे काही प्रतिक्रमण केलेले नाही.

**दादाश्री :** ती सर्व प्रतिक्रमणे करावी लागतील. तरच गोळा झालेल्या दोषांपासून मुक्ती मिळू शकेल. आता हे प्रतिक्रमण करताना जो आनंद होतो तो एकदम अस्सल आनंद असतो. प्रथम आपल्या घरातील सदस्यांचे, मग इतर नातेवाईकांचे. मग दररोज तुम्ही दोघांची तुलना करत जा. दुपारी जेव्हा विश्रांती घेता, त्यावेळी करत जा. एक एक व्यक्तींसाठी. प्रथम घरातील मुले, मुली सर्व. मुलगा, सून सर्वच, मग पाहा कसा आनंद वाटतो! याप्रकारे घरातील व्यक्तींसाठी प्रतिक्रमण करा. एका तासाचा प्रयोग करा. या वेळेतील आनंद तर अनुभवा, आठवून आठवून! लहान मूल देखील दिसेल!

आपले हे ज्ञान तर बघा, आपले हे ज्ञान किती क्रियाकारी आहे? तसे तर कोणी आठवत नाही, पण प्रतिक्रमण करायला बसलो की घरातील मुले-मुली सर्व दिसू लागतात.

**प्रश्नकर्ता :** दादा, तुम्ही जर एखाद्या गोष्टीसाठी टोकले असेल की रोज प्रतिक्रमणे करावी, की मग एखाद्या दिवशी जर झाली नाहीत किंवा कमी झाली, म्हणजे आम्ही जो वेळ काढला त्यात कमी प्रतिक्रमणे झाली तर ते टोचते. पूर्वी तर कसे वाटायचे की झाले, संपले आता प्रतिक्रमण.

**दादाश्री :** टोचायला लागले म्हणजे समजावे की तुम्ही आता इकडे वळलात. तुम्ही या बाजूने व्होटिंग केले.

**प्रश्नकर्ता :** ह्या प्रतिक्रमणामुळे खूप चांगले झाले आहे, दादा.

**दादाश्री :** प्रतिक्रमणाने तर खूप काम होऊन जाते.

आज रात्री प्रथम जवळच्या लोकांपासून सुरुवात करायची, आई-

बाबा यांच्यापासून सुरुवात करायची. म्हणजे भाऊ, बहीण, काका, काकू, मामा, मामी सगळ्यांसकट अखेरीस लहानात लहान मुलांसह सगळ्यांचे तू प्रतिक्रमण कर. घरातील सर्वांचेच कर. मग दुसऱ्या दिवशी प्रतिक्रमणाचा विस्तार वाढवायचा. नंतर दर दिवशी विस्तार वाढवत जायचा. त्यात ओळखी-पाळखीचे, शिक्षक वगैरे सगळे येतील. मग कॉलेजमधील सर्वांचे प्रतिक्रमण करायचे. सगळ्यांबरोबरचा (हिशोब) स्वच्छ करायचा. मानसिक संबंध स्वच्छ करायचा. आणि जी कर्मे बांधली गेली असतील ती मग नंतर बघू.

कधी कोणाचे प्रतिक्रमण करता का? आजपर्यंत हे शेठजी वगैरे जे सगळे ओळखीचे आहेत त्यांच्यातील कोणाला तुमच्यामुळे दुःख झाले असेल तर त्याचे प्रतिक्रमण करायला हवे.

पूर्वी जिथे जिथे राग-द्वेष केले आहेत, तिथे प्रतिक्रमणे करायला हवीत ना? आणि ते स्वच्छ करण्यात जो आनंद मिळतो, तसा आनंद तर कशातच नाही. जी अगोदर झाली आहेत, ती तर अज्ञान दशेत झाली आहेत, पण आता ज्ञान मिळाल्यावरही जर आपण ती धुतली नाहीत, कपडे न धुताच पेटीत ठेवून दिले तर? तुम्ही तर खूप सारे पेटीत ठेवून दिले आहेत, नाही का? बघा ना जरा, आत डाग पडले असतील.

मग फ्रेन्ड सर्कल (मित्रवर्तुळ) घ्या. नंतर दुसरे वर्तुळ घ्या. कामे तर खूप असतात. कुठे कुठे काय राहिले आहे ते लक्षात ठेवा की या ठिकाणी इतके बाकी राहिले आहे, त्या ठिकाणी इतके बाकी राहिले आहे. मग त्यासाठी प्रतिक्रमण करत राहा. नाही तर मग मनाला काय काम देणार? हे जे प्रतिक्रमण करतो, ते संसार संबंधित हेतूसाठी नाही. संसार संबंधित हेतूसाठी तर व्यापारी आहेत ते मग मनाला चालवीत राहतात की पुढच्या वर्षी असे करू, मग तिथे गोडाऊन बांधू, मग हे करू, ते करू. त्यात मग दोन चार तास घालवतात.

## 'आम्ही' असे केले जगापासून निवारण

चंदुभाईत जे जे दोष आहेत, ते सर्व दिसतात. जर दोष दिसले नाहीत तर हे ज्ञान काय कामाचे? म्हणून कृपाळूदेवांनी काय म्हटले होते?

*"हुं तो दोष अनंतनुं, भाजन छु करुणाळ,*
*दीठा नही निज दोष, तो तरीये कोण उपाय?"*

(हे करुणामय, मी तर अनंत दोषांनी भरलेला आहे, माझे दोष जर मला दिसले नाहीत तर मी कसा तरेन?)

म्हणजे स्वत:चे दोष दिसतात. दोष आहेत त्याला हरकत नाही. कोणाचे पंचवीस असतील, कोणाचे शंभर असतील, आमच्यात दोन असतात. त्याची काही किंमत नाही. उपयोगच ठेवायचा आहे. उपयोग ठेवला, की दोष दिसतच राहतील. दुसरे काही करायचे नसते.

'तुम्हाला' चंदुभाईला इतके सांगावे लागेल की प्रतिक्रमण करत राहा. तुमच्या घरातील लोकांना तुमच्याकडून पूर्वी काही ना काही दु:ख झाले असेल, त्यासाठी तुम्ही प्रतिक्रमण करा. संख्यात किंवा असंख्यात जन्मात राग-द्वेष, विषय, कषाय यामुळे जे दोष झाले असतील त्यासाठी क्षमा मागतो. अशा तऱ्हेने घरच्या एक-एक व्यक्तीचे रोजच प्रतिक्रमण करा. नंतर उपयोगपूर्वक आसपासच्या, शेजारी-पाजारी यांच्यासाठी, सर्वांसाठी उपयोग ठेवून हेच करत राहायला हवे. तुम्ही असे केल्यानंतर हा बोजा हलका होत जाईल. असाच हलका होणार नाही. आम्ही संपूर्ण जगाशी अशा प्रकारे निवारण केले होते. प्रथम असे निवारण केले म्हणून तर सुटका झाली. जोपर्यंत तुमच्या मनात आमचा दोष आहे तोपर्यंत तो आम्हाला चैन पडू देणार नाही! म्हणून आम्ही जेव्हा अशा प्रकारे प्रतिक्रमण करतो तेव्हा तुमच्यातील दोष पण मिटतो. म्हणजे आलोचना माझ्यासमक्ष करायची नाही, पण तुम्ही शुद्धात्मा आहात तर तेव्हा शुद्धात्म्यासमक्ष चंदुभाईनी आलोचना करायची आहे. चंदुभाईला सांगावे, आलोचना कर. मग प्रतिक्रमण-प्रत्याख्यान पण करवून घ्या. असे एक-एक तास करवून घ्या. घरातील प्रत्येक व्यक्तीचे करा. ज्यांच्याबरोबर तुमचे संबंध असतील अशा सर्वांसाठी करावे लागेल.

## ऋणानुबंधी तिथेच चिकटपणा

निरंतर प्रतिक्रमण करून राग-द्वेषांचा चिकटपणा धुऊन पातळ

करायला हवा. जर समोरचा वाकडा वागत असेल तर ती तुमची चूक आहे. तुम्ही ती धुतलेली नाही आणि धुतली असेल तरी नीट पुरुषार्थ झालेला नाही. जेव्हा जेव्हा वेळ मिळेल, तेव्हा तेव्हा जे गाढ ऋणानुबंधी असतात, त्यांच्याबद्दलचा राग-द्वेष धूत राहा. असे जास्त नसतात, पाच किंवा दहा जणांशीच गाढ ऋणानुबंध असतात. त्यांच्यासाठीच प्रतिक्रमणे करायची असतात. त्या चिकटपणालाच धूत राहायचे असते. कोणा-कोणाशी देणेघेणे आहे हे शोधून काढावे. जर नवीन कोणी उत्पन्न झाले तर लगेच समजून येईल. पण जे जुने आहेत त्यांना शोधून काढावे. जे-जे जवळचे ऋणानुबंधी असतात, तिथेच अधिक चिकटपणा असतो. काय उफाळून येते? तर चिकटपणाच उफाळून येतो.

जेव्हा सर्व स्वच्छ होईल, तेव्हा वाणी चांगली निघेल. नाही तर वाणी चांगली निघत नाही. हे सर्व स्वच्छच. प्रत्येक गोष्टीत, जिथे जिथेही ओळखीचे लोक आहेत, त्या सर्वांचे जिल्ह्यानुसार केले पाहिजे. प्रांतानुसार प्रतिक्रमण केले पाहिजे. उदा. वकील असतील तर सर्व वकीलांसाठी, नंतर जजेस् असतील तर सर्व जजेस्साठी, याप्रकारे.

इतरही बऱ्याच प्रकारची प्रतिक्रमणे करावी लागतात. रस्त्यात येता-जाता, कोणाशी बोलताना जर काही झाले असेल तर त्याचेही प्रतिक्रमण करावे लागते. रस्त्यात चालता चालता ठेच लागली तर ठेच का लागली? या सगळ्यांचे सार (हिशोब) काढावे की या रस्त्याने आलो म्हणून ठेच लागली. तर मग पुन्हा ठेच लागणार नाही, पण त्याची पुनरावृती करू नये.

प्रतिक्रमण तर तुम्हाला खूप करायला हवे. तुमच्या सर्कलमध्ये जी पन्नास-शंभर माणसे असतील, ज्यांना ज्यांना तुम्ही दुखावले असेल, त्या सगळ्यांसाठी सवड मिळाल्यावर एक-एक तास एकेकाला आठवून आठवून प्रतिक्रमण करा. जेवढ्यांना दुखावले आहेत त्यांच्या बाबतीत सर्व धुवावे तर लागेलच ना? त्यानंतरच ज्ञान प्रकट होईल.

## त्यात दोन्ही आहेत

**प्रश्नकर्ता :** लहानपणी एका मुलीचे दहा रुपये चोरले आणि

जिला गरज होती अशा दुसऱ्या मुलीच्या कंपासमध्ये हळूच ठेवून दिले होते, त्याचे पण प्रतिक्रमण केले.

**दादाश्री :** हे कसे आहे? दिले ते दान झाले, त्याचे पुण्य मिळाले आणि चोरी केली त्याचे पाप लागले. आता पुण्य केले म्हणजे शंभर रुपये मिळाले आणि पाप केले त्यामुळे तीनशे रुपये गमावले. असे आहे हे जग! अशी हेरफेर करण्यात पण नुकसानच आहे.

जेवढे ओळखीचे आहेत त्या सर्वांचे प्रतिक्रमण करा. मग सगळे अशील, वकील, जजेस् सगळ्यांचे प्रतिक्रमण करा. मग जे जे परिचयात आले त्या सर्वांचे प्रतिक्रमण करा. दुपारी विश्रांती करताना प्रतिक्रमण करायला सुरुवात केलीत तर झोप पण येणार नाही, आणि ही प्रतिक्रमणे पण पूर्ण होतील आणि आराम पण मिळेल. 'आम्ही' याच प्रकारे करत असू, पण आता 'आमचे' सर्व पूर्ण झाले आहे.

## साधू-साध्वी यांचे प्रतिक्रमण

मग हा जन्म, मागील जन्म, मागील संख्यात जन्म, मागील असंख्यात जन्म, पूर्वीचे अनंत जन्म, या सर्व जन्मात दिगंबर धर्माची, साधूंची, आचार्यांची जी काही अशातना, विराधना केली किंवा करविली असेल तर त्याबद्दल मी दादा भगवान यांच्या साक्षीने क्षमा मागतो. माझ्याकडून किंचितही अपराध होऊ नये यासाठी शक्ती द्या. अशा प्रकारे सर्व धर्मांसाठी प्रतिक्रमण करावे.

## या प्रकारे प्रतिक्रमण करावे

अहो, अज्ञान दशेत आमचा अहंकार खूप भारी होता. 'हा असा, तो तसा' म्हणजे तिरस्कार, तिरस्कार, तिरस्कार, तिरस्कार... आणि काहींची प्रशंसाही करत असे. एकाची प्रशंसा आणि दुसऱ्याचा तिरस्कार करत असे. मग जेव्हा 1958 साली ज्ञानप्राप्ती झाली तेव्हापासून या 'ए.एम.पटेल'ला सांगितले की हे जे सगळे तिरस्कार केले आहेत, ते सर्व आता साबण लावून धुऊन टाका. सगळ्यांना शोधून-शोधून सर्व दोष धुऊन टाकले. या बाजूचे शेजारी, त्या बाजूचे शेजारी, इकडचे

नातेवाईक, मामा, काका, अरे, सगळ्यांचाच तिरस्कार केला गेलेला असतो! ते सर्व (तिरस्कार) धुऊन टाकले.

**प्रश्नकर्ता :** ही सर्व प्रतिक्रमणे मनाने केली? समोर जाऊन नाही?

**दादाश्री :** मी अंबालाल पटेलला सांगितले की तुम्ही जे सर्व चुकीचे केले आहे, ते सर्व मला दिसत आहे. आता तरी ते सर्व धुऊन टाका! मग त्यांनी काय करायला सुरुवात केली? कसे धुवायचे? तेव्हा मी समजावून सांगितले की त्याला आठवा. मगनभाईला तुम्ही शिव्या दिल्या आहेत, आयुष्यभर रागराग केला आहे, तिरस्कार केला आहे, त्या सगळ्यांचे वर्णन करून असे म्हणा, 'मगनभाईचे मन-वचन-काया यांचे योग, भावकर्म-द्रव्यकर्म-नोकर्म, यापासून भिन्न असे हे प्रकट शुद्धात्मा भगवान! मी या मगनभाईची वारंवार माफी मागत आहे. दादा भगवान यांच्या साक्षीने माफी मागत आहे. पुन्हा अशा चुका करणार नाही.' तुम्ही असे प्रतिक्रमण केल्यावर तुम्हाला समोरच्या व्यक्तीच्या चेहऱ्यात फरक दिसेल. त्याचा चेहरा बदललेला दिसेल. तुम्ही इथे प्रतिक्रमण करता आणि तिथे फरक पडतो.

**प्रश्नकर्ता :** समोरासमोर प्रतिक्रमण करू शकतो?

**दादाश्री :** समोरासमोर प्रतिक्रमण करू शकता. पण जर समोरासमोर प्रतिक्रमण करायचे असेल तर फार खानदानी व्यक्ती असेल तरच करावे. नाही तर उलट तो म्हणेल, 'आता आली ना अक्कल! मी सांगत होतो तेव्हा ऐकले नाही, आता आलीस ना वठणीवर!' अरे, हा तर त्याने चुकीचा अर्थ लावला. मग धमकावतो त्या बिचारीला. त्याऐवजी असे करू नका. हे सगळे तर अडाणी लोक. एखादीच खानदानी व्यक्ती असते, जी नरम पडते. बाकी सगळे तर म्हणतील 'आता आलीस ना वठणीवर? मी केव्हापासून सांगत होतो तेव्हा ऐकले नाही.' म्हणजे तो काय म्हणेल ते पण मला समजते आणि तुम्हाला काय झाले आहे ते पण मला समजते. नाटक, ड्रामा! म्हणून आम्ही असे प्रतिक्रमण करून टाकतो.

## बुद्धीमान लोकांच्या जगात

आम्ही कितीतरी धुतले, तेव्हा कुठे आमचे वहीखाते स्वच्छ झाले. आम्ही खूप काळापासून धूत आलो होतो, तेव्हा कुठे वहीखाते स्वच्छ झाले! आणि तुम्हाला तर मी मार्ग दाखविला आहे, म्हणून तुम्ही लवकर सुटाल. आम्ही तर बऱ्याच काळापासून स्वतःच धूत होतो.

तुम्ही फक्त प्रतिक्रमण करावे. म्हणजे तुम्ही जबाबदारीतून मोकळे व्हाल. सुरुवातीला सर्व लोक माझ्यावर 'अॅटॅक (हल्ला) करीत असत ना? मागाहून सगळे थकले. जर आपणही त्यांच्यावर अॅटॅक केला तर समोरचे थकणार नाहीत. हे जग कुणालाही मोक्षाला जाऊ देईल असे नाही. असे बुद्धीवाले हे जग आहे. यात सावध राहिलो, सलोख्याने राहिलो तर मोक्ष मिळेल.

हे प्रतिक्रमण करून तर पाहा! मग तुमच्या घरातील सर्व माणसांमध्ये बदल होईल. जादूसारखा बदल! जादूसारखा परिणाम!

इथे मार खाऊन पडून राहणे चांगले आणि तिथे (कुसंगात) माल खाऊन पडून राहणे तेही चुकीचे. जागा चांगली आहे की वाईट आहे ते पाहायला नको का?

**प्रश्नकर्ता :** जेव्हा माझा पाय तसा झाला होता, तेव्हा तुम्ही मला प्रतिक्रमण करण्यास सांगितले होते. पण दोनच दिवसात त्या प्रतिक्रमणाचा जादूसारखा परिणाम झाला होता.

**दादाश्री :** आम्ही आशीर्वाद पाठविले होते.

**प्रश्नकर्ता :** त्याचा दोन दिवसातच खूप जादूसारखा परिणाम झाला होता.

**दादाश्री :** जादूसारखा परिणाम आहे हा आमचा, जर तुम्ही आज्ञेप्रमाणे प्रतिक्रमण केलेत तर. भगवंत जेवढे करू शकत नाहीत, तेवढे काम हे प्रतिक्रमण करू शकते.

## आता गुदगुल्या परवडणार नाहीत

**प्रश्नकर्ता :** त्यात खूप चांगला अनुभव आला.

**दादाश्री :** हो, म्हणजे वस्तूस्थितीत हा इतका सोपा मार्ग आहे. सरळ आहे. समभावी आहे. कसलाच त्रास नाही. आणि मार्ग दाखविणारे व कृपा करणारे स्वत: काय म्हणतात, 'मी केवळ निमित्त आहे.' डोक्यावर (मानाची) पगडी घालत नाहीत. नाही तर शेवटी पांढरी पगडी घालून फिरत राहिले, तर मग आपल्यालाच त्या पघडीचा बोजा. म्हणून मी म्हणतो की आता हे सगळे इतके सरळ-सोपे आहे, तर तुमचे काम पूर्ण करून घ्या. इतके सरळ, इतके जास्त सरळ पुन्हा कधी मिळणार नाही. अशी संधी परत मिळणार नाही. ही खूप मोठी संधी मिळाली आहे. तेव्हा आता या गुदगुल्याची आवड (संसाराची गोडी, मानाची गोडी) कमी करा ना! त्यात काहीच मजा नाही. गुदगुल्या करणारे लोक तर भेटतीलच पण त्यात तुमचे हित नाही. म्हणून आता या गुदगुल्याचा शौक सोडा. हा जन्म देखील आता अर्धा संपला आहे. पूर्ण थोडाच शिल्लक आहे?

## त्यांच्यातील शुद्धात्म्याला नमस्कार करून

**प्रश्नकर्ता :** तुम्ही नाते-वाईकांचे जे प्रतिक्रमण करायला सांगितले आहे, तर त्यात फक्त पाहात राहायचे आहे की काही बोलायचे पण आहे?

**दादाश्री :** मनातल्या मनात बोलायचे.

**प्रश्नकर्ता :** त्यांच्याबद्दल राग (मोह, आसक्ती) केला असेल तर तो ही दोष आहे, आणि द्वेष केला असेल तर तो ही दोष आहे. मग त्यासाठी प्रतिक्रमण करावे का?

**दादाश्री :** फक्त राग-द्वेष एवढेच नाही, तर इतरही बरेच काही बोलावे लागते. या जन्मात, पूर्वीच्या संख्यात-असंख्यात जन्मात, राग-द्वेष, अज्ञान, यामुळे जे जे दोष झाले त्या सर्वांचे आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान करीत आहे, असे बोलावे लागते.

**प्रश्नकर्ता :** या जन्मात, असंख्यात जन्मात जे जे राग-द्वेष झाले त्या सर्वांसाठी?

**दादाश्री :** राग-द्वेष, अज्ञान यामुळे जे जे दोष झाले असतील, किंवा आक्षेप घेतले असतील, अहंकार भग्न केले असतील तर ते सर्व बोलावे लागते. हे सगळे बोलून झाले म्हणजे एक फाइल पूर्ण झाली. त्यानंतर दुसरी फाइल, डॉक्टर जसे एक-एक पेशंटला तपासून मोकळे करतात तसे?

आम्ही तर गावकऱ्यांसोबतचेही सर्वकाही स्वच्छ केले. आमच्या गावातील गल्लीतल्या प्रत्येकाला शोधून-शोधून स्वच्छ करून टाकले. अज्ञानामुळेच दोष झालेले असतात. तुम्ही कधी दोष केले होते का?

**प्रश्नकर्ता :** पुष्कळ.

## स्वतःची पुडी घुसडू नये

**प्रश्नकर्ता :** मी पुस्तकात वाचले आहे की संख्यात-असंख्यात जन्मांचे प्रतिक्रमण केले तर स्वच्छ होऊनच जाते. तर मागील जन्मांत जे दोष झाले असतील त्यांचे काय?

**दादाश्री :** काही मागील दोष झाले असतील तर त्याचा अंदाज येत नाही. तो मग आतून क्लेम (दावा) करतो. कोणी तरी क्लेम घेऊन आला, कागदपत्र घेऊन आला तर समजून जावे की हा मागचा हिशोब आहे. आत्ताचा, या जन्मातला तर वाटत नाही पण मागील जन्माचा असावा.

**प्रश्नकर्ता :** हो, पण समजा कोणी क्लेम घेऊन येऊच नये यासाठी आपण अगोदरच प्रतिक्रमणे करून घ्यायची, जेणेकरून ताबडतोब शुद्ध होऊन जावे आणि आपली प्रतिक्रमणे लवकर होतील... तर असे दोष की ज्याचा क्लेम नसेल त्याचेही अशा प्रकारे बोलून प्रतिक्रमण केले तर ते चालेल का?

**दादाश्री :** क्लेम असेल तरच प्रतिक्रमण करावे. क्लेम नसेल तर त्याच्याशी आपले काय देणेघेणे? ज्याचा क्लेम असेल त्याचेच प्रतिक्रमण करावे.

**प्रश्नकर्ता :** मग जोपर्यंत एक-एक, एक-एक दोष क्लेम करत नाही तोपर्यंत सुटूच शकणार नाही ना? संख्यात-असंख्यात जन्मात जे जे दोष केले आहेत, त्यासाठी सामूहिक प्रतिक्रमण करायला हवे ना?

**दादाश्री :** हो.

**प्रश्नकर्ता :** त्याच्यासाठी माफी मागतो, प्रतिक्रमण करतो. मग त्यासाठी प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** तेवढेच बोलायची गरज आहे. आणखी काही बोलण्याची आवश्यकता नाही. आणि दुसरी गोष्ट म्हणजे प्रतिक्रमण करताना स्वत:चा (वेगळा) हिशोब लावायचा नाही. जसे लिहिले आहे तसेच करावे. जर कोणी अॅटॅक करत असेल तर फक्त त्याचेच प्रतिक्रमण करावे. दुसरे काही नाही. ज्ञानात सांगितले तेवढे सगळे एकदमच करावे.

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी, वारंवार अॅटॅकसारखेच वाटत असते म्हणून शूट ऑन साइट प्रतिक्रमण तर करतो परंतु...

**दादाश्री :** आम्ही सांगतो तेवढेच करावे. याहून जास्त काहीच करायचे नाही.

**प्रश्नकर्ता :** नाही, पण इतर मोकळ्या वेळात तासन्तास तेच बोलत राहिलो तर चालेल का?

**दादाश्री :** आम्ही सांगितल्याप्रमाणेच करावे. जेव्हा मोकळा वेळ असेल तेव्हा देखील या जन्मी केले असतील त्यासाठी, संख्यात-असंख्यात जन्मात हे सर्व... बाकी स्वत:चे शहाणपण त्यात टाकायचे नाही. घरची पुडी त्यात टाकली जात नाही. मग ते अर्धे विष होऊन जाईल. आणि जो कोणी क्लेम घेऊन आला असेल त्याच्यासाठीच. नवीन नाही, नवीन बोलता कामा नये. जे आहे त्याप्रमाणेच करत राहावे. बुद्धी तर उलट चित्रीकरण करील. ती ठारच करील. असे केले तर काय हरकत आहे, असे सांगेल.

राग (आसक्ती) नेहमीच केव्हा उत्पन्न होतो? तर द्वेषातून राग

उत्पन्न होतो आणि मग परत रागातून द्वेष उत्पन्न होतो. म्हणजे हे सर्व दोषच आहेत. जिथे दोष असतो, तिथे राग-द्वेष असतात, अशा फाइलला चिकट फाइल म्हणतात!

## याच्यावर आधारित आहे महावीरांचा सिद्धांत

आपण ज्यांचे प्रतिक्रमण करतो, त्यांच्या मनात आपल्या बद्दल काहीच वाईट भाव राहत नाहीत, उलट मानच उत्पन्न होतो. आणि प्रतिक्रमण केल्यामुळे कितीही मोठे शत्रुत्व असले तरी ते ह्या जन्मातच संपून जाते! एवढा एकच उपाय आहे. प्रतिक्रमणावरच महावीर भगवंतांचा संपूर्ण सिद्धांत कायम आहे. आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान! जिथे आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान नाही, तिथे धर्मच नाही. आताच्या काळात लोकांना आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान यांची आठवण राहत नाही. तुम्ही शुद्धात्मा झाला आहात, म्हणून तुम्हाला ताबडतोब आठवण येते!

## जे टोचते त्याचे प्रतिक्रमण

जोपर्यंत समोरच्याचा दोष आपल्या मनात आहे, तोपर्यंत तो आपल्याला चैन पडू देत नाही. जेव्हा आपण प्रतिक्रमण करतो, तेव्हा सर्व पुसले जाते. 'राग-द्वेष' असलेल्या प्रत्येक चिकट 'फाइलला' 'उपयोग' ठेवून, प्रतिक्रमण करून स्वच्छ करावे. रागाच्या (आसक्तीच्या) फाइलचे तर निश्चितच प्रतिक्रमण करायला हवे.

तुम्ही गादीवर झोपले असाल, आणि तुम्हाला तिथे खडे टोचत असतील तर तुम्ही ते खडे काढून टाकाल की नाही? हे प्रतिक्रमण पण जिथे जिथे टोचत असते तिथेच करायचे आहे. तुम्हाला जिथे टोचत असेल तिथून तुम्ही काढून टाका आणि त्यांना जिथे टोचते, तिथून ते काढतील! प्रत्येक व्यक्तीची प्रतिक्रमणे वेगवेगळी असतात.

समजा, एखादी व्यक्ती कोणावर उपकार करत असेल तरी पण त्याच्याच घरी अनाचार होतो, असे घडते. तर अशा वेळी प्रतिक्रमण करावेच लागते. जिथे जिथे टोचते अशा सर्व ठिकाणी प्रतिक्रमण करावे

लागते. पण प्रत्येकासाठी प्रतिक्रमणे वेगवेगळी असतात. कारण माझ्याकडून गुन्हा झाला आहे म्हणून मला ते टोचत आहे, हे त्याला स्वत:ला समजलेले आहे. जोपर्यंत त्याचे प्रतिक्रमण होत नाही तोपर्यंत ते टोचत राहते. नाही का?

**प्रश्नकर्ता :** हो, मला खूप टोचत होते.

**दादाश्री :** आपण पूर्वी चूक केली होती म्हणूनच टोचत आहे. चुकांमुळेच आपल्याला बंधन पडले आहे. बंधन रागाचे असो, द्वेषाचे असो, कसलेही असो, त्यासाठी प्रतिक्रमण करावे. समोरचा जर सरळ आणि नम्र असेल तर समोरासमोर माफी मागावी. नाही तर आतल्याआतच माफी मागू शकतो, तरीदेखील हिशोब संपेल.

## जेव्हा दोघेही प्रतिक्रमण करतात तेव्हा

कोणाच्याही बाबतीत अतिक्रमण झाले असेल तर दिवसभर त्यासाठी प्रतिक्रमण करावे लागते, तेव्हाच सुटू शकतो. जर दोघांनी समोरासमोर प्रतिक्रमण केले तर दोघेही लवकर सुटू शकतात. पाच हजार वेळा तुम्ही प्रतिक्रमण करा आणि पाच हजार वेळा ते प्रतिक्रमण करतील तर लवकर संपुष्टात येईल. परंतु जर समोरचा प्रतिक्रमण करत नसेल, आणि तुम्हाला मात्र सुटायचे असेल तर तुम्हाला दहा हजार वेळा प्रतिक्रमण करावे लागते.

**प्रश्नकर्ता :** जेव्हा असे काही राहून जाते, तेव्हा मनात सारखे वाटत राहते की हे राहिले आहे, राहिले आहे.

**दादाश्री :** त्यासाठी ओझे वाटू देऊ नये. नंतर एखाद्या दिवशी बसून सर्व प्रतिक्रमणे एकदम करून घ्यावी. ज्यांची ज्यांची करायची असतील, ओळखीच्या लोकांची, ज्यांच्याबरोबर जास्त अतिक्रमण होत असते त्यांची नावे घेऊन तासभर जरी प्रतिक्रमण केले तरी हे सर्व संपून जाईल. पण आपण असे ओझे शिल्लक ठेवू नये.

**प्रश्नकर्ता :** सकाळी सामायिक करायला बसलो की त्यातील अर्धा-पाऊण तास तर प्रतिक्रमण करण्यातच जातो.

**दादाश्री :** त्याचे इतके ओझे वाटू देऊ नये. पंधरा दिवसानंतर, महिन्यानंतर किंवा अगदी एक वर्षांनंतर जेव्हा कराल तेव्हा सगळ्यांसाठी एकदम करा.

## अतिक्रमणावर अतिक्रमण

अतिक्रमण होऊ नये यासाठी काही जण अजून मोठे अतिक्रमण करतात, परत त्याचे सर्मथन करण्यासाठी त्याहून मोठे अतिक्रमण करतात.

**प्रश्नकर्ता :** त्यामुळे गुंता वाढत जातो.

**दादाश्री :** अरे, गुंता इतका वाढतो, इतका वाढतो की मग काही थाऱ्यावरच राहत नाही. रात्रं-दिवस आरडाओरडा करायला लावतात. म्हणून मग मनुष्य जन्मात गुंता सुटत नाही. त्यातून सुटण्यासाठी मग चार पायात (जनावर गतीत) जावे लागते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे प्रथम अतिक्रमण बंद होते. अतिक्रमण थोड्या काळासाठी बंद होते, तेवढ्यात तो तिथे (जनावर गतीत)जाऊन भोगून, मग परत येतो.

**दादाश्री :** नाही, भोगल्यावर ते सर्व धुतले जाते. अतिक्रमणे केली होती त्याची तो प्रतिक्रमणे करतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे चार पायात दुसरी अतिक्रमणे तर करत नाही, फक्त भोगण्यासाठी जातो.

**दादाश्री :** हो, दुसरी काहीच कटकट नाही. बस, फक्त भोगण्यासाठीच तो भोगतो. भोगून झाल्यानंतर तो परत येतो. त्याच जन्मात अडकतो असे नाही. तो जरी म्हणाला की मला आता ह्याच जन्मात राहायचे आहे तरी पण त्याला तिथे राहू दिले जात नाही. एकदा हिशोब संपला की 'निघा इथून. चालते व्हा.'

**प्रश्नकर्ता :** जर अतिक्रमणे खूप केली तर पशुयोनीतच जावे लागते का?

**दादाश्री :** जास्त अतिक्रमणाचे फळच पशुयोनी आणि त्याहूनही खूपच मोठ्या अतिक्रमणांसाठी नरकयोनी!

**प्रश्नकर्ता :** कित्येक पशूंना तर माणसांपेक्षा जास्त चांगले वागवतात.

**दादाश्री :** ते तर कोणी तरी पुण्यवान असतात ना! अतिक्रमण करणारे पण पुण्यशाली असतात ना!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दोन्ही प्रकारची कर्मे एकत्रच केलेली असतात, अतिक्रमण पण केलेले असते आणि पुण्य पण केलेले असते.

**दादाश्री :** अरे! अतिक्रमण पण त्यांनी कोणाच्या तरी हितासाठी केलेले असते.

**प्रश्नकर्ता :** पण तुम्ही म्हणता की समोरच्या व्यक्तीच्या हितासाठी केलेल्या अतिक्रमणाला, गुन्हा मानला जात नाही?

**दादाश्री :** तो पुण्य मिळवतो, आणि गायकवाड सरकारच्या घरी बैल म्हणून जन्माला येतो.

## ऋणानुसार भोगणे

हे जे भ्रष्टाचार करतात, त्याला पाशवी कृत्ये म्हणतात. ते सगळे भोगण्यासाठी पशुयोनीत तर जावे लागणार ना?

**प्रश्नकर्ता :** चांगले-वाईट काहीही असो, सर्व प्रकारचे ऋण चुकते करावेच लागते ना?

**दादाश्री :** हो, ऋण तर सर्वांना चुकवावेच लागते ना? हे ज्ञान घेतल्यानंतर आता नवीन ऋणे बांधली जाणार नाहीत असा रस्ता तुमच्याकडे आहेच ना! तुम्ही जितके शुद्धात्म्यात राहाल, तितके नवीन ऋण अजिबात होणार नाही. शुद्धात्म्यात राहिला नाहीत आणि जर तुमच्याकडून अतिक्रमण घडले, तर त्याचे प्रतिक्रमण केल्याने ते सर्व धुतले जाते. अर्थात तुम्ही जागृत राहिलात तर! नाही तर हे ज्ञान घेण्यापूर्वी जी कर्मे बांधली गेली आहेत, त्यातील काही कर्मांचा विलय होऊन

गेला आहे, ती कर्मे संपली आहेत आणि ज्या कर्मांचा गठ्ठा होऊन पडला आहे, जी गोठलेली आहेत, ती कर्मे भोगायला तर जावेच लागेल पण तो कालावधी खूप कमी असेल.

**प्रश्नकर्ता :** तुमची भेट होण्यापूर्वी तर खूप प्रकारच्या चुका केल्या आहेत, त्यांचे काय करावे?

**दादाश्री :** त्या सगळ्यांसाठी सामूहिक प्रतिक्रमण करावे. सामूहिक म्हणजे एकत्रित. रोज अर्धा तास करावे. जर लहानपणी एखाद्या मुलाला दगड मारला असेल तर ते आठवून त्याचेही प्रतिक्रमण करावे. प्रतिक्रमण केल्यामुळे पुद्‌गल शुद्ध होते.

**प्रश्नकर्ता :** कितीही मोठे पाप केले असेल तरी ते प्रतिक्रमणामुळे धुतले जाते का?

**दादाश्री :** कितीही भयंकर पाप केले असले तरी पण प्रतिक्रमण केल्याने ते नष्ट होते.

**प्रश्नकर्ता :** एखाद्याच्या हातून खून झाला असेल तरी, दादा?

**दादाश्री :** हो, एक खून नाही, दोन खून केले, सारे गाव पेटवले तरीही.

**प्रश्नकर्ता :** पण ते प्रतिक्रमण व्हायला हवे ना?

**दादाश्री :** त्यासाठी अत्यंत उत्तम (हृदयपूर्वक, पश्चात्तापपूर्वक) प्रतिक्रमण व्हायला हवे. जेवढ्या जोराचे अतिक्रमण तेवढ्याच जोराचे प्रतिक्रमण करायला हवे.

## वेगवेगळे करणे हेच बरोबर

जेव्हा सारे दोष दिसू लागतील, तेव्हा प्रतिक्रमणे होतील आणि तेव्हा तुम्ही सुटाल. तुमची जितकी प्रतिक्रमणे झाली तेवढे सुटलात. आणि जे बाकी राहिले आहेत यासाठी प्रतिक्रमण करतच राहावे.

**प्रश्नकर्ता :** आम्ही साऱ्या जगातील जीवमात्रांची क्षमा मागितली तर प्रतिक्रमण झाले असे म्हणता येईल का?

**दादाश्री :** प्रतिक्रमण झाले असे कधी म्हणता येईल? तर प्रत्येकाचे वेगवेगळे प्रतिक्रमण कराल तेव्हा.

**प्रश्नकर्ता :** आम्ही ज्ञान घेण्यापूर्वी जी कर्मे केली आहेत, त्यांचा जर आता हिशोब पाहायला बसलो की, 'हे असे केले आहे', तर ती कर्मे केव्हा दिसतील?

**दादाश्री :** ती कर्मे आठवली तर प्रतिक्रमण करावे. जेवढ्या चुका आठवतील तेवढ्यांचेच प्रतिक्रमण करावे. नाही तर आम्ही येथे सामायिक करवून घेत असतो. त्या दिवशी तुम्ही बसा. तेव्हा एक्झॅक्ट (नीट) करा. त्या दिवशी थोडे धुतले जाईल. असे करत करत सर्व धुतले जाईल.

## प्रतिक्रमणाचे 'सॉफ्टवेअर'

ह्या अपूर्व गोष्टी आहेत, पूर्वी कधीच ऐकलेल्या नसतील, वाचलेल्या नसतील, जाणल्या नसतील, अशा अपूर्व गोष्टी जाणण्यासाठी ही मेहनत आहे.

आम्ही येथे प्रतिक्रमण करवून घेण्यासाठी बसवतो, तर तेव्हा काय होते? आत दोन तास प्रतिक्रमण करवितो ना, की लहानपणापासून ते आजपर्यंत जे जे दोष झाले आहेत, ते सगळे आठवून आठवून प्रतिक्रमण करा, समोरच्या व्यक्तीच्या शुद्धात्म्याला पाहून प्रतिक्रमण करा. तेव्हा तो लहान वयात जेव्हापासून समज येऊ लागते तेव्हापासूनच्या दोषांसाठी प्रतिक्रमणांची सुरुवात करतो ती अगदी आजपर्यंतच्या दोषांसाठी प्रतिक्रमणे करतो. जेव्हा असे प्रतिक्रमण करतो तेव्हा त्याला प्रथम मोठे मोठे दोष आठवतात. नंतर पुन्हा प्रतिक्रमण करतो तेव्हा छोटे छोटे दोष दिसतात. त्यानंतर पुन्हा प्रतिक्रमण करतो तेव्हा त्याहून छोटे छोटे दोष पण आठवू लागतात. असे करत करत तो सर्व दोष संपवून टाकतो.

दोन तासाच्या प्रतिक्रमणात आयुष्यातील सर्व मागील दोष धुऊन काढावे. आणि पुन्हा कधीही असे दोष करणार नाही असा निश्चय करावा, म्हणजे प्रत्याख्यान झाले.

जेव्हा तुम्ही असे प्रतिक्रमण करायला बसता ना, तेव्हा एकीकडे

अमृताचे थेंब टपटपतात आणि तुम्हाला हलके वाटू लागते. भाऊ, तुम्ही करता ना प्रतिक्रमण? हलके झाले असे वाटते का? तुमची प्रतिक्रमणे जोरात चालू आहेत ना? सगळे शोधून शोधून प्रतिक्रमणे करा. शोधून काढण्याच्या मागे लागा. मग ते सगळे आठवू पण लागेल. तो रस्तासुद्धा दिसेल. आठव्या वर्षी कोणाला लाथ मारली होती ते पण आठवेल. तो रस्ताही दिसेल, ती लाथही दिसेल. हे सर्व कसे आठवले? असेच आठवायला बसलो तर काहीच आठवणार नाही, पण प्रतिक्रमण करायला बसलो की सगळे क्रमवार आठवते. तुम्ही कधी आयुष्यभराचे प्रतिक्रमण केले होते का?

**प्रश्नकर्ता :** हो, केले होते.

**दादाश्री :** मग पुन्हा करू नका असे कोणी सांगितले आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही, हल्ली पुन्हा करायला सुरुवात केली होती. त्यासाठी एक दिवस सर्वजण एकत्र बसलो होतो.

**दादाश्री :** तुम्हाला वाटले तर तुम्ही हे घरीही करू शकता.

**प्रश्नकर्ता :** दादा, आज प्रथमच सामायिकला बसता आले, खूपच आनंद झाला.

**दादाश्री :** म्हणजेच सगळ्यांचे प्रतिक्रमण करावे. घरातील व्यक्तींचे तर रोजच करावे, मग जवळच्या नातेवाईकांसाठी, ज्यांना ज्यांना दुखावले असेल, अशा सर्वांसाठी प्रतिक्रमणे हमखास करावीत. अशा आठवणी येतात की येत नाहीत?

**प्रश्नकर्ता :** हो, येतात ना. रोज सामायिकमध्ये बसून तेच करत राहणार आहे.

**दादाश्री :** प्रतिक्रमण केल्यामुळे तुम्हाला आता हा चांगला अनुभव आहे अशी खात्री पटली आहे ना?

**प्रश्नकर्ता :** दादा, पूर्वी असे वाटायचे की माझी चूकच नाही. मग असे खोटे-खोटे प्रतिक्रमण कशाला करावे?

**दादाश्री :** नाही, पण आता?

**प्रश्नकर्ता :** आता समजू लागले आहे.

**दादाश्री :** आज आनंद झाला का?

**प्रश्नकर्ता :** हो, कुठे चुकले ते आता समजते. पूर्वी ते समजतच नसे. पण आता काही दिवसांपासून समजू लागले आहे.

**दादाश्री :** प्रतिक्रमण केल्यावर जेव्हा मूळ चूक लक्षात येईल ना, तेव्हा खूप आनंद होईल. जर आनंद वाटत नसेल, तर त्याचा अर्थ प्रतिक्रमण नीट करता आले नाही. अतिक्रमण केल्यावर जर (स्वत:ला) दु:ख होत नसेल, तर तो माणूस, माणूसच राहिला नाही.

**प्रश्नकर्ता :** मूळ चूक कोणती, दादा?

**दादाश्री :** पूर्वी तर चूकच दिसत नव्हती ना! आता दिसतात, पण त्या स्थूल दिसतात. या पुढे अजून दिसतील.

**प्रश्नकर्ता :** सूक्ष्म, सूक्ष्मतर...

**दादाश्री :** चुका दिसू लागतील.

ही तर अजागृती. बाहेरचे शरीर पाहिले. आतून कसे आहेत ते कसे कळेल? या दोन्ही ताई बाहेरून किती गोऱ्यापान दिसतात, पण आतून कशा आहेत ते कसे समजणार? म्हणून आतील पाहिल्यावर मूळ चुका समजू लागतील, समजत आहे का तुला?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** हे बाहुली एवढे शरीर, हरभऱ्या एवढे नाक, पण पाहा ना, किती समज भरली आहे!

## जिवंत प्रतिक्रमणाचा पुरावा

आपल्याकडे दोन-तीन तास प्रतिक्रमण करतात, तेव्हा दोन-तीन तास फक्त दोषच दिसतात. याला जिवंत प्रतिक्रमण म्हणतात. प्रतिक्रमण

करायला बसता, तेव्हा शुद्धात्माच होऊन जाता. एक वेळ प्रतिक्रमण करायला बसले की मग प्रतिक्रमण चालूच राहते ना? तुम्हाला करायची नसतील तरी चालू राहतात ना?

**प्रश्नकर्ता :** हो, चालूच राहतात.

**दादाश्री :** मी म्हटले, 'आता बंद करा?'

**प्रश्नकर्ता :** तरी चरखा चालूच राहतो.

**दादाश्री :** कोण चालविते हे सर्व? आता 'शुद्धात्मा' प्राप्त झाला आहे, आणि ही सर्व क्रिया प्रज्ञाची आहे. पूर्वी 'अज्ञा'ची क्रिया चालू होती. हे बाकी सारे लोक म्हणतात, 'मी शुद्धात्मा आहे' पण ती 'अज्ञा'ची क्रिया चालू आहे. अजून 'प्रज्ञा'ची क्रिया उत्पन्नच झालेली नाही. आणि तुमची 'अज्ञा'ची क्रिया बंद झाली आहे आणि 'प्रज्ञा'ची क्रिया चालू झाली आहे. 'अज्ञा'ची क्रिया काय करते? 'अज्ञा' सतत संसार वाढवतच राहते, रोज रोज नवीन नवीन (संसार) उत्पन्न करते.

## प्रतिक्रमणाचे 'हार्डवेअर'

जेव्हा तुम्ही पूर्ण आयुष्याचे प्रतिक्रमण करता तेव्हा तुम्ही मोक्षातही नसतात आणि संसारातही नसतात. तसे तर प्रतिक्रमण करते वेळी तुम्ही मागील सर्व दोषांचे विवरण करत असता. तेव्हा मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार या सगळ्यांचे फोन-बिन सर्व बंद असतात. अंत:करण बंद असते. त्यावेळी फक्त प्रज्ञेचेच काम चालू असते. आत्मा पण यात काहीच करत नाही. दोष झाला तर परत तो झाकला जातो. नंतर पुन्हा दुसरा थर येतो. याप्रकारे थरावर थर येत जातात. मग मृत्यूच्या वेळी शेवटच्या एका तासात या सगळ्यांचा सारांश येतो.

भूतकाळातील सर्व दोष वर्तमानात दिसतात, तो ज्ञानप्रकाश आहे. ती मेमरी (स्मृती) नाही.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणाने आत्म्यावर काही इफेक्ट (परिणाम) होतो का?

**दादाश्री :** आत्म्याला तर कोणताच इफेक्ट स्पर्श करू शकत नाही. जर तसे झाले तर त्याला संज्ञी म्हणावे लागेल. आत्मा आहे हे तर 100 टक्के निश्चितच आहे. जिथे स्मृती पोहोचत नाही, तिथे आत्म्याच्या प्रभावाने सर्व होत असते. आत्मा अनंत शक्तीवाला आहे. त्याची प्रज्ञाशक्ती 'पाताळ' फोडून दाखवीत असते. या प्रतिक्रमणामुळे तर 'स्वत:'ला समजते की आता हलके वाटत आहे, आणि सर्व वैर संपून जाते, नियमानुसारच संपून जाते. आणि प्रतिक्रमण करण्यासाठी समोरची व्यक्ती हजर नसली तरी हरकत नाही. यात समक्ष सह्या करण्याची गरज नाही. जशी कोर्टात समक्ष सह्यांची गरज असते तशी इथे नसते. कारण हे गुन्हे कोणाच्या हजेरीत झालेले नाहीत. हे गुन्हे तर लोकांच्या गैरहजेरीत झालेले आहेत. तसे लोकांच्या हजेरीत झाले आहेत पण हजेरीत सह्या केलेल्या नाहीत. सह्या आतील राग-द्वेषांच्या आहेत.

एखाद्या दिवशी एकांतात बसलेले असता आणि प्रतिक्रमण किंवा असे काही करता-करता-करता आत्म्याचा थोडा अनुभव येतो, त्याचा स्वाद येतो, त्याला अनुभव म्हणतात.

## दोष स्वीकारला की तो जातो

अखेरीस कोणाचीच चूक दिसेनाशी होते. प्रथम चूक दिसते मग तो प्रतिक्रमण करतो. संपूर्ण रात्रभर जर कोणाचीच चूक दिसली नाही असे घडले, आणि वहीखाते (हिशोब) संपले, तर तुमचे ईप्सित साध्य झाले. मग तुम्हाला त्या दिवसासाठी पुढच्या जन्माच्या जबाबदारीची भीती राहिली नाही. दुसऱ्या दिवशी पण याचप्रमाणे आचरण केले पाहिजे. हे असे सर्व समाधान करणारे ज्ञान आहे. यात काहीच शिल्लक राहत नाही. दोष झाला तर तो प्रतिक्रमण करून सर्व स्वच्छ करून टाकतो. प्रतिक्रमण म्हणजे घेतलेले परत करणे. प्रतिक्रमण केले की हिशोब संपला! तुम्ही तुमचा दोष स्वीकारला. स्वीकार केलात म्हणजे 'यु आर नोट रिस्पोन्सिबल' (तुम्ही जबाबदार राहिला नाहीत.) याला तर विज्ञान म्हणतात. ताबडतोब फळ देते, 'कॅश इन हॅन्ड' (रोख). हळूहळू होत जाते. आम्ही म्हटले तसे ताबडतोब होत नाही. पण दोष स्वीकारला तर धुतला जातो. तुम्ही प्रतिक्रमण करता म्हणून धुतला जातो.

## तेव्हाच होईल यथार्थ प्रतिक्रमण

जेव्हा घरातील माणसे निर्दोष दिसू लागतील, तेव्हा समजा की तुमचे प्रतिक्रमण खरे आहे. प्रत्यक्षात तर ते निर्दोषच आहेत, पूर्ण जगच निर्दोष आहे. तुम्ही तुमच्या दोषांमुळे बांधले गेलेला आहात. त्यांच्या दोषांमुळे नाही. तुमच्या स्वतःच्या दोषांमुळेच बांधलेले आहात. आता, असे जेव्हा समजेल, तेव्हा सुटका होईल!

## दृष्टी स्वतःच्या दोषांकडे

दुसऱ्यांची चूक पाहिल्यामुळे संसार उत्पन्न होतो आणि स्वतःची चूक दिसल्यामुळे मोक्ष मिळतो.

**प्रश्नकर्ता :** 'रिलेटिव्ह' तर स्वाभाविकपणेच दोषी दिसते ना?

**दादाश्री :** दोषी केव्हा म्हटले जाईल? तर जेव्हा त्याचा शुद्धात्मा तसे करत असेल तेव्हा. पण शुद्धात्मा तर अकर्ता आहे. तो काहीच करू शकत नाही. आणि हे तर 'डिस्चार्ज' होत राहिले आहे, त्यात तू त्याला दोषी मानतोस. जर दोष दिसला तर प्रतिक्रमण करावे. जोपर्यंत जगात कोणताही जीव दोषी दिसत आहे, तोपर्यंत समजावे की आत शुद्धीकरण झालेले नाही, तोपर्यंत इंद्रिय ज्ञानच आहे.

## प्रतीतीत निर्दोष आणि वर्तनात?

'डिस्चार्ज' मालामुळे समोरचा दोषी दिसतो. पण स्वतःच्या मनात तसे असता कामा नये, निर्दोष दिसला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** निश्चयात तर खात्री आहे की सर्व जग निर्दोष आहे.

**दादाश्री :** याला प्रतीतीत आले आहे असे म्हणता येईल. अनुभवात किती आले? ही गोष्ट एवढी सोपी नाही. जेव्हा ढेकणांनी घेरलेले असेल, मच्छरांनी घेरलेले असेल, सापांनी घेरलेले असेल, त्यावेळी निर्दोष दिसले तरच खरे. पण तुमच्या प्रतीतीत तरी ते निर्दोष आहेत असे राहिले पाहिजे. तुम्हाला दोषी दिसतात, ती तुमची चूक आहे.

त्यासाठी प्रतिक्रमण केले पाहिजे. आमच्या प्रतीतीत पण निर्दोष आहे आणि आमच्या वर्तनात पण निर्दोष आहे. तुला तर अजून प्रतीतीत पण निर्दोष आहे असे आलेले नाही. तुला अजून ते दोषी वाटतात. कोणी काही केले तर नंतर तू त्यासाठी प्रतिक्रमण करतोस, म्हणजेच सुरुवातीला तर दोषी वाटतात ना? हो की नाही?

**प्रश्नकर्ता :** नंतर प्रतिक्रमण करतो, याला प्रतीतीत आहे असे म्हणता येणार नाही का?

**दादाश्री :** पण सुरुवातीला तर दोषीच दिसतात ना, म्हणून तर प्रतिक्रमण करावे लागते ना?

**प्रश्नकर्ता :** हो, नंतर प्रतिक्रमण करावे लागते.

**दादाश्री :** पण तो दोषी वाटतो म्हणूनच ना? म्हणजेच तुला अजून सगळे निर्दोष आहेत हे पटलेले नाही ना?

**प्रश्नकर्ता :** पण निर्दोषची प्रतीती झाली असेल तरच प्रतिक्रमण करू शकतो ना?

**दादाश्री :** पण दोषी वाटतो, त्याला पाहात राहावे.

## जागृती वाढली की अतिक्रमणे कमी होऊ लागतात

**प्रश्नकर्ता :** जसे जसे जागृतीची अखंडता वाढत जाते, तशी तशी प्रतिक्रमणे कमी होत जातात.

**दादाश्री :** जर आतमध्ये दोष झाला असेल, अतिक्रमण झाले असेल तरच प्रतिक्रमण करावे. जागृती वाढते तेव्हा मोठे अतिक्रमण होते असा काही नियम नाही.

**प्रश्नकर्ता :** शुद्ध उपयोग असेल तर अतिक्रमण होऊ शकते का?

**दादाश्री :** होऊ शकते, अतिक्रमणही होऊ शकते आणि प्रतिक्रमणही होऊ शकते.

## उपयोग चुकल्याचेही प्रतिक्रमण

असे उत्तम विज्ञान हातात आल्यावर कोण सोडेल? यापूर्वी तर पाच मिनिटदेखील उपयोगात राहता येत नव्हते. एक गुणस्थानक सामायिक करायची म्हटली तरी देखील खूप मेटाकुटीने ती होत असे, आणि आता तर सहज, तुम्ही जिथे जाल तिथे उपयोगपूर्वक राहता येते, असे झाले आहे!

**प्रश्नकर्ता :** ते समजते दादा.

**दादाश्री :** आता जरा चुकांना आवर घाला. म्हणजेच प्रतिक्रमण करा. तुम्ही असे ठरवूनच बाहेर पडा की आज शुद्ध उपयोगात राहायचे आहे. असे जर निश्चित केले नाही तर शुद्ध उपयोग चुकाल. आणि आपले विज्ञान तर फारच उत्तम आहे. आणखी काहीच भानगड नाही.

तुम्हाला जर कधी असे वाटले की आपण उपयोग सोडून चुकीच्या रस्त्याने चाललो आहोत. तर तेव्हा तुम्हाला उपयोग चुकल्याबद्दलचे प्रतिक्रमण करावे लागेल. चुकीचा रस्ता म्हणजे वेस्ट ऑफ टाइम ॲन्ड एनर्जी (वेळ आणि शक्ती यांचा अपव्यय). तरी पण त्यासाठी प्रतिक्रमण केले नाही तरी चालेल. त्यात फार नुकसान नाही. एक जन्म अजून शिल्लक आहे म्हणून 'लेट गो' केले (चालवून घेतले) आहे. पण ज्यांना अधिक उपयोगपूर्वक राहायचे आहे, त्यांना उपयोग चुकल्यासाठी प्रतिक्रमण करणे आवश्यक आहे. प्रतिक्रमण म्हणजे परत येणे. कधी परत आलेलाच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्यामुळे नंतर चांगले प्रतिबिंब पडते का?

**दादाश्री :** नक्कीच. सगळे स्पष्ट होते. दर्शन स्वच्छ होते व वाढत जाते. प्रतिक्रमण केल्याशिवाय कोणीही मोक्षाला गेलेला नाही. प्रतिक्रमण केल्यामुळे स्वत:चे दोष कमी होत जातात आणि हळूहळू संपतात.

## औरंगाबाद येथील अनोखे वार्षिक प्रतिक्रमण

आम्ही इतर कुठेही असा विधी करत नाही. औरंगाबादला आम्ही

असा विधी करतो की अनंत जन्मांचे दोष धुतले जातात. एक तासाच्या प्रतिक्रमण विधीत तर सर्वांचा अहंकार भस्मीभूत होऊन जातो! आम्ही तिथे औरंगाबादला वर्षातून एकदा प्रतिक्रमण करवून घेत असतो, तेव्हा दोन-तीनशे माणसे अक्षरश: रडतात पण त्यांचे सगळे रोग निघून जातात. कारण तिथे नवरा आपल्या बायकोच्या पाया पडून माफी मागतो. कितीतरी जन्मांचे हे बंधन, माफी मागितल्यावर किती स्वच्छ होऊन जाते!

तिथे आम्हाला दर वर्षी खूप मोठा विधी करावा लागतो. सर्वांची मने शुद्ध करण्यासाठी, आत्मा (व्यवहार आत्मा) शुद्ध करण्यासाठी. खूप मोठा विधी करतो जेणेकरून सर्वांची मने स्वच्छ होतात, कम्प्लीट क्लिअर. त्याला स्वत:लाच पत्ता नसतो की मी काय लिहित आहे, पण सर्व काही स्पष्ट लिहून आणतात. मग सर्व 'क्लिअर' होऊन जाते. कारण अभेदभाव उत्पन्न झाला ना! एका मिनिटासाठी माझ्याकडे सोपवले ना की 'साहेब, मी असा आहे', म्हणजे अभेदभाव उत्पन्न झाला. तेवढी त्याची शक्ती वाढली.

आणि मग मला तुझे दोष समजल्यावर त्या दोषांसाठी मी विधी करतो. हे कलियुग आहे. कलियुगात कोणता दोष होत नसेल? कोणाचे दोष पाहाणे हीच चूक आहे. कलियुगात कोणाचे दोष पाहणे ही स्वत:ची चूक आहे. कोणाचेच दोष पाहायचे नाहीत. कोणते गुण आहेत ते पाहणे आवश्यक आहे. त्याच्याजवळ काय शिल्लक आहे? किती पुंजी शिल्लक आहे, तेच पाहण्याची गरज आहे, या काळात लोकांकडे पुंजीच नसते ना? ज्यांच्याकडे पुंजी शिल्लक आहे ते महात्माच पुढे आहेत ना!

## धर्मबंधूबद्दलचे वैर

ज्ञानी पुरुषांच्या आज्ञेने हे प्रतिक्रमण होत असते, त्यामुळे तो अनंतकाळची पापे जाळून टाकतो. हे प्रतिक्रमण तर कसे आहे? सर्व प्रकारचे वैरभाव संपतात. कारण सहाध्यायांशीच जास्त वैरभाव निर्माण झालेले असतात. या जगात इतर कोणाशी वैरभाव नसतो पण सहाध्यायींची मात्र सतत आठवण येत राहते.

**प्रश्नकर्ता :** सत्‌युगात पण सहाध्यायींशी वैर असायचे का?

**दादाश्री :** नाही. तेव्हा तसे नव्हते. त्यावेळी सर्वांची समज उच्च प्रतीची होती, आणि प्रेम पण गाढ असायचे!

**प्रश्नकर्ता :** सहाध्यायींशी वैर निर्माण व्हायचे काय कारण?

**दादाश्री :** अज्ञानतेमुळे! सत्युगात असे नसे. चोर चोर असे, लुच्चा लुच्चा असे आणि सावकार सावकार असे. या जगात चोर नाहीत असे कधीच नव्हते, पण सत्युगात त्यांची वस्ती कमी असे.

जे आता आपल्याबरोबर आहेत, पूर्वीही होते आणि आजही आहेत, त्यांना आपले धर्मबंधू म्हणतात आणि आपल्या धर्मबंधूशीच अनेक जन्मांचे वैर बांधले गेलेले असते. जर असे काही वैर बांधले गेले असेल तर एकमेकांनी समोरासमोर प्रतिक्रमण करून घ्या, तर सर्व हिशोब संपून जाईल. एकाही व्यक्तीला विसरू नका, सगळ्यांबरोबर समोरासमोर प्रतिक्रमण करा. सहाध्यायींबरोबरच जास्त वैर असते, आणि त्यांचे समोरासमोर प्रतिक्रमण केल्याने ते धुतले जाते. औरंगाबादला जे प्रतिक्रमण आम्ही करवून घेतो तसे प्रतिक्रमण तर जगात कुठेच होत नाही.

## अश्रू गाळीत पाया पडतात

**प्रश्नकर्ता :** तिथे सगळे रडत होते ना? मोठे-मोठे शेठ पण रडत होते.

**दादाश्री :** हो, औरंगाबादचेच पाहा ना! सगळे किती रडत होते? असे प्रतिक्रमण पूर्ण आयुष्यात एकदा जरी केले असेल तरी पुष्कळ झाले.

**प्रश्नकर्ता :** मोठ्या माणसांना रडायला जागा आहे तरी कुठे? अशा ठिकाणीच फक्त असू शकते.

**दादाश्री :** हो, खरे आहे. तिथे तर सर्वच जण खूप रडले होते.

**प्रश्नकर्ता :** मी तर असे प्रथमच पाहिले, समाजात ज्यांना प्रतिष्ठित व्यक्ती म्हटले जाते अशा व्यक्ती तिथे उघडउघड रडत होत्या!

**दादाश्री :** हो, अगदी उघडउघड रडत होत्या आणि स्वत:च्या बायकोच्या पाया पडून माफी मागत होत्या. तुम्ही औरंगाबादला आला होता ना, तिथे तुम्ही पाहिले नव्हते का?

**प्रश्नकर्ता :** हो, आणि इतर कुठेच असे दृश्य पाहिले नव्हते!

**दादाश्री :** असे होऊच शकत नाही ना! असे अक्रम विज्ञान नसते, असे प्रतिक्रमण नसते, असे काहीच नसते.

**प्रश्नकर्ता :** असे 'दादाजी' पण नसतात!

**दादाश्री :** हो, असे 'दादाजी' पण नसतात.

## जगातील सर्वात मोठे आश्चर्य औरंगाबादमध्ये

औरंगाबादमध्ये आम्ही वर्षातून एकदा असे सामूहिक प्रतिक्रमण करवून घेतो. त्याला तर आश्चर्यच म्हणावे लागेल ना! हे जे आपले प्रतिक्रमण झाले, ते जगातील सर्वात मोठे आश्चर्यच आहे!

याने तर शक्ती खूपच वाढते. हा तर केवळ शक्तीचाच कारखाना आहे. आणि त्यावेळी आम्ही इतका मोठा विधी करतो की (प्रत्येक) व्यक्तीत निव्वळ शक्तीच उत्पन्न होतात. नाही तर हे वकील, म्हणजे काय साधी-सुधी माणसे आहेत का? म्हणतील, मरण आले तरी चालेल, पण मी कोणाच्या पाया पडणार नाही. खूप शूरवीर (!) पण एकदा त्यांच्यात ही शक्ती उत्पन्न झाली होती, जेव्हा औरंगाबादला मी (त्यांच्याकडून) प्रतिक्रमण करवून घेतले होते तेव्हा चांगलीच शक्ती उत्पन्न झाली होती. आणि त्यांना हे समजले होते की याच्यात खूप लाभ आहे. जबरदस्त शक्ती निर्माण होते! सगळा कमकुवतपणा नाहीसा होतो.

## आलोचना, आप्तपुरुषांजवळच

**प्रश्नकर्ता :** ज्यांच्याकडून मागील काळात खूप दोष झाले आहेत असे लोक तुमच्याकडे येतात, आणि तुमच्या समक्ष आलोचना करतात, तर त्यांना तुम्ही सोडवता का?

**दादाश्री :** जर एखाद्या व्यक्तीने माझ्या समक्ष आलोचना केली तर ती व्यक्ती माझ्याबरोबर अभेद झाली असे म्हटले जाईल. आम्हाला तर त्यांना सोडवावेच लागेल. आलोचना करण्यासाठी दुसरे कोणते स्थानच नाही. जर पत्नीला हे सगळे सांगितले तर ती डोक्यावर बसेल, मित्राला सांगितले तर तो डोक्यावर बसेल. स्वतःला सांगितले तर स्वतः डोक्यावर बसेल, म्हणजे कुणालाच सांगू शकत नाही आणि हल्के होऊ शकत नाही.

म्हणून आम्ही ही आलोचनेची सिस्टीम (पद्धत) ठेवली आहे.

**प्रश्नकर्ता :** या जन्मात आम्ही जे जे दोष केले आहेत, त्या सगळ्यांसाठी आम्ही ज्ञानी पुरुषांसमक्ष माफी मागू शकतो?

**दादाश्री :** हो, नंतर ते दोष हलके होतात. ज्ञानी पुरुषांच्या समक्ष आलोचना केली आणि तीसुद्धा तुम्ही तुमच्या तोंडाने सांगून केली तर फार उत्तम. जर बोलून सांगता येत नसेल तर कागदावर लिहून सांगा, ती दुसऱ्या नंबरची. आणि मनातल्या मनात केली तर ती तिसऱ्या नंबरची. तुम्हाला ज्या 'स्टँडर्ड'मध्ये बसायचे असेल त्या 'स्टँडर्ड'मध्ये बसा. दुसरीत बसायचे की पहिलीत बसायचे ही तुमची मर्जी आहे.

**प्रश्नकर्ता :** हे शक्य आहे का?

**दादाश्री :** हो, शक्य आहे, हे तर सर्वात जास्त शक्य आहे. या सर्व प्रश्नातील सर्वात मोठा (महत्वाचा) प्रश्न हाच आहे.

आमच्या समक्ष, सर्वांच्या देखत बोलतील त्यांचा ओर्केस्ट्रा क्लास. आणि जर तुम्ही म्हणालात 'नाही, तुम्ही एकटे असाल, तेव्हाच मी सांगेन', तर तो फर्स्ट क्लास, मग तुम्ही म्हणालात 'मी बोलणार नाही पण कागदावर लिहून देईन' तर तो सेकन्ड क्लास आणि जर तुम्ही म्हणालात 'कागदावर पण लिहून देणार नाही, मी घरी बसूनच मनातल्या मनात करीन.' तर तो थर्ड क्लास. तुम्हाला ज्या क्लासमध्ये बसायचे असेल तिथे तुम्ही बसू शकता. इथे पैसे-बिसे घेतले जात नाहीत.

**प्रश्नकर्ता :** मला तर हे शक्य आहे की नाही, एवढेच विचारायचे होते.

**दादाश्री :** शंभर टक्के शक्य आहे.

## प्रत्यक्ष ज्ञानींजवळ प्रत्यक्ष आलोचना

स्वत:ची एखादी खाजगी (व्यक्तीगत) गोष्ट कोणाला सांगायची असेल तर लोक का सांगत नाहीत? कारण ते मग त्याला दटावत राहतात. लगाम हातात मिळाला, तर दटावणारच ना? याउलट आम्ही हे दटावण्यासाठी करत नाही. आम्ही तर त्याला सोडवू इच्छितो की मी तुझे सर्व गुन्हे माफ करीन. हे 'दादा भगवान' प्रकट झालेले आहेत!!! हेच जगात सर्वात मोठे वाक्य आहे. वास्तवात हेच तर समजून घ्यायचे आहे की तुम्ही माझ्याजवळ आलोचना कराल तर तुमची सर्व कर्मे भस्मीभूत होतील. क्रमिक मार्ग ही एक वेगळी बाब आहे आणि हा अभेदधर्म आहे. भेदच नाही, वेगळेपणच नाही!

एक दिवस मी या सर्वांना प्रतिक्रमण करायला सांगितले. सगळ्यांना आलोचना करण्यासाठी, त्यांचे जे जे दोष झाले असतील ते सर्व लिहून आणायला सांगितले. नाही तर प्रतिक्रमण तर लोक रोजच करत असतात. पण आलोचना म्हणजे माझ्याजवळ उघड करा. असे एक दिवस सांगितले. तुमच्याकडून जे जे दोष झाले आहेत ते सर्व माझ्याकडे उघड करा. मग आमच्याजवळ ते कशी आलोचना करतात? कधीही झाली नसेल अशी आलोचना करतात. म्हणजे त्यांच्या अगदी वाईटातील वाईट गोष्टी उघड करतात. पण ऑन पेपर-कागदावर लिहून. तोंडावर सांगत नाहीत. जरी कागदावर लिहून सांगितले तरी खूप झाले. कागदावर लिहून देतात आणि तेही खाली सही करून. स्त्रियासुद्धा लिहून, सही करून वाचण्यासाठी देतात, ही खूप मोठी गोष्ट आहे. त्यांना सर्व दोष दिसतात. त्या सर्वांनीच स्वत:कडून जे जे दोष झाले होते ते सारे कागदावर लिहून आणले होते. एकही दोष लिहायचे शिल्लक ठेवले नव्हते.

असे केव्हा होऊ शकते हे माहीत आहे का? अभेदता असेल तेव्हाच. अशी हिम्मत केव्हा येते? अभेदता असेल तेव्हाच. स्त्रियांनी पण सांगितले की काही ठिकाणी माझ्याकडून असे झाले होते आणि काही ठिकाणी तसे झाले होते. नावासकट लिहून दिले होते. वाटेल तो

दोष झाला, तरी हरकत नाही. ते सर्व दोष संपवायला मी तयार आहे. तुमचे लाखो दोष मी एका तासात संपवायला तयार आहे, मात्र तुमची तयारी हवी. निर्दोषला दोष स्पर्शच कसे करतील?

माझ्याजवळ दहा हजार लोकांनी तरी स्वत:ची कमजोरी (दोष) कबूल केली असेल. आणि ती कमजोरी कमी करण्यासाठी तर तुम्ही माझ्याकडे आला आहात. ती कमजोरी मी दुसऱ्या कोणाला सांगूच शकत नाही. तुमची कमजोरी तुमच्या भावाला पण सांगता येणार नाही. तुमच्या बायकोला पण सांगता येणार नाही. कोणालाही सांगता येणार नाही अशी कमजोरी तुम्ही आम्हाला सांगता, आणि इतक्या प्रकारच्या लहान-लहान चुकांपासून जीवनात घडलेल्या मोठमोठ्या चुकांपर्यंत सर्व चुका तुम्ही आम्हाला सांगता. यालाच आलोचना म्हणतात. लोक ते सर्व धुऊन टाकतात. आम्ही जाणतो ना की जग असेच आहे. कलियुगात दुसरे काय असणार?

**प्रश्नकर्ता :** असेच असते.

**दादाश्री :** असेच असते, हे तर आम्ही जाणतोच आणि त्यामुळेच आम्हाला करुणा वाटते की अरेरे! काय दशा आहे बिचाऱ्याची? आम्ही ते धुऊन टाकतो, आणि आमच्यात कधीच दोष नव्हते असे आम्ही थोडेच म्हटले आहे? आमचा पण जन्म कलियुगातच झाला आहे ना! कसले ना कसले तरी दोष असतातच! कोणाचे जास्त असतात, कोणाचे कमी असतात.

## आलोचना, संपूर्ण गुप्त

एखाद्या व्यक्तीने लिहून दिलेली आलोचना जर कोणा दुसऱ्याला वाचायला दिली तर ती व्यक्ती आत्महत्या करील. म्हणून तो कागद आम्ही विधी झाल्यानंतर त्यालाच परत देतो. त्याचे दोष संपवून मग तो कागद त्यालाच परत देतो. कारण तुमचे दोष जर मी कोणाला सांगितले तर तुम्ही आत्महत्या कराल. कोणालाही सांगता येत नाही असे सर्व दोष असतात. वर्तमानपत्रात येतात असे ते दोष नसतात. कधी ऐकलेलेही नसेल, कधी विचारही केला नसेल असे दोष असतात. प्रायव्हेट (खाजगी) दोष म्हणतात ना, असे प्रायव्हेट दोष.

**प्रश्नकर्ता :** पण ज्ञानी पुरुषांच्या चरणी आल्यावर माणूस आत्महत्या का करील?

**दादाश्री :** जोपर्यंत तुमचे दोष ज्ञानींनाच माहीत असतील तोपर्यंत सर्व ठीक आहे, परंतु जर ते दुसऱ्या कोणाला कळले तर व्यवहारात खूप त्रास होईल, म्हणून आम्ही असे करत नाही. आम्ही कोणाला कळू देत नाही. किती विश्वासाने आणि मोकळेपणाने तो आपले गुन्हे उघड करतो! नंतर मग तो कागद मी परत त्यालाच का देतो? कारण त्याला मी असे सांगतो की 'तू हे गुप्तच ठेव आणि महिनाभर रोजच हे वाचत जा आणि पश्चात्ताप करत रहा, त्याबद्दल अश्रू ढाळ, रड आणि मग तो कागद जाळून टाक. महिनाभर तो वाचत राहून पश्चात्ताप कर. त्याची मुळे मी जाळून टाकली आहेत. आता तुला वरती राहिलेला भाग साफ करायचा आहे. एवढे तू कर.

## प्युअर हार्ट तिथेच एकता

एकता आली की तिला 'हार्टची प्युरिटी' (हृदयाची शुद्धता) म्हणतात. माझी सगळ्यांबरोबर एकता होते, कारण हार्ट 'प्युअर' आहे ना! मला तर सगळे अभेदच वाटतात. जे लोक स्वत:चे ॲफिडेव्हिट (गुन्ह्यांची कबुली) लिहितात, त्यात ते एकसुद्धा गुन्हा लिहायचा बाकी ठेवत नाहीत. पंधरा वर्षापासून ते चाळीस वर्षापर्यंतचे सर्व दोष, एकही दोष न सोडता मला सर्व सांगतात. ही मुले-मुली सगळेच जण सांगतात. त्याचे काय कारण?

**प्रश्नकर्ता :** कारण प्युरिटी आहे.

**दादाश्री :** हो, प्युरिटी आहे. ते सर्व जाहीर करतात, आणि त्यानंतर मी ते वाचून विधी करतो आणि कागद त्याला परत करतो.

तीर्थंकरांनी काय सांगितले आहे? आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान. आमच्याकडे आलोचना झाली म्हणजे झाले! मग यापुढे आणखी कोणी *उपरी* नाही की जो मंजूर करू शकेल. इथे झाली तीच शेवटची मंजूरी, ही मंजूरी एकदा झाली की मग तू स्वत:च प्रतिक्रमण कर, आणि प्रत्याख्यानाचा भाव ठेव की पुन्हा असे करणार नाही.

## वेगवेगळ्या आलोचना

सर्व मुली पण माफी मागतात. पंधराव्या वर्षी अशी चूक केली होती, विसाव्या वर्षी असे केले होते, असे सर्व गुन्हे आठवून आठवून इथे माफी मागतात आणि मला म्हणतात 'आज माफी मागत आहे, म्हणून मला माफ करा.'

मग काय शिल्लक राहते ते तुम्हाला माहीत आहे का? आपण जी घट्ट गाठ बांधली असेल ती पुढच्या जन्मी सोडवायचा प्रयत्न कराल तर खूप त्रास होईल, परंतु जर ती गाठ आत्ताच इथे जाळून टाकली तर ती जळलेली गाठ तर राहील, पण (पुढच्या जन्मी) तिला जरासा स्पर्श केला की ती सगळी राख विखुरली जाईल. पुढच्या जन्मी फक्त एवढेच करावे लागेल, बस!

हा मार्ग सोपा आहे की कठीण आहे? आम्ही सर्व काही धुऊन टाकतो. एक ताई तर मला असे सांगू लागली, 'दादाजी, मी एका बाईबरोबर वैर धरले आहे!' मी विचारले 'असे का केले? कसे वैर धरले आहे?' तर ती म्हणाली 'पुढच्या जन्मात नागीण होऊन तिला चावेन. असे वैर मी धरले आहे.' मी तिला सांगितले की 'असे वैर ठेवू नको.' त्यावर ती म्हणाली, 'मी तर असे वैर धरले आहे, आता मी काय करायला हवे?' मग मी तिची त्या दोषातून सुटका केली. तिने पुढच्या जन्मासाठी कसे वैर धरले होते?

**प्रश्नकर्ता :** नागीण होऊन चावेन!

**दादाश्री :** मी तिला सांगितले, 'ताई, एवढी मोठी जोखीम का बरे ओढवून घेत आहेस?' त्यावर ती म्हणाली, 'माझे लग्न झाले तेव्हा माझ्या पतीबरोबर तिची मैत्री होती. ती माझ्या पतीला सोडतच नसे. म्हणून मी त्याच दिवशी निश्चय केला की आता पुढच्या जन्मी मी तिला सोडणार नाही. पुढच्या जन्मी नागीण होऊन तिला चावेन.' मग मी तिला विचारले, 'आता अजून तुला वैर चालूच ठेवायचे आहे का?' तेव्हा ती म्हणाली, 'नाही दादाजी, आता मला यातून सुटका हवी आहे.'

मग मी म्हटले, 'मी तुला यातून सोडवीन.' तिच्या पतीला बोलावले नाही. त्याच्या गैरहजेरीतच मी त्या ताईंना समजावले. जर पतीला बोलावले असते तर उलट त्रास खूप वाढला असता.

डोक्याला जरा मार लागला तरी आपण बेशुद्ध होतो. अरे, एवढीशी बाटली जरी प्यायली तरी बेशुद्ध होतो. म्हणजे बेशुद्ध होणे हा गुन्हा नाही. अशी बेशुद्धी आली तरी घाबरायचे नाही. पण जे दोष झाले असतील त्यांची दादांसमोर प्रत्यक्ष आलोचना करायची की, 'दादाजी, मला माफ करा.' मग आम्ही त्यासाठी विधी करतो. जे दोष होते त्यांना आम्ही भाजून काढतो आणि भाजून काढल्यामुळे नंतर परत उगवण्याच्या लायकीचे राहत नाहीत. आता त्यांना परत फळे येणार नाहीत. ते सर्व आता निष्फळ होतात.

## आलोचना पात्र कृत्ये

आम्ही जी जागृती दिली आहे, तीच जागृती आहे. याहून वेगळी कोणती जागृती नाही. जर त्या जागृतीवर आवरणे आली नसती तर आज खूप उच्च दशा प्राप्त झाली असती. आम्ही ज्ञान देतो, त्या दिवशी खूप उच्च प्रतीची जागृती झालेली असते, तीच खरी जागृती आहे.

**प्रश्नकर्ता :** आम्ही सर्व दादांसमक्ष 'कन्फेशन' (कबूल) करत नाही, दादांना काही सांगत नाही, येथे येऊन चुपचाप बसून राहतो. स्वतःच्या दोषांचे काही वर्णन करत नाही...

**दादाश्री :** इथे येऊन दोषांचे वर्णन केले नाही तरी हरकत नाही. पण तुमच्या आत जे 'दादा' बसले आहेत त्यांच्याजवळ तरी वर्णन करता की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, ते तर करतो, पण जागृती तर वाढायला हवी ना? जागृती वाढविण्यासाठी आम्ही सगळे दोष दादांनाच सांगायला हवेत ना?

**दादाश्री :** सर्व दोष मला सांगायला हवेत असे नाही. सर्व दोष मला सांगत बसलात तर ते कधी पार येईल?

ज्यांना दोषांतून सुटायचे असेल, त्यांनी माझ्याजवळ येऊन आलोचना करावी. ज्यांच्याकडून खूप मोठा दोष झाला असेल, आणि त्यातून बाहेर पडायचे असेल, त्यांनी जर माझ्याजवळ येऊन आलोचना केली तर ती केल्याबरोबर लगेच तो दोष बंद होतो. त्याचे मन माझ्याशी बांधले गेले की मग तो कसा सोडवू शकेल? मग आम्ही भगवंताची कृपा घडवून आणतो. पण त्यासाठी त्यांचे मन आमच्याशी बांधले गेले पाहिजे. ही सर्व डोकेफोड करायला मी कुठे जाऊ? म्हणून तो जर आपले आपण आला आणि मला सांगितले तर मी उपाय करीन. मी कुठे घरोघरी जाऊन सर्वांची चौकशी करत बसू?

जेवढा फायदा झाला तेवढा तरी लाभ मिळाला. बाकी तर याचा अंत येईल असा नाही. जो जास्त जागृत असेल आणि ज्याला स्वच्छ करण्याची इच्छा असेल तो माझ्याजवळ येईल आणि मला खाजगीत सांगेल की 'दादाजी, माझ्याकडून असा गुन्हा झाला आहे.' तर तो दोष बंद होईल. आलोचना केल्यामुळे तो दोष कायमचा बंद होतो. दोष बंद होतो म्हणजे मग तो तुम्हाला जास्त चिकटत नाही.

जग स्वीकारू शकेल असेच दोष सर्वांसमक्ष मला सांगा, इतर सर्व दोष मला खाजगीतच सांगा. आमच्याकडे खाजगीत अनेक लोकांनी आपले दोष कबूल केले आहेत. पण ते सर्व प्रायव्हेट (खाजगी) असतात. दोष उघड केले तर लोक त्याचा दुरुपयोग करतील. फक्त ज्ञानी पुरुषच त्याचा दुरुपयोग करत नाहीत. इतर सर्वजण तर दोष समजल्यावर लगेचच त्याचा दुरुपयोग करू लागतात. हा पंगतीत बसून जेवतो, मग जरी त्याने जास्त भाजी खाल्ली, जास्त लाडू खाल्ले तरी पण तो पंगतीत बसूनच खात आहे ना? मग याला दोष लपविले असे म्हणता येत नाही. जे दोष लोक लपून-छपून गुपचुप करतात, दरवाजा बंद करून करतात, अशा दोषांना लपवलेले दोष म्हणतात! ज्यासाठी अंधार शोधावा लागतो त्या सर्व दोषांना लपवलेले दोष म्हणतात! तुम्ही असा अंधार शोधत नाही ना? त्याला लपवून छपवून केलेले काम म्हणतात. आता लपून छपून करायची कामे जर उघड-उघड कराल तर लोक खूप तिरस्कार करतील. लोक तिरस्कार करतील, अशा गोष्टी इथे उघडपणे सांगू नये.

जाहीर करण्यासारख्या ज्या गोष्टी असतील त्या सर्व तुम्ही इथे करू शकता. उदाहरणार्थ, माझ्याकडून परवा चोरी केली गेली, माझ्याकडून खोटे बोलले गेले. मी कोणाशी दगा-फटका केला असे सर्व बोलू शकता. पण काही गोष्टी मला फक्त खाजगीपणेच सांगू शकता. लपवलेले काम म्हणजे काय ते तुला समजले ना? ज्ञान मिळण्यापूर्वी जे लपलेले असायचे, ते तर तू ओळखतोसच ना! त्याचप्रमाणे ज्ञान मिळाल्यानंतर जे लपून राहते, ते तू ओळखत नाहीस का? लपविण्यासारखे काही नसेल तर हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** दादा, ते मला दिसू लागले आहेत.

**दादाश्री :** दिसू लागले आहेत म्हणजे तू दोष ओळखले आहेस, परंतु त्यांना लपवलेले दोषच म्हणावे लागेल ना? त्यांना तू जमा तर केलेच आहेस ना?

एखाद्या व्यक्तीला भाजी जास्त आवडत असेल आणि तो जर जास्त भाजी खाऊ लागला तर लोक त्याला ओरडतात की तू खूप भाजी खातोस. तेव्हा तो म्हणतो, मी खाणार, तू ओरडणारा कोण? म्हणजे जगात लपविण्यासारखे काय आहे? तर अशी कृत्ये की जे उघडकीस आल्यावर लोक बोंबा मारतात, 'असे केलेस? अशी कामे करतोस?' ही तर निंदनीय कामे आहेत, लोकनिंद्य आहेत दिवसाढवळ्या भर रस्त्यावर जर तुम्ही दाढी करू लागलात तर कोणी ओरडेल का? तुम्ही म्हणाल मला अशी उजेडात दाढी करायची आहे, तर आम्ही थोडीच मनाई करू शकतो? एखादा म्हणेल, मला संडासमध्ये बसल्याबसल्या दाढी करायची आहे. तर आम्ही म्हणू 'कर बाबा' अशी सर्व सूट आहे. ही सर्व लपविण्यासारखी कामे नाहीत.

## खरी आलोचना

माणसांनी खरी आलोचना केलीच नाही. हीच गोष्ट मोक्षाला जाण्याचा रस्ता अडवते. गुन्हा झाला तरी हरकत नाही. खरी आलोचना झाली की मग काहीच हरकत नाही. आलोचना अशा विलक्षण पुरुषांसमोरच केली पाहिजे. स्वतःच्या दोषांची अशी आलोचना आयुष्यात

कधी केली आहे का? कोणासमक्ष आलोचना करणार? आणि आलोचना केल्याशिवाय गत्यंतरच नाही. जोपर्यंत तुम्ही आलोचना करत नाही तोपर्यंत तुम्हाला माफ कोण करविणार? ज्ञानी पुरुष हवे ते करू शकतात. कारण ते कर्ता नसतात. जर ते कर्ता असते तर त्यांना पण कर्मबंधन झाले असते, पण ते कर्ता नाहीत म्हणून हवे ते करू शकतात.

## अंतिम गुरु, 'दादा भगवान'

तिथे तुम्हाला गुरुंसमोर आलोचना करावी लागते. पण अंतिम गुरु हे 'दादा भगवान' आहेत. आम्ही तर तुम्हाला मार्ग दाखविला आहे. आता अंतिम गुरु पण दाखवून दिले आहेत. ते तुम्हाला उत्तरे देत राहतील, आणि म्हणून तर ते 'दादा भगवान' आहेत. जोपर्यंत ते तुमच्यात प्रत्यक्ष प्रकट होत नाहीत तोपर्यंत तुम्हाला 'या' दादा भगवानांची भजना करावी लागेल. ते प्रकट झाल्यावर होता होता आपोआपच ते मशीन सुरू होईल. मग तो स्वत:च 'दादा भगवान' होईल.

## आमच्याजवळ झाकून ठेवले तर संपलेच

ज्ञानी पुरुषांसमोर (दोष) झाकून ठेवले म्हणजे संपलेच समजा. लोक उघड करून सांगण्यासाठीच तर प्रतिक्रमण करतात. तो भाऊ सगळे काही घेऊन आला होता ना? ज्ञानींसमोर तर उलट सगळे उघड करून सांगायला हवे. तिथेच जर झाकून ठेवलेत (लपवलेत) तर काय होणार? झाकल्यामुळे दोष दुप्पट होतात.

## ॲफिडेव्हिटसारखेच

माझ्याजवळ स्त्री-पुरुष ॲफिडेव्हिट (प्रतिज्ञापत्रक) करवून घेतात, जसे तिथे पाद्री समक्ष स्वत:चे गुन्हे कबूल करतात ना, तसे. पाद्री म्हणतात 'भाऊ तुमचे गुन्हे आम्हाला सांगा.' पण तेव्हा तिथे काळोख करतात, चेहरा दिसू नये म्हणून. कारण गुन्हेगाराला ते सहन होत नाही. जर समोर कोणी दिसले तर स्वत:चा गुन्हा कबूल करण्याची शक्ती लोकांमध्ये नसते.

याउलट माझ्याजवळ तर कित्येक स्त्रिया आणि पुरुष सोळाव्या

वर्षी केलेल्या चुकांपासून आजपर्यंत केलेल्या सगळ्या चुका सांगतात. एवढे मोठे ॲफिडेव्हिट यापूर्वी कधी झाले नव्हते. त्याला आलोचना असे म्हणतात. सर्व काही लिहून देतात, मी ते पाहतो आणि त्यांना आशीर्वाद देतो. मग त्यांचे सर्व दोष संपून जातात, आतील रस संपून जातो. जसे एखादे सुंभ असेल, त्याला खूप खूप गाठी बांधल्या असतील परंतु जर त्या सुंभाला जाळून टाकले तर त्या गाठी राहतील पण त्या गाठी काही नुकसान करतील का? नाही. त्याप्रमाणे मी सुंभ जाळून टाकतो. नंतर गाठी तर राहातात, पण त्यांना तुम्हाला जरासा असा स्पर्शच करावा लागेल. मग सर्व गळून पडेल!

## आलोचना पत्र

आमच्याजवळ लोक आलोचना पत्र लिहून आणतात. जेवढे जेवढे दोष त्यांना माहीत असतात, ते सर्व दोष ते त्यात लिहितात. कोणी एक नाही, तर हजारो माणसे! मग त्या दोषांचे आम्ही काय करतो? त्याचे आलोचना पत्र वाचून, त्याबद्दल विधी करून ते पत्र त्यालाच परत देतो. जर आम्ही कोणाला सांगितले की ह्याचे असे असे दोष आहेत, आणि थोड्याशा गोष्टी जरी बाहेर पडल्या आणि त्याचे दोष इतरांना समजले तर...! त्याला त्याचे दोष बाहेर जाहीर करायचे नसतात. म्हणून तर तो बिचारा सारखे सारखे त्या दोषांना सांभाळत (लपवीत) असतो. स्वत:चे दोष सांभाळेल की नाही? बाहेर का कळू देत नाही? कारण तसे केले तर अब्रू जाईल. त्याने माझ्याकडे लिहून दिले आहे ते काय अब्रू घालविण्यासाठी दिले आहे? तो तर मला म्हणतो 'साहेब, माझे दोष धुऊन द्या, माझ्याकडून असे असे दोष झाले आहेत. मला माफ करा.' म्हणजे किती विश्वास ठेवला आहे त्याने माझ्यावर! जगात घडले नसतील असे दोष तो लिहून देतो. दोष वाचूनच तुम्हाला वाटेल अरेरे! असले कसे हे दोष?

असे हजारो लोकांनी स्वत:चे दोष लिहून दिले आहेत. स्त्रियांनी पण स्वत:चे सर्व दोष उघड केले आहेत, सर्वच दोष. सात पती केले असतील तर त्या सातही जणांची नावे लिहिलेली असतात! बोला आता, इथे आम्ही काय करावे? थोडी जरी माहिती बाहेर पडली तर ती

आत्महत्याच करील. आमच्यावर खूप मोठी जोखीम पडते. म्हणून आम्ही काय करतो? जोखीम आमच्याजवळ ठेवतो, तिच्याकडून सात चुका झाल्या असतील आणि आम्ही जर त्या जाहीर केल्या, तर काय जाहीर करण्यासाठी तिने हे सर्व आम्हाला सांगितले आहे? म्हणजे यात तर आम्ही खूप मोठी जोखीम उचललेली आहे! एक दहा-अकरा वर्षाच्या मुलीच्या वडिलांनी मला सांगितले, 'दादा, मी मारून टाकण्याच्या लायकीचा आहे.' मी विचारले, का बरे? तर तो म्हणाला, मी माझ्या मुलीला मांडीवर बसवून आत हात फिरवतो.

**प्रश्नकर्ता :** असे कसे करतात ही माणसे?

**दादाश्री :** असे एकच नाही, बरेच लोक आले होते. मग त्याने आपल्या बायकोला म्हटले, 'आपली मुलगी आता 10-11 वर्षाची झाली आहे, तर मला तिला भोगायचे आहे.' वडिलांनी एकदा हात फिरवला की मग त्या मुलीची नजरच बदलते. त्याच नजरेने ती इतर लोकांकडे बघू लागते. ती मग विकारी बनते. वडिलांनी तर खूप स्थिरता ठेवली पाहिजे. म्हणजे त्यांनी दुसऱ्या स्त्रीकडे असे पाहताच कामा नये. पण असे काही भानच नसते ना! त्याला तर मारले देखील होते. त्याच्या बायकोने आणि इतरांनी मिळून त्याला मारले होते की अशी वाईट इच्छा का करतोस? दूषमकाळातील लोकांची वागणूक पाहिली ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** ती मुले सत्संगात आली होती ना, तिथे यात्रेमध्ये, तेव्हा त्याने सत्संगातीलच एका व्यक्तीबरोबर लग्न केले (लग्नाचे भाव मनात आणले). तो पंचवीस वर्षाचा होता आणि ती 35 वर्षाची विवाहित स्त्री होती. मग त्याने मला लिहून दिले, 'ह्या स्त्रीबद्दल मी असे भाव केले होते, त्याचे प्रतिक्रमण करतो. त्या स्त्रीसाठी प्रतिक्रमण करतो.'

अरेरे, तू असे सर्व करत होतास? अरे, सत्संगातील माणसांसमोर असे करताना तुला लाज नाही वाटली? असे सारे प्रायश्चित्त! (पण) हे सर्व क्षमा करण्यायोग्य आहे. काळाचा प्रभावच ना? आता तर भावाबरोबर, बहिणीबरोबर...काय हा प्रकार? कधी ऐकलेले नाही,

पाहिलेले नाही, असे हे सर्व. डोळ्यांना, कानांना त्रासदायक होत आहे. भरकटलेली ही माणसे? आता खूप झाले, सावधान! आता तरी सावध व्हा!

## एक-एक दोष असंख्य थर असलेले

असे आहे की, या जगात माफी हे सगळ्यात मोठे शस्त्र आहे. पश्चात्ताप आणि माफी. भगवंत माफ करत नाहीत. भगवंतांना माफ करण्याचा अधिकारच नाही. हे ज्ञानी पुरुषच सर्व दोष माफ करू शकतात. ते एजन्ट आहेत. मूळ भगवंत देहधारी नसतातच. जे देहधारी असतात, तेच सर्व करू शकतात. तेव्हा अजून काही दोष झाले असतील तर माझ्याकडे माफी मागून घ्या.

तुला रोज तुझे किती दोष दिसतात?

**प्रश्नकर्ता :** दोनशे-तीनशे दिसतात.

**दादाश्री :** सात वर्षांपासून दोनशे-तीनशे दोष दिसतात आणि दोनशे-तीनशे निघून जातात. परत दुसरे दोष दिसू लागतात.

एक तर त्या दोषांना खूप पाकळ्या असतात आणि नवीन दोष पण होतात, पण हे जे दोष आहेत त्यांचे अनंत थर असतात!

**प्रश्नकर्ता :** रोज दोष होतच राहतात आणि याप्रकारे त्यांचा पश्चात्ताप पण करतो, मग ही लिंक (साखळी) तुटणार तरी कधी?

**दादाश्री :** ती संपतेच, याप्रकारे करत राहिलात तर सर्व दोष संपणारच. मी ज्या मार्गाने गेलो तोच मार्ग मी तुम्हाला दाखवीत आहे.

## पत्नीसारखे प्रेम प्रतिक्रमणाशीही

पत्नीशी जेवढी ओळख आहे तेवढी ओळख प्रतिक्रमणाशी व्हायला हवी. जसे पत्नीला विसरू शकत नाही तसेच प्रतिक्रमण पण विसरता कामा नये. दिवसभर माफी मागतच राहिले पाहिजे. माफी मागायची सवयच लागली पाहिजे. मात्र इथे तर दुसऱ्यांचे दोष पाहायची सवय लागली आहे.

**प्रश्नकर्ता :** अशी किती प्रतिक्रमणे करायला हवीत?

**दादाश्री :** जसे रोज खाता, पिता, दिवसभर श्वास घेता त्याच प्रमाणे संपूर्ण दिवस प्रतिक्रमण करत राहिले पाहिजे.

## प्रतिक्रमणांचा तांडा

जसजसे दोषांचे प्रतिक्रमण करत जातो तसतसे दोष जास्त दिसू लागतात. नंतर तर कित्येकांना दोनशे-दोनशे दोष दिसू लागतात. एक भाऊ साहेब म्हणतात, दादा, हे मी कसे करणार? माझा मेंदू थकून जातो. पाचशे-पाचशे, हजार-हजार प्रतिक्रमणे रोज करतो, पण तरी कमी होतच नाही! कारण माल पण तसाच भरून ठेवला आहे ना? आणि या बिचाऱ्यांकडे तर जास्त मालच नाही, यांनी लहान-लहान दुकाने उघडली होती, याउलट त्यांनी तर मोठीमोठी गोडाऊन्स भरली होती, पण आता पुष्कळ रिकामी केली आहेत.

**प्रश्नकर्ता :** या महात्म्यांना तर असे काही झाले की लगेच प्रतिक्रमणाचे भाव निर्माण होतात.

**दादाश्री :** हो, ताबडतोब, आपोआपच येतात. सहजपणे येतात.

तुमची किती प्रतिक्रमणे होतात?

**नीरू बहन :** रोज पाचशे होतात.

**दादाश्री :** 'ह्या' ताई रोज पाचशे-पाचशे प्रतिक्रमण करतात! कोणी पन्नास करतात, कोणी हजार करतात, जेवढी-जेवढी जागृती वाढते, तेवढी प्रतिक्रमणे ते करतात. पण हा निरंतर प्रतिक्रमण करण्याचा मार्ग आहे.

हे प्रतिक्रमण म्हणजे 'शूट ऑन साइट.' 'शूट ऑन साइट' म्हणजे दोष होताक्षणीच त्याचे निवारण करून टाकणे, ताबडतोब 'ऑन दि मोमेन्ट.' जागृती एवढी असते की 'शूट ऑन साइट' केल्याशिवाय राहतच नाहीत. एक पण दोष दिसल्याशिवाय राहत नाही. तसे झाले तरच माणसाचे दोष संपून जातात, आणि निरंतर संयम राहतो. निरंतर संयम!

सगळ्यांना सांगितले आहे की रस-पोळी खा, तूप खा, सर्व काही खा, आणि तरी निरंतर संयमात राहू शकता, वीतराग मार्ग हा असा आहे.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता, की रोज पाचशे-पाचशे प्रतिक्रमणे होतात. तर जेवढी जास्त प्रतिक्रमणे होतात, ते चांगले म्हणावे की जेवढी कमी प्रतिक्रमणे होतात, ते चांगले म्हणावे?

**दादाश्री :** जेवढी जास्त होतील तेवढे चांगले. निव्वळ दोषांचेच भांडार आहेत. कृपाळूदेवांनी म्हटले आहे, *'हुं तो दोष अनंतनुं भाजन छुं करुणाळ, दीठा नहीं निज दोष तो तरीये कोण उपाय?'* (मी तर अनंत दोषांनी भरलेले भांडे आहे. मला जर स्वत:चे दोष दिसले नाहीत तर मी कसा तरेन?) इथे तर पाचसुद्धा दोष दिसत नाहीत. मग कसे काय तरता येईल? पूर्णपणे दोषांनी भरलेले भाजन आहे. म्हणून ज्याचे (रोज) पाचशे-पाचशे दोष संपतात त्याचे लवकर स्वच्छ होते. कोणाचे पन्नास-पन्नास दोष संपतात, तर कोणाचे शंभर-शंभर दोष संपतात, पण दोष संपत जात आहेत.

**प्रश्नकर्ता :** जसेजसे उर्ध्वीकरण सुरू होते, तसेतसे मग दोष कमी व्हायला लागतात ना?

**दादाश्री :** नाही, उर्ध्वीकरणाची काही गरज नाही. जेवढी जास्त जागृती तेवढे जास्त दोष दिसू लागतात आणि दोष दिसले की लगेचच त्यांचे प्रतिक्रमण करायला हवे. आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान, लगेचच, 'ऑन दि मोमेन्ट'! 'शूट ऑन साइट!'

**प्रश्नकर्ता :** जशीजशी प्रतिक्रमणे होत जातात, तशीतशी काही अवस्थेनंतर प्रतिक्रमणे कमी होत जातात ना? पण मग वाढतच का जातात?

**दादाश्री :** ती कमी व्हायला खूप कालावधी लागेल, कारण अनंत जन्मांचा माल भरून आणलेला आहे.

## तो भगवंत होतोच

कित्येक वर्षे या नीरू बहन रोज पाचशे-पाचशे प्रतिक्रमण करतात.

तेव्हा कुठे आता त्याचा परिणाम येऊ लागला आहे. बाकी काहीच करायची गरज नाही. फक्त ही आज्ञा पाळायची आहे आणि 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करत राहायचे आहे. कोणी आले आणि आपल्या मनात जर असा विचार आला की 'इतक्या गर्दीच्या वेळी हे आता कशाला आले?' असे म्हटले म्हणजे आपण त्यांची विराधना केली, म्हणून समोरच्याच्या आत्म्याला हे सगळे लगेच कळले. म्हणून आपण ताबडतोब म्हटले पाहिजे 'चंदुभाई, अशी भावना का केली? हे अतिक्रमण केले, म्हणून आता प्रतिक्रमण करा.'

हा आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान याचा मार्ग आहे, 'शूट ऑन साइट.' रोज तीनशे-तीनशे चुका, चारशे-चारशे चुका दिसतील. ज्याला स्वत:ची एक पण चूक दिसते, तो भगवंत होतो. आणि जर माणसात दोष नसते, तर सर्वत्र भगवंतच दिसले असते! जो दोषरहित झाला, त्याला भगवंत म्हणतात!

तुमचे काम तर झाले! आता जशीजशी शक्ती वाढेल, तसेतसे दोष दिसू लागतील. सध्या तर स्थूल दोष दिसतील, नंतर सूक्ष्म दिसतील. जेवढे दिसतील, तेवढे निघून जातील. नियम असा आहे की जे दोष आपल्या आत आहेत, ते जेवढे दिसतील तेवढे निघून जातील. आपण जेव्हा झोपलेले असू तेव्हा चोर घुसला असेल आणि आपण जागे झालो तर? चोर पळायची तयारी करतो, आपण जागे झालो म्हणून! त्याचप्रमाणे आपण जागृत झालो की लगेचच हे सर्व दोष पळून जायची तयारी करतात.

## अगदी थोडक्यात आणि पद्धतशीर प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** दादाश्री, प्रतिक्रमणाची क्रिया समजावून सांगा ना. खूप लोक म्हणतात, 'मी दोनशे प्रतिक्रमणे केली' तर ती ते कशी काय करतात?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की जसेजसे आपण अधिकाधिक खोलवर उतरत जातो तसेतसे स्वत:चे आणखी आणखी दोष दिसू लागतात.

**प्रश्नकर्ता :** मला तर माझेच दोष दिसतात.

**दादाश्री :** हे तर आता मी तुम्हाला ज्ञान दिले आहे म्हणून दिसतात, नाही तर यापूर्वी कुठे दिसत होते? आता दिसतात ना? आता हे जे दोष दिसतात त्यासाठी माफी मागायला हवी. प्रतिक्रमण केल्याने दोष दिसू लागतात. कोणाला रोज पंचवीस दिसतात, तर कोणाला पन्नास दिसतात, कोणाला शंभर दिसतात. (रोज) पाचशे-पाचशे दोष दिसू लागतात अशी दृष्टी खुलत जाते, दर्शन खुले होत जाते.

तुमच्याबरोबर बोलताना कधी कडक बोलतात पण त्याचबरोबर यांना स्वतःचा दोष पण दिसतो की ही चूक झाली. पण तुला तुझे दोष दिसतात की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, मला माझे दोष दिसतात.

**दादाश्री :** मग तुमचे कल्याणच झाले म्हणायचे!

आपले महात्मा तर प्रतिक्रमण कसे करतात? पट, पट, पट लगेचच! 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण करतात. त्यामुळे मग दोष उत्पन्नच होत नाही ना!

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करताना प्रतिक्रमणाचा जो मोठा विधी दिला आहे, तो आम्ही संपूर्ण बोलायला हवा की संक्षिप्तपणे भावपूर्वक करू शकतो?

**दादाश्री :** भावपूर्वक संक्षिप्तपणेच करावा. द्रव्यकर्म, भावकर्म, नोकर्म वगैरे तर आम्ही लिहिले आहे, पण तुम्ही थोडक्यात केला तरी चालेल, हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** दादा, मग थोडक्यात प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** हे जे काही घडले ते बरोबर नाही, असे आपल्याला वाटले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** हो, पण अगदी थोडक्यात प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** दादा भगवान यांच्या साक्षीने, हा जो दोष झाला त्याबद्दल मी क्षमा मागतो, आता पुन्हा असे करणार नाही. बस, फक्त एवढेच म्हणावे. हेच आहे अगदी थोडक्यात प्रतिक्रमण. त्याचे मन-वचन-काया आणि भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्म असे सगळे बोलण्याची काही गरज नाही. हे सर्व तर नवीन लोकांना शिकवण्यासाठी आहे.

आता जर कोणाचे कोणाशी शत्रुत्व असेल, तेव्हा मात्र सर्व पद्धतशीरपणे बोलून प्रतिक्रमण करायला हवे ज्याच्याबरोबर शत्रुत्व आहे त्याच्यापर्यंत पोहोचविण्यासाठी आवश्यक आहे. तर मग शत्रुत्व संपेल. असे पद्धतशीरपणे, पूर्ण सविस्तर बोलत राहिल्याने सर्वच जणांशी शत्रुत्व संपत जाते. आणि त्याचबरोबर समोरच्या व्यक्तीलाही जाणीव होते की आता माझे मन त्यांच्याबद्दल चांगले होत चालले आहे. प्रतिक्रमणामध्ये एवढी जबरदस्त शक्ती असते.

**प्रश्नकर्ता :** दोषांसाठी आम्हाला, ह्या जन्मात, संख्यात जन्मात, असंख्यात जन्मात वाणीद्वारा जे जे दोष झाले असतील, राग-द्वेष आणि कषाय संबंधी दोष झाले असतील, असे सर्व बोलण्याची आवश्यकता आहे का?

**दादाश्री :** हो, असे सर्व बोलायला हवे. अन्य लोकांबरोबर असेल तर थोडक्यात करू शकता, क्षमा मागितली, पश्चात्ताप केलात तरी चालेल.

## हा आहे आमचा सूक्ष्मातिसूक्ष्म शोध

ज्यांच्या बाबतीत खूप जास्त अतिक्रमण झाले असेल त्यांच्यासाठी तर प्रतिक्रमणाचा यज्ञच केला पाहिजे. अतिक्रमण खूप केले पण प्रतिक्रमण केलेले नाही. म्हणून हे सर्व आहे.

प्रतिक्रमण हा तर आमचा सूक्ष्मातिसूक्ष्म शोध आहे. जर हा शोध समजून घेतला तर कोणाचेच कोणाशी भांडण राहणार नाही.

## गहन प्रतिक्रमणामुळे पूर्व जन्म पण दिसू शकतो.

प्रतिक्रमणात जे खूप खोल उतरतात त्यांना पूर्व जन्म सुद्धा आरपार

दिसतो! एखाद्याला पूर्व जन्म पण दिसतो. सगळ्यांनाच दिसत नाही. कोणाचे सरळ परिणाम असतील, त्याला आरपार दिसते. पण आता पूर्व जन्म पाहून आपल्याला काय करायचे आहे? आपल्याला तर मोक्ष हवा आहे ना?

## सामूहिक प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** आपण जे प्रतिक्रमण करतो, त्यात जे जे दोष झाले आहेत, ते सर्व आठवून त्याबद्दल आपण क्षमा मागतो. तरी दोष तर पुष्कळच असतात पण त्यातील कित्येक तर आपण विसरूनही गेलेलो असतो, मग त्यांची पुन्हा आठवण काढून आपण दु:खी का व्हायचे?

**दादाश्री :** ते दु:खी होण्यासाठी नाही. आपले वहीखाते जितके शुद्ध होईल, तितकी शुद्धी होईल. अखेरीस तुम्हाला ते वहीखाते शुद्ध तर करावेच लागेल. मोकळ्या वेळात तासभर जर त्यासाठी घालवला तर काय बिघडले?

**प्रश्नकर्ता :** दोषांची यादी तर खूप मोठी होत जाते.

**दादाश्री :** यादी खूप मोठी झाली, म्हणजे समजा एका व्यक्तीबरोबर शंभर प्रकारचे दोष झाले आहेत, तर त्याचे असे सामूहिक प्रतिक्रमण करावे की या सर्व दोषांबद्दल मी तुमची माफी मागत आहे.

**प्रश्नकर्ता :** आम्ही ज्याला एकत्रित प्रतिक्रमण म्हणतो, तेच हे सामूहिक प्रतिक्रमण आहे ना?

**दादाश्री :** हो, तेच सामूहिक.

## व्यक्तीगत प्रतिक्रमण

व्यक्तीगत प्रतिक्रमण कोणाचे करावे लागते? तर ज्याच्याबरोबर आपले अतिक्रमण होत असेल त्याचे. आपली पूर्वजन्मीची कर्मे असतील, इतर जी काही कर्मे केली असतील, किंवा जे आपले ओळखीचे नसतील, तुम्हाला माझ्याकडून काही इजा झाली असेल म्हणजे ज्या दोषांची

स्वत:ला जाणीव नाही, अशा सर्व दोषांसाठी सामूहिक प्रतिक्रमण करावे. आणि माझा पाय तुम्हाला लागला आहे हे माझ्या लक्षात आले तर त्यासाठी मला तुमचे व्यक्तीगत प्रतिक्रमण करावे लागते. आणि ते लगेच करून घ्यावे.

## जोरदार अवस्थांमुळे प्रतिक्रमणाला अडथळे येतात

**प्रश्नकर्ता :** दादा, कित्येकदा चूक झाल्यानंतर मी तुम्हाला आठवून, 'हे दादा भगवान, माझ्याकडून चूक झाली, त्याची मी क्षमा मागते, एवढेच म्हणते.' मग मी सविस्तर प्रतिक्रमण करत नाही.

**दादाश्री :** माफी मागता त्यात काही हरकत नाही, पण प्रतिक्रमण तर करायलाच हवे. प्रतिक्रमण करणे शक्यच नसेल तरच माफी मागावी.

**प्रश्नकर्ता :** कधी कधी अवस्थाच इतकी जोरदार असते की ती प्रतिक्रमण होऊ देत नाही.

**दादाश्री :** त्यासाठी माफी मागावी.

## अतिक्रमणांची बॉम्बार्डिंग

**प्रश्नकर्ता :** एका तासात पाच पंचवीस अतिक्रमणे होतात.

**दादाश्री :** तर त्यासाठी एकत्र प्रतिक्रमणे होऊ शकतात. एकत्र (प्रतिक्रमणे) करावी आणि एकत्र प्रतिक्रमण करत आहे, असे म्हणावे.

**प्रश्नकर्ता :** एकत्र प्रतिक्रमणे कशी करावीत?

**दादाश्री :** खूप सारी अतिक्रमणे झाली आहेत म्हणून त्या सर्वांचे एकत्र प्रतिक्रमण करतो. ज्या विषयांच्या बाबतीत अतिक्रमणे झाली असतील त्या त्या विषयांसाठी बोलावे की या विषयासाठी, त्या विषयासाठी, मी एकत्र प्रतिक्रमण करतो असे म्हणावे, म्हणजे निराकरण झाले. आणि तरी देखील काही बाकी राहिले तर आम्ही धुऊन टाकू. पण त्यासाठी बसून राहायची गरज नाही. बसून राहिले तर सर्व काही आतल्या आतच राहून जाईल. द्विधा अवस्थेत राहायची गरज नाही.

एक गृहस्थ मला म्हणतात, 'दादा, मला एकाच दिवसात दोन-दोन हजार प्रतिक्रमणे करावी लागतात. मग मी काय करू? मी थकून जातो.' म्हणून मी त्यांना सामूहिक प्रतिक्रमण करण्यास सांगितले. दोन हजार प्रतिक्रमणे माणूस कसा करू शकेल? दोन-दोन हजार वेळा बोलणे आणि करणे, हे कसे काय शक्य आहे? आता, जेवढे दोष दिसतात, तेवढे दोष निघून जातात आणि परत दुसरे येतात. जेवढे दोष दिसले, ते मुक्त होऊन निघून गेले. तेव्हा जर कोणी असे म्हटले, 'तसाच्या तसा दोष पुन्हा दिसला.' तर त्याला म्हणावे तोच तोच दोष परत येत नाही. पण जसे कांद्याचे थर असतात, एक थर काढला तर परत दुसरा दिसतो. तसे हे दोष पण कांद्याच्या थरांसारखे असतात. आपण एक थर काढला तर दुसरा थर दिसू लागतो. म्हणजे तोच थर परत येत नाही, तो तर निघून गेला. तीस थर होते त्यातला एक गेला, आता एकोणतीस राहिले. मग एकोणतीसमधून एक थर जाईल, तेव्हा अठ्ठावीस राहतील.

अनंत दोषांचे भांडार आहे म्हणून रोज दोन-दोन, तीन-तीन हजार दोष दिसतील. ते गृहस्थ तर थकून गेले, म्हणून मग आम्ही त्यांची लेव्हल थोडी कमी केली. माणूस एवढे सर्व करू शकत नाही. जागृती खूप वाढली म्हणून खूप दोष दिसतात. ते गृहस्थ तर एक मोठे व्यापारी आहेत, तेव्हा त्यांना त्रास होईल ना! म्हणून मग आम्ही त्यांची जागृती थोडी मंद केली आणि त्यांना सामूहिक प्रतिक्रमण करायला सांगितले. सामूहिक म्हणजे सर्वांचे एकत्र. जेवढे दोष झाले असतील त्या सर्वांचे एकत्र. एरवी आपले प्रतिक्रमण कसे व्हायला हवे? तर 'शूट ऑन साइट' व्हायला हवे. सगळे कॅश (रोख) व्हायला हवे.

दोष होताक्षणीच प्रतिक्रमण. कित्येक लोक तर असेही म्हणतात की, 'दादा, आता सहन होत नाही. माझ्याने आता प्रतिक्रमणे होऊच शकत नाहीत. इतकी सारी प्रतिक्रमणे करायची आहेत, एकापाठोपाठ एक, ती संपतच नाहीत. इतके सारे दोष दिसतात. म्हणून मग मी त्यांना सामूहिक प्रतिक्रमण करायला सांगतो. पुष्कळ दोष होत असतील तर

काय करणार? नुसते दोषांचेच भांडार आहे, आणि तरी मनात मात्र असे धरून बसला आहे, 'मी हा आहे, मी तो आहे', असा कोण आहेस तू? कोणी अपमान केला की कळेल तू कोण आहेस ते?

## शिल्लक असलेल्या दोषांसाठी उपाय

**प्रश्नकर्ता :** जर चुकून प्रतिक्रमणे करायची राहिली तर सामूहिक प्रतिक्रमण करून (दोष) निघून जातात का?

**दादाश्री :** हो, त्याने तर पुष्कळसे दोष निघून जातात. पुष्कळ दिवसांची पुंजी साठली असेल तर तिला एकदम घालविण्याचा हाच सर्वात मोठा उपाय आहे. सर्व दोष एकदम उडवून टाकले जातात! उलट हा तर चांगला मार्ग आहे!

## सामायिकमध्ये दोषांचा चक्काचूर

**प्रश्नकर्ता :** ज्ञान घेण्यापूर्वी जेवढे दोष झाले असतील त्या सर्व दोषांचे 'शूट ऑन साइट' प्रतिक्रमण कसे काय होऊ शकेल?

**दादाश्री :** ते दोष जरा गाढ आहेत त्यामुळे ते त्याच्या प्रकृतीस्वभावात येत राहतात. त्यावरून लक्षात येते की हे पहिल्यापासूनच आहेत. अर्थातच त्या दोषांसाठी जास्त प्रतिक्रमणे करावीत.

**प्रश्नकर्ता :** सामायिकमुळे ते जास्त चांगले ओळखता येतात का?

**दादाश्री :** हो, सामायिकमध्ये तर खूप सारे (दोष) ओळखता येतात. परंतु जर हे दोष आतून येत असतील, तर त्याचा अर्थ पहिल्यापासूनच हा प्रकृतीचा गुण आहे. म्हणजेच पूर्वीही हे दोष होते म्हणून त्यांची जास्त प्रतिक्रमणे करावी. आणि कित्येक दोष की जे (तुमच्यात) नाहीत, त्यांच्यासाठी काहीच करायचे नाही.

## ज्ञानात राहून कर्मातून मुक्त होता येते

**प्रश्नकर्ता :** ज्ञान घेतल्यानंतर कर्मबंधन होते का?

**दादाश्री :** वाकडे बोलले गेले तर कर्मबंधन होत नाही, पण

कर्म सुटतही नाही. कर्म कधी सुटते? तर जेव्हा ज्ञानपूर्वक असेल, समजपूर्वक असेल तरच. ज्ञानपूर्वकच त्यांचा निकाल करू शकतो. अज्ञानाने बांधलेल्या कर्मांचा ज्ञानपूर्वक निकाल करू तेव्हाच सुटका होईल. आज जरी आवडत नसेल तरीही त्यांचा ज्ञानात राहून निकाल करावाच लागेल. 'मी शुद्धात्मा आहे' असे होऊन ते सर्व पाहत राहावे. याप्रकारे निराकरण करावे लागेल.

प्रतिक्रमण हे तर (दोषमुक्त होण्यासाठी) सर्वात मोठे हत्यार आहे.

## चरण विधीत प्रतिक्रमण की शक्तींची मागणी?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणे केली तर लवकर समाधान होत नाही का?

**दादाश्री :** केव्हा?

**प्रश्नकर्ता :** चरण विधी करतो तेव्हा.

**दादाश्री :** नाही, तेव्हा तर शक्ती भरायची. प्रतिक्रमण तर नंतर आपल्या परीने करत राहावे.

## विवाह वेळेस सुद्धा प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** कितीतरी धूत राहतो, परंतु अजूनही चिकट कर्मे शिल्लकच आहेत?

**दादाश्री :** संसार म्हणजे अतिक्रमण आणि तो प्रतिक्रमणाने धुवायचा. तुम्ही नियमितपणे खाता, पिता, दिवसभर श्वास घेता ना? तसेच प्रतिक्रमण पण नियमितपणे पूर्ण दिवस करायचे आहे.

बाशिंग बांधून लग्न केले होते, तेव्हा काही लाज वाटली होती का? सगळ्यांनीच बाशिंग बांधून लग्न केले होते ना? त्या वेळेला असा विचार मनातही आला नव्हता की या सगळ्यांसाठी प्रतिक्रमणे करावी लागतील. आणि आता जेव्हा एकदम प्रतिक्रमण करायची वेळ आली तेव्हा मात्र खूप जड जात आहे.

## दोष आहे तर दोष पाहणाराही आहे

**प्रश्नकर्ता :** दादा, दोष दिसायचे बंद होतील असे काही तरी करा ना?

**दादाश्री :** नाही, दोष तर दिसणारच! दोष दिसत आहेत म्हणून तर आत्मा आहे आणि (दोष) हे ज्ञेय आहेत.

**प्रश्नकर्ता :** पण दोष दिसणारच नाहीत असे काही करता येणार नाही का?

**दादाश्री :** नाही. जर दोष दिसलेच नाही तर मग आत्मा निघून जाईल. आत्मा आहे म्हणून तर दिसतात. पण आता ते दोष नाहीत, ते ज्ञेय आहेत आणि तुम्ही ज्ञाता आहात.

## अतिक्रमणांपासून आता कंटाळा

**प्रश्नकर्ता :** या सर्व ज्या फाइली आहेत ना, त्यामुळे दिवसभर इतके दोष दिसतात की आता स्वत:चाच खूप कंटाळा येतो.

**दादाश्री :** तसे तर होणारच.

**प्रश्नकर्ता :** दिवसभर क्षणोक्षणी इतके सारे दोष दिसत राहतात.

**दादाश्री :** दोष दिसतात, म्हणजे ते दोष आता निघून जातील. दोष तर दिसणारच ना! दोष दिसत आहेत म्हणजे आत्मा झाला! शुद्ध झाल्यावरच दोष दिसतील ना!

**प्रश्नकर्ता :** पण संपूर्ण दिवस? क्षणोक्षणी?

**दादाश्री :** हो, उलट (स्वत:चे) दोष दिसतात हे तर खूपच चांगले! स्वत:चे दोष दिसावे आणि जागृती यावी यासाठीच तर तप करायला सांगितले आहे. जागृतीमुळेच दोष दिसतात.

## पश्चात्ताप करतो तो चंदू

**प्रश्नकर्ता :** आम्ही काही चूक केली तर त्याचे प्रतिक्रमण करतो,

पण तरीही प्रतिक्रमण करून आम्ही शुद्ध का होत नाही? मन आनंदी किंवा नॉर्मल का होत नाही? एखाद-दोन दिवसासाठी ते चिकटल्यासारखे का राहते?

**दादाश्री :** त्याला काय हरकत आहे? जर पश्चात्ताप वाढविलात तर मग परत चूक होणार नाही. जागृती राहते म्हणून नुकसानकारक नाही. जरी ते चिकटले तरी हरकत नाही, मग पुन्हा (तशी) चूक होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** पश्चात्ताप होतो म्हणून तर दुसऱ्या गोष्टीतील लक्ष सुटून याच्यातच अडकून राहतो ना?

**दादाश्री :** जेवढा पश्चात्ताप होईल तेवढे चांगलेच आहे. तुम्हाला पश्चात्ताप करण्याची गरज नाही. आणि चंदुभाई पश्चात्ताप करत आहे. तुम्ही नाही.

## सिनेमा मध्येच बंद करायला हवा का?

**प्रश्नकर्ता :** आता हे आयुष्याचे नाटक लवकर संपेल तर बरे, असे वाटते.

**दादाश्री :** असे का म्हणता? मग या बांगड्या कोण घालणार?

**प्रश्नकर्ता :** मला नाही घालायच्या आता?

**दादाश्री :** असे नाही. बांगड्या घाला. हिंडा-फिरा, सगळे करा. लवकर संपवायचे आहे असे बोलू नये. अजून तर आपल्याला खूप कामे करायची आहेत. म्हणून ह्या देहाला सांभाळायचे. तुम्ही असे का बोलता?

**प्रश्नकर्ता :** दादा, तुम्ही वीस दिवस इथे होता, पण मी एकाही ठिकाणी येऊ शकले नाही.

**दादाश्री :** म्हणून काय देह संपवून टाकायचा का?

**प्रश्नकर्ता :** पण मी किती कच्ची पडते, नाही का?

**दादाश्री :** या देहाचे तर एवढे सारे उपकार आहेत की त्यासाठी कोणताही औषधोपचार करावा लागला तरी करा. या देहानेच आपल्याला 'दादा भगवान' यांची ओळख झाली. यापूर्वी अनंत देह गमावले, सगळे वाया गेले. या देहाच्या माध्यमातून (ज्ञानींची) ओळख झाली, म्हणून हा देह मित्रासमान झाला आहे. तर आता ह्या देहाला सांभाळत राहायला हवे. म्हणून आज प्रतिक्रमण करा की 'हा देह लवकर संपेल तर बरे, असे म्हटले त्याबद्दल मी माफी मागते.'

**प्रश्नकर्ता :** हो, दादा.

**दादाश्री :** आपण सिनेमा बघत असू आणि मध्येच सिनेमा बंद पडला तर काय कराल?



# [ 25 ]
# प्रतिक्रमणाची सैद्धांतिक समज

## परभावात तन्मयाकार

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात जर अतिक्रमण झाले तर ताबडतोब प्रतिक्रमण करायला हवे, असे आपण म्हटले आहे. परंतु जर निजस्वभावातून परभाव किंवा परद्रव्यात ओढले गेलो किंवा त्याच्यात तन्मयाकार झालो तर तेव्हा काय करावे? परभावात तन्मयाकार होणे याला शुद्धात्म्यावर अतिक्रमण करणे असे म्हणता येईल का?

**दादाश्री :** आपण प्रतिक्रमण करावे. मग पुढे काय लिहिले आहे की निजस्वभावातून परभावात जाणे. आता जो आमच्या आज्ञांचे पालन करतो तो तर परभावात जाऊच शकत नाही. त्याला जायचे असेल तरी जाता येणार नाही. म्हणूनच आज्ञा पालन करण्याची सुरुवात करा, तर मग परभावात जाणारच नाही. परद्रव्यात ओढला जाणार नाही. म्हणून कोणी घाबरू नका. यात जर तन्मयाकार झाला तर तो परभावात किंवा परद्रव्यात नाहीच, जर आज्ञा पालन करत असेल तर असे होणारच नाही, आणि जर असे असेल तर आज्ञा पालन होणार नाही. हे इतके वैज्ञानिक आहे.

**प्रश्नकर्ता :** तन्मयाकार होतो म्हणून जागृतीपूर्वक पूर्णपणे निकाल होत नाही. आता तन्मयाकार झाल्यानंतर समजते, तर मग त्यासाठी प्रतिक्रमण करून निकाल करायचा काही मार्ग आहे का?

**दादाश्री :** प्रतिक्रमण केल्यामुळे (कर्मे) हलकी होऊन जातील. पुढच्या वेळी हलकी होऊन येतील आणि जर प्रतिक्रमण केले नाही तर जसेच्या तसे ओझे परत येईल. किंबहुना परत सटकेल, चार्ज न होता, म्हणजेच प्रतिक्रमण करून (कर्मे) हलकी करत राहिल्याने त्याचा निकाल होत राहील.

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमण न्यूट्रल आहे असे तुम्ही म्हणता, मग प्रतिक्रमण करण्यासारखे राहिलेच काय?

**दादाश्री :** अतिक्रमण न्यूट्रलच आहे, पण त्यात तो तन्मयाकार होतो. म्हणून (कर्म) बीज पडते. अतिक्रमणात जर तन्मयाकार झाला नाही तर बीज पडणार नाही. अतिक्रमण काहीच करू शकत नाही. आणि प्रतिक्रमण तर आपण तन्मयाकार झालो नाही तरीही 'करतो'. चंदुभाई तन्मयाकार झाला हे पण तुम्ही जाणता आणि झाला नाही ते पण तुम्ही जाणता. तुम्ही तर तन्मयाकार होतच नाही. 'मन-बुद्धी-चित्त-अहंकार' हे तन्मयाकार होतात, ते तुम्ही जाणता. तन्मयाकार चंदुभाई होतो, तुम्ही तर त्याला जाणता.

**प्रश्नकर्ता :** चंदुभाई तन्मयाकार झाला तर चंदुभाईला प्रतिक्रमण करायला सांगावे लागेल ना?

**दादाश्री :** हो, चंदुभाईला सांगावे लागेल.

## स्वप्नातही प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** स्वप्नात प्रतिक्रमणे होऊ शकतात?

**दादाश्री :** हो, खूप चांगल्या प्रकारे होऊ शकतात. स्वप्नात जी प्रतिक्रमणे होतात, ती आता होतात त्याहीपेक्षा चांगली होतात. आता तर तुम्ही घाईघाईत करता. स्वप्नात जे काम होते ते सर्व पद्धतीशीर होते. स्वप्नात जे 'दादा' दिसतात तसे 'दादा' तर पूर्वी कधीही पाहिले नसतील असे 'दादा' दिसतात. जागृत अवस्थेत असे दादा कोणालाही दिसत नाहीत, स्वप्नात खूप चांगले दिसतात. कारण स्वप्न ही सहज अवस्था आहे. आणि जागृत अवस्था ही असहज अवस्था आहे.

**प्रश्नकर्ता :** स्वप्नात जर पाप केले असेल तर जागृत अवस्थेत त्याचे प्रतिक्रमण करू शकतो का?

**दादाश्री :** हो, करू शकतो ना! जेव्हा तुम्हाला जागृती येते तेव्हा करू शकता. कारण (स्वप्नात) आपणच तर होतो.

**प्रश्नकर्ता :** त्यामुळे मग स्वच्छ होते का?

**दादाश्री :** हो, गुन्हेगार केव्हाही कबूल करू शकतो, येथील कोर्टाचे कायदे वेगळे असतात, इथे तर जेव्हा कबूल करायचे असेल तेव्हा करू शकता.

**प्रश्नकर्ता :** स्वप्नात जे कर्म होते, त्याचे प्रतिक्रमण केव्हा करावे? जागे झाल्यावर करावे का?

**दादाश्री :** हो, जागे झाल्यावर समजत असेल, आठवत असेल तर प्रतिक्रमण करावे. स्वप्नात तुम्ही कोणाला दगड मारून आलात, म्हणजेच तुमचा हिंसक भाव तर होताच ना? हे तर नक्कीच आहे ना? समोरच्याला लागले, नाही लागले, ती वेगळी गोष्ट आहे. म्हणून त्यासाठी प्रतिक्रमण करावे. स्वप्नातदेखील राग येतो. काकांना बघताच राग येतो.

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा स्वप्नात एखादी चूक होते त्याचे प्रतिक्रमण स्वप्नातच होऊन जाते.

**दादाश्री :** हो, होऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, कित्येक वेळा स्वप्नात प्रतिक्रमण होत नाही, पण सकाळी मी जेव्हा जागी होते तेव्हा जर माझ्या लक्षात आले की मी प्रतिक्रमण केले नाही, तर त्याचे प्रतिक्रमण सकाळी करायला हवे का?

**दादाश्री :** हो, करायला हवे. प्रतिक्रमण कधीही करू शकता. जर तुझे तुझ्या पतीशी काही भांडण झाले, तेव्हा जर तू असे काही म्हटले की मी त्यांच्या शुद्धात्म्याच्या साक्षीने क्षमा मागते, तरी चालेल.

जेव्हा तू त्यांच्यावर रागावलीस तेव्हा 'त्यांच्या शुद्धात्म्याच्या साक्षीने क्षमा मागते' हे तर टॅक्निकल शब्द झाले पण साधे सरळ बोललीस तरी चालेल. कोणात्याही मार्गाने कपडे धुवायचे आहेत.

## स्वप्न हे नेहमीच गलन

**प्रश्नकर्ता :** विषयविकाराची स्वप्ने आली तर त्याचा परिणाम होतो.

**दादाश्री :** त्यासाठी तर प्रतिक्रमण करू शकता ना?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणे तर होतातच.

**दादाश्री :** मग तर एकदम छानच आहे. प्रतिक्रमणे होतात हे तर फायदेशीर आहे. त्याला काहीच हरकत नाही. प्रतिक्रमणे तर करायलाच हवीत. आणि जर 'लेट गो' केले (सोडून दिले), तर त्या बाबतीत त्यांचे कच्चे राहते. याउलट प्रतिक्रमण केले तर मुळापासून उपटले जाते. ते चांगलेच आहे. आणि नंतर तुम्ही म्हणता की 'हे चुकीचे झाले.' 'चुकीचे झाले' असे जर वाटले तर ती चांगली गोष्ट आहे.

स्वप्न म्हणजे काय? तर गलन (डिस्चार्ज होणे, रिकामे होणे)! पूरण (चार्ज होणे, भरणे) नाही. अजिबात 'पूरण' नाही ते स्वप्न. आणि जागेपणी अहंकार असल्यामुळे 'गलन' आणि 'पूरण' दोन्ही चालू असते. पण स्वप्न म्हणजे फक्त गलन आहे. डिस्चार्ज म्हणजे गलन! आणि 'डिस्चार्ज'ची काळजी करायचे कोणाला कारण नाही. हो, डिस्चार्ज होऊ नये याकडे लक्ष द्यावे पण 'डिस्चार्ज' झालेच तर काळजी करू नये. जे होऊन गेले त्याची काळजी सोडून द्या. आणि भविष्यात असे होऊ नये, याकडे लक्ष द्या.

## अनौपचारिक व्यवहारात कर्मबंधने कुठून?

**प्रश्नकर्ता :** हे 'ज्ञान' घेतल्यानंतर व्यवहाराला तुम्ही 'निकाली' असे म्हटले आहे, ही गोष्ट बरोबर आहे पण त्यात कधी अनौपचारिक व्यवहार होत असतो, तर त्यात 'चार्जिंग'चे भयस्थान (धोका) कुठे आहे?

**दादाश्री :** चार्ज होतील अशी भयस्थाने तर नसतातच. पण जेव्हा शंका येत असेल, तेव्हा चार्ज होईल. जिथे शंका वाटते त्या भयस्थानाला 'चार्जिंगवालेच' समजा. शंका म्हणजे कशी? की त्या शंकेमुळे झोपच येत नाही. अशी शंका नाही की जराशी शंका उत्पन्न झाली आणि थोड्यावेळाने ती संपली, अशा शंकेला काही किंमतच नाही.

**प्रश्नकर्ता :** मग काय बिनधास्त राहायचे? नीडर आणि बेफाम राहायचे?

**दादाश्री :** नाही, बेफाम राहील तर मार बसेल. बेफाम आणि बेफिकीर राहिला तर मार बसेल. आगीत हात का घालत नाहीत?

**प्रश्नकर्ता :** मग तिथे कोणती औपचारिक 'ॲक्शन' (कृती) करायला हवी?

**दादाश्री :** आणखी कोणती 'ॲक्शन्स' करणार? तिथे फक्त पश्चात्ताप आणि प्रतिक्रमण ह्याच 'ॲक्शन्स' आहेत.

## महात्म्यांना कुठे कर्म चार्ज होते?

**प्रश्नकर्ता :** हाच मुद्दा खास समजून घ्यायचा आहे की महात्म्यांना ज्ञानप्राप्ती नंतर कर्मे चार्ज होतात की नाही?

**दादाश्री :** तुम्हाला (कर्मे) 'चार्ज' होणार नाहीत, तरी पण प्रतिक्रमण करणे चांगले. प्रतिक्रमण केलेत तर तुम्ही आमच्या आज्ञेचे पालन केले असे म्हटले जाईल. अतिक्रमण झाले म्हणून प्रतिक्रमण करा. 'आपण' अतिक्रमण करत नाही. 'आपल्याला' अतिक्रमण आवडत पण नाही. इच्छाच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** नाही, अजिबात इच्छा होत नाही.

जर महात्म्यांचे प्रत्येक कर्म डिस्चार्ज आहे, तर प्रतिक्रमण करण्याची काय गरज आहे?

**दादाश्री :** 'डिस्चार्ज' आहे म्हणून प्रतिक्रमण करायची गरज नाही. परंतु जर अतिक्रमण झाले तरच प्रतिक्रमण करावे. तुम्ही खाता–

पिता यासाठी प्रतिक्रमण करायचे नसते. मी तुम्हाला कधी असे विचारतो का की 'आंबे खाल्लेत की नाही? तुम्ही भजी का खाल्लीत? तुम्ही हॉटेलात का गेलात?' मी तुम्हाला असे काही विचारतो का? असे-तसे काही विचारले आहे का? नाही. कारण मला माहीत आहे की ते सर्व 'डिस्चार्ज' आहे!

'डिस्चार्ज' भावाने जर कोणावर आक्षेप घेतला असेल तर त्यासाठी प्रतिक्रमण करायला हवे!

**प्रश्नकर्ता :** ज्याच्यावर आक्षेप घेतला त्याने पण प्रतिक्रमण करायला हवे का?

**दादाश्री :** हो, त्याने पण करायला हवे की, माझ्या कोणत्या दोषामुळे असे घडले? पण आक्षेप घेणारा जास्त मोठा गुन्हेगार आहे.

**प्रश्नकर्ता :** 'डिस्चार्ज'मध्ये तन्मयाकार झाले तर मग दुसरे भाव उत्पन्न होतात ना?

**दादाश्री :** हो, सगळी जोखीमच आहे ना! पण प्रतिक्रमण केल्यामुळे शुद्ध होऊन जाते. प्रतिक्रमण करतो हा सुद्धा परभाव आहे. त्यामुळे पुण्य मिळते, पण तो स्वभाव नाही. पाप, पुण्य हे सगळे परभाव आहेत. जेवढे समभावाने निकाल झाले तेवढे कमी झाले.

## ज्ञानानंतर 'पाहत' राहा

**प्रश्नकर्ता :** ज्याने हे ज्ञान घेतले आहे, त्याला जर कोणी शिवी दिली तर त्याला असे वाटते की समोरच्याला दोन शिव्या द्याव्या. आणि तो देतोसुद्धा. मग 'आम्ही' पाहतो की ह्या चंदुभाईला शिव्या द्यायची इच्छा झाली आणि त्याने त्या दिल्या पण. तेव्हा मग आम्ही त्या चंदुभाईला पाहतो, तर याला काय म्हणावे? याला 'चार्ज' झाले असे म्हणता येईल का?

**दादाश्री :** हे सगळे झाले ते तुम्ही पाहत होतात का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** बस, मग सुटले. तुमचे काहीच देणेघेणे नाही.

**प्रश्नकर्ता :** जेव्हा कोणी आम्हाला शिवी देतो तेव्हा असे वाटते की आपण शिवी देता कामा नये. पण चंदुभाई असे म्हणतो की नाही, दिलीच पाहिजे, आणि मग चंदुभाई जाऊन देऊनही येतो. तेव्हा सुद्धा आतमध्ये असे वाटते की ही चूक केली. हे सर्व आम्ही पाहत असतो, तरी पण आम्ही चंदुभाईला थांबवू शकत नाही.

**दादाश्री :** त्याला हरकत नाही. तुमची जबाबदारी नाही. पण चंदुभाईची जबाबदारी तर आहेच. मग ती व्यक्ती चंदुभाईला ओरडेल की किती तू नालायक आहेस? का असे बडबडतोस? किंवा एखादी थप्पड सुद्धा मारील. जो जबाबदार आहे, त्याला मार खावा लागतो.

**प्रश्नकर्ता :** मग याला 'चार्ज' केले असे म्हटले जाईल का?

**दादाश्री :** नाही, पण प्रतिक्रमण करायला हवे. 'तुम्हाला' प्रतिक्रमण करायचे नाही, ते चंदुभाई करील. तुम्ही चंदुभाईला सांगावे की 'अतिक्रमण' का केले? म्हणून प्रतिक्रमण कर.

**प्रश्नकर्ता :** पण समजा चंदुभाईने प्रतिक्रमण केले नाही, तर?

**दादाश्री :** तरी चालेल.

**प्रश्नकर्ता :** मग तर 'चार्ज' झाले ना?

**दादाश्री :** नाही, ते 'चार्ज' होत नाही.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करायला हवे का?

**दादाश्री :** प्रतिक्रमण कराल तर सर्व फाइल्स स्वच्छ होतील. ज्ञानात राहून स्वच्छ करून ठेवून दिली. जितके कपडे धुतले जातील, त्यांना स्वच्छ करून ठेवून द्यावे. मग ते आपोआप इस्त्रीला जातील.

## चार्ज केव्हा होते?

**प्रश्नकर्ता :** ज्ञान घेतल्यानंतर कर्मे 'चार्ज' होतात की नाही?

**दादाश्री :** कशी काय 'चार्ज' होतील? 'चार्ज' केव्हा होतात? 'व्यवस्थित' कर्ता आहे, यावर तुमचा विश्वास बसला आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** आणि चंदुभाई कर्ता नाही यावर तुमचा विश्वास आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** जर चंदुभाई कर्ता असेल तरच 'चार्ज' होईल? म्हणून आता ते वाक्यच राहिले नाही. समजले ना तुम्हाला? त्या वाक्याचे नीट स्पष्टीकरण झाले की नाही?

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण केल्यामुळे नवीन चार्ज होणार नाही का?

**दादाश्री :** आत्मा जेव्हा स्वत: कर्ता बनतो तेव्हाच कर्मबंधन होते.

## ज्ञानानंतर क्रेडिट-डेबिट शून्य

**प्रश्नकर्ता :** वाईट 'चार्जिंग' होते तसे चांगले पण 'चार्जिंग' होते ना?

**दादाश्री :** नाही. वाईट पण चार्ज होत नाही. 'डिस्चार्ज'मध्ये जी अतिक्रमणे झाली होती, त्यांचे आपण प्रतिक्रमण करतो. समोरच्या व्यक्तीचे नुकसान होईल अशी अतिक्रमणे झाली होती.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करायचे म्हणजे 'डिस्चार्ज'मध्ये जे राग-द्वेष होतात, त्यासाठी करायचे आहे का?

**दादाश्री :** 'डिस्चार्ज'चे प्रतिक्रमण करायचे. 'चार्ज' तर होतच नाही, मग राहिलेच काय? म्हणजे आता आपल्याला 'क्रेडिट-डेबिट' तर होतच नाही.

'क्रेडिट' असेल तर देवगती मिळते, 'डेबिट' असेल तर जनावरगती मिळते. असे काही तर होतच नाही. पण हे जे 'क्रेडिट-डेबिट' आहे, 'डिस्चार्ज' आहे त्यासंबंधी आम्ही बोलत आहोत. अतिक्रमण झाले तर प्रतिक्रमण करावे.

## 'काहीच करण्याची गरज नाही', हे नीट समजून घ्या

**प्रश्नकर्ता :** काही जण म्हणतात की आता आपल्याला शुद्धात्मापद दिले आहे. शुद्धात्मा तर काहीच करत नाही. म्हणून आता आपल्याला काहीच बाधक नाही. आपल्याला आता काहीच करायची गरज नाही. प्रतिक्रमण करायची गरजच नाही.

**दादाश्री :** हे सर्व चुकीचे आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आता तो एक व्ह्यू पॉइंट (दृष्टीकोन) झाला. दुसरे काही जण म्हणतात, की आपल्या काही कर्मांचा उदय आला तर तेव्हा प्रतिक्रमण करायची गरज आहे.

**दादाश्री :** 'काहीच करायची गरज नाही' असे जे म्हणतात, तर त्यांना म्हणावे जर काहीच करायचे नाही, तर मग 'तुम्ही जेवता कशाला?' जर ते जेवायचे बंद करत असतील तर मग काहीच करायची गरज नाही. जेवायचे बंद करतात का ते?

**प्रश्नकर्ता :** नाही, ते तर चालू आहे.

**दादाश्री :** काही करायचे नाही याचा अर्थ कशातच कर्ताभाव ठेवायचा नाही हा आहे. केल्याने तर भोवराच बनून जातात.

## प्रतिक्रमण सुद्धा डिस्चार्ज

**प्रश्नकर्ता :** आमच्यावर जर काहीच परिणाम होत नसेल, राग-द्वेष होत नसतील, तर मग प्रतिक्रमणाची गरज आहे का?

**दादाश्री :** तुम्हाला राग-द्वेष होत नाहीत, म्हणून तुम्हाला प्रतिक्रमण करायची गरज नाही. परंतु या चंदुभाईला होत असतील, तर चंदुभाईला प्रतिक्रमण करायची गरज आहेच ना!

**प्रश्नकर्ता :** बहुतेक तर 'मी चंदुभाई आहे' या प्रकारेच वर्तन होत असते. बराच वेळ गेल्यानंतर लक्षात येते, आणि कधी-कधी लक्षात पण येत नाही. मग त्यासाठी प्रतिक्रमण करायला हवे का?

**दादाश्री :** जितके लक्षात येते तितके प्रतिक्रमण करणे आवश्यक आहे.

**प्रश्नकर्ता :** का आवश्यक आहे?

**दादाश्री :** प्रतिक्रमणे तुम्ही कुठे करता? ती तर चंदुभाईला करायची आहेत.

**प्रश्नकर्ता :** चंदुभाईने का करायला हवीत?

**दादाश्री :** का?

**प्रश्नकर्ता :** सगळेच 'डिस्चार्ज' स्वरूपात आहे तरी?

**दादाश्री :** तसे नाही. कोणाला जर दु:ख झाले तर प्रतिक्रमण करायलाच हवे. तुमच्या कृतीमुळे जर कोणाला दु:ख झाले तर प्रतिक्रमणे करावीच लागतील. कोणाला दु:ख होत नसेल तर काही हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण हे जे चंदुभाई आहेत ते तर 'डिस्चार्ज'च आहेत, मग प्रतिक्रमणाची काय आवश्यकता? मला हे अजूनही समजत नाही.

**दादाश्री :** प्रतिक्रमण पण 'डिस्चार्ज' आहे आणि 'काय गरज आहे' असे बोलणाराही 'डिस्चार्ज'च आहे.

**प्रश्नकर्ता :** तर मग मनात असे येते की इतकी सारी प्रतिक्रमणे कोण करणार? तर काय तेही 'डिस्चार्ज' आहे?

**दादाश्री :** तेही 'डिस्चार्ज' आहे, त्याला हरकत नाही. परंतु जर तुम्ही काही म्हणालात आणि त्यामुळे समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले तर मात्र तुम्ही चंदुभाईकडून प्रतिक्रमण करवून घ्यावे. आणि त्याला सांगावे की 'प्रतिक्रमण कर. कोणाला दु:ख होईल असे करू नकोस.'

**प्रश्नकर्ता :** जर चंदुभाई वाकड्यात शिरले आणि म्हणाले, 'मी प्रतिक्रमण करणार नाही.' तर?

**दादाश्री :** हरकत नाही. ते थोड्या वेळाने सरळ होतील, तेव्हा

प्रतिक्रमण करवून घ्या. संध्याकाळी मोठे प्रतिक्रमण करवून घ्या. वाकड्यात शिरले तर त्यांना सांगा, (ठीक आहे) 'आता झोपा.'

## 'सॉरी' ह्याला प्रतिक्रमण म्हणता येईल?

**प्रश्नकर्ता :** इथे अमेरिकेत अजाणता जरी काही चूक झाली तर लगेच 'सॉरी' म्हणतात. तर 'सॉरी'ला प्रतिक्रमण म्हणता येईल का?

**दादाश्री :** 'सॉरी'ला प्रतिक्रमण म्हणता येणार नाही. पण ती चांगली पद्धत आहे. ते प्रतिक्रमण नाही पण 'सॉरी' म्हटल्यामुळे समोरच्या व्यक्तीच्या मनात आक्रमक भाव निर्माण होत नाही. हे चांगलेच आहे. आक्रमक भाव होत असेल तर तो बंद होऊन जातो. म्हणून लोकांनी शिकवल्यावर 'सॉरी' म्हणणे शिकला असेल तरी खूप चांगले आहे. पण प्रतिक्रमणासारखे (उत्तम) तर काहीच नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्ही 'अकर्ता' आहोत तर मग हा (चंदुभाई) अतिक्रमण करो वा प्रतिक्रमण करो, काहीही करो, आमचा काय संबंध? आपण तर फक्त पाहत राहायचे आहे ना?

**दादाश्री :** 'आपण' पाहत राहायचे. अतिक्रमण कोण करत आहे ते पाहायचे आणि त्यालाच प्रतिक्रमण करायला सांगायचे की, 'बाबा, अतिक्रमण का केलेस? मग आता प्रतिक्रमण कर. अतिक्रमण केले नसतेस तर तुला आम्ही काहीच बोललो नसतो.'

**प्रश्नकर्ता :** आमचा पुढचा जन्म 'इजी' (सुरळीत) जावा, चांगला जावा, यासाठी आम्ही प्रतिक्रमण करतो का?

**दादाश्री :** स्वच्छ करण्यासाठी. डाग लागला की आपण त्याला ताबडतोब स्वच्छ करतो. नाही तर मग तो धुवायला परत यावे लागेल. एक डाग लागला तर लगेच तो धुऊन टाका. अतिक्रमण झाले म्हणजे डाग लागला. कोणत्याही रंगाचा का डाग लागेना, तो धुऊन टाकून मगच आपण बसावे. त्यावेळी जर चंदुभाई आडमुठेपणा करू लागला तर संध्याकाळी बसून सर्व धुऊन टाकावे. पाच-सात अतिक्रमणे झाली असतील तर मग एकत्र प्रतिक्रमण करून स्वच्छ करून टाकावे.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण म्हणजे ती चौथी आज्ञा 'समभावाने निकाल' याचाच एक भाग आहे का?

**दादाश्री :** समभावाने निकाल आणि प्रतिक्रमण यांचे काही देणेघेणे नाही. फाइलचा निकाल ही तर वेगळी गोष्ट आहे.

## अक्रम मार्गातील प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** एका व्यक्तीला प्रतिक्रमणाची इतकी चीड येते की तो आम्हाला म्हणतो, तुम्ही प्रतिक्रमण करता म्हणजे तुम्ही आत्मा नाहीत. प्रतिक्रमण केलेत म्हणजे तुम्ही आत्माच गमावलात.

**दादाश्री :** तो क्रमिक मार्ग असा आहे की तिथे आत्मा प्राप्त झाल्यानंतर प्रतिक्रमणे करायची नसतात. त्यांनी जर प्रतिक्रमण केले तर ते आत्मा गमावून बसतात.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, आम्ही जे प्रतिक्रमण करतो ते तुमच्या आज्ञेप्रमाणे 'वेगळे राहून करतो?'

**दादाश्री :** होय, 'चंदुभाई' करतो. ज्याने चूक केली आहे, ज्याने अतिक्रमण केले आहे, तो प्रतिक्रमण करतो.

क्रमिक मार्गात आत्मा प्राप्त झाल्यानंतर प्रतिक्रमणे करायची नसतात. प्रतिक्रमणाला ते पॉइजन (विष) समजतात. आपल्याकडेही प्रतिक्रमणे करायची नसतात. आपण 'चंदुभाई'कडून प्रतिक्रमण करवून घेतो. कारण हा तर अक्रम मार्ग आहे. इथे तर अजून सर्व प्रकारचा माल भरलेला आहे. कसा कसा माल भरलेला आहे, मग कसे बरे निपटावे? आणि त्या लोकांच्या मनात शंका येते की हा काय प्रकार आहे? ही सर्व वेडी माणसे, मोक्षाचा सत्संग कसा करू शकतील? अशा वेड्या लोकांना मोक्षाचा सत्संग करण्याचा अधिकारच नाही, 'शुभ-अशुभ' याचा सत्संग करण्याचा अधिकार आहे, असे त्या लोकांच्या मनात ठसविले होते. तेव्हा मला असे सांगणे भाग पडते की, मी जो ज्ञानाचा शोध लावला आहे, तो पूर्णपणे एक उच्च प्रकारचा शोध आहे.

## क्रमिक मार्गात प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** क्रमिक मार्गात प्रतिक्रमणे होतात का?

**दादाश्री :** हो, क्रमिक मार्गात प्रतिक्रमणे होतात, पण क्रमिक मार्गात या दर्जाची प्रतिक्रमणे नसतात. आत्मा प्राप्त झाल्यानंतर क्रमिक मार्गात प्रतिक्रमण हे विषासारखे आहे. कारण क्रमिक मार्गात अतिक्रमणे होतच नाहीत. त्या उंचीवर पोहोचलेला माणूस अतिक्रमण करतच नाही. तर मग प्रतिक्रमणे कशाची होतात? तर ती क्रमणासाठी होतात आणि ती शंभरात दोन-पाच टक्के जेवढी अतिक्रमणे होतात, तेवढीच. त्याचे फळ तर त्याला मिळतेच. एरवी, तो अतिक्रमण करतच नाही.

तुम्हाला हे ज्ञान अचानकच मिळाले आहे म्हणून जसा माल भरला आहे तसा तो बाहेर पडतो. त्यासाठी प्रतिक्रमण करावे लागते.

क्रमिक मार्गात शुद्धात्म्याचा अनुभव आल्यावर प्रतिक्रमणे करावी लागत नाहीत. आणि आपला तर अक्रम मार्ग आहे, म्हणून ठोक प्रमाणात माल भरलेला आहे, आणि आपण शुद्धात्मा झालो आहोत. म्हणून आता आपला हा माल रिकामा होत जाईल. तो प्रतिक्रमण केल्यामुळे शुद्ध होत जाईल. पण प्रतिक्रमण आपल्याला स्वत:ला करायचे नाही. आपण तर शुद्धात्मा झालो म्हणून आपण चंदुभाईला सांगावे की, 'बाबा रे, तुम्ही हे बिघडविले आहे, म्हणून तुम्हीच सुधारा.' या प्रतिक्रमणामुळे लोकांबरोबरचा वैरभाव संपून जाईल. तुमचा या भाऊसाहेबांबरोबर काही वाद-विवाद झाला असेल आणि ते भाऊसाहेब काही वेडेवाकडे बोलले असतील, म्हणून तुमचे मन दुखावले असेल आणि त्यांच्याबद्दल तुम्हाला वाईट विचार येत असतील तर तुम्ही त्यांच्या शुद्धात्म्याला आठवून प्रतिक्रमण करावे. त्यांचे नाही, तर सरळ त्यांच्या शुद्धात्म्यांशी प्रतिक्रमण करावे. आणि त्या दोषातून मुक्त व्हावे. 'पुन्हा असे करणार नाही' असे प्रत्याख्यान करावे. असे केले की तो दोष धुतला जाईल.

## शुक्लध्यानानंतर प्रतिक्रमण हे पॉइजन आहे

आणि जर प्रतिक्रमण करा असे सांगितले नाही तर चालणार नाही.

तुम्ही जे म्हणता की प्रतिक्रमण हे पॉइजन (विष) मानले जाते ही गोष्ट अगदी बरोबर आहे. जर शुक्लध्यान झाल्यानंतर स्वतः प्रतिक्रमण करत असेल तर मग त्याला शुक्लध्यान म्हणताच येणार नाही. पण हे प्रतिक्रमण स्वतः करायचेच नाही. हे प्रतिक्रमण तुम्ही कोणाकडून करवून घेता?

**प्रश्नकर्ता :** 'चंदुभाई'कडून करवून घेतो, पण चंदुभाईला कोण सांगतो?

**दादाश्री :** ही जी आतमध्ये प्रज्ञाशक्ती आहे, ती प्रज्ञाशक्तीच काम करत असते.

**प्रश्नकर्ता :** जे स्वाभाविकपणेच निघून जात आहे, त्यालाच परत आश्रय देतो.

**दादाश्री :** जर याहून जास्त खोल उतराल तर आतील चिखल बाहेर पडेल. हे सर्व 'सरकमस्टेन्शियल एविडन्सेस्' आहेत. उन्हाळ्यात सगळे म्हणतात, 'अंगावर पांघरूण घ्यायची गरज नाही.' सगळे म्हणतात, पण 'सरकमस्टेन्शियल एविडन्सेस्' पांघरूण घ्यायला सांगतात. उन्हाळ्यात ताप आला तर? पांघरूण घ्यायची गरज पडते. म्हणजेच हा एक 'एविडेन्स' आहे. 'एविडेन्स'ला आपण असे म्हणू शकत नाही की उन्हाळा आहे, पांघरूण नको असे तुम्ही म्हणत होता, मग आता का मागता? अरे बाबा, ताप आला आहे, दे ना त्याला पांघरूण! तुला समजत नाही का? हे प्रतिक्रमण स्वतःला करायचे नाही. चंदुभाईकडून करून घ्यायचे आहे. तो 'स्वतः' अतिक्रमण करतच नाही, मग तो प्रतिक्रमण का करील?

## 'त्याला' प्रतिक्रमणाची आवश्यकता नाही

जेव्हा ज्ञान देतो, तेव्हा म्हणतो, 'तू शुद्धात्मा आहेस' बरोबर ना? हो. तर मग आता काय उरले? तर ते आहे तुझे 'व्यवस्थित', व्यवस्थितचा अर्थ काय? चंदुभाई काय करतात, ते पाहत राहणे, हा व्यवस्थितचा अर्थ. समजा 'चंदुभाई'ने एखाद्याचे दोन लाखाचे नुकसान केले. तरी

पण तुम्ही पाहत राहावे. आणि हे जर त्याला समजत नसेल तर मग आम्ही त्याला 'प्रतिक्रमण कर' असे म्हणतो. व्यवस्थित म्हणजे जे आहे ते एक्झॅक्ट पाहत राहणे. तर तुम्ही मुक्त झालात.

'प्रतिक्रमण' कशाबद्दल करावे? तर 'आपल्या' 'विपरिणामा'मुळे जे संयोग घडून येतात ते प्रतिक्रमणामुळे मिटतात. खरे म्हणजे *दरअस्सल* (खऱ्या) सायंटिस्टला प्रतिक्रमणाची गरजच नाही. पण आपले लोक हे विसरतात त्यासाठी प्रतिक्रमण आहे. अस्सल सायंटिस्ट तर यात बोट घालणारच नाही. 'द वर्ल्ड इज दि सायन्स' (हे जग म्हणजे विज्ञानच आहे)!

## त्यात अजिबात विरोधाभास नाही

**प्रश्नकर्ता :** तुमची वाणी निमित्ताधीन आहे, म्हणून कित्येकदा 'दादा' प्रतिक्रमण करण्याची मनाई करतात, आणि कित्येकदा प्रतिक्रमण करा, असे पण म्हणतात, असे का?

**दादाश्री :** आम्ही असे कधी म्हणत नाही की 'प्रतिक्रमण करायची गरज नाही' आणि जर कधी असे म्हटले असेल तर त्याला काही खास महत्व नाही, कारण तेव्हा संयोगच तसे असतात. आमची वाणी संयोगानुसार निघत असते.

**प्रश्नकर्ता :** त्यामुळे हे 'पझल' (कोडे) निर्माण झाले आहे.

**दादाश्री :** नाही, कोडे निर्माण करण्याची काहीच गरज नाही.

आमचे बोलणे कधीच एकतर्फी नसते. सर्व काही संयोगानुसार होत असते आणि समोरच्या व्यक्तीचे संयोग कसे आहेत त्यावर अवलंबून असते.

**प्रश्नकर्ता :** हो, बरोबर आहे.

**दादाश्री :** आणि जर समोरचा कंटाळेल असा असेल तर तेव्हा आम्ही असे सांगूनसुद्धा त्याला पुढे नेतो. समोरच्याला कंटाळा येत असेल आणि आपण त्याच्यावर आणखी हा बोजा टाकला तर काय होईल?

म्हणून आम्ही त्याला सांगतो, 'ठीक आहे, हे सर्व करायची गरज नाही. तू आपला बाकीचे सर्व कर.' असे म्हणून आम्ही त्याला पुढे नेतो. म्हणजेच आम्ही संयोगानुसार वाणी बोलत असतो, पण आमचा मूळ अभिप्राय हाच असतो की 'प्रतिक्रमण केले पाहिजे.'

**प्रश्नकर्ता :** त्याचा उल्हास संपू नये म्हणून...

**दादाश्री :** आधीच तो एवढे करत असेल आणि त्यात जर आणखी प्रतिक्रमण पण आले, तर त्याला ते ओझे पेलवत नाही, त्यामुळे तो सगळेच फेकून देतो. म्हणून प्रत्येकाला वेगळे-वेगळे सांगावे लागते.

म्हणून मग आम्ही नंतर असे सांगतो की 'आमची वाणी संयोगाला अनुरूप अशी निघते, संयोगानुसार.' असे म्हटले की लोक त्याला चुकीचे समजत नाहीत. पण ज्याला उलटच समजायचे असेल, त्याला तसे सर्व मिळते. आणि उलटे पकडले तरी हरकत नाही. जो उलटे पकडतो तोच नंतर ते उपटून फेकून देतो. हे विज्ञानच असे आहे की जरी त्याने उलटे पकडले तरी नंतर त्यालाच ते टोचते. म्हणून आपण त्याबद्दल काळजी करण्याचे कारण नाही.

म्हणून आम्ही काय सांगतो की अतिक्रमण केलेत तर प्रतिक्रमण करा, आणि जर प्रतिक्रमण होत असेल तर पाहत राहा.

## आत्म्याने माफी मागायला हवी का?

**प्रश्नकर्ता :** हा जो क्षमा मागतो, तो प्रतिष्ठित आत्माच मागतो ना?

**दादाश्री :** हो, मूळ आत्म्याला माफी मागायची गरजच काय? जो गुन्हा करतो त्यानेच माफी मागायला हवी. प्रतिष्ठित आत्म्याने गुन्हा केला आहे, म्हणून प्रतिष्ठित आत्मा माफी मागतो.

अतिक्रमणच काय, तर इतर सगळेही चंदुभाईच करत असतो. यात आत्मा काहीच करत नसतो. तो तर फक्त प्रकाशच देतो.

## महावीरांनी पण स्वतःच्या पुद्‌गलालाच पाहिले

**दादाश्री :** आता कसली भीती आहे असे तुम्हाला वाटते का?

**प्रश्नकर्ता :** मला आता कसली भीती? आता सर्व काही तुमच्यावर सोपवल्यानंतर मला आता तिच्याशी काय करायचे आहे?

**दादाश्री :** पण तुम्हाला कुठल्या प्रकारची धास्ती तर वाटत नाही ना? जर सगळे सोपवलेच असेल तर किंचितही धास्ती वाटत नाही आणि थरकाप पण होत नाही, इतके चांगले आहे हे. जितके तुम्हाला सोपवता आले तितके उपयोगाचे. हे सोपवून मग टेबल खुर्चीवर बसून निवांत जेवा ना! कोणीही तुम्हाला रागावायला येणार नाही. कोणी *उपरी* नसतोच. तुमच्या चुका आणि तुमच्या 'ब्लंडर्स' (घोडचुका) याच तुमच्या *उपरी* होत्या. तुमच्या 'ब्लंडर्स' दादांनी नष्ट केल्या आणि आता चुका तुम्हाला धुवाव्या (संपवाव्या) लागतील. पाच-दहा अशा थोड्या फार चुका कधी कधी दिसायला लागल्या आहेत का?

**प्रश्नकर्ता :** थोड्या थोड्या दिसू लागल्या आहेत. पाच-पाच, दहा-दहा चुका दिसू लागल्या आहेत आणि त्यासाठी मी क्षमा पण मागतो.

**दादाश्री :** नाही, त्यासाठी प्रतिक्रमण करणे शिकायला हवे. आता जर कोणी आचार्य महाराज असतील तर म्हणतील, 'आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर देखील तुम्ही प्रतिक्रमण का करता?' पण हा अक्रम मार्ग आहे. म्हणून आपण काय करायला हवे? तुम्ही स्वतः करायचे नाही, तर तुम्ही चंदुभाईकडून करून घ्यावे. त्यांना म्हणावे 'तुम्ही असे असे अतिक्रमण केले आहे म्हणून प्रतिक्रमण करा.' कारण 'आपण' तर सुटलो (मुक्त झालो) पण हे चंदुभाई पण सुटतील तेव्हाच 'आपण' सुटू शकू. या परमाणूंना स्वच्छ करून पाठवावे लागेल. 'आपल्या' निमित्ताने ते बिघडले आहेत.

**प्रश्नकर्ता :** 'चंदुभाई'ची भानगड अजून शिल्लक आहे. ती शुद्ध करा.

**दादाश्री :** हो, चंदुभाई दादांची विधी करतो, आत्मा विधी करत नाही. आपण 'चंदुभाई'ला सांगितले पाहिजे चंदुभाई, दादांची विधी करा. अजून तर आपल्याला हे स्वच्छ करायचे आहे. म्हणजे आपण आत्म्यात राहून हे जाणत राहावे की आज दादांची विधी केली, कशी केली, कशी नाही.

निरंतर जाणणे हे 'आपले' काम आणि निरंतर करणे हे 'चंदुभाई'चे काम. 'चंदुभाई' नोकर आणि 'आपण' शेठ. हो!

**प्रश्नकर्ता :** बरे झाले मी शेठ बनलो. हे तर छान जमले.

**दादाश्री :** हो, आणि आता 'चंदुभाई' नोकर, म्हणून तुम्ही रुबाब दाखवायचा. म्हणावे चंदुभाई, टेबलावर बसून जेवा, रुबाबात जेवा. आता आम्ही आहोत तुमच्याबरोबर, असे म्हणावे. तेव्हा तो म्हणेल, 'महाराज, मनाई करत होते ना!' तेव्हा म्हणा, 'महाराज मनाई करत होते पण तुम्ही रुबाबाने जेवा. आपल्याला आता दादा भेटले आहेत, तेव्हा टेबलाचा वापर तर करा', टेबल नसेल तर आणा!!!

**प्रश्नकर्ता :** ज्याने अतिक्रमण केले, त्याच्याकडूनच प्रतिक्रमण करून घ्यावे. 'तुम्हाला' करायचे नाही. तुम्ही फक्त जाणणारे,चंदुभाई काय करत आहे हे तुम्ही जाणणारे, मग काय हरकत आहे? महावीर भगवंत पण हेच करत होते. ते फक्त एकाच पुद्गलला (जे पूरण होते आणि गलन होते) निरंतर पाहत असत. इतर सर्व लोकांचे पुद्गल पाहत नसत. फक्त एकच (स्वतःचे) पुद्गल पाहत असत.

## 'हे माझे नाही' असे कोणाला वाटते?

**प्रश्नकर्ता :** दादा, हे माझे नाही असे वाटते. पण तरी त्यात अडकून राहतो.

**दादाश्री :** त्याला हरकत नाही. कोण अडकून राहतो?

**प्रश्नकर्ता :** आम्हाला समजते की हे चूक आहे. असे करणे बरोबर नाही, तरी पण ती चूक होऊन जाते.

**दादाश्री :** पण चंदुभाईकडून चूक झाली असेच म्हटले जाईल ना! तुम्ही थोडीच करता?

**प्रश्नकर्ता :** तेव्हा असे वाटते की ह्या चंदुभाईत किती नालायकपणा भरला आहे?

**दादाश्री :** नाही, नाही, 'चंदुभाई' पकडले जातात. कारण चूक त्यांनी केली आहे, म्हणून ते पकडले जातात. म्हणून जोर देऊन म्हणा, 'चंदुभाई, प्रतिक्रमण करा. अतिक्रमण का केलेत? आता प्रतिक्रमण करा.' चंदुभाईंना पकडतात 'तुम्ही' तर पकडले जात नाही ना?

तुम्ही तर शेजाऱ्याप्रमाणे चंदुभाईला म्हणा की, ''अशाच चुका करत राहिलात तर तुम्ही कसे सुटाल? 'तुम्हाला' आमच्यापासून वेगळे व्हायचे आहे, आणि 'तुम्हाला' शुद्ध पण व्हायचे आहे, म्हणून तुम्ही प्रतिक्रमण करा.'' अतिक्रमण झाले तर प्रतिक्रमण करायला हवे. चांगले घडले तर त्यासाठी प्रतिक्रमण करायची गरज नाही.

## तसतसे त्यापासून वेगळे होत जाऊ

**प्रश्नकर्ता :** काही गोष्टींसाठी आग्रह धरलेला असतो, आणि आम्हाला समजते सुद्धा की ही चूक आहे, असे होता कामा नये. इच्छा नसली तरी आग्रह धरला जातो, नंतर पश्चात्ताप होतो, प्रतिक्रमण पण होते पण ती पकड (आग्रह) सुटत का नाही?

**दादाश्री :** त्याला आपण (प्रतिक्रमण करून) सोडवतो आणि आपण सुटतो. तुम्ही जर प्रतिक्रमण कराल तर सुटेल. जसेजसे त्यासाठी प्रतिक्रमण कराल, तसेतसे तो (दोष) वेगळा होत जाईल. जितकी प्रतिक्रमणे कराल, तितका वेगळा होत जाईल.

**प्रश्नकर्ता :** मग दादांच्या फोटोसमोर येऊन मी रडते सुद्धा.

**दादाश्री :** हो, पण जेवढे प्रतिक्रमण करता, तेवढा वेगळा होत जातो. एक प्रतिक्रमण केले आणि दूर ढकलले, दुसरे प्रतिक्रमण केले आणि परत दूर ढकलले. असे करत-करत जसेजसे दूर होत जाईल, तसेतसे कमी होत जाईल. आता या ताईचे दोन-तीन महिन्यात एकदाच घरात भांडण होते. यापूर्वी दररोज तीन-चार वेळा भांडणे होत असत. म्हणजे तीन महिन्यात तीनशे साठ वेळा, आता तीन महिन्यात फक्त एकदाच होते. तुमचेही तसेच होत जाईल. हिच्यासारखी दुसरी पण एक ताई होती, ती रोज घरात भांडण करायची. सारखे उलट-सुलट बोलत

राहायची. पण प्रतिक्रमण केल्यानेच (दोष) वेगळा होऊ लागला. ती रोजच प्रतिक्रमण करते.

**प्रश्नकर्ता :** या जगातील कोणत्याच गोष्टीचा उपभोग घ्यायचा नाही असा निश्चय आहे. पण जेव्हा आतून तशी काही इच्छा होते तेव्हा त्यानुसार आचरण होते. अशा वेळी काय करावे?

**दादाश्री :** तर त्याचे असे प्रतिक्रमण करायचे की नवीन इच्छा नसताना सुद्धा मी हा गुन्हा केला त्याबद्दल माफी मागत आहे. पुन्हा असे करणार नाही, तेव्हा मला क्षमा करा.

## प्रतिक्रमण पौद्गलिक आहे, पण आहे पुरुषार्थ

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण पौद्गलिक आहे असे म्हटले जाते. म्हणजे ते 'व्यवस्थित'च्या आधीन आहे. बरोबर ना?

**दादाश्री :** नाही, प्रतिक्रमण आत्मा नाही, ते पौद्गलिक आहे पण तो पुरुषार्थ आहे, जागृतीच्या आधीन आहे. जागृती म्हणजेच पुरुषार्थ. जागृती असेल तर (प्रतिक्रमण) करावे लागत नाही, ते होत राहते.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणात मी असे म्हणतो की, अनंत जन्मात पुद्गलाचे जे अनंत पर्याय केले असतील, अंतराय केले असतील, त्यासाठी प्रतिक्रमण करतो.

**दादाश्री :** आपण तर दोषांसाठी प्रतिक्रमण करत असतो, त्यात पुद्गल पर्याय आपोआपच येतात.

## पुद्गलच जग चालविते

**प्रश्नकर्ता :** पुद्गल अतिक्रमण कसे करते?

**दादाश्री :** पुद्गल फक्त अतिक्रमणच करते असे नाही, तर हे सारे जगच पुद्गल चालवीत असते. लढाया पण पुद्गल करते. हे सारे पुद्गलच करते. ज्ञानींची भाषा दुसऱ्यांना कशी कळणार? ज्ञानी पाहून सांगतात, याउलट इतरांना तर प्रतीतीत आणायचे आहे. हे सर्व पुद्गलच आहे.

**प्रश्नकर्ता :** पुद्‌गलाचे जे काही होते ते सर्व 'व्यवस्थित'च्या अनुसारच होत असते, मग ते अतिक्रमण कसे करू शकते?

**दादाश्री :** क्रमण पण करू शकते आणि अतिक्रमण पण करू शकते. सगळे काही तेच तर करते ना?

**प्रश्नकर्ता :** पुद्‌गलात जेव्हा आत्म्याचे 'चेतन' येऊन मिळते तेव्हाच ते शक्य होते ना?

**दादाश्री :** त्यालाच पुद्‌गल म्हणतात. हे जे पुद्‌गल परमाणू आहेत, त्यानांच आपण पुद्‌गल म्हणतो, बस, फक्त एवढेच आहे. ते परमाणू आहेत, त्या पुद्‌गलाला भगवंतांनी 'मिश्रचेतन' असे म्हटले आहे. पुद्‌गल परमाणू म्हणजे काय? तर मिश्रचेतन. चैतन्यभावाने भरलेले, त्याचे पूरण (चार्ज) होते, आणि दुसऱ्या जन्मात त्याचे गलन (डिस्चार्ज) होते. परत 'चार्ज' ही होते. पूरणाद्वारे चार्ज होते आणि गलनाद्वारे 'डिस्चार्ज' होते, आणि अतिक्रमण ते गलन आहे. ज्ञान घेतल्यानंतरही जर आत्म्याद्वारे अतिक्रमण होत असेल तर ते पूरण आहे. स्व-परिणती' (कर्ताभावाने) झाली असेल तर ते पूरण आहे. पर-परिणती (अकर्ताभावाने) झाली असेल तर ते गलन आहे.

**प्रश्नकर्ता :** हे सर्व तर चंदुभाई करतात. पण त्यांना तर राग-द्वेष वगैरे काहीच नसते. मग त्यांना कसले अतिक्रमण आणि कसले प्रतिक्रमण?

**दादाश्री :** राग-द्वेष सगळे चंदुभाई (बावा)लाच आहेत.

## माफी कोण कोणाकडे मागतो?

आपले हे जे प्रतिक्रमण आहे ते अतिक्रमण झाल्यावर करायचे प्रतिक्रमण आहे. क्रमणासाठी नाही. आपण समोरच्या व्यक्तीच्या शुद्धात्म्याला फोन करतो, तो त्यांना लगेच पोहोचतो, मग त्यांचा शुद्धात्मा तुमचा तो फोन (त्यांच्या) पुद्‌गलाला पोहोचवितो. प्रतिक्रमणे माणसांसाठी करायची असतात, जडासाठी नाही.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही शुद्धात्मा आहात, म्हणून तुम्हाला प्रतिक्रमण

करायचे नाही. ज्याने अतिक्रमण केले आहे त्यानेच प्रतिक्रमण करायचे. आणि त्यानेही शुद्धात्म्याप्रती अतिक्रमण केलेले नाही, अतिक्रमण समोरच्या व्यक्तीच्या पुद्‌गलाप्रती होत असते. म्हणजे आम्ही प्रतिक्रमणात जी माफी मागतो, ती समोरच्या व्यक्तीच्या शुद्धात्म्याची मागायची आहे की त्याच्या पुद्‌गलाची मागायची आहे?

**दादाश्री :** शुद्धात्म्याची माफी मागायची आहे. पण माफी मागणारा कोण आहे? तर पुद्‌गल! आणि ती समोरच्या व्यक्तीच्या शुद्धात्म्याची मागायची आहे! 'हे शुद्धात्मा भगवान्! तुमच्या साक्षीने मी माफी मागत आहे.'

## प्रतिक्रमण पण पुद्‌गलाचे

**प्रश्नकर्ता :** आम्ही जे प्रतिक्रमण करतो ते पुद्‌गलाचे करतो की कोणाचे करतो?

**दादाश्री :** पुद्‌गलाचेच, दुसरे कोणाचे?

**प्रश्नकर्ता :** पुद्‌गलाचे ना! मग त्याचप्रमाणे आपल्या पुद्‌गलाचे पण प्रतिक्रमण होऊ शकते ना?

**दादाश्री :** आपल्याच पुद्‌गलाचे करायचे आहे. समोरच्या व्यक्तीच्या पुद्‌गलाचे तर त्याचे जेव्हा नुकसान केले असेल तेव्हाच करावे लागते. नाही तर आपल्याच पुद्‌गलाचे प्रतिक्रमण करायचे आहे ना?

**प्रश्नकर्ता :** आपल्या पुद्‌गलाचे प्रतिक्रमण कोण करतो?

**दादाश्री :** ते सर्व आपली प्रज्ञा करते. (प्रज्ञा 'चंदुभाई'कडून करून घेते).

## प्रतिक्रमण करायला कोण सांगते?

**प्रश्नकर्ता :** आपल्या पुद्‌गलाचे प्रतिक्रमण कोण करतो?

**दादाश्री :** ते सर्व आपली प्रज्ञा करते. (प्रज्ञा चंदुभाईंकडून करवून घेते.)

**प्रश्नकर्ता :** पण दादा, आपण तर असे बोलतो की 'मन-वचन-

काया' यापासून अगदी भिन्न असा शुद्धात्मा!' असेच म्हणतो ना, मग पुद्‌गलाचे प्रतिक्रमण असे का म्हणायचे?

**दादाश्री :** ती तर शुद्धात्म्याची माफी मागतो की माझ्याकडून अशी चूक झाली, त्यासाठी माफी मागतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे माफी शुद्धात्म्याची मागायची आणि प्रतिक्रमण पुद्‌गलाचे करायचे, असे आहे का?

**दादाश्री :** नाही, प्रतिक्रमण आणि माफी, दोन्ही एकच गोष्टी आहेत. त्याच्या शुद्धात्म्याची माफी मागायची की तुमच्या प्रतिष्ठित आत्म्याबरोबर माझी जी चूक झाली आहे त्यासाठी मी माफी मागतो.

**प्रश्नकर्ता :** ज्या व्यक्तीने ज्ञान घेतलेले नाही, त्या व्यक्तीने पण असेच प्रतिक्रमण करायचे?

**दादाश्री :** (त्याच्याकडून) असे होऊ शकणार नाही. असे चालणार नाही! ज्याने ज्ञान घेतलेले नाही त्याने त्याच्या परीने माफी मागावी.

**प्रश्नकर्ता :** आम्ही ज्ञान घेतलेले असेल आणि समोरच्या व्यक्तीने घेतलेले नसेल, तर काय?

**दादाश्री :** समोरच्या व्यक्तीने ज्ञान घेतलेले नसेल तरी काहीच हरकत नाही. आपण प्रतिक्रमण करू शकतो.

**प्रश्नकर्ता :** तो जो आतमध्ये चंदुभाईला सांगतो की, 'तुम्ही चूक केली आहे, म्हणून प्रतिक्रमण करा', तर तो सांगणारा कोण आहे? असे कोण सांगतो?

**दादाश्री :** ती आपली प्रज्ञा नावाची जी शक्ती आहे, ती सावध करते की तुम्ही हे प्रतिक्रमण करा.

**प्रश्नकर्ता :** जेव्हा आपण आपले प्रतिक्रमण करतो तेव्हा वास्तवात पुद्‌गल शुद्धात्म्याचे प्रतिक्रमण करते ना?

**दादाश्री :** ते आपल्या शुद्धात्म्याचे करतो, आपला शुद्धात्मा म्हणजे ही प्रज्ञाशक्ती. या प्रतिक्रमणात प्रज्ञाशक्ती आणि शुद्ध चेतन काम करतात.

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमण दुसऱ्यांसाठी नाही, तर स्वत:साठी सुद्धा होऊ शकते?

**दादाश्री :** स्वत:चे तर आपल्या शुद्धात्म्यासमक्ष करायचे. आपण 'चंदुभाई'ला म्हणावे, की 'हे चंदुभाई, प्रतिक्रमण करा, तुम्ही अशा चुका का करता?'

## दोष आणि दोष जाणणारा, हे वेगळे आहेत

**प्रश्नकर्ता :** जर दोष जाणत असू तर त्याला दोष कसे म्हणावे?

**दादाश्री :** तुम्ही जर 'जाणणारे' असाल तर जाणणाऱ्याचा दोष नाही. पण चंदुभाई काय करत आहे त्याला 'स्वत:' जाणतो. क्रमणाला हरकत नाही, पण चंदुभाई जेव्हा कोणाला रागावतो, तेव्हा स्वत:ने चंदुभाईला असे सांगावे की 'तुमचा दोष आहे.' हा अक्रम मार्ग आहे, यात पाहण्याचा माल जर फक्त शुभच असेल तर हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** जर ज्ञायक असेल तर मग अशुभ असेल तरी काय हरकत आहे?

**दादाश्री :** पण अशी जागृती नसतेच ना! म्हणूनच आम्ही प्रतिक्रमण करायला सांगतो.

हे जे पॅकिंग आहे, ते आत्म्याच्या प्रतिबिंबासारखे व्हायला हवे. या पॅकिंगला पण 'भगवंतांसारखे' बनवायचे आहे. म्हणून प्रतिक्रमण करायचे ना! क्रमिक मार्गात तर सगळे शुभच असते, म्हणून त्यांना प्रतिक्रमणे करायची नसतात. तिथे तर 'प्रतिक्रमण' हा दोष मानला जातो. तिथे तर 'क्रमण', फक्त शुभच असते.

## तर प्रतिक्रमण नाही

**प्रश्नकर्ता :** कोणाबद्दल वाईट विचार आले तर प्रतिक्रमण करायला हवे का?

**दादाश्री :** हो, (कारण) ते विचार लगेच त्याला पोहोचतात आणि त्याचे मनोभाव बिघडतात. प्रतिक्रमण केल्यामुळे त्याचे बिघडलेले मनोभाव सुधारतात. कोणाबद्दल अजिबात वाईट विचार करू नये.

**प्रश्नकर्ता :** कोणाबद्दल वाईट विचार आले तर त्या विचारांना मी पाहतो.

**दादाश्री :** तुम्ही 'पाहणारे' असाल तर हरकत नाही. परंतु जर पाहायचे राहून गेले तर मात्र प्रतिक्रमण करायला हवे. पाहिल्यामुळे आपोआप संपून जाते. त्याला ज्ञानपूर्वक 'करेक्ट' (बरोबर) पाहू शकत असाल तर हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** जर वेगळे राहून पाहू शकत असू, तर असे विचार येणारच नाहीत.

**दादाश्री :** तरीही येतात, पूर्ण वेगळे राहिलात, तरी विचार येतील. कारण तो भरलेला माल आहे ना! 'इफेक्ट' (परिणाम) आल्याशिवाय राहणारच नाही.

## जिथे ज्ञाता-द्रष्टा पद, तिथे दोष समाप्ती

**प्रश्नकर्ता :** जर स्वत:कडूनच काही दोष झाले तर?

**दादाश्री :** त्यांना तर पाहायचे. आणि दुसऱ्यांचे दोष दिसले तर प्रतिक्रमण करून ते संपवायचे.

**प्रश्नकर्ता :** जर आम्ही दोषांचे 'ज्ञाता-द्रष्टा' राहिलो तर ते धुतले जातात ना? की मग प्रतिक्रमण करावे लागते?

**दादाश्री :** मग तर दोष राहिलाच नाही ना! पण त्यावेळी तर स्वत: 'ज्ञाता-द्रष्टा' राहिला नाही हे लक्षातच येत नाही.

## जर 'ज्ञाता-द्रष्टा', तर काहीच करायचे नाही

जागृती असेल तरच ज्ञाता-द्रष्टा राहता येते आणि जागृती असेल तरच प्रतिक्रमण होऊ शकते. प्रतिक्रमण आता 'तुम्हाला' करायचे नाही.

जो 'ज्ञाता-द्रष्टा' आहे तो करत नाही आणि जो करतो तो 'ज्ञाता-द्रष्टा' नाही. म्हणजेच प्रतिक्रमण हे चंदुभाईने करायचे आहे. ज्याने अतिक्रमण केले आहे त्याला 'आपण' सांगावे की 'तुम्ही' प्रतिक्रमण करा. जो आक्रमण करतो त्यालाच सांगावे की तुम्ही प्रतिक्रमण करा. तुम्ही जर शुद्धात्मा असाल तरच तुम्ही चंदुभाईला प्रतिक्रमण करायला सांगू शकता.

## अहंकार - अतिक्रमणात आणि प्रतिक्रमणात

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण कोण करतो?

**दादाश्री :** जो अतिक्रमण करतो, तो.

**प्रश्नकर्ता :** पण अतिक्रमण कोण करतो?

**दादाश्री :** अतिक्रमण अहंकार करतो.

**प्रश्नकर्ता :** जर अहंकार अतिक्रमण करतो तर प्रतिक्रमण पण अहंकारानेच करायचे का?

**दादाश्री :** होय, प्रतिक्रमण पण अहंकारानेच करायचे. पण सावध कोण करते? प्रज्ञा करते. प्रज्ञा म्हणते, 'अतिक्रमण का केलेत? तर मग आता प्रतिक्रमण करा.'

**प्रश्नकर्ता :** मग प्रज्ञा 'रिलेटिव्ह'मधून येते की 'रियल'मधून?

**दादाश्री :** ती 'रियल'मधून येते. म्हणजे ती 'रियल'मधून उत्पन्न होणारी शक्ती आहे. दोन तऱ्हेच्या शक्ती असतात. एक 'रियल'मधून उत्पन्न होणारी शक्ती, ती म्हणजे प्रज्ञा आणि दुसरी 'रिलेटिव्ह'मधून उत्पन्न होणारी शक्ती तिला अज्ञा म्हणतात. 'अज्ञा' ती संसाराबाहेर पडूच देत नाही आणि प्रज्ञा ती तर मोक्षाला नेईपर्यंत सोडत नाही. ज्या वेळी येथून शरीर सुटेल आणि मोक्षाची तयारी झालेली असेल त्याच वेळी प्रज्ञा आत्म्यात समाविष्ट होऊन जाते. ती काही वेगळी शक्ती नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे अहंकार 'रिलेटिव्ह'मध्येच येतो ना?

**दादाश्री :** ते सर्व रिलेटिव्हमध्येच येते.

**प्रश्नकर्ता :** दादा, 'रियल' आणि 'रिलेटिव्ह' दोन्ही जर वेगळे आहेत तर मग आम्हाला मध्ये पडण्याची काय गरज आहे? प्रतिक्रमण करायची गरज काय? आपल्याला 'रिलेटिव्ह'मध्ये पडण्याची गरजच काय?

**दादाश्री :** 'रिलेटिव्ह'मध्ये पडण्याची गरज नाही पण समोरच्या व्यक्तीला दु:ख झाले म्हणून आपल्याला चंदुभाईला (स्वत:ला) सांगायला हवे की 'बाबा रे, याला दु:ख का दिलेस? मग आता प्रतिक्रमण कर.' बस, म्हणजे धुऊन टाकायचे. डाग पडल्यावर लगेच धुऊन टाकायचे. आपण 'रिलेटिव्ह' कपडा पण स्वच्छ ठेवायचा.

**प्रश्नकर्ता :** दादा, हे जे दु:ख देतो, तो 'रियल' देतो का?

**दादाश्री :** 'रियल' तर काहीच करत नाही. सगळे 'रिलेटिव्ह'मध्येच आहे. आणि दु:ख सुद्धा 'रिलेटिव्ह'लाच पोहोचते, 'रियल'ला काहीच पोहोचत नाही.

## दु:ख कोणाला होते?

**प्रश्नकर्ता :** हे जे दु:ख होते ते समोरच्या व्यक्तीच्या अहंकारालाच होते ना?

**दादाश्री :** हो, अहंकारालाच दु:ख होते.

**प्रश्नकर्ता :** मग प्रतिक्रमण करण्याची काय गरज आहे? परत 'रिलेटिव्ह'मध्ये घुसण्याची काय गरज आहे?

**दादाश्री :** पण त्याला जे दु:ख झाले त्याचा डाग आपल्या 'रिलेटिव्ह' वर राहिला ना! 'रिलेटिव्ह' वर डाग ठेवता कामा नये. शेवटी साफ करावे लागेल. या कपड्याला स्वच्छ ठेवायचे आहे. क्रमणाला हरकत नाही. क्रमण म्हणजे असाच मळ लागला तर हरकत नाही. मळतो त्याला हरकत नाही, पण डाग पडला की तो ताबडतोब धुऊन टाकायचा.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे 'रिलेटिव्ह'ला स्वच्छ ठेवणे आवश्यक आहे?

**दादाश्री :** असे नाही. 'रिलेटिव्ह' जुने झाले, कपडा जुना झाला

तर त्याला हरकत नाही. पण क्रमणामुळे एकदम डाग लागला तर ते आपल्या विरोधात म्हटले जाईल. म्हणून तो डाग धुणे आवश्यक आहे. म्हणजे जर असे अतिक्रमण झाले तर प्रतिक्रमण करा. आणि ते कधीतरीच होत असते, रोज होत नाही. आणि जरी त्याचे प्रतिक्रमण झाले नसेल तरी तो फार मोठा गुन्हा नाही, पण प्रतिक्रमण करणे हे चांगले आहे.

**प्रश्नकर्ता :** जर अतिक्रमणाची सत्ता आपल्या हातात नाही, तर प्रतिक्रमणाची सत्ता आपल्या हातात कशी असेल?

**दादाश्री :** अतिक्रमणाची सत्ता आपल्या हातात नाही. पण प्रतिक्रमणासाठी तर आतून सावध केले जाते. आतमध्ये जे चेतन आहे ना, प्रज्ञाशक्ती, ती सावध करते.

## स्थूल प्रतिक्रमण आणि सूक्ष्म प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** तर मग प्रतिक्रमण कोण करतो?

**दादाश्री :** जो अतिक्रमण करतो, त्याच्याकडूनच प्रतिक्रमण करून घेतले जाते.

**प्रश्नकर्ता :** मला स्थूलपणे सांगा की हे प्रतिक्रमण शरीर करते ना? मी मगनभाईला जाऊन सांगितले की 'मी तुम्हाला काल दुःख दिले होते, मला माफ करा'. तेव्हा शरीर तिथे जाऊन प्रतिक्रमण करते. म्हणजे ही स्थूल गोष्ट झाली, मग यात सूक्ष्म गोष्ट कुठली आहे?

**दादाश्री :** का बरे? आतमध्ये प्रतिक्रमण करण्याचे जे भाव आले ते सूक्ष्म आहे, आणि बाहेर जे केले ते स्थूल आहे 'स्थूल' झाले नाही तरी हरकत नाही. म्हणजेच सूक्ष्म केले तरी खूप झाले. ज्याने अतिक्रमण केले त्याच्याकडूनच प्रतिक्रमण करवून घ्यावे की, 'बाबा रे, तू कर. तू अतिक्रमण केले आहेस, म्हणून तू प्रतिक्रमण कर. तू प्रतिक्रमण कर आणि शुद्ध होऊन जा.' या प्रकारे अतिक्रमणवाल्यांना अडवायचे आहे की, 'बाबा रे, आता तू असे का करत आहेस?' प्रतिक्रमणासारखा दुसरा मार्गच नाही.

जर 'सायंटिफिक' रूपात हे ज्ञान राहत असेल तर मौन राहायला

पण काही हरकत नाही. पण लोकांना 'सायंटिफिक' रूपात राहू शकत नाही म्हणून तुम्हाला असे काही तरी बोलले पाहिजे. कारण जो बोलतो तो शुद्धात्मा बोलत नाही, ती प्रज्ञा नावाची शक्ती बोलत असते. शुद्धात्म्याला तर काही बोलायचे नसतेच ना! म्हणून प्रज्ञा नावाची शक्ती म्हणते, 'असे का करतोस? असे होता कामा नये.' एवढे म्हटले तरी खूप झाले. किंवा कोणाला वाईट वाटेल असे जर वर्तन घडले तर प्रज्ञा नावाची शक्ती चंदुभाईला म्हणते, 'तुम्ही प्रतिक्रमण करा आणि प्रत्याख्यान करा.' बस, एवढेच. यात काही कठीण आहे का?

## पुन्हा पुन्हा प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** एकदा प्रतिक्रमण केले तरी पण नंतर पुन्हा असेच अतिक्रमण केले तर?

**दादाश्री :** पुन्हा असे झाले तर पुन्हा प्रतिक्रमण करावे. पुन्हा प्रतिक्रमण करा, सर्व बंद होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणाची बाब शब्दाने नाही, पण अनुभवाने जाणली तर त्याला ताबडतोब समजते. त्याचा परिणाम होतोच.

**दादाश्री :** आपल्या महात्म्यांना तर हे अनुभवास आलेलेच आहे. पण बाहेरच्यांना अनुभव यायला वेळ लागणार ना! जेवढे उलटे चाललो, तेवढे प्रतिक्रमण करतो, अर्थात परत फिरतो, मग कसले नुकसान?

**प्रश्नकर्ता :** मग काहीच नुकसान नाही.

## सर्व सुरळीत चालू लागते

**दादाश्री :** ज्ञानानंतर आतमध्ये सगळे सुरळीत चालू लागते. यापूर्वी तर दिवसभर सगळे उलटेच चालू असे. हे ज्ञान सर्व सरळच करत राहते. तू समोरच्याच्या थोबाडीत मारले तरी पण आतून म्हणेल 'नाही, नाही, असे करता कामा नये, प्रतिक्रमण कर.' आणि पूर्वी जेव्हा ज्ञान घेतलेले नव्हते तेव्हा तू थोबाडीत मारायचा आणि शिवाय वर असे

म्हणायचा की, 'अजून मारले पाहिजे. असेच करायला पाहिजे.' म्हणजेच जे तुमच्या आत चालू आहे ते समकितचे बळ आहे, जबरदस्त बळ आहे! ते रात्रंदिवस चालू राहते, निरंतर चालू राहते!

**प्रश्नकर्ता :** हे सगळे काम प्रज्ञा करत आहे का?

**दादाश्री :** हो, प्रज्ञा काम करत आहे. मोक्षाला घेऊन जाण्यासाठी. सारे चंबूगबाळे आवरून ती मोक्षाला घेऊन जाते.

## अक्रम मार्गात 'क्षायक' प्रतीती

जेव्हा एखाद्याशी भांडण होते तेव्हा आपल्या महात्म्यांची प्रतीती जात नाही. लक्ष (जागृती) चुकते, पण प्रतीती मात्र जात नाही. कारण ही प्रतीती क्षायक प्रतीती आहे. प्रतीती क्षणभर देखील जात नाही. भांडताना देखील जात नाही. तुम्ही कोणाशी भांडत असाल तरी आम्ही रागावत नाही. जर ज्ञानी-ज्ञानी (आपसात) भांडत असतील तर आम्ही त्यांना जाब विचारत नाही. आम्ही जाणतो की हे फाइलचा निकाल करीत आहेत. नंतर लगेचच ते प्रतिक्रमण करू लागतात. आम्हाला सांगावेही लागत नाही. आपले आपणच प्रतिक्रमण करू लागतात. यात अशा प्रकारे प्रतिक्रमणे होत असतात.

तो स्वतः शुद्धात्मा आहे आणि आतमध्ये जो क्रिया करणारा आहे त्याला प्रज्ञाभाव म्हणतात. आणि त्या प्रज्ञाभावाने तो त्यांना (चंदुभाईंना) सांगतो 'तुम्ही प्रतिक्रमण करा.' असे वेगळ्या प्रकारे बोलणे होते. तो स्वतः (म्हणजे प्रज्ञाभाव) चंदुभाईला म्हणतो, 'तुम्ही प्रतिक्रमण करा. तुम्ही असे असे केलेत, अतिक्रमण केलेत म्हणून प्रतिक्रमण करा.' अतिक्रमण म्हणजे समजा तुम्ही येत असता आणि समोरच्या व्यक्तीच्या भावात थोडासा बदल झालेला असतो, तुम्हाला त्याचा पत्ता लागत नाही, कोणालाच पत्ता लागत नाही, पण त्याला स्वतःला तर कळते ना की माझा भाव बदलला होता. म्हणून लगेच तो म्हणतो, 'त्यांच्या नावाने प्रतिक्रमण कर.' मग तो तुमच्या नावाने प्रतिक्रमण करतो. 'शूट ऑन साइट' एकही प्रतिक्रमण शिल्लक राहत नाही.

## शेजारीभावाने प्रतिक्रमण करवून घ्यावे

**प्रश्नकर्ता :** निश्चयाचे लक्ष (जागृती) ठेवलेले आहे, शुद्धात्मा कर्मबंधन करतच नाही, तरी पण प्रतिक्रमण का करावे?

**दादाश्री :** हा शेजारीपणाचा भाव आहे. शेजाऱ्याची आपण काळजी घेतो, सर्वात जवळचा, 'फर्स्ट नंबर'चा शेजारी आहे, म्हणून आपण त्याला समजावले पाहिजे की बाबा, तुम्ही हे अतिक्रमण केले आहे तरी आता प्रतिक्रमण करा. नाही तर जोखीम येईल. अतिक्रमणाचे प्रतिक्रमण तर करावेच लागते. हा अक्रम मार्ग मिळाला आहे, याचा अर्थ असा नाही की त्यामुळे ही (अतिक्रमणे) अशीच संपून जातील. कुठलीही गोष्ट आपोआप संपत नाही. प्रतिक्रमण-प्रत्याख्यान-आलोचना या शिवाय जगातील कुठलीच गोष्ट संपत नाही आणि कोणी मोक्षात जाऊ शकत नाही.

## अपराधांचीच गाठोडी

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण तर अपराध केला असेल तरच करायचे असते ना?

**दादाश्री :** निव्वळ अपराधच आहेत. अपराधीच आहे. ते चौथ्या गुणस्थानकवाले सुद्धा अपराधी म्हटले जातात. क्षणभर देखील निरपराधी झालेला नाही. जेव्हा शुद्धात्मा बनतो तेव्हाच निरपराधी बनतो. निरपराधी झाला याचा अर्थ अहंकार गेला आणि ममता गेली, तेव्हापासूनच निरपराधी झाला. तरी पण हा शेजारी (फाइल नं 1) अपराधी राहिला. म्हणून इथे दोन भाग करण्यात आले आहेत. प्रकृती आणि पुरुष. म्हणजे तुम्ही आता 'पुरुष' झाला आहात आणि पुरुष होऊन प्रकृतीला सूचना द्या की तुम्ही आमचे शेजारी आहात. म्हणून आमचा तुम्हाला सल्ला आहे की तुम्ही अतिक्रमण केले म्हणून तुम्ही प्रतिक्रमण करा.

हे नैसर्गिकपणेच होऊन जाते. हे ज्ञानच असे आहे ना! आणि शिवाय आज्ञा पण दिलेल्या आहेत. म्हणून आज्ञा आपोआपच करवून घेतात. त्याला काहीच करावे लागत नाही. आमच्या आज्ञेने सर्व काही

होऊ शकते. म्हणजे ही पण फाइल आणि समोरचाही फाइल, म्हणून समोरचा दोषी दिसत नाही. आम्हाला कोणतीच व्यक्ती दोषी दिसत नाही. कुठलाही जीव आम्हाला दोषी दिसत नाही. जो फुले वाहतो तोही दोषी दिसत नाही. हे अक्रम विज्ञान तर क्वचितच कधी, दहा लाख वर्षातून एकदाच प्रकट होत असते.

## पश्चात्तापाने दोष धुतले जातात

जिथे आग्रह असेल, तर तोच सगळ्यात मोठे 'पॉइजन' आहे. कोणत्याही गोष्टीचा आग्रह म्हणजे सगळ्यात मोठे 'पॉइजन' आहे. आम्ही निराग्रही आहोत. ज्या भागात निराग्रही झाला त्या भागात 'करेक्ट' झाला.

या जगात कोणताही जीव दोषी नाहीच. ही ज्ञानींची दृष्टी आहे. (कोणी) दोषी दिसतो, तो आपला दृष्टीचा दोष आहे, आपले राग-द्वेष आहेत.

दोषी दिसतो, तो 'इगोइजम' (अहंकार) आहे, राग-द्वेष आहे. आम्हाला जरी कोणी चापट मारली तरी तो आम्हाला निर्दोष दिसतो.

**प्रश्नकर्ता :** दोषी दिसल्यानंतर पश्चात्ताप तर खूप होतो. तरी पण परत परत असे होतेच.

**दादाश्री :** पश्चात्तापामुळे त्याच्याबरोबर जो दोष झाला आहे तो धुतला जातो. तुमच्याकडून जो दोष झाला असेल, तो धुतला जाईल.

जगाला कोणी निर्दोष दिसत नाही. जगासाठी तर फक्त हे कोर्ट निर्दोष आहे. बाकी सर्व दोषीच दिसतात. मग ते वडील असोत की आई असो.

कोणी दोषी दिसत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** 'फन्डामेंटली' (मूळ स्वरूपात) तर निर्दोष आहेत, हे समजते पण तरीही कधी-कधी दोष दिसू लागतात. पण नंतर प्रतिक्रमणे पण होतात, ॲट-ए-टाइम (ताबडतोब).

**दादाश्री :** त्याने ते धुतले जातात. जे दोष झाले असतील ते धुतले जातात. दोष दिसतात आणि ते धुतले जातात, यालाच निर्दोष पाहणे असे म्हणतात. तुमच्यासाठी ही (स्थूल आणि सूक्ष्म) आणि आमच्यासाठी ही (सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम स्तरावरची) प्रतिक्रमणे आहेत.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमण करतो म्हणून आपण परत ॲडजस्ट होतो, बरोबर ना?

**दादाश्री :** आपल्याआपणच होत राहतात. कित्येक जण तर शंभर-शंभर प्रतिक्रमणे करतात. सहाशे-सहाशे प्रतिक्रमण करतात. अतिक्रमण केले त्याचे प्रतिक्रमण करतात.

## आम्हाला यासाठी प्रतिक्रमणे करावी लागतात

जेव्हा मी औरंगाबादला जातो, तेव्हा तेथे खूप मंत्री, मेम्बर्स ऑफ पार्लमेन्ट, एम.एल.ए असे सर्व लोक येतात. आता ते येतात म्हणून मला तर सर्व काही करणे भाग पडते ना! ते म्हणतात, 'मी एम.एल.ए आहे. मला असे प्रसारण करायचे आहे, आणि असे असे करायचे आहे. तर मला विधी करून द्या.' आता खरे म्हणजे त्यांच्यात काही खास नसतेच, नोकरीला ठेवण्याच्या लायकीचे पण नसतात, असे लोक!

**प्रश्नकर्ता :** स्पष्ट शब्दात बोलायचे तर बैलासारखी अक्कल असलेले!

**दादाश्री :** पण काय करणार? असे बोललो तर प्रतिक्रमण करावे लागेल. गत्यंतरच नाही ना! आम्ही कधीही असे बोलत नाही, पण तरीही आम्ही प्रतिक्रमण करतो. दुसरे काय करणार? हा पण भरलेला मालच आहे ना, म्हणून तर बाहेर पडतो, नाही तर कसा बाहेर पडेल? आम्हाला परत त्यासाठी प्रतिक्रमणे करावी लागतात. गत्यंतरच नाही ना! आम्हाला असे चालत नाही. कोणाचेही बेजबाबदार वर्तन चालत नाही.

## भाव, क्रिया आणि त्याचे फळ

क्रियांचे फळ भविष्यात नाही, भावांचे फळ भविष्यात मिळते. क्रियेचे फळ येथल्या येथेच मिळते.

आम्हाला सुद्धा प्रतिक्रमण करावे लागते पण खूप कमी. आमचे 'द्रव्य' पण एकदम स्वच्छ असते. निंदनीय असेल असे एक पण कृत्य आमचे नसते. सर्व मनोहरच असतात.

**प्रश्नकर्ता :** टीकापात्र नसतात.

**दादाश्री :** टीकापात्र नसतात. उलट मनोहरच असतात. वाणी-वर्तन आणि विनय सर्व मनोहरच असतात. समोरच्या व्यक्तीच्या मनाचे हरण (आकर्षित) करणारे असतात. म्हणून तर या जगातून सुटका होऊ शकते. नाही तर पुस्तके वाचली, शास्त्रे वाचली किंवा अन्य काही क्रिया केली तरी पण त्या सर्व क्रिया स-फळ आहेत, काही क्रिया फळ देणाऱ्या आहेत. भगवंतांचा नियम काय आहे की तू ज्या क्रिया करशील त्यांचे फळ तुला भोगावे लागेल. तुला जर ते फळ भोगण्याची इच्छा असेल तर तू कर, त्यातून मग परत दुसरे बी पेरले जातील आणि हे वादळ असेच चालू राहील.

## आमचे प्रतिक्रमण दोष होण्यापूर्वीच

**प्रश्नकर्ता :** मला तुमची एक गोष्ट खूप आवडली. तुम्ही म्हणालात की तुमचे प्रतिक्रमण दोष होण्यापूर्वीच होऊन जाते.

**दादाश्री :** हो, ही प्रतिक्रमणे 'शूट ऑन साइट' होतात. दोष होण्यापूर्वीच आपोआप सुरू होतात. आम्हाला कळतही नाही की हे केव्हा सुरू झाले! कारण ते जागृतीचे फळ आहे. आणि संपूर्ण जागृती, त्यालाच 'केवलज्ञान' म्हणतात. दुसरे काय? जागृती हीच मुख्य गोष्ट आहे.

आम्ही आता या संघपतींबरोबर अतिक्रमण केले आणि त्यासाठी आमचे प्रतिक्रमण पण लगेच होऊन गेले. आमचे प्रतिक्रमण त्याचवेळी होऊन जाते. बोलत पण जातो आणि प्रतिक्रमण पण करत राहतो. बोललो नाही तर गाडी चालणार नाही.

**प्रश्नकर्ता :** दादा, कित्येक वेळा आमच्याकडून सुद्धा असे होते की आम्ही बोलत राहतो आणि त्याचवेळी प्रतिक्रमण पण होत राहते

पण तुम्ही ज्या प्रकारे करता आणि आम्ही जे करतो, त्यात आम्हाला फरक वाटतो.

**दादाश्री :** आमचे कसे वेगळे? एकदम काळे मुलायम केस आणि पांढरे केस, यात किती फरक आहे?

**प्रश्नकर्ता :** तुम्हीच सांगा की तुम्ही प्रतिक्रमण कुठल्या पद्धतीने करता?

**दादाश्री :** ती पद्धत अशी सांगून सापडणार नाही! 'ज्ञान' प्राप्त झाल्यानंतर, बुद्धी गेल्यानंतर, अशी स्थिती येईपर्यंत ती पद्धत शोधूच नका. तुम्ही आपणहून पुढे चालत राहा. जितके पुढे जाता येईल तितके खरे.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आम्हाला शोधायचे नाही, फक्त समजूनच घ्यायचे आहे.

**दादाश्री :** नाही. पण ती पद्धत सापडणारच नाही. जिथे सर्व स्वच्छ झाले, 'क्लिअर'च असेल तिथे करायला उरलेच काय? एका बाजूने चूक होत जाते आणि एका बाजूने ती धुतली जाते. तिथे दुसरी काही ढवळाढवळच नाही. आणि हे सगळेच तर 'अनक्लिअर.' मातीचे ढीगचे ढीग पडलेले आहेत, विटाचे तुकडे पडलेले आहेत, असे तर चालणार नाही ना! तरी पण रस्त्यावर धूळ दिसू लागली की समजावे आता आपण पोहोचणार आहोत. तुम्हाला आता (स्वत:ची चूक) दिसू लागली आहे मग काय हरकत आहे?

**प्रश्नकर्ता :** नाही, केवळ जाणून घेण्यासाठी विचारले.

**दादाश्री :** जेव्हा स्वत:ची चूक दिसू लागते तेव्हा समजावे की योग्य मार्गावर येऊन पोहोचलो आहोत.

जेव्हा भादरण गावची माणसे येतात तेव्हा मी म्हणतो, 'तुमचे काका तर असे होते!'

**प्रश्नकर्ता :** तुमची गोष्ट वेगळी आहे.

**दादाश्री :** नाही, आमची गोष्ट कितीही वेगळी असली तरी पण

आम्हाला त्यांची प्रतिक्रमणे करावीच लागतात. अजिबात, एक अक्षरदेखील सोडू शकत नाही. कारण त्यांना भगवंत म्हणतात. तुम्ही काय म्हणता? निंदा करणे बंद करायला हवे का?

**प्रश्नकर्ता :** जर जागृती असेल तर निंदा करणारच नाही ना?

**दादाश्री :** जागृती असते, स्वतः जागृत असतो आणि (तरीही) एका बाजूने असे बोलले जाते. स्वतःला हे समजते सुद्धा की हे चुकीचे बोलले जात आहे, असे पण तो जाणतो.

**प्रश्नकर्ता :** ती तर ज्ञानी पुरुषांची गोष्ट झाली.

**दादाश्री :** नाही, तुम्हाला पण असे होत नाही का?

**प्रश्नकर्ता :** असे होते की जागृती असते, तरी पण निंदा किंवा इतर जे काही करत असतो ते दोन्ही एकत्रच होत असते. आणि त्याच वेळी त्याचे प्रतिक्रमण पण होऊन जाते.

## आमच्या चुका, सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम

आमची प्रकृती चूकरहित असते. कोणाला चूक दिसत नाही कारण आमची (प्रकृती) चूकरहित असते. आमच्या चुका कोणत्या प्रकारच्या असतात? आमच्या स्थूल चुका नसतात आणि सूक्ष्म चुकाही नसतात. तुमच्या स्थूल चुका निघून गेल्या आहेत पण सूक्ष्म चुका राहिल्या आहेत, आणि माझ्या स्थूल व सूक्ष्म दोन्ही प्रकारच्या चुका संपलेल्या आहेत. फक्त सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम चुका शिल्लक राहिलेल्या आहेत की ज्या जगातील कोणत्याही जीवाला नुकसान करत नाहीत, अशा आमच्या चुका आहेत. आमच्या चुका सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम असतात की ज्या जगातील कोणत्याही जीवाला किंचितही नुकसान करत नाहीत.

जेव्हा स्वतःचे दोष स्वतःला दिसू लागतात तेव्हा कोणी *उपरी* (वरिष्ठ) राहत नाहीत. *उपरी* म्हणजे अनिवार्यपणे तुमच्या वर *उपरी* राहतातच, जोपर्यंत तुम्ही तुमचे दोष स्वतः पाहू शकत नाही, तोपर्यंत तुम्हाला *उपरी* असणारच! तुम्ही स्वतःचे दोष पाहू शकलात तर *उपरी* राहणारच नाहीत. हा निसर्गाचा नियम आहे! नॅचरल लॉ!

माझ्याकडून जे दोष होतात, ते मला दिसतात आणि जर मी ते बाहेर सांगितले तर जग माझ्यावर आफरिनच होईल! आणि म्हणतील यांना काय दोष म्हणायचे का? लोकांकाडून जसे स्थूल दोष होतात तसे माझे होत नाहीत, तो तर घाण कचरा आहे. आणि मला जे दोष दिसतात त्याबद्दल जर लोकांनी ऐकले तर ते आफरिनच होऊन जातील आणि म्हणतील, 'यांना कोण दोष म्हणेल?' म्हणजे ते भगवंत कसे आहेत? कसे कैवल्य आहे! किती ऐश्वर्य आहे! पूर्ण ऐश्वर्य! साऱ्या जगात. म्हणून आम्ही तुम्हाला म्हणतो, आमच्याजवळ बसून राहा. जरी आमच्या गोष्टी तुम्हाला समजोत, न समजोत तरीही!

**प्रश्नकर्ता :** दादा, तुम्ही ज्यांना दोष म्हणता ना, त्याची एक दोन उदाहरणे द्या ना, आश्चर्य वाटेल अशी एक दोन उदाहरणे द्या ना!

**दादाश्री :** ते तर जेव्हा योग्य वेळ येईल तेव्हा उदाहरण देईन, तेव्हा मजा येईल.

आम्हाला तो दोष दिसल्याशिवाय राहत नाही. तुम्ही बाहेर पाहायला जाल तर म्हणतील, हे काय दोष आहेत का? याला दोष कसे काय म्हणता येईल! जेवता जेवता दोष दिसतात, कळते की हा दोष झाला, हा दोष झाला. दोष जरी पुद्‌गलाचे असले तरी मूळ मालक तर आम्हीच आहोत ना! जबाबदार तर आम्हीच आहोत ना! पूर्वी 'टायटल' (मालकी) तर आमचेच होते ना! आता टायटल परत केले असले तरी ते वकील सोडतील का? कायदा तर शोधून काढतीलच ना?

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता, मालकीपणा सुटला आहे तर मग या दोषांना आपले कसे म्हणायचे? पुद्‌गलाच्या दोषांशी आपले काय देणेघेणे?

**दादाश्री :** आपले म्हणायचे नाही पण तरीही जबाबदार तर आहातच ना.

**प्रश्नकर्ता :** मी तर तुमच्याबद्दल बोलत आहे.

**दादाश्री :** आम्हाला जे दोष दिसतात, ते आम्हाला समजतात ना! अहाहा, भगवंतांमध्ये किती शक्ती उत्पन्न झाली आहे की अजूनही

त्यांना आमच्यात दोष दिसतात. आणि आम्हालाही ते बरोबर पण वाटतात. 'आम्ही' कुठे आहोत आणि 'ते' कुठे आहेत, हे मला समजते. मग कसला त्रास? असे काही संसारी दोष आहेत असे नाही.

**प्रश्नकर्ता :** ते दोष खूप सूक्ष्म असतात का?

**दादाश्री :** सूक्ष्मातिसूक्ष्म. ज्यांना सूक्ष्मतम म्हणता येतील असे. म्हणजे मला हे समजते की अहाहा! हे ज्ञानी कुठे आहेत! आणि हे भगवंत कुठे आहेत? समजणारच ना?

**प्रश्नकर्ता :** हो, समजणार.

**दादाश्री :** म्हणून मी म्हणतो ना, या प्रकारे 'दादा भगवानांचा असीम जय जयकार असो.'

वास्तविक भगवंत मिळविले. मी तुम्हाला दाखविले. अजून तर साऱ्या जगाला दाखवीन की प्रत्यक्षात जगात भगवंत आहेत की नाही. लोकांचा तर भगवंत आहेत की नाही, आत्मा आहे की नाही, यावरच विश्वास नाही. पण ज्यांचा विश्वास नाही त्यांना दिसून आले! आत्मा आहे यावर तर लोकांचा विश्वास बसला आहे.

आम्ही तुम्हाला दोष दाखवितो कारण तुम्हाला तुमचे दोष दिसत नाहीत. म्हणून भविष्यात देखील ते तुमचे *उपरी* राहतील. दाखविणारा तर पाहिजे ना? म्हणूनच मला (तुमचे) *उपरी* व्हावे लागले आहे ना! नाही तर मला तुमचे *उपरी* व्हावे लागले नसते. मी तर ज्ञान देऊन मोकळा झालो. पण नेहमी *उपरी* म्हणून राहावे लागते, कारण (दोष) दाखविणारा पाहिजे. तुम्हाला तुमचे दोष दिसत नाहीत. हे जे थोडेसे दोष तुम्हाला दिसतात ना, याचे कारण मी तुम्हाला दृष्टी दिली आहे. आता जास्तीत जास्त दोष दिसतात की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, दिसतात ना?

**दादाश्री :** अजून सूक्ष्मापर्यंत तर पोहोचलात नाही. हे सर्व तर अजून 'स्थूल' मध्येच आहे.

## ज्ञानींची दृष्टी, अनुयायांकडे

सूक्ष्माहून सूक्ष्म दोषसुद्धा आमच्या दृष्टीबाहेर जात नाहीत. सूक्ष्माहून सूक्ष्म, अति-अति सूक्ष्म दोषसुद्धा आम्हाला लगेच कळतात. तुमच्यापैकी कोणालाच हे कळणार नाही की माझ्याकडून हा दोष झाला. कारण हे दोष स्थूल नसतात.

**प्रश्नकर्ता :** तुम्हाला आमचे दोष पण दिसतात का?

**दादाश्री :** सगळे दोष दिसतात, पण आमची दृष्टी दोषांकडे नसते. आम्हाला लगेच कळते पण आमची दृष्टी तुमच्या शुद्धात्म्याकडे असते, तुमच्या उदयकर्मांकडे नसते. सगळ्यांचे दोष आम्हाला समजतात. दोष दिसतात पण त्यांचा परिणाम आतमध्ये होत नाही. म्हणून कवीने म्हटले आहे. *'मा कदी खोड काढे नही, दादानेय दोष कोईना देखाय नही.'* (आई कधी चूक काढत नाही, दादा पण कोणाचे दोष पाहत नाहीत.)

आम्ही जाणतो की एवढा कमकुवतपणा तर राहणारच! म्हणून आमची सहज क्षमा असते. आणि म्हणूनच आम्हाला कोणाला रागावावे लागत नाही. आम्हाला जर असे वाटले की एखाद्याकडून खूप मोठा दोष होणार आहे, तर आम्ही त्याला बोलावून दोन शब्द सांगतो. असे वाटले की तो इथून घसरून पडेल, स्लिप होईल, असे वाटले तरच सांगतो. आम्ही जाणून असतो की हा आज जागृत झाला नाही, तर उद्या जागृत होईल. कारण हा जागृतीचा मार्ग आहे! सतत 'ॲलर्टनेस' (जागृती)चा हा मार्ग आहे!

## अक्रममध्ये प्रमाद नाही

**प्रश्नकर्ता :** प्रमादाला आधार कोण देतो?

**दादाश्री :** ती तर क्रमिक मार्गातील गोष्ट आहे. 'अक्रम'मध्ये प्रमाद नसतोच. अहंकार असेल तर मद असतो आणि मद असला की प्रमाद असतो, प्रमत्त असतो. अक्रममध्ये असे काही नसते. हा मार्ग एकदम वेगळा आहे. एक दिवससुद्धा वहीखाते स्वच्छ झाल्याशिवाय

राहत नाही, असा हा मार्ग आहे. रोज संध्याकाळी प्रतिक्रमण करून सर्व वहीखाते (रोजच्या रोज) साफ करूनच टाकतात. आणि या जगात कोणीही दोषी दिसत नाही. सगळे निर्दोष दिसतात.

सर्व दोष 'स्वत:'चेच असतात. दुसऱ्या कोणाचा दोष नाहीच. जगात कोणाचाच दोष नाही. म्हणजेच सर्व जग निर्दोष आहे. 'स्वत:'च्या दोषाने हे सर्व उत्पन्न झाले आहे. म्हणून त्या दोषांना धुऊन टाका. आम्ही काय सांगतो? प्रतिक्रमण करा. इतरांचे दोष बघितल्यामुळेच तर हा संसार उभा झाला आहे आणि जर स्वत:चे दोष पाहू लागला तर तो मोक्षाला जाईल. जगात स्वत:चे दोष कोणी पाहू शकत नाही. साधू-आचार्य पण पाहू शकत नाहीत. इथे केवळ ज्ञानाच्या प्रतापामुळे, अक्रम विज्ञानाच्या प्रतापामुळे स्वत:चे दोष दिसू लागतात, नाहीतर एक पण दोष दिसणार नाही, आणि अतिक्रमण झाल्यावर प्रतिक्रमण पण होणार नाही. किती सुंदर विज्ञान आहे! निरंतर समाधी देणारे, भांडता भांडता पण समाधी! भांडणे होत राहतात ती पूर्व जन्मीच्या कारणामुळे होतात. हो, ते पूर्वीच्या भरलेल्या मालामुळे होतात. पण हे विज्ञान निरंतर समाधी देते!

## सहज क्षमा ज्ञानींची, सदैव असते

समोरचा जे करतो, उलट किंवा सुलट, ते सर्व 'व्यवस्थित'च्या आधीन आहे.

**प्रश्नकर्ता :** पण अनादी काळापासून उलटच पाहायची सवय लागली आहे, त्याचे काय?

**दादाश्री :** हो, पण आपण उपयोग राखायचा आणि प्रतिक्रमण करून धुऊन टाकायचे.

**प्रश्नकर्ता :** अपमान झाल्यावर स्वत:ला आघात झाला, तर ते कसे सुधारून घ्यायचे? प्रतिक्रमण कसे करायचे?

**दादाश्री :** समोरच्याने अपमान केला आणि तुम्हाला आघात झाला तर?

**प्रश्नकर्ता :** हो, त्याचे प्रतिक्रमण कसे करायचे?

**दादाश्री :** त्याचे प्रतिक्रमण तुम्हाला करायची गरज नाही, त्याने करायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** त्याला कुठल्या भावाने सुधारता येईल?

**दादाश्री :** तोच सुधारेल. तुम्हाला सुधारायचे नसते. तुम्ही फक्त क्षमा करायची.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आम्ही त्याला क्षमा करण्याची आवश्यकता आहे ना!

**दादाश्री :** जे घडून गेले त्याला व्यावहारिक रूपात क्षमा असे म्हणावे लागते, पण ही वीर पुरुषाची क्षमा नाही.

**प्रश्नकर्ता :** हे अनिवार्य आहे का?

**दादाश्री :** नाही, 'व्यवस्थित'च आहे. त्यात तुम्ही त्याचे काय केले? तुम्ही नवीन काय केले? आमची सहज क्षमा असते, जर समोरच्याची चूक झाली तर त्याच्या मनात पश्चात्ताप होतो. मी सांगतो, 'अजिबात पश्चात्ताप करू नका. सर्व बरोबर आहे.' म्हणजेच त्याच्यासाठी आमची सहज क्षमा असतेच. क्षमा सहज असली पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** दादाजींसमोर चूक झाली तर लगेच दुसऱ्याचक्षणी आम्हाला असा अनुभव येतो, की दादाजींच्या करुणेचा वर्षाव आमच्यावर झाला आहे.

**दादाश्री :** हो, म्हणजे सहज क्षमा!

ती जी क्षमा आहे, तो आत्म्याचा पण गुण नाही आणि अनात्म्याचा पण गुण नाही. अशी आहे ती क्षमा. लोक तिला संसार-व्यवहारात घेऊन जातात. ते क्षमा करतात, तरी तेसुद्धा चांगले आहे. भाषेच्या रूपात ठेवणे चांगले आहे. भाषेच्या दृष्टीने 'ऑनॉमेंटल' (अलंकृत) शब्द आहे. मोठी माणसे लहानांना क्षमा करतात. लोक म्हणतात 'साहेब, मला क्षमा करा.' तेव्हा ते म्हणतात, 'हो, तुला क्षमा करतो' असे करणे 'ऑनॉमेंटली' चांगले आहे. पण क्षमा हा तर सहज गुण आहे.

आम्हाला असे खूप भेटलेले, तरी पण आम्ही वीतराग राहतो. तो जरी वाकडा वागला तरी पण आम्ही वीतराग राहतो. जर आम्ही त्याला शिक्षा केली तर त्याला शिक्षा होईल, पण आम्हाला डाग लागेल ना? आमच्याकडे शिक्षेला योग्य अशा व्यक्तींना पण माफी मिळते आणि ती पण अगदी सहज! समोरच्याला माफी मागायची गरज पडत नाही. जिथे सहज माफ केले जाते, तिथे ते लोक शुद्ध होऊन जातात आणि जिथे 'साहेब, माफ करा.' असे म्हटले जाते, तिथे उलट ते मळके होतात. जिथे सहज माफी असेल तिथे तर खूप शुद्धी होऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** जर तुमच्याकडून सहज माफी मिळाली, ऑटोमेटिक तर मग प्रतिक्रमणे करावी लागणार नाहीत का?

**दादाश्री :** प्रतिक्रमणे तर करावीच लागतील. प्रतिक्रमण केले नाही तर त्याचे नुकसान होईल. पण आम्ही जी माफी देतो अशी सहज माफी, फक्त आमचीच असते, इतर कोणी अशी माफी देऊ शकत नाही ना! आम्ही सांगितलेली प्रतिक्रमणे केलीत तर तुमचे कल्याणच होईल! आमच्यासाठी कोणालाच प्रतिक्रमणे करावी लागत नाहीत. आमच्याकडून असा एकही गुन्हा होत नाही की ज्यामुळे समोरच्याला प्रतिक्रमण करावे लागेल. तुमच्याकडून चूक झाली, त्यासाठी जर तुम्ही प्रतिक्रमण केले, तर ते तेवढेच फायदेशीर होईल. बाकी, आमची सहज माफी असतेच.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही सहज माफ करता तर मग आम्ही प्रतिक्रमणाची मेहनत का घ्यायची?

**दादाश्री :** हो, पण तुमचे तर बिघडलेलेच राहिले ना! आम्ही माफ केले, पण तुमचे जे बिघडले आहे, त्याचे काय? माफी अर्थात आमच्याकडून तुम्हाला आता कोणताही दंड पडणार नाही.

## सहजपणा तुटल्यावर प्रतिक्रमण

**प्रश्नकर्ता :** आमची जागृती अशी असावी की दादाजींना खूप प्रतिक्रमणे करावी लागू नयेत.

**दादाश्री :** असे समजदार असाल तर ती खूपच चांगली गोष्ट म्हणायची. नाहीतर कोणी बिनकामाचे कुठून तरी ऐकून आलेले असतात आणि मग ते आम्हाला सांगत बसतात, तर ते आम्हाला आवडत नाही. आता त्यांचा उद्देश तसा नसतो पण प्रकृतीस्वभावच तसा आणलेला असतो, म्हणजे यात त्यांचा काही दोष नाही. दोष आमचा आहे की आम्हाला प्रतिक्रमणे करावी लागतात. ज्याचा वेळ वाया जातो त्याचा दोष. तो तर बॅन्ड वाजला. 'वाजणे' हा बॅन्डचा स्वभावच आहे.

जोपर्यंत आमच्यात सहजपणा आहे तोपर्यंत आम्हाला प्रतिक्रमणे करावी लागत नाहीत. सहजतेत तुम्हालाही प्रतिक्रमण करावे लागत नाही. सहजतेत फरक पडला तर प्रतिक्रमण करावे लागते. तुम्ही जेव्हाही आम्हाला पाहाल तेव्हा सहजतेतच पाहाल, जेव्हाही पाहाल तेव्हा त्याच स्वभावात पाहाल. आमच्या सहजतेत फरक पडत नाही.

## आज्ञापूर्वकचे प्रतिक्रमण

हे प्रतिक्रमण केल्याने खूप साऱ्या शक्ती उमलतात पण आमच्या आज्ञेनुसार केले तर.

**प्रश्नकर्ता :** ते कसे आणि केव्हा?

**दादाश्री :** जर आमची आज्ञा घेऊन करील तर त्याचे (मोक्षाचे) काम होऊन जाईल. विशेष करून या यात्रेत. अशा संयोगात देखील आज्ञा घेऊन करावे.

1973 मध्ये आम्ही सर्व 38 दिवसाच्या यात्रेला गेलो होतो. तिथे पण आमचा 'नो लॉ' (काहीच नियम नाहीत). म्हणजे असे नाही की कोणाशी भांडायचे नाही. ज्याच्याशी भांडायचे असेल त्याच्याशी भांडायची सूट. म्हणजे भांडायची सूट द्यायची असे ही नाही आणि नाही द्यायची असे ही नाही. जर ते भांडले तर 'आम्ही' पाहत असू, पण मग रात्री सर्वजण आमच्या साक्षीने 'प्रतिक्रमण' करून धुऊन टाकत असत. समोरासमोर डाग पडत आणि नंतर ते धुऊनही टाकत! हा प्युअर 'वीतराग मार्ग' आहे. म्हणून इथे कॅश-रोख प्रतिक्रमणे करावी लागतात.

यात पाक्षिक किंवा मासिक प्रतिक्रमणे होत नाहीत. इथे तर दोष झाला की लगेच प्रतिक्रमण.

**प्रश्नकर्ता :** तशी तर 'मी शुद्धात्मा आहे' अशी जागृती आहे तरी पण ते पूर्वीचे...

**दादाश्री :** जो कचरा आहे ना, तो जर आतून बाहेर पडला नाही तर आतच राहील, त्याऐवजी बाहेर पडला तर चांगले. जेव्हा पूर्वी आम्ही यात्रेवर निघालो होतो तेव्हा आमचे काही पटेल आणि दुसरे तुमच्यासारखे वाणी लोक होते, ते आपापसात इतके भांडत, इतके भांडत, तेव्हा सगळे मला काय म्हणत की, 'दादाजी, यांना सोडवा ना! हे इतके उलटे (वाईट) शब्द बोलत आहेत, खूप भांडत आहेत.' तेव्हा मी त्यांना म्हणत असे, माझ्या हजेरीत भांडत आहेत म्हणून निराकरण होईलच ना! लवकरात लवकर निराकरण होईल आणि कसलेही कर्मबंधन होणार नाही बिचाऱ्यांना. म्हणून जर मारामारी करत असतील तर खुशाल करू द्या, 'चांगले मारा'. असे मी म्हणे, 'मारा, चांगले जोरात मारा.' जर आतमध्ये तसे असेल तरच मारतील ना? आत नसलेच तर कसे मारतील?

या प्रकारे संपूर्ण दिवस बसमध्ये जोरदार भांडणे चालू असत. तेव्हा ड्रायव्हर मला म्हणाला, 'साहेब, तुम्ही तर देवासारखे आहात, अशा लोकांबद्दल तुम्हाला प्रेम कसे काय वाटू लागले?' मी सांगितले, 'ही सगळी माणसेच खूप चांगली आहेत. एक दिवस सुधारतील.'

मग संध्याकाळ होताच सगळे जण मिळून बसमध्येच 'दादा भगवान' यांची आरती करत. ते मारामारी करीत पण परत सर्वजण मिळून पूर्ण आरती गात आणि नंतर प्रतिक्रमण पण करीत. जे सर्व जण मारामारी, भांडण-तंटा करीत ते मग समोरासमोर एकमेकांच्या पाया पडून नमस्कार करीत असत. तेव्हा तो ड्रायव्हर म्हणू लागला, असे तर मी जगात कुठेच पाहिले नाही. ताबडतोब परत प्रतिक्रमण करीत. रोज एक वेळ तरी प्रतिक्रमण करतच करत. जेवढे भांडत, तेवढेच प्रतिक्रमण करत आणि ते पण एकमेकांच्या पाया पडून! बघा, आता आहे का कसली भानगड?

प्रतिक्रमणरूपी विचार देत आहोत. आमच्या आज्ञेने प्रतिक्रमण कराल तर झपाट्याने कल्याण होऊन जाईल. पाप भोगावे तर लागेल पण इतके नाही.

## आज्ञा चुकल्याचे प्रतिक्रमण

आम्ही तुम्हाला ज्ञान तर दिले आहे, पण तुम्ही ते गमावून बसाल, म्हणून आम्ही तुम्हाला पाच आज्ञा देतो. जर या पाच आज्ञा पाळाल तर मोक्षाला जाल, आणि सहावे काय सांगितले आहे? तर जर अतिक्रमण झाले तर प्रतिक्रमण करा. आज्ञा पालन करण्याचे विसरलात तर प्रतिक्रमण करा. माणूस आहे चूक तर होणार पण विसरलात त्यासाठी प्रतिक्रमण करा, की 'हे दादा भगवान, हे दोन तास मी तुमची आज्ञा विसरलो पण मला तर आज्ञा पाळायच्याच आहेत. मला माफ करा.' मग मागचे सगळे पास. शंभरापैकी शंभर मार्क्स. म्हणजे मग तुमची जबाबदारी राहिली नाही. पुन्हा चूक करण्याची ज्याची इच्छा नाही, त्याला आम्ही माफ करतो. आमच्याजवळ माफ करण्याचे लायसेन्स आहे.

आमच्या आज्ञेत राहिलात तर तुमचे कार्य सिद्ध होईल. आणि जर व्यर्थ चर्चा करत बसाल तर काय होईल?

आज्ञेत राहता येत नसेल तर प्रतिक्रमण करावे लागते. घरातून बाहेर पडताना 'मला दादांच्या आज्ञा पाळायच्याच आहेत' असा निश्चय करूनच बाहेर पडावे. तरी पण आज्ञा पालन जमले नाही तर ताबडतोब प्रतिक्रमण करावे. असे रोजच करत गेले तर सहा महिन्यांनी, बारा महिन्यांनी वळण लागेल. कायम स्वरूपी वळण लागेल.

ट्रेनमध्ये बसलेले, टॅक्सीत बसलेले हे सर्व मुक्तच आहेत ना? बसणाऱ्याला काय? इकडे-तिकडे पाहतो, अवती-भवती पाहातो, असे-तसे विचार येतात! वास्तवात शुद्ध उपयोग चुकता कामा नये. पैसे मोजताना का चुकत नाही? कारण तेव्हा तर जराही इकडे-तिकडे पाहत नाही. हजार-हजारांच्या नोटा असल्या तर अजिबात इकडे-तिकडे पाहत नाही. मग हा तर त्याहून किती तरी मौल्यवान आत्मा प्राप्त झाला आहे!

अरे, दहा-दहा पैशांची नाणी देखील मोजत बसतो, आणि तेसुद्धा अगदी न चुकता.

'तुम्ही' काहीच करायचे नाही, 'तुम्ही' फक्त निश्चयच करायचा आहे की 'मला दादांच्या आज्ञांचे पालन करायचे आहे' आणि जर पालन करणे जमले नाही तर चिंता करत बसायचे नाही. माझी सासू रागावते असे वाटल्यावर 'सासू' दृष्टीस पडण्यापूर्वीच 'मला दादांची आज्ञा पाळायची आहे, आणि यांच्याबरोबर 'समभावाने निकाल' करायचाच आहे असे मनात निश्चित करावे. मग समभावाने निकाल करणे जरी जमले नाही तरी तुम्ही जबाबदार राहत नाही. तुम्हाला आज्ञा पालन करायचा अधिकार आहे, निश्चयाचा अधिकार आहे, त्याच्या परिणामाचा अधिकार तुम्हाला नाही. आज्ञा पालन करायचे आहे असा तुमचा निश्चय असला पाहिजे. मग जरी आज्ञा पालन करणे जमले नाही तर त्याबद्दल खेद करत बसायचे नाही. पण मी जसे सांगतो, त्याप्रमाणे तुम्ही प्रतिक्रमण केले पाहिजे. अतिक्रमण केले म्हणून प्रतिक्रमण करा. हा इतका, सरळ, साधा आणि सुगम मार्ग आहे, त्याला नीट समजून घ्या.

## प्रतिक्रमणाचा पंप

पाच आज्ञांमध्येच जास्तीतजास्त राहायचे आहे. दुसरे काही करण्यासारखे नाही. सकाळपासूनच निश्चय करावा की मला पाच आज्ञांमध्येच राहायचे आहे, आणि जर जमले नाही तर त्यासाठी रात्री प्रतिक्रमण करावे. म्हणजे मग दुसऱ्या दिवशी आज्ञानुसार राहता येईल. नंतर हळूहळू जोर वाढत जाईल. यासाठी दुसरे कुठले पंप नसतात. हाच पंप आहे.

**प्रश्नकर्ता :** हो, प्रतिक्रमणाचा पंप.

**दादाश्री :** प्रतिक्रमणाचा पंप. म्हणून मी काय नियम बनविला आहे की बाबा, तुमच्याकडून जेवढ्या आज्ञा पाळता येतील तेवढ्या पाळा. आणि जर पाळता आल्या नाहीत तर दादांची क्षमा मागा, आणि म्हणा, 'दादा, जेवढ्या पाळता येणे शक्य आहे तेवढ्यांचे पालन करतो

आणि ज्या पाळता येणे जमले नाही त्यासाठी मी काय करू शकतो? म्हणून तुमची क्षमा मागतो.' तर तुमच्या साऱ्या आज्ञा पूर्ण झाल्या. मात्र यात जाणूनबुजून चालढकल करता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** हो, ठीक आहे.

**दादाश्री :** हार्टिली जर तुमच्याकडून जमले नाही तर तुम्ही याप्रमाणे केले तरी मी मान्य करीन की तुम्ही आमच्या सर्व आज्ञांचे पालन करीत आहात.

कारण माणूस किती करू शकणार? जेवढे शक्य असेल तेवढे करावे आणि उरलेल्यासाठी माफी मागावी. मग त्याच्यासाठी मी सर्व भगवंतांना सांगेन ना की याला काय हरकत आहे? हे सगळे तुमच्या आज्ञेतच आहेत. ते जर पालन करू शकत नसतील तर काय करणार?

अर्थात आपले सगळे नियम खूप सुंदर आहेत! प्रतिक्रमण करावे लागेल. आणि हे प्रतिक्रमणच तुम्हाला पुढे नेणार, खूप उंचीवर नेणार. या द्वारे तुम्ही पुढे प्रगती करू शकाल.

आपल्या जवळ जे मार्ग आहेत, त्यांच्यातच राहण्याची आवश्यकता आहे. टेन्शन घ्यायची काही गरज नाही. यात काही नुकसान होणार नाही. मार्ग धरून ठेवायची गरज आहे. ज्ञानच धरून ठेवण्याची गरज आहे.

## जोपर्यंत आज्ञेत राहिला तोपर्यंत परमात्मा

जोपर्यंत आज्ञेत राहील तोपर्यंत परमात्मा, आज्ञेच्या बाहेर गेला तर संपले. आज्ञा कमी पाळल्या गेल्या तरी हरकत नाही, पण इच्छा मात्र जास्तीत जास्त आज्ञा पालन करण्याची बाळगली पाहिजे. आज्ञा पालन करण्याचा भाव ठेवावा आणि तरीही कमी पाळल्या गेल्या तर रोज प्रतिक्रमण करावे की आज्ञा पालन होत नाही म्हणून मी प्रतिक्रमण करत आहे. त्यानंतर ज्ञानींच्या आज्ञेत जे स्वच्छंद करतील ते नरकात जाण्यास योग्य. करायला नको तिथेच स्वच्छंद केला? तिथेच दगा-फटका केला? तिथेच काळाबाजार केला?

## प्रतिक्रमणात विघ्ने येत नाहीत

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणात विघ्ने येतात, प्रमाद (आळस) होतो त्याचे काय कारण आहे?

**दादाश्री :** प्रतिक्रमणात काहीच विघ्ने येत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, प्रतिक्रमण नीट होत नाही.

**दादाश्री :** प्रतिक्रमण होत नाही यासाठी सुद्धा प्रतिक्रमण करावे लागते. आज्ञेत राहता आले नाही त्यासाठी सुद्धा प्रतिक्रमण करावे लागते. मग जबाबदारी राहत नाही.

आपल्याकडे तर शुद्ध व्यवहार, म्हणजे काय? तर पाच आज्ञेतच राहायचे. जितके जमेल तितके आज्ञा पालन करावे. जमले नाही त्यासाठी प्रतिक्रमण करावे.

## शुद्ध उपयोग सेट करा

या आत्म्याला उपयोगात ठेवावे. आत्मा काही अन्य वस्तू नाही, आत्मा म्हणजेच ज्ञान-दर्शन. तर त्या ज्ञान-दर्शनाला उपयोगात ठेवावे. शुद्ध ज्ञान-दर्शन कशाला म्हणतात? राग-द्वेष विरहित जे ज्ञान-दर्शन ते शुद्ध ज्ञान-दर्शन आणि ह्या जगाजवळ जे ज्ञान-दर्शन आहे ते राग-द्वेष युक्त आहे, अशुद्ध आहे. कसे आहे?

**प्रश्नकर्ता :** अशुद्ध आहे.

**दादाश्री :** राग-द्वेष सहित आहे. आणि जे राग-द्वेष रहित आहे, त्याला शुद्ध ज्ञान म्हणतात. त्या शुद्ध ज्ञानाने कोणत्याही प्रकारचा शुद्ध उपयोग होतो. काहीच नसेल तर बसल्या-बसल्या अशा शुद्ध उपयोगात पाहत राहिलात तरी चालेल. असे रस्त्यातसुद्धा चालेल. आणि जर दुसरे काही नसेल तर घरात बसल्या-बसल्या त्यांचे प्रतिक्रमण करत राहा. मागील कित्येक जन्मांपासून हे सर्व जॉइंट झाले आहे ना? म्हणून प्रतिक्रमणासाठी अर्धा तास काढलात तरी सर्व काही निघून जाईल. घरातील प्रत्येक व्यक्तीचे नाव घेऊन प्रतिक्रमण करत राहावे, या जन्मात

आणि मागील अनंत जन्मात जे जे दोष झाले आहेत, त्या उपयोगात राहाल आणि ते दोष स्वच्छ होत जातील. अशी खूप कामे असतात, याला शुद्ध उपयोग राहिला असे म्हटले जाईल. हे सर्व नातेवाईक का भेटले आहेत? तर मागील जन्मात गुंते निर्माण झाले होते म्हणून. जर आपण प्रतिक्रमण केले तर त्यातून आपली सुटका होईल. समोरच्यांना सुटायचे आहे की नाही ही त्यांची मर्जी. आपण तर सुटलो! सुटणाऱ्याला कोणी बांधू शकत नाही. लोक महावीरांवर प्रेमाचा वर्षाव करतात पण त्यामुळे महावीर बांधले जात नाहीत. जर महावीर स्वतः प्रेम करू लागले तर बांधले जातील. लोक मला विचारतात की, 'समोरच्याने काही केले तर माझे काय होईल?' अरे, समोरच्याला जे करावेसे वाटेल ते तो करील, आपल्याला काय देणेघेणे? त्याने जर पुरुषाला स्त्री मानले, तर आपण त्याला मनाई करू शकतो का? जर तो कोर्टात फिर्याद घेऊन गेला तर काय तुम्ही ती घेणार? त्याला जे योग्य वाटेल तो ते करील. तो स्वतंत्र आहे. तो करणार नाही का?

**प्रश्नकर्ता :** करील.

**दादाश्री :** त्यासाठी आपण का त्रास करून घ्यावा? आपण आपले सांभाळावे. म्हणजेच पुष्कळ कामात आपण उपयोग राखायचा आहे. असेच पाहत राहिल्यानेही उपयोग राहतो. शुद्धात्मा झालो म्हणजे काही काम संपत नाही. शुद्धात्मा कोणाला म्हणतात? तर समोरच्याने शिव्या दिल्या आणि त्यामुळे जर आपल्याला अशुद्धी झाली तर त्याला शुद्धात्मा म्हणत नाहीत. त्यावेळी त्याचा शुद्धात्मा दिसला पाहिजे. तो शिव्या देत आहे ते आपले उदयकर्म देत आहे. तो तर बाजा वाजवत आहे, टेपरेकॉर्डर वाजत आहे, पण उदयकर्म तर आपलेच आहे ना! आणि समोरचा शुद्धच आहे, म्हणून स्वतः समोरच्याला शुद्ध पाहतो. स्वतःला शुद्ध पाहतो, याला शुद्ध उपयोग म्हणतात! सर्व जीवमात्रांना शुद्ध पाहणे याला शुद्ध उपयोग म्हणतात.

## अक्रम मार्गाद्वारे भेदज्ञान

**प्रश्नकर्ता :** या अक्रम मार्गाचे वैशिष्ट्य हे आहे की आत्मा

आणि अनात्मा, दोनही भेद-विज्ञानीच्या माध्यमाने वेगळे झाले आहेत, हेच अक्रम मार्गाचे ऐश्वर्य आहे. याउलट क्रमिक मार्गात शेवटपर्यंत त्याचे सातत्य राहते.

**दादाश्री :** शेवटपर्यंत अहंकार पण राहतो, कमी होत जातो.

**प्रश्नकर्ता :** त्यात अहंकार कमी होत जातो, परंतु इथे तर तो वेगळाच झाला आहे, त्यामुळे जी दशा वर्तत आहे, ते अक्रमचे खास वैशिष्ट्य आहे.

**दादाश्री :** म्हणूनच येथे प्रतिक्रमण करावे लागते. कारण येथे अकाळीच (कर्मक्षय केल्याशिवायच) ज्ञान प्राप्त होत असते.

## मोक्षासाठी सर्वांत श्रेष्ठ साधन

**प्रश्नकर्ता :** वरच्या मजल्यावर जायचे असेल तर जिना हा एकमेव साधन आहे. तसेच जर मोक्षाला जायचे असेल, तर ज्ञान मिळाल्यावर प्रतिक्रमण हेच एकमेव साधन आहे, असे मी मानतो.

**दादाश्री :** नाही, असे नाही. प्रतिक्रमण तर या सर्व साधनांपैकी एक साधन आहे. मोक्षाला जाण्यासाठी तर स्वत:च्या स्वरूपाचे ज्ञान, फक्त तेच साधन आहे. दुसरे काहीच साधन नाही.

**प्रश्नकर्ता :** हो, ते ज्ञान तर तुम्ही दिलेच, पण मुख्य गोष्ट तर प्रतिक्रमणच आहे ना?

**दादाश्री :** काही जणांना प्रतिक्रमणे करावी लागत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** चूक झाली नाही तर प्रतिक्रमणे करावी लागत नाहीत.

**दादाश्री :** अशा कितीतरी लोकांना प्रतिक्रमणे करावी लागत नाहीत. जर कोणाला या साधनाची गरज असेल तर ते याचा उपयोग करतील. मुख्य म्हणजे हे ज्ञान आहे. ज्ञान असेल तरच मोक्षाला जाता येते. आणि जर ज्ञान नसेल तर कितीही प्रतिक्रमणे केली तरीही ते सर्व संसारातच असतात.

**प्रश्नकर्ता :** पण ज्ञान मिळाल्याशिवाय प्रतिक्रमण कसे करता येईल?

**दादाश्री :** करतात की खूप लोक! ते अहंकाराने प्रतिक्रमण करतात की पुन्हा असे करणार नाही, असेच करतात ना लोक! आणि त्यांचीसुद्धा गाडी चालतेच ना! अतिक्रमण जसे अहंकाराने करतात, तसेच प्रतिक्रमण पण अहंकारानेच करतात. या साऱ्या पौद्‌गलिक रचना आहेत. साऱ्या पुद्‌गलाच्या रचना आहेत, त्यात आत्मा नाही.

## अक्रमच्या प्रतिक्रमणानेच मोक्ष

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी, असे आहे की हेच एकमेव शस्त्र आहे की ज्यामुळे मोक्ष मिळेल.

**दादाश्री :** हा एक मार्ग आहे. आणि हा अक्रम आहे, म्हणजे मोक्ष स्वभावच आहे.

**प्रश्नकर्ता :** हे बरोबर आहे, पण प्रतिक्रमण, प्रत्याख्यान तर करावीच लागतील ना?

**दादाश्री :** करावी लागतील. तीसुद्धा ज्यांना जमू शकेल ते करतील. ज्यांना जमू शकत नाही, ते काय करतील? आता जर ते चालू शकत नसतील तर मला त्यांना खांद्यावर बसवावे लागते. ते स्वतःच जर करतील तर त्यांच्यात शक्ती येईल, मग ते करतीलच. करणारच नाहीत, असे बेशरम ते नाहीत. दादांशी ज्यांची ज्यांची भेट झाली ते सर्व खानदानी आहेत.

**प्रश्नकर्ता :** दादा, आम्हाला हे जरा सविस्तर समजवा ना.

**दादाश्री :** जर तुम्हाला समजावयाचे असेल तर मी एवढेच म्हणेन की आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान या तीनही गोष्टी करा. तुम्हा सर्वांना तर शांती मिळाली आहे. यांना शांती मिळालेली नाही. कलियुगात माणसांना शांती सहज कशी मिळू शकेल?

## हा आहे सायंटिफिक शोध

**प्रश्नकर्ता :** आम्ही जर काही चूक केली आणि आम्हाला नंतर

समजले तर आम्ही त्यासाठी प्रतिक्रमण करतो. तर असे प्रतिक्रमण केल्यामुळे आम्ही दोषमुक्त कसे होतो?

**दादाश्री :** ही जी चूक होत आहे तो तर परिणाम आहे, 'रिजल्ट' आहे. आणि दोषांची कारणे काय होती? ती कारणे खराब होती म्हणून आम्ही सुद्धा प्रतिक्रमण करतो. त्याच्या परिणामासाठी नाही. त्याचा परिणाम तर काहीही येईल. म्हणजेच आपण दोषांची मूळ कॉजेस् (कारणे) संपवून टाकतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे ही प्रतिक्रमणे कॉजेससाठी आहेत?

**दादाश्री :** हो, ही प्रतिक्रमणे कॉजेस्ला मारून टाकतात. रिजल्टला नाही. हे समजले ना?

आपण कोणाचे नुकसान केले, त्यानंतर आपण प्रतिक्रमण करतो. आता जे नुकसान झाले तो तर इफेक्ट आहे, रिजल्ट आहे आणि नुकसान करण्याचा आमचा जो हेतू होता तो 'कॉज' आहे. म्हणजे प्रतिक्रमण त्या मूळ कारणांना नष्ट करते. बाकी, हे जे घडले, तो तर परिणाम आहे. प्रतिक्रमणाने ते सर्व स्वच्छ होऊन जाते. हे तर सायंटिफिक इन्वेन्शन (वैज्ञानिक शोध) आहे.

**प्रश्नकर्ता :** हे जे आपण प्रतिक्रमण करतो, ते प्रतिक्रमण कशा प्रकारे काम करते की ज्यामुळे आपले दोष धुतले जातात आणि आपण प्युअर फॉर्ममध्ये (शुद्ध स्वरूपात) येतो? म्हणजे हे प्रतिक्रमण त्याच्या शुद्धात्म्याकडे जाते आणि सर्व पुसून साफ करून येते, असे होते की आणखी काही वेगळे?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की बटण दाबले की लाइट चालू होते आणि परत बटण दाबले तर लाइट बंद होते. त्याच प्रकारे जर काही दोष झाला आणि प्रतिक्रमण केले तर त्यामुळे दोष बंद होतो.

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमणामुळे कोणाला आनंद होऊ शकतो का?

**दादाश्री :** हो, आम्ही कोणाला म्हटले, अरे, तुला अजिबात अक्कल नाही, तरी तो हसतो.

**प्रश्नकर्ता :** आम्हालाही आनंद होतो.

**दादाश्री :** अशा काही (विलक्षण) व्यक्तींच्या अतिक्रमणामुळे दुसऱ्याला आनंद होतो!

## फक्त पाहिल्यानेच चारित्र्यमोह निघून जातो

**प्रश्नकर्ता :** खूप वेळा मनात गोंधळ चालू असतो.

**दादाश्री :** तो पाहत राहा.

**प्रश्नकर्ता :** नंतर प्रतिक्रमण करतो, तरी पण गोंधळ चालूच राहतो.

**दादाश्री :** प्रतिक्रमण करतो त्यालाही पाहत राहा. जेवढे अखंड ज्ञान-दर्शन एकत्र होते, तेवढे चारित्र्य उत्पन्न होते. आता हा अनुभव त्याला कशामुळे होतो? तर चारित्र्यमोहाला पाहत राहिल्यामुळे अनुभव होतो. म्हणजेच चंदुभाई काय करत आहेत ते सर्व पाहत राहावे.

**प्रश्नकर्ता :** 'चंदुभाई' काय करत आहे, त्या चारित्र्यमोहाकडे पाहत असताना काही वाईट विचार आला तर?

**दादाश्री :** वाईट विचार येतात हा सुद्धा चारित्र्यमोहच आहे.

**प्रश्नकर्ता :** त्याला फक्त पाहत राहिल्यानेच तो जाईल की त्यासाठी प्रतिक्रमण करावे लागते?

**दादाश्री :** प्रतिक्रमण करायची गरज नाही. प्रतिक्रमण तर सर्व काही पूर्ण झाल्यावर जर तुम्हाला असे वाटले की तुम्ही अतिक्रमण केले आहे तर तुम्ही चंदुभाईला सांगावे की, 'प्रतिक्रमण करा.' 'तुम्ही' करायचे नाही, ज्याने अतिक्रमण केले तोच प्रतिक्रमण करील.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे फक्त पाहिल्यामुळेच सर्व चारित्र्यमोह निघून जातो?

**दादाश्री :** 'पाहिले' म्हणजे शुद्ध झालात. तुमची जी आत्मदृष्टी आहे, ती त्याच्यावर पडली.

**प्रश्नकर्ता :** चंदुभाई तर निरंतर अतिक्रमणच करत असतात ना?

**दादाश्री :** ज्याने अतिक्रमण केले, त्यानेच प्रतिक्रमण करावे.

**प्रश्नकर्ता :** पण त्यासाठी शक्ती तर समोरच्याच्या शुद्धात्म्याकडूनच मागत आहोत ना?

**दादाश्री :** तो तर फक्त व्यवहार आहे. त्यात व्यवहार आणि निश्चय असे नसते. ते फक्त विवेकासाठी, विनयासाठी आहे. शक्ती मागायच्या आहेत.

**प्रश्नकर्ता :** या ज्या साऱ्या इच्छा होत आहेत, तो सर्व चारित्र्यमोहच आहे ना? पण ज्या बाकी राहतात आणि ज्यांचे प्रतिक्रमण नीट झालेले नाही, त्यांचे काय?

**दादाश्री :** मी तर म्हणतो, की जो 'पाहत राहतो' त्याला प्रतिक्रमण करायची पण गरज नाही. काहीच करायची गरज नाही.

## परमाणूंची शुद्धी, ज्ञाता-द्रष्टा पदामुळे

**प्रश्नकर्ता :** दादा, या शरीराचा प्रत्येक परमाणू शुद्ध करण्यासाठी त्याला जे जे होत आहे त्याला आम्ही ज्ञाता-द्रष्टा राहून पाहत राहिलो तर ते शुद्ध होतात की प्रतिक्रमण करून शुद्ध होतात?

**दादाश्री :** ज्ञाता-द्रष्टा राहिल्यानेच शुद्ध होतात.

**प्रश्नकर्ता :** मग प्रतिक्रमणाने काय होते?

**दादाश्री :** प्रतिक्रमणाने काय होते, की जर एखादा खूप मोठा दोष झाला असा दोष की ज्यामुळे समोरच्याला दुःख झाले तर 'आपल्याला' त्यांना (चंदुभाईंना) सांगावे लागेल की 'अहो, असे करू नका. अतिक्रमण केले म्हणून तुम्ही प्रतिक्रमण करा.' जर कोणाला दुःख होईल असे अतिक्रमण केले नसेल तर काही गरज नाही.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, प्रतिक्रमणाने परमाणू शुद्ध होत नाहीत का?

**दादाश्री :** नाही, प्रतिक्रमण तर या दोषांपासून मुक्त होण्यासाठी आहे. त्याने परमाणू शुद्ध होत नाहीत, ते परत तसेच होऊन जातात. त्यासाठी 'आपल्याला' आत्म्यात राहून पाहावे लागते. आपण पाहिल्याबरोबरच ते सुटत जातील. कारण पुद्‌गल तर क्लेम (दावा) करते की 'तुम्ही तर शुद्धात्मा झालात पण माझा मोक्ष होणार नाही.' का रे बाबा, याला काय हरकत आहे? 'मी तर शुद्ध झालो, माझे स्वरूप जाणले?' तेव्हा पुद्‌गल म्हणते, 'तुम्ही मोक्षाला जाऊ शकत नाही. जोपर्यंत आम्ही तुम्हाला सोडत नाही तोपर्यंत तुम्ही कसे काय जाऊ शकाल?' तेव्हा तुम्ही म्हणता, 'बाबा, तुला काय अडचण आहे?' तर पुद्‌गल म्हणते, 'आम्ही तर आमच्या स्वभावातच होतो. तुम्हीच आम्हाला बिघडविले आहे. तुम्ही शुद्ध झालात, आता आम्हाला शुद्ध करून नंतर जा. आम्ही जसे होतो तसे आम्हाला करा, तर मग आम्ही पण मुक्त होऊ.' म्हणूनच शुद्ध पाहायचे आहे. जग तर अशुद्ध पाहते कारण 'मी कर्ता आहे' या भावाने ते करते. आणि आता 'याचा कर्ता मी नाही' असा भाव झाला आहे म्हणून ते मुक्त झाले.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणाने काय होते? त्याचा काय इफेक्ट (परिणाम) होतो? तुम्हीच म्हणता की प्रतिक्रमणाने परमाणू शुद्ध होत नाहीत. मग प्रतिक्रमणाने काय होते?

**दादाश्री :** परमाणू शुद्ध केव्हा होतील की जेव्हा 'आपण' त्यांना 'पाहू'. प्रतिक्रमणाचा इफेक्ट काय होतो की अतिक्रमणामुळे समोरच्याला जे दुःख झाले आहे, त्याचा परिणाम त्याच्यावर राहतो, तो प्रतिक्रमणाने धुतला जातो. शक्यतोवर आपल्या निमित्ताने त्याच्यावर परिणाम होऊ देऊ नये.

**प्रश्नकर्ता :** प्रतिक्रमणाने शुद्ध होते, असे आपण म्हणू शकतो?

**दादाश्री :** सर्वसामान्यपणे आपण असे म्हणू शकतो.

## अक्रम मार्गात प्रतिक्रमण जबाबदारीपूर्वक

**प्रश्नकर्ता :** एक जन्मभर पाहतच राहावे म्हणजे प्रतिक्रमण करत करत पाहत राहावे, असेच ना?

**दादाश्री :** निरंतर ध्यानात हे राहिले पाहिजे की 'मी काहीच करत नाही.' जर निरंतर असे ध्यानात राहिले तर प्रतिक्रमण नाही केले तरी चालेल. आम्हाला असे निरंतर राहते. आम्हाला जे राहते तेच आम्ही तुम्हाला सांगत आहोत. 'ज्ञाना'नंतर आमच्या ध्यानात हे निरंतर असते.

बाकी, ह्या ज्ञानात तर प्रतिक्रमण करण्याची गरजच राहत नाही. असे हे अंतिम प्रकारचे ज्ञान आहे की ज्यात प्रतिक्रमण करण्याची गरजच नाही. पण इथे तर तिसऱ्या इयत्तेतील लोकांना एकदम ग्रॅज्युएट बनवून टाकतो. पण मग त्या मधल्या स्टँडर्डचे काय? म्हणून मध्ये आमच्या जबाबदारीवर एवढे (प्रतिक्रमण) ठेवले. नाही तर या ज्ञानात असे नसतेच, पण तरीही हे आमच्या जबाबदारीवर ठेवले आहे.

शुद्धात्म्याखेरीज बाकी सर्व कचराच आहे. त्यातील एक क्रमण आणि दुसरे अतिक्रमण. शुद्धात्म्याच्या बाहेर जे जे आहेत ते सर्व दोष आहेत आणि त्यासाठी प्रतिक्रमणे करावी लागतील.

## अक्रम विज्ञानाची बलिहारी तर पाहा

**प्रश्नकर्ता :** दादा आपल्या श्रीमुखातून हा खुलासा ऐकून खूप संतोष झाला.

**दादाश्री :** अर्थात यात तुम्ही मुक्तच आहात.

बोला आता, प्रतिक्रमण पण सोबतच होत राहतात, तेव्हा कोण नावे ठेवील?

**प्रश्नकर्ता :** आमची या शरीराने रात्रं-दिवस क्षणोक्षणी प्रतिक्रमणे होतच राहतात. त्यामुळे प्रतिक्रमणाची सुरुवात होण्याआधीच अतिक्रमण अदृश्य होऊन जाते.

**दादाश्री :** हे विज्ञान आहे. म्हणजेच हे विज्ञान त्वरीत काम करणारे आहे. हे अक्रम विज्ञान म्हणजे पूर्ण सिद्धांतच आहे आणि सिद्धांतच फळ देईल. जसे कांद्याची एक स्लाइस कापली तरी ती कांद्याचे

सर्व गुण दाखविते, त्याचप्रमाणे ह्यातील एक 'स्लाइस' जरी कापलीत तरी ती पूर्ण सिद्धांताचेच फळ देईल. आणि अज्ञानाची एक 'स्लाइस' कापलीत तर ती अज्ञानाचे फळ देईल. फक्त एकच 'स्लाइस' त्याचे सर्व गुण दाखविते की नाही?

हे 'अक्रम विज्ञान' आहे. विज्ञान म्हणजेच त्वरित फळ देणारे आहे. जिथे कर्तापण नसते त्याला 'विज्ञान' म्हणतात आणि जिथे कर्तापण असते त्याला 'ज्ञान' म्हणतात.

विचारशील व्यक्ती असेल तर त्याला वाटेल की अरे, आपण तर काहीच केले नाही, आणि हे आहे तरी काय? ही अक्रम विज्ञानाची बलिहारी आहे! 'अक्रम', क्रम-बिम काही नाही.



# [ खंड : 2 ]

## सामायिकची परिभाषा

### सामायिक म्हणजे काय?

**प्रश्नकर्ता :** सामायिक म्हणजे काय?

**दादाश्री :** दोन प्रकारची सामायिक. एक, व्यवहारात प्रचलित असलेली सामायिक, की ज्यात मनाला एका वर्तुळातून बाहेर जाऊ दिले जात नाही. मनाला एक बाउंड्रीत (सीमेत) ठेवले जाते. बाहेर जे काही चालत आहे, त्यात मन स्थिर राहिले तर तिला (व्यवहार) सामायिक म्हटले जाते.

आणि दुसऱ्या प्रकारची सामायिक, ती आहे महावीर भगवंतांनी सांगितलेली यथार्थ सामायिक, जी आपण सर्व 'अक्रम'मध्ये करतो ती! (एक गुंठाणा, म्हणजे अठ्ठेचाळीस मिनिटे 'स्वत:' आत्म्यात राहून 'फाइल नं 1'ला पाहणे, ती).

**प्रश्नकर्ता :** आपल्या अक्रमची सामायिक समजावून सांगा ना, दादा!

**दादाश्री :** आपली सामायिक म्हणजे आत्मरूपात राहणे. आतमध्ये चंदुभाईच्या (फाइल नं 1 च्या) तंत्रात काय चालू आहे ते पाहणे. चंदुभाईला हा विचार आला, तो विचार आला, अमका विचार आला, त्या सर्व विचारांना पाहणे, 'आपण' पाहाणारे. विचार ही दृश्ये आहेत.

'आपण' द्रष्टा आहोत आणि समजतील असे जे विचार असतील ते ज्ञेय आहेत आणि 'आपण' ज्ञाता.

मग चंदुभाईची बुद्धी काय करत आहे, चित्त काय करत आहे, पाय दुखत आहे, तिथे चंदुभाईचे लक्ष आहे की नाही, हे सर्व 'आपण' जाणायचे. पोटात भूक लागली असेल तेही जाणायचे, आणि कोणा दुसऱ्याचा विचार आला तर त्याला शुद्ध पाहायचे, ही आपली सामायिक! शुद्ध राहणे, शुद्ध पाहणे, रात्रभर कटकट केली असेल तरी नंतर जेव्हा सामायिकसाठी बसाल तेव्हा शुद्ध पाहायचे आणि चंदुभाईंना म्हणायचे, 'चंदुभाई, माफी मागा!'

**प्रश्नकर्ता :** दादा, अशी सामायिक यथार्थपणे कशी केली जाते?

**दादाश्री :** इथे हे सर्वजण अशीच 'सामायिक' करतात. मग 'सामायिक'मध्ये त्या विषयाला धरून ध्यान केले जाते, तेव्हा तो विषय विलय होऊ लागतो, संपत जातो. तुम्हाला ज्या ज्या गोष्टींचा विलय करावा असे वाटते, त्याचा या सामायिकमध्ये तुम्ही विलय करू शकता. तुम्हाला जर जिभेचा स्वाद (खाण्याची आवड) बाधक वाटत असेल तर तोच विषय सामायिकमध्ये घ्यावा. आणि त्यात जसे दिसत असेल, त्याप्रमाणे त्याला पाहत राहावे. फक्त पाहण्यामुळेच सर्व गाठी विरघळतील. जी गाठ खूप मोठी असेल, जी गाठ खूप त्रास देत असेल, ती सामायिकमुळे विरघळून जाते. आम्ही इथे करवून घेतो, अशा सामायिक कराव्यात.

## सामायिक-प्रतिक्रमणाची व्याख्या

**प्रश्नकर्ता :** आपले प्रतिक्रमण आणि सामायिक यात काय संबंध आहे?

**दादाश्री :** जे अतिक्रमण झालेले असते त्यासाठी आपण प्रतिक्रमण करतो. तुमचा (सामान्य) व्यवहार हा क्रमण आहे आणि जरूरीपेक्षा जास्त बोलले गेले तर ते अतिक्रमण आहे. म्हणून तुम्ही चंदुभाईला सांगावे की 'अतिक्रमण का केलेस? म्हणून आता प्रतिक्रमण कर.' अतिक्रमण झाले तर प्रतिक्रमण करावे.

सामायिक म्हणजे, 'मी शुद्धात्मा आहे' याचे भान (जागृती) ते सामायिक आहे. पाच आज्ञेत निरंतर सामायिक असते. समभावाने निकाल करणे ही पहिली सामायिक आणि सहज दशेत, स्वाभाविक राहणे ही आमच्यासारखी सामायिक. तशी तुम्हालाही थोडीफार राहत असते.

जेव्हा तुम्ही अशी सामायिक करता, तेव्हा तुमची प्रकृती एकदम सहज म्हटली जाते. सामायिक करत करत वर्तमानकाळात राहणे जमू लागेल. आपोआप जमणार नाही. जेव्हा तासभर सामायिकमध्ये बसता, तेव्हा वर्तमान काळातच राहता ना!

## सामायिक, क्रमिक आणि अक्रम मार्गातील

जगातील लोक जी सामायिक करतात ती सामायिक वेगळी आहे आणि आपण इथे जी सामायिक करतो ती वेगळ्या प्रकारची सामायिक आहे. ही सामायिक अत्यंत विलक्षण, सर्वोत्तम प्रकारची आहे. अशी सामायिक तर कुठे होतच नाही ना? इतर सर्वजण जी सामायिक करतात ती कशी असते? त्या सामायिकमध्ये ते एक बाउंड्री (सीमा) निश्चित करून बसतात, त्यानंतर मनात जे जे विचार येत राहतात, त्यांना हकलत राहतात. जर दुकानाचा विचार आला तर त्याला हकलतात. दुसरा कुठला विचार आला तर त्याला हकलतात, म्हणजे सारखे असे हकलवत राहतात, असे करत करत एक गुंठाणा (48 मिनिटे, गुणस्थानक) पूर्ण होतो, त्याला ते सामायिक म्हणतात.

याउलट आपली सामायिक वेगळ्याच प्रकारची आहे. ही सामायिक कशासाठी आहे? बाहेरच्या गाठी विरघळून टाकण्यासाठी आहे, आणि जेव्हा आपण 'स्वत:' आत्मा बनतो तेव्हाच अशी सामायिक शक्य होते. आपण काय म्हणतो, 'मन-वचन-काया यांच्या सवयी आणि त्यांचा स्वभाव मी जाणतो आणि माझ्या स्व-स्वभावालाही मी जाणतो.' तर या सामायिकमध्ये मन-वचन-काया यांच्या स्वभावाला तुम्ही विरघळून टाका. जर कोणी असे विचारील की तो कसा विरघळेल? तर 'मी म्हणेन त्यांना पाहून.' मन-वचन-काया यांचा स्वभाव इतका गाढ आहे, खूप गाढ आहे. तुम्हाला कळते ना की तो किती गाढ आहे?

**प्रश्नकर्ता :** हो, कळते.

**दादाश्री :** त्या स्वभावाला सामायिकमध्ये घ्यावा. तर तेवढा त्याचा स्वभाव विरघळून संपेल. नंतर दुसरा स्वभाव घ्यावा. म्हणजेच ही सामायिक गाठी विरघळविण्यासाठी आहे. आपला तर अक्रम मार्ग आहे. म्हणजेच स्वभावाला विरघळून टाकण्यासाठी आपल्याला ही सामायिक करायची आहे. नाही तर, हे ज्ञानच खरे असे आहे की आपल्याला संपूर्ण दिवस सामायिकच चालू असते.

सामायिक कशाला म्हणतात, तर कषायांचा अभाव, कषायांच्या अभावाला यथार्थ सामायिक म्हटले जाते. पण कषायांचा अभाव तर लोकांना नसतोच ना? कसा असेल?

आपल्या सर्वांना तर सतत पूर्ण दिवस सामायिकच राहते, तरी पण ही सामायिक का करावी लागते? कारण हा सर्व भरलेला माल रिकामा करायचा आहे. पुष्कळ माल आहे. इतका सारा मसाला भरून आणला आहे, वेगवेगळ्या मार्केटमधून भरून आणलेला आहे. अरे, आपल्या देशी मार्केटमधून घ्या ना? तर म्हणतो, 'नाही, हा तर बटाट्यासारखा वाटतो.' असे करत करत हा सर्व तऱ्हेतऱ्हेचा माल भरून आणला आहे. कोणाला सांगताना सुद्धा लाज वाटेल.

## लौकिक सामायिक

(लौकिक) सामायिकमध्ये तर मन स्थिर करायचे असते. ज्या प्रकारे गाईला (एका खुंटीला बांधून) एका वर्तुळाबाहेर जाऊ देत नाहीत त्याप्रमाणे. जर बाहेर जाऊ लागले तर त्याला हाकलत राहतात. सासूचा विचार आला तर त्याला हाकलून काढतात. वर्तुळाबाहेर हाकलून काढतात, आत घेत नाहीत. जे जे विचार येतात, त्यांना अशा प्रकारे हाकलत राहतात. तरी पण मन इतके सैल झालेले आहे की ते बाहेर जातेच. सैल म्हणजे बाटली आडवी झाली की तिचे बूच कुठे तरी उडून जाते. या प्रकारे मनाला परत परत आत ढकलून, त्याच्या बाउंड्रीत (सीमेत) आणत राहतात. याला सामायिक म्हणतात. सध्या व्यवहारात जी सामायिक चालते तिला (लौकिक) सामायिक म्हणतात.

तितका वेळपर्यंत कोणी ढवळाढवळ करत नाहीत, शांतपणे बसतात. वाळूचे घड्याळ जवळ ठेवतात. वरची वाळू खाली पडते. जेव्हा सर्व वाळू खालच्या बाजूला पडते तेव्हा ते घड्याळ परत उलट करतात. त्या वाळूच्या घड्याळातील वाळू वरून खाली पडण्यास 48 मिनिटे लागतात. जेव्हा सर्व वाळू खाली पडते तेव्हा म्हणतात, 'माझी सामायिक पूर्ण झाली!' म्हणजे वाळूचे घड्याळ जवळ ठेवून काय करतात? आदल्या दिवशी असा निश्चय केलेला असतो की सकाळच्या सामायिकमध्ये दुकानाची आठवण काढायचीच नाही. पण डोळे बंद केल्यावर पहिली आठवण दुकानाचीच येते. ज्याची आठवण काढायची नसते त्याचीच सर्वात प्रथम आठवण येते. त्यामुळे तो त्रासून जातो. मग दुसऱ्या दिवशी मला सांगतो, 'काल असे झाले? तेव्हा मी त्याला म्हणतो, 'दुकानाची आठवण काढायची नाही. अशी आठवण कशाला ठेवतोस?' तू ॲक्शन केलीस मग रिॲक्शन येणारच. ॲक्शन केलीसच का? पण मग तो सामायिकमध्ये करणार तरी काय? शुद्धात्मा तर झालेला नाही, म्हणून जे विचार येतात, त्यांना बाजूला सारत बसतो. वर्तुळाबाहेरचे विचार आले तर त्यांना म्हणतो, 'इथे नाही' (चालते व्हा). असे करत करत वेळ पुरी होते. 48 मिनिटे तो वाळूच्या घड्याळाकडेच बघत बसतो आणि म्हणतो, 'अजून थोडा वेळ बाकी आहे.' भगवंतानी मनाई केली आहे तरी पण तो सारखा घड्याळाकडे पाहत राहतो.

ठीक आहे. तरी पण लोक म्हणतात, 'बाबा, हा सारा दिवस इकडे-तिकडे धावपळ करत बसला होता. त्याऐवजी थोडा वेळ का होईना, पण एका जागी स्थिर बसला तरी! नाही तर जसे कोळी (बाहेर) मासे मारत असतात तसेच हा आतल्या आत मासे मारत असतो. याला सामायिक म्हणताच येणार नाही ना! ती तर एक प्रकारची स्थिरता आहे. तरी पण स्थूल भाषेत ती सामायिक चुकीची नाही. तेवढे तरी स्थैर्य राहते ना! त्याला आपण चूक तर म्हणू शकत नाही ना?

जर एखादी व्यक्ती दुकानात तीन तास पण स्थिर बसू शकत नसेल तर ती व्यक्ती व्यापार करू शकत नाही. दुकानदार दुकानात किती तास स्थिर बसू शकतो यावर व्यापार अवलंबून असतो. तीन तास (तरी)

एका जागेवर स्थिर बसता आले पाहिजे. किती तरी लोक भोवऱ्यासारखे असतात. ते पाच मिनिट बसतात, परत उठतात, परत बसतात... असे चालू असते.

## स्वाध्याय सामायिक

**मुमुक्षु :** ही जी दोन घडीची (अठ्ठेचाळीस मिनीटांची)सामायिक करतात, त्यात कुठल्या कुठल्या क्रिया होऊ शकतात?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की, ही जी सामायिक आहे ती मनाची सामायिक आहे. दुकानाचे विचार आले किंवा स्वयंपाक घराचे विचार आले तर त्यांना सारखे हटवत राहणे.

**मुमुक्षु :** असे काही विचार येत नाहीत.

**दादाश्री :** मग कसले येतात?

**मुमुक्षु :** काही पण होत राहते, पण विचार येत नाहीत. मी तर पुस्तके वाचत बसतो.

**दादाश्री :** पुस्तके वाचून सामायिक होतेच. सामायिक म्हणजे काय? तर पाऊण तास तुमचे ध्यान कुठेतरी दुसरीकडे होते ते या पुस्तकात राहिले, स्वाध्यायात राहिले, याला स्वाध्याय सामायिक असे म्हणतात. उपयोग अन्य ठिकाणी राहिला असे म्हटले जाईल. नाही तर यथार्थ सामायिक तर केवळ एकवेळ जरी केली तरी अपार आनंद होतो. सर्व पापे भस्मीभूत होऊन जातात.

**मुमुक्षु :** तर मग काय यात निर्जरा होत नाही का? (निर्जरा = आत्मप्रदेशातून कर्मे वेगळी होणे)

**दादाश्री :** निर्जरा होते, पण थोड्याफार प्रमाणातच. जास्त निर्जरा तर होऊच शकत नाही ना! पुस्तके वाचून तर सर्वच जण सामायिक करतात. पुस्तक वाचणे चांगले वाटते. तो दरोडेखोरांच्या कथा वाचत नाही पण शास्त्रांची पुस्तके वाचतो. शास्त्रात पण त्याला इंटरेस्ट (गोडी) वाटतो ना? त्यामुळे खूप आनंद मिळतो. पण त्यापासून काहीही निष्पन्न होत

नाही. जर आत्म्याची यथार्थ सामायिक कराल, तरच लाभ मिळेल. एक वेळ 'आत्मा' होऊन 'आत्मा' म्हणाल तर कल्याण होईल. 'आत्मा' होऊन बोलावे. मी 'आत्मा' झालो आहे, असे तुम्हाला वाटल्यानंतर बोलायचे आहे. एका मिनिटासाठी जरी 'आत्मा' झालात तरी पण खूप झाले.

म्हणजे तुम्ही ही जी सामायिक करता ना, त्यात जरी तुम्ही धार्मिक पुस्तक घेऊन बसलात तरी चालेल, पण ती सर्व मानसिक सामायिकच म्हटली जाईल. मानसिक म्हणजेच त्यात आत्म्याचे काहीच देणेघेणे नाही. त्याने मन स्थिर होते, मन मजबूत होते किंवा जोपर्यंत शास्त्र वाचत असतो तोपर्यंत दुसरे विचार येत नाहीत.

## स्व-समजपूर्वक सामायिक

**मुमुक्षु :** रोज सामायिक करून काय फायदा होतो?

**दादाश्री :** हो, पण सामायिक स्वत:च्या समजेनुसारच ना? भगवंतांनी सांगितलेले सामायिक नाही ना? स्वत:च्या समजेनुसारच सामायिक ना?

**मुमुक्षु :** आम्ही तर भगवंतानी सांगितल्याप्रमाणेच करतो.

**दादाश्री :** ते वाळूचे घड्याळ बघत राहता, सगळी वाळू खाली पडली की नाही?

**मुमुक्षु :** ते तर पाहणारच ना, वेळ पूर्ण झाला की नाही?

**दादाश्री :** तसे पाहता कामा नये. जेव्हा तुम्ही त्या घड्याळाकडे पाहाल, आणि तुम्हाला आढळेल की वाळूचे घड्याळ पूर्ण झाले आहे तेव्हा समजावे की सामायिक झाली. सामायिक मनोबळ वाढविण्यासाठी आहे. रोज सामायिक केल्यामुळे मन बलवान होते आणि स्वत:वर श्रद्धा बसते.

**मुमुक्षु :** त्यामुळे पुण्य वाढते ना?

**दादाश्री :** हो, पुण्य तर वाढणारच. अठ्ठेचाळीस मिनिटे जर तुम्ही मनाला स्वत:च्या वर्तुळातच ठेवलेत तर पुण्य तर वाढणारच.

**मुमुक्षु :** पण मन वर्तुळात राहत नाही, ते तर कुठेतरी बाहेर फिरत राहते.

**दादाश्री :** मग त्याला पूर्ण सामायिक म्हणता येणार नाही. मन जितका वेळ त्यात राहील, तितकाच वेळ सामायिक. ही व्यवहार सामायिक आहे, आणि यथार्थ सामायिक तर हिंडता-फिरता पण चालू असते.

## अशी सामायिक व्यर्थ

**मुमुक्षु :** आम्ही सामायिक करतो, प्रतिक्रमण करतो सर्व (धार्मिक) क्रिया करतो, पण त्यात आमचे लक्ष नसते.

**दादाश्री :** तर मग त्याचा काय उपयोग? जर त्याच्यात लक्ष नसेल तर ते काय कामाचे? लक्ष राहिले तरच कामाचे, लक्ष राहिले नाही तर बिनकामाचे. तुमचे लक्ष कुठे असते?

**मुमुक्षु :** (लक्ष) संसारात जाते.

**दादाश्री :** पण संसारात काय आवडते? आता जर मन इथून उठले तर दुसरीकडे कुठे तरी बसणारच ना? तुमचे मन कुठे बसते?

**मुमुक्षु :** कामात लक्ष जाते. घरात जर काही काम असेल तर त्यात लक्ष जाते.

**दादाश्री :** मग तुम्ही ते काम केले पाहिजे. जिथे लक्ष जाते, ते काम केले पाहिजे. जिथे लक्ष नसेल त्याचा काय उपयोग? सर्व कष्ट वाया जातील आणि फायदा काहीही होणार नाही.

## चांगल्या तऱ्हेने संसार चालविते, तीच सामायिक

**मुमुक्षु :** आम्ही तर निश्चय केला आहे की रोज क्रिया करायचीच आहे, तर मग त्याचे काय होणार?

**दादाश्री :** वाया जाईल. ती सारी मेहनत वाया जाईल. कमी मेहनत करा पण अशी करा की तिचा उपयोग होईल. आणि संसारात पण तुम्ही चांगल्या प्रकारे राहू शकाल!

त्यात सामायिक करा. संसारात पण सामायिकच आहे. मुलांना चांगल्या प्रकारे वाढवायचे, त्यांना ओरडू नये, त्यांच्याशी भांडू नये, त्यांच्यावर रागवू नये, हे सर्व सामायिकच आहे ना! मग तुम्ही करता ती सामायिक करण्यात काय अर्थ? तुम्ही तुमच्या मुलांची सामायिक करा, पतीची सामायिक करा, सासूची सामायिक करा, थोरल्या जाऊबाईंची सामायिक करा, अशी सर्व सामायिक करा ना! नाही तर ती सामायिक करून काय मिळणार? जर मन लागले तर सामायिक करण्याचा उपयोग आहे. मन लागत नाही आणि तसेच सामायिक केले तर त्याचा काय उपयोग?

**मुमुक्षु :** पण ही तर रोजची क्रिया आहे. मग ती रोज करत राहायलाच हवी ना?

**दादाश्री :** हो, पण त्या क्रियेत जर मनच लागत नसेल, तर मग ती क्रिया करण्याची गरजच काय? चित्त जागेवर राहिले पाहिजे ना?

**मुमुक्षु :** चित्त जागेवर राहत नाही.

**दादाश्री :** मग काय कराल?

**मुमुक्षु :** तेच तर तुमच्याकडे मागायला आलो आहोत.

**दादाश्री :** हो, म्हणजेच हे आवडत नाही. हे आवडत नाही, आणि मुलेबाळे वगैरे सर्व आवडतात. जे आवडते, तिकडेच चित्त जाते. मुलांची किंमत काढून टाका, कमी करा, आणि याची किंमत वाढवा, तर काही होईल. नाही तर कसे काय होईल?

जर सामायिक करायचीच असेल तर पश्चात्ताप करण्याचीच सामायिक करा ना! कोणकोणत्या गोष्टींचा पश्चात्ताप करायचा आहे? ज्या ज्या लोकांकडून चुकीच्या मार्गाने पैसे घेतले आहेत त्यांचा पश्चात्ताप करा, जिथे जिथे दृष्टी बिघडविली असेल अशा गोष्टींचा पश्चात्ताप करा.

**मुमुक्षु :** मग सामायिकमध्ये नवकार मंत्राची माळ जपायची नाही का?

**दादाश्री :** अरे, नवकारची माळ जपल्यामुळेच तर ही दशा झाली आहे. एकही नवकार यथार्थ प्रकारे म्हटला नाही. तो कोणाकडून दिला गेला आहे हे पाहायला नको का?

## ती सर्व स्थूल सामायिक आहेत

जिथे आर्तध्यान, रौद्रध्यान आहे, तिथे जैन धर्मच नाही.

**मुमुक्षु :** जर आम्ही सामायिक करत असू, तरी पण त्याला जैन धर्म म्हटले जाणार नाही का?

**दादाश्री :** तुम्ही सामायिक कशाला म्हणता? सामायिकला सामायिक म्हणता की असामायिकला सामायिक म्हणता?

**मुमुक्षु :** सामायिक आणि असामायिक कशाला म्हणता? त्याचे जरा स्पष्टीकरण करा ना!

**दादाश्री :** हे सर्व लोक कोणती सामायिक करतात? हे साधू, आचार्य सर्व स्थूल सामायिक करतात. स्थूल सामायिक म्हणजे ते मनाला व्यग्रतेमधून एकाग्रतेमध्ये आणतात.

काही जण पुस्तक घेऊन बसतात. ते पुस्तकेच वाचत राहतात. काही जण इतर काही विचारात, काही जण मंत्रात, किंवा दुसऱ्या एखाद्या गोष्टीत घुसतात, म्हणजे ते सामायिकमध्ये राहतात. परंतु तरी पण ते सरळ राहत नाहीत, मग भगवंत यांचे सामायिक कसे जमा करून घेतील? जो काही वेळेसाठी, अठ्ठेचाळीस मिनिटांसाठी सुद्धा सरळ राहू शकत नाही, त्याचे काय होईल?

अरे, अशी स्थूल सामयिक तर सामान्य मजुरांना पण राहत असते. पण या सतत व्यग्र असलेल्या शेठजींना राहत नाही. स्थूल सामायिक मजुरांना राहते पण ती त्यांना कामी येत नाही, व्यर्थ जाते. आणि हे तर व्यग्रतावाल्यांना एकाग्रता होते, ती कामी येते!

## जैन धर्माचे सार 'हेच' आहे

आर्तध्यान आणि रौद्रध्यान बंद होणे हेच जैन धर्माचे सार आहे.

**मुमुक्षु :** ते तर आम्ही प्रतिक्रमण करताना म्हणतो, आर्तध्यान-रौद्रध्यान जावो, आणि धर्मध्यान-शुक्लध्यान होवो! त्यानंतर त्यासाठी 'मिच्छामि दुक्कडम्' करतो, माफी मागतो.

**दादाश्री :** हो, पण त्यातून काहीच निष्पन्न होत नाही ना! असे नुसते बोलून थोडेच होते? आर्तध्यानाचे फळ जनावर गती आणि रौद्रध्यानाचे फळ नरकगती. मग यातून काय होणार? जैन कुळात जन्म घेऊन सुद्धा जनावर गती होते. जळो हा जन्म!

## इतर धर्मातील क्रिया

**मुमुक्षु :** जशा जैनात आहेत, तशाच इतर धर्मात पण अशा काही पद्धती असतात का?

**दादाश्री :** सगळ्याच धर्मात अशा गोष्टी असतात, तिथे स्थिरता आणण्याचा गुण आहे ना! इतर धर्मात भक्ती करतात, जैन धर्मात सामायिक करतात, पण ते थोड्या वेळासाठी मनाला स्थिर करतात.

## मनाला थांबवणे म्हणजे सामायिक

तुम्ही कोणत्या सामायिकबद्दल बोलत आहात?

**मुमुक्षु :** आम्ही एका तासासाठी सामायिक करतो तर त्या क्रियेत आम्ही काय काय करावे?

**दादाश्री :** फक्त एवढेच करावे की मनाला स्थिर करण्यासाठी बाहेरच्या सर्व विचारांना हाकलत राहावे. व्यवहारात अशी लौकिक सामायिकच चालत असते.

**मुमुक्षु :** उपाश्रयात साधू-मुनी करतात ती?

**दादाश्री :** ती सर्व मानसिक आहे, लौकिक आहे. ते सर्व मन स्थिर करण्यासाठी आहे. कारण मन स्थिर राहत नाही ना! तासभर जरी मन स्थिर करता आले, तरी खूप चांगले म्हणायचे.त्यामुळे मनाची शक्ती वाढते आणि तेवढा अवकाश मिळतो. पुढच्या जन्मासाठी अवकाश

मिळाला म्हणजे तेवढी कर्मे बंद होतात. मनाला थांबवले, मनाला स्थिर केले, याचे पुण्य मिळते.

**मुमुक्षु :** एखादाच कोणी असा असू शकेल की ज्याचे मन त्या वर्तुळात राहते. लोक उपाश्रयात जातात तेव्हा तिथे व्याख्यान चालू असते. लोक सामायिकसाठी बसतात, पण त्यांची मने तर बाहेरच असतात, आतमध्ये नसतातच.

**दादाश्री :** मन व्याख्यानात नसते पण चित्त व्याख्यानात असते, आणि तेसुद्धा जर व्याख्यान आवडत असेल तरच. 'बापजींचे' व्याख्यान जर आपल्याला आवडले तर चित्त काही वेळ तिथे स्थिर राहते, बाहेर भटकणे थांबते. पण दुसरीकडे मन तर विचार करतच राहते. जेव्हा मन ताब्यात येईल, तेव्हाच काही तरी निष्पन्न होईल. तेव्हा चांगल्या प्रकारे सामायिक होऊ शकेल.

**मुमुक्षु :** कोणी जर नवकार मंत्राच्या शंभर माळा जपण्यास सांगितले असेल, तर शंभर कधी पूर्ण होतील याकडेच सगळे लक्ष असते.

**दादाश्री :** हो, तिथे तर घाईच असते. सामायिकमध्ये सुद्धा त्याचे लक्ष वाळूच्या घड्याळ्याकडेच असते! ज्याला 'पौषध' असे म्हणतात, त्यातसुद्धा उपाश्रयात जाऊन काय करतात? दुसऱ्या जातीचे लोक म्हणतात, आपण जेव्हा बैलांना पाणी पाजायला घेऊन जातो तेव्हा 'पोषो, पोषो' असे म्हणतो ना, त्याच प्रकारे हे लोक पाणी पाजून आलेत. 'पौषध' व्रत म्हणजे आत्म्याला पोषण देणे. घर सोडून उपाश्रयात जाऊन साधूप्रमाणे जीवन जगणे. त्यावेळी आत्म्याला पोषण देतात, सर्व बाह्य व्यवहार एका बाजूला ठेवून द्यावा लागतो.

## आरंभ, समरंभ आणि समारंभ

लोक आरंभ असा शब्द तर बोलतात पण ते आरंभ म्हणजे काय समजतात? समारंभ असेही म्हणतात, पण समारंभ म्हणजे काय? ते त्यांना समजत नाही. मोठमोठ्या पंडितांना पण समजत नाही. कुठल्या डिग्रीपर्यंत समारंभ म्हणावे, आणि कुठल्या डिग्रीनंतर आरंभ म्हणावे,

त्या डिग्री त्यांना माहीतच नाहीत. ते फक्त शब्द बोलतात एवढेच. शब्द शास्त्रांतीलच आहेत.

**प्रश्नकर्ता :** समरंभाने पण कर्मबंधन होते का?

**दादाश्री :** समरंभ म्हणजेच कर्म. ते पहिले कर्म आहे, त्याला मानसिक कर्म म्हणतात. समरंभ म्हणजे मन आणि वचन या दोघांचे कर्म. आणि मन-वचन-काया या तिघांच्या एकत्रित कर्माला आरंभ म्हणतात. हे ज्ञान घेतल्यानंतर जरी तुम्ही कोणाला शिवी देऊन आलात, असा आरंभ करून आलात तरी ते तुम्हाला चिकटणार नाही, असे आहे हे विज्ञान. फक्त या शिवी देण्यामुळे समोरच्याला जे दु:ख झाले त्यासाठी तुम्हाला चंदुभाईला एवढे सांगावे लागेल, 'हे अतिक्रमण का केलेत? आता प्रतिक्रमण करा.' तुम्हाला एवढेच करावयाचे आहे. तुमच्या मनात दु:ख देण्याचा भाव आता उरलेलाच नाही. कोणाला दु:ख देऊन आपण मोक्ष मिळवू शकत नाही. आपल्याजवळ जरी कोणतेही विज्ञान का असेना, तरीही.

**मुमुक्षु :** समरंभाने जे कर्मबंधन होते, ते कमी होते आणि जेव्हा तिन्ही एकत्र होतात तेव्हा जास्त होते का?

**दादाश्री :** समरंभालाच कमी म्हटले जाणार ना. समरंभ म्हणजे फक्त मनाने. आणि जेव्हा एकत्र होते तेव्हा खूप मोठे कर्म म्हटले जाते. म्हणूनच भगवंतांनी त्याला आरंभ म्हटले आहे.

**प्रश्नकर्ता :** मनाने कर्म करून मग तिथेच जर थांबला तर त्याला जास्त बंधन होणार नाही ना?

**दादाश्री :** जास्त बंधन होणार नाही. तो फक्त विचार करील आणि सुटून जाईल. फक्त विचार केल्यावर सुटतो.

**प्रश्नकर्ता :** शास्त्रांत त्या आरंभ-परिग्रहाची सीमा आखायला सांगितले आहे. जर ती आखली गेली तर काय फरक पडेल आणि आखली नाही तर काय फरक पडेल?

**दादाश्री :** जर सीमा आखली तर कर्मे कमी होतील. या जन्मात

जर सीमा आखली तर पुढच्या जन्मात कर्मे कमी होतील. असे करत करत, सीमा आखत आखत, कमी करत करत तो पुढे प्रगती करत राहतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे त्या सामायिक सारखे?

**दादाश्री :** सामायिक म्हणजेच आरंभ रहित. एक तासभर आरंभ परिग्रह रहित होणे म्हणजेच सामायिक.

## अशी सामायिक कोण करतो?

**मुमुक्षु :** जर सामायिक करत असेल आणि तेवढ्यात भूकंप झाला, तरी पण सामायिक सोडता कामा नये ना?

**दादाश्री :** अशी सामायिक कोण करतो? अशी सामायिक तर कोणी करतच नाही ना?

म्हणजे ही जी सामायिक आहे, ती देहाला स्थिर करण्याचा एक साधा प्रयोग आहे. देह स्थिर राहिला तर संसारासाठी ते हितकर होईल. लक्ष्मी वगैरे जास्त मिळेल. ज्याचे शरीर क्षणभरदेखील स्थिर राहत नाही, त्याच्याजवळ लक्ष्मी कशी येईल? म्हणून ती सामायिक यथार्थ सामायिक नाही.

## यथार्थ पुरुषांची मोहोर नसलेली सामायिक

लोक आता ज्याला आत्मा मानून बसले आहेत तो तर 'मेकॅनिकल आत्मा' आहे. तो कधीच खरा-मूळ आत्मा नसतो आणि त्यालाच स्थिर करण्याचा प्रयत्न करतात. अहो, हा तर 'मेकॅनिकल आत्मा' आहे, तो कधीच स्थिर होणार नाही.

**मुमुक्षु :** हे समजले नाही.

**दादाश्री :** हा जो व्यवहार आत्मा आहे, तो मेकॅनिकल आत्मा आहे. त्याला स्थिर करण्याची गरज नाही. ते तर केवळ सराव करण्यासाठीच आहे की मन स्थिर राहू शकते की नाही, एवढेच फक्त पाहायचे आहे. मन स्थिर करण्यासाठी हे सामायिक करतात, जेणे करून थोडा वेळ का होईना, शरीर स्थिर राहील, मन स्थिर राहील, सरळ

राहील. सर्वसामान्यपणे स्थैर्य राखण्यासाठीच आहे. उदाहरणार्थ थकवा दूर करण्यासाठी माणूस थोडा वेळ बसतो, तर काय तो कायम तसाच बसून राहील?

**मुमुक्षु :** नाही.

**दादाश्री :** तर असे आहे हे सर्व.

ही सामायिक तर थकावटीसारखी आहे. बाकी, हे मशीन तर दिवस-रात्र चालूच असते आणि हा निरंतर सामायिकमध्येच असतो. एक क्षण पण सामायिकच्या बाहेर नसतो. या संसारात घर बसल्या, बायको-मुलांसह राहून निरंतर सामायिकमध्येच असतो.

आणि 'आत्मा'च सामायिक आहे. इतर सर्व सामायिक ही 'व्यवहार सामायिक' आहेत. सच्ची सामायिक प्राप्त करण्याच्या हेतूने ही 'व्यवहार सामायिक' करायची आहे. ही व्यावहारिक सामायिकसुद्धा सच्च्या पुरुषाद्वारे दिली गेलेली असावी.

**मुमुक्षु :** सच्चे पुरुष कोणाला म्हणावे? त्याची व्याख्या काय?

**दादाश्री :** सच्चा पुरुष म्हणजे उदाहरणार्थ या ठाणे जिल्ह्याच्या कलेक्टरने अशी ऑडर लिहून दिली की एवढी एवढी जमीन तुम्हाला देण्यात येत आहे. आता तो तर खरेच कलेक्टर आहे परंतु कोणी खरोखर कलेक्टर नसेल आणि त्याने जर लेखी ऑर्डर दिली असेल तर? त्याने कलेक्टर लिहून खाली शिक्का मारला असेल परंतु जर तो कलेक्टर नसेल तर? तर चालणार नाही, पुढे चालणार नाही. तसेच हे जे सारे कलेक्टर सामायिक लिहून देतात, ते सच्चे पुरुष नाहीत.

## सामायिकमध्ये कप फुटलेत की आत्मा?

मी टेबलवर चहा पीत होतो आणि पंचाहत्तर वर्षांचे शेठ सामायिक करत होते. दुसऱ्या खोलीत कप फुटले तर शेठला ऐकू आले. मी तर बहिरा (कानाने कमी ऐकू येणारा) मला ऐकू आले नाही. पण शेठ तर तीक्ष्ण कानाचे. जसा आवाज ऐकू आला की लगेच सामायिक करता

करताच शेठजींनी विचारले, 'काय फुटले?' मी म्हटले, 'तुमचा आत्मा फुटला.' यात दुसरे काय फुटणार होते? जर बायको पडली तर आवाज येईल? दुसरे काही फुटण्यासारखे नाही. कपच फुटले आहेत. त्याचा आवाज झाला आहे. सामायिक करता करताच शेठजी विचारतात, 'काय फुटले?' याला सामायिक कसे म्हणणार? त्या वेळी तर पती मरायला आला असेल, पत्नी मरायला आली असेल तरीही सामायिक सोडत नाही, तिलाच खरी सामायिक म्हणतात. याला सामायिक कसे म्हणणार? कप फुटले, त्यासाठी सुद्धा 'सामायिक'मध्ये शोक करणार? अजूनही होत असते का सर्व ठिकाणी?

**प्रश्नकर्ता :** हो, असेच होत असते.

**दादाश्री :** असे होय? आणि तुम्ही सामायिक सोडल्यामुळे ते कप परत जिवंत होत असतील, नाही का?

## स्थूल कर्म आणि सूक्ष्म कर्म

आचार्य महाराज प्रतिक्रमण करतात, सामायिक करतात, व्याख्यान देतात, प्रवचन करतात, पण तो तर त्यांचा आचार (आचरण) आहे, ते स्थूल कर्म आहे. पण आत काय आहे ते पाहायचे आहे. आत जे 'चार्ज' होत आहे ते 'तिथे' कामी लागेल. सध्या ते जे आचार पाळतात तो तर 'डिस्चार्ज' आहे. संपूर्ण बाह्याचार हा 'डिस्चार्ज' स्वरूप आहे. तिथे हे लोक म्हणतात की 'मी सामायिक केली, ध्यान केले, दान दिले' तर त्याचे यश तर तुम्हाला इथेच मिळेल. त्याचे पुढच्या जन्माशी काय देणेघेणे? भगवंत असे काही कच्चे नाहीत की ते तुझे हे घोटाळे खपवून घेतील?

बाहेर सामायिक करतो आणि आतमध्ये काही तरी दुसरेच करत असतो! एक शेठजी सामायिक करायला बसले होते, तेव्हा बाहेर कोणी तरी दरवाजा ठोठावला. शेठानीने दरवाजा उघडला. एक गृहस्थ आले होते. त्यांनी विचारले 'शेठ कुठे गेले आहेत?' तर शेठानींनी उत्तर दिले 'उकिरड्यावर'! शेठजींनी हे ऐकले आणि आतमध्ये पाहिले तर खरोखरच उकिरड्यावर गेले होते! त्यांच्या मनात वाईट विचारच चालू होते, आणि ते

बाहेर सामायिक करत बसले होते. भगवंत असले घोटाळे खपवून घेत नाहीत. आत सामायिक होत असेल आणि बाहेर सामायिक नसेल तरीही त्याचे 'तिथे' चालेल. पण हा बाहेरचा देखावा मात्र 'तिथे' चालू शकत नाही.

## आर्तध्यान-रौद्रध्यान बंद होतात, तीच सामायिक महावीरांची

भगवंतांनी सामायिक कशाला म्हटले आहे? ज्याला आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत नाहीत त्याला पूर्ण दिवस सामायिकच असते, असे महावीर भगवंत म्हणतात. किती समजदार आहेत ते! तुमच्यासाठी करायला काहीच ठेवले नाही. आणि या लोकांची एक पण सामायिक महावीर भगवंत 'एक्सेप्ट' (मान्य) करीत नाहीत, आर्तध्यान आणि रौद्रध्यान एक गुठांणापर्यंत (48 मिनिटे, 1 गुणस्थानक) तरी बंद व्हायला हवे ना?

'मी चंदुभाई आहे' असे मानून सामायिक करतात. समजा या कडुनिंबाच्या फांद्या कापल्या, तरी पण परत ज्या नवीन फांद्या येतात, त्या पण कडूच असतात ना? कापल्यावर जरी तिथे साखर टाकली तरी पण त्या फांद्या कडूच असणार ना?

**मुमुक्षु :** हो दादा, मुळातच असे आहे.

**दादाश्री :** मूळ स्वभावच असा आहे. तसेच हे 'चंदुभाई' राग-द्वेष बंद करून सामायिकला बसले, तर ते कसली सामायिक करणार? आत्मा काय ते माहीत नाही, मिथ्यात्व काय तेही माहीत नाही! ज्याला मिथ्यात्व म्हणजे काय ते समजेल त्याला समकित प्राप्त झाल्याशिवाय राहणारच नाही. म्हणून शेठजी सामायिक करायला बसतात, पण त्यांना दुसरे काही येत नाही, म्हणून ते काय करतात? स्वत: एक वर्तुळ तयार करतात आणि इतर काही विचार आले, दुकानाचे, लक्ष्मीचे, विषयाचे तर ते त्या विचारांना वर्तुळाबाहेर पळवून लावत राहतात. उदाहरणार्थ, एका विशिष्ट भागात (बाउंड्रीत) गायीचे वासरू घुसले, कुत्रे घुसले तर तो त्यांना हाकलतच राहतो आणि त्या आवारात घुसू देत नाही, यालाच ते सामायिक म्हणतात. तरी पण ते सामायिकच आहे, कारण त्यात आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत नाहीत.

**मुमुक्षु :** जर त्यात आर्तध्यान आणि रौद्रध्यान होत नाहीत तर मग त्याला समताच म्हणायचे ना?

**दादाश्री :** पण आर्तध्यान आणि रौद्रध्यान निघून जात नाहीत, ते तर राहतातच. त्यासाठी सामायिक करण्यापूर्वी एक नियम करावा लागतो की 'हे दादा भगवान! हा चंदुभाई, माझे नाव, माझे शरीर, माझे अंतःकरण, माझे मिथ्यात्व हे सर्व मी तुम्हाला अर्पण करीत आहे. आता मला ही सामायिक करतेवेळी वीतरागभाव द्या.' या प्रकारे विधीपूर्वक केले तर काम होईल.

## मोक्ष प्राप्ती, यथार्थ सामायिकद्वारे

**मुमुक्षु :** सामायिक, प्रतिक्रमण वगैरे सर्व धर्मध्यान केल्यामुळे मोक्षाचा मार्ग मिळेल का?

**दादाश्री :** मिळेल, पण आता जसे चालले आहे, तशा सामायिक आणि प्रतिक्रमणाने मिळणार नाही. हा तर खरा माल नाही. खरी सामायिक असेल, तर केवळ एक सामायिक केली तरी मोक्ष मिळेल. आता यात कोणाचा दोष नाही. काळाचा स्वभावच तसा आहे.

**मुमुक्षु :** आम्ही चुकीची सामायिक करत आहोत हे आम्हाला कसे कळेल? आम्ही तर खरी सामायिक करत आहोत, याच आशयाने करतो ना?

**दादाश्री :** आत्म्याची ओळख झाल्यानंतरच खरी सामायिक होते. तोपर्यंत खरी सामायिक होऊच शकत नाही. मात्र तोपर्यंत ती मन स्थिर करण्याचे एक साधन आहे. देहाला स्थिर करण्याचे साधन आहे. ती सर्व लौकिक सामायिकच आहे! याउलट (इथे) ही 'अलौकिक सामायिक', व्यवहार आत्म्याला स्थिर करण्यासाठी आहे. इथे आम्ही ज्ञान दिल्यानंतर 'व्यवहार आत्मा' स्थिर केला जाऊ शकतो ना! जाणल्याशिवाय कसे शक्य आहे? आपल्या इथे ज्ञान घेतल्यानंतर तो 'व्यवहार आत्म्याला' स्थिर करत राहतो. इथे खूप जागृती असते. याउलट तिथे (लौकिक सामायिकमध्ये) जागृती नसतेच.

## सामायिकचा कर्ता कोण?

एक व्यक्ती आहे ती रोज सामायिक करते. ती दुसऱ्या लोकांना काय म्हणते, 'मी रोज चार सामायिक करतो. आणि हा तर फक्त एकच सामायिक करतो.' या वरून हे लक्षात येते की या माणसाला सामायिक करण्याचा अहंकार आहे. म्हणून तो दुसऱ्यांचे दोष काढत आहे. 'तो एकच करतो आणि मी चार करतो.' नंतर दोन-चार दिवसानंतर जर आपण त्याच्याकडे गेलो आणि त्याला विचारले, 'अहो, आज सामायिक का करत नाहीत? का बरे?' तेव्हा तो म्हणेल, 'पाय जखडलेत.' तेव्हा जर आपण त्याला विचारले, अरे, सामायिक पाय करत होते की तुम्ही करत होता? जर पायच सामायिक करत होते तर तुम्ही जे (चार सामायिक करतो) म्हणत होता ते चुकीचे होते. म्हणजेच पाय नीट पाहिजेत, मन नीट पाहिजे, बुद्धी जाग्यावर पाहिजे, जेव्हा सगळे संयोग नीट असतील तेव्हा सामायिक होईल. आणि शिवाय अहंकार पण जाग्यावर हवा. अहंकार पण त्या वेळी जाग्यावर नसेल तरी काम होणार नाही. म्हणजेच हे सगळे एकत्र असतील तरच काम होईल. मग यात तुम्ही एकटेच सगळे का डोक्यावर घेत आहात? म्हणजेच हे सर्व परसत्तेने केले, त्यात तुमचे काय? असे डोक्यावर घेतात की नाही? पण हा तर फक्त अहंकारच करत राहतो. प्रत्यक्षात हे सर्व 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सिस'मुळे घडत आहे. पण 'स्वतः' म्हणतो की मी करत आहे. हा आहे गर्वरस! आणि जोपर्यंत गर्वरस चाखायची सवय आहे, तोपर्यंत संसार चालूच राहतो. हे सर्व समजून तर घ्यावे लागेल ना! अशीच थापेबाजी चालेल का?

म्हणून आता ह्या लोकांनी म्हटले आहे की, 'यही गले में फांसी' (हाच गळ्यात फास). मी सामायिक केली, मी प्रतिक्रमण केले, मी ह्याचा त्याग केला असे बोलणे म्हणजे तो तुमच्या गळ्यात फास आहे, तू गर्वरस चाखलास म्हणून!

## सामायिक, पुनिया श्रावकची

**प्रश्नकर्ता :** पुनिया श्रावकची सामायिक कशी होती?

**दादाश्री :** तुम्ही सर्व जण इथे करता तशीच सामायिक. क्रमिक मार्गात तो तिथपर्यंत पोहोचला होता.

श्रेणिक राजाला जेव्हा नरकात जावे लागेल असे कळले तेव्हा भगवंतांनी सर्व उपाय सांगितले. राजानी भगवंतांना विचारले की नरक टाळता येईल असे काही उपाय सांगा. भगवंत, तुमची भेट झाली तरी पण मला नरकाला जावे लागणार? तेव्हा भगवंत म्हणाले, 'बाबा, यात कोण काय करू शकतो? यात कोणाचेच काही चालत नाही. एकदा कर्मबंधन झाले की झाले. त्यात कोणाचे काहीच चालत नाही!' तरीही राजा म्हणाला 'काही तरी उपाय सांगा.' मग भगवंतांनी चार उपाय सांगितले की यातील कोणताही एक उपाय कराल तर तुम्हाला नरकात जावे लागणार नाही. त्यातील तीन उपाय तर असफल झाले. त्यानंतर जेव्हा पुनिया श्रावकाच्या सामायिकचा उपाय सांगितला तेव्हा श्रेणिक राजा म्हणाले, 'ते तर मी पुनिया श्रावकाकडून घेऊन येतो.'

श्रेणिक राजा पुनिया श्रावक यांच्यापाशी गेले, आणि त्याला म्हणाले 'तू मला सामायिक दे.' तू माझ्या राज्यात राहतोस सामायिकची तू मागशील तेवढी किंमत मी तुला देईन. सामायिक म्हणजे 48 मिनिटांचे जे तुझे फळ असेल ते तू मला दे. आणि तू मला फक्त एवढे म्हण की, 'मी तुम्हाला दिले, तुम्हाला अर्पण केले.' तेव्हा पुनिया श्रावक म्हणाला, 'साहेब, ते दिले जाऊ शकत नाही, ती देण्यासारखी वस्तू नाही.' राजा म्हणाला, 'का देऊ शकत नाही? तुला द्यावेच लागेल. 'नाही' असे तर म्हणूच नको.' तेव्हा पुनिया श्रावक म्हणाला, 'ते देता येत नाही. जर भगवंत म्हणाले तर मी देऊ शकतो.' तेव्हा राजा म्हणाला, 'भगवंतांनीच तर मला पुनिया श्रावकाची सामायिक आणायला सांगितले आहे. तुला किती किंमत घ्यायची आहे?' पुनिया श्रावक बिचारा दबावाखाली आला म्हणून तो म्हणाला 'ठीक आहे, जर भगवंतांनी सांगितले असेल तर मी देईन.' राजाला वाटले की हातोहात काही तरी प्रॉमिस करायचे असेल. राजाने विचारले, 'बोल, किती किंमत हवी आहे तुला?' ते तर राजा होते, मग कोणाचे उपकार कसे मान्य करतील? म्हणून राजाने विचारले, 'किती किंमत घेणार आहेस?' तेव्हा पुनिया श्रावक म्हणाला, 'भगवंत सांगतील तेवढी किंमत मी घेईन.'

मग राजाला खात्री वाटू लागली की हा आता द्यायला तयार झाला आहे, सौदा झालेलाच आहे, मग आता काय हरकत आहे? मग राजाने येऊन ते सगळे भगवंतांना सांगितले. भगवंतांना म्हणाला, 'आज चांगला शकुन झाला आहे.' भगवंतांनी विचारले, 'कसला शकुन झाला आहे?' तेव्हा राजा म्हणाला, 'त्याने सामायिक द्यायला हो म्हटले आहे, राजीखुशीने हो म्हटले आहे. आता तर मला नरकगतीत जावे लागणार नाही ना?' तेव्हा भगवंतांनी विचारले, 'देण्याघेण्याचे काय ठरले आहे?' राजाला वाटले, त्यात काय? फार तर पाच-दहा लाख द्यायला सांगतील, आणखी काय करणार? 48 मिनिटांचे असे किती असणार? आता मला नरकात जावे लागणार नाही ना? तेव्हा भगवंत म्हणाले, 'तर मग (नरकात) जावे लागणार नाही. पण तुला कोणी सांगितले? तुला (सामायिक) कशी काय दिली? तेव्हा राजा म्हणाला, 'त्याने ते तुमच्यावरच सोडले आहे. आता तुम्ही सांगाल तितकी किंमत मी त्याला देईन.' तेव्हा भगवंत म्हणाले, 'माझ्यावर सोडले आहे? त्याची किंमत तर मी जाणतोच ना? आणि मी अशी कशी भलतीसलती किंमत तुला सांगू शकेन?' तेव्हा राजा म्हणाला, 'जी किंमत आहे ती मला सांगा, आता देऊन टाकतो.' तेव्हा भगवंत म्हणाले, 'हे बघ, मी तुला समजावून सांगतो तिची किंमत किती आहे हे तुला माहीत आहे का? तुझे संपूर्ण राज्य तर फक्त दलालीतच जाणार. फक्त तीन टक्के दलालीत तुझे सगळे राज्य जाईल, इतकी तिची किंमत आहे. म्हणजे मूळ रक्कम तर द्यायची बाकीच राहिली, ती तू कुठून आणून देशील?' त्यावर राजाने विचारले, 'माझे राज्य फक्त दलालीतच जाईल? तर मग बाकी रक्कम मी कुठून आणून देऊ? म्हणजे आता माझी नरकगती तर थांबूच शकत नाही.' तेव्हा भगवंतांनी म्हटले, 'या सामायिकची इतकी प्रचंड किंमत आहे की तू ती देऊच शकत नाही!' मग राजाने स्वत:च मनाई केली आणि म्हणाला, 'नाही साहेब, मी देऊ शकणार नाही.' म्हणून मग त्यांनी प्रयत्न बंद केले आणि आरामात नरकगतीत गेले. आणि आता (पुढच्या चोवीशीत) पहिले तीर्थंकर म्हणून ते येतील. 'पद्मनाभ' नावाने! अशी सामायिक आम्ही तुमच्याकडून रोज करवून घेतो. परंतु लोक तिचे महत्व जाणत नाहीत, पान खाऊन परत थुंकून टाकतात!

**प्रश्नकर्ता :** एखाद्या आदिवासीला जर हीरा दिला तर तो त्याला काचच समजेल ना?

**दादाश्री :** हो, तसेच आहे. लहान मुलाच्या हातात रत्न देण्यासारखी ही गोष्ट आहे, तरी पण कधी ना कधी तरी त्याची गाडी चालू लागेल. लहान मूल मोठे होईल. एक दोन वेळा त्याच्या हातातून कोणी तरी घेईल, पण मग परत 'दादां'कडून घेतल्यानंतर तो कुणाला देणार नाही. एक वेळ त्याला सावध केले की आता फसू नकोस. तर मग तो परत देणार नाही, बरोबर आहे ना?

आणि त्यावेळी आनंद पण तसाच होतो. अशी पुनिया श्रावक सारखी सामायिक जेव्हा होते, तेव्हा त्याचा आनंद पण तसाच होतो. त्यावेळी जरी स्पंदने होत असतील, देहाची स्पंदने तर होतील, पण तरीदेखील सामायिकमध्ये जो आनंद होत असतो, तो स्पंदने होत नसल्यामुळे होत असतो.

## कायोत्सर्ग सहित

भगवंतांनी तर हा देह आणि हे सर्व माझे नाही, अशा प्रकारे सामायिक सांगितली होती. सामायिक कायोत्सर्गपूर्वक व्हायला हवी. ज्याने आपले ज्ञान घेतले आहे तो कायोत्सर्गपूर्वक सामायिक करील. कायोत्सर्गपूर्वक! ती खूपच मौल्यवान आहे.

आता ते कायोत्सर्ग कसे करीत? सर्व मोठमोठे लोक, गणधर वगैरे जो कायोत्सर्ग करीत, ते असे उभे राहत, एखाद्या खांबाप्रमाणे. मग असे ठरवत की 'मी पाय नाही, मी पोट नाही, मी छाती नाही, मी डोके नाही, मी हे नाही, मी ते नाही' याचा उत्सर्ग करीत, आणि मग आतमध्ये निश्चित करीत की, 'मी शुद्धात्मा आहे.' कसा? तर 'अनंत ज्ञानवाला, अनंत शक्तीवाला, अनंत दर्शनवाला', असे पाच-सहा गुणधर्म त्यांना माहीत असत. शास्त्रांच्या शब्दांच्या आधारे, ते त्या शब्दांना पुन्हा पुन्हा आठवत राहत. प्रथम उत्सर्ग करीत. कायोत्सर्ग, याला भगवंतांनी सर्वात शेवटचा उपाय म्हटले आहे.

'मी म्हणजे हे मन-वचन-काया नाही, मी शुद्धात्मा आहे.' असे ध्यानात राहणे याला काउसग्ग म्हटले आहे. आता लोकांना काउसग्ग शब्द समजत नाही ना! कायउत्सर्ग, आम्ही जे आता म्हणवून घेतले ना! ज्ञानविधीत बोलत होतो तेव्हा कायउत्सर्गच होता. 'मन-वचन-काया या पासून भिन्न, असा मी प्रकट शुद्धात्मा आहे', असे म्हणवून घेतले तो सर्व कायोत्सर्गच होता.

## ज्ञानविधी म्हणजे आत्म्याची सामायिक

सामायिक म्हणजेच मी तुमच्याकडून हा जो एक तासाचा ज्ञानविधी करवून घेतला, त्यालाच सामायिक म्हणतात. अध्यात्म संबंधी एका ध्यानात राहणे, यालाच सामायिक म्हणतात. अशी सामायिक सामान्य माणसांकडून पूर्णपणे चांगल्या प्रकारे होऊ शकत नाही. त्यासाठी ज्ञानी पुरुष पाप धुऊन देतात. जोपर्यंत पापे धुतली जात नाहीत, तोपर्यंत काहीही निष्पन्न होत नाही.

जेव्हा आम्ही पुन्हा 'ज्ञान' देतो तेव्हा तुम्हाला म्हणतो की तुम्ही पुन्हा (ज्ञानविधीत) बसा. अशी सामायिक वारंवार होत नाही. म्हणून (जेव्हा जेव्हा) वेळ मिळेल तेव्हा बसत जा. जर वेळ नसेल तर काम झाल्यावर सुद्धा, पण इथे या.

## अक्रममध्ये निरंतर सामायिक

**प्रश्नकर्ता :** आपल्या अक्रम मार्गात सामायिकचे काय महत्व आहे ?

**दादाश्री :** आपल्या सर्वांना संपूर्ण दिवस सामायिकच असते. सामायिकपेक्षाही अधिक असते. 'मी शुद्धात्मा आहे' हे लक्ष, त्यालाच सामायिक म्हणतात आणि ती तर यथार्थ सामायिक. अशी सामायिक पूर्ण दिवस राहत असते.

'मी शुद्धात्मा आहे' असा भाव तासभर राहणे, म्हणजेच सामायिक. समभावाने निकाल करणे हीच सामायिक. 'रियल आणि रिलेटिव्ह'ला पाहणे हीच सामायिक आहे. आमची पाच वाक्ये (आज्ञा), त्या पण सामायिक स्वरूपच आहेत!

**प्रश्नकर्ता :** क्रमिक मार्गात तर पुनिया श्रावकाची सामायिक सर्वश्रेष्ठ आहे, हो ना?

**दादाश्री :** हो, ती तर तुम्ही करता तीच सामायिक! तुम्ही सकाळी घराबाहेर पडता तेव्हा स्थूल डोळ्यांनी गाय दिसते आणि आतील डोळ्यांनी शुद्धात्मा दिसतो. पुनिया श्रावकाची सामायिक अशीच होती. म्हणूनच मी तुम्हाला म्हणतो ना, की मी तुम्हाला पुनिया श्रावकाचीच सामायिक दिली आहे, शुद्ध सामायिक. आता जर तुम्हाला याचा लाभ घेता आला तर घ्या. म्हणजेच या काळात (सुद्धा) अशी सामायिक होऊ शकते. जर लाभ होत नसेल तर ती (तुमचीच) चूक आहे ना!

एक तासभर रियल आणि रिलेटिव्ह, दोघांना बघत-बघत ठीक प्रकारे त्याचा उपयोग ठेवला, तर भगवंतांनी त्याला शुद्ध उपयोग असे म्हटले आहे. असा शुद्ध उपयोग जर एक गुंठाणापर्यंत (48 मिनिट, 1 गुणस्थानक) राहिला ना, तर पुनिया श्रावकासारखी सामायिक होईल, असे आहे. तुम्हाला हे जमत असेल तर याचा अवश्य लाभ घ्या.

आतमध्ये मन कितीही ढवळाढवळा करत असेल तरी पण त्याला सांगा, 'आता गप्प बसून रहा. एका तासानंतर ये, ज्यांना ज्यांना यायचे असेल त्यांनी त्यांनी यावे.' आणि मग आतमध्ये पण येणारे असतातच ना, आरडाओरडा करणारेही असतात, त्यांना सांगा, आता गप्प बसा, आता तासाभरासाठी सगळे बंद आहे. आमची सामायिक चालू आहे. आता येऊ नका. आतमध्ये होम डिपार्टमेंट (आत्मा)मध्ये घुसण्याचा कोणाला अधिकार नाही. फॉरेन डिपार्टमेंटमध्ये (अनात्म विभागातच) राहा. आम्ही एका तासानंतर जेव्हा बाहेर येऊ तेव्हा पाहू. मग सगळे आपोआप बंद होईल. आपण हुकूम देऊ त्याचप्रमाणेच ते वागतील. कारण त्या सर्व गोष्टी निर्जीव आहेत पण सचेतन झाल्या आहेत, त्यांना सचेतन भाव प्राप्त झालेला आहे. तेव्हा तुम्ही तासभर ही पुनिया श्रावकाची सामायिक करा. सगळे काही झडून निघून जाईल!

## जग विस्मृत करविते ती सामायिक

सामायिकचा अर्थ काय? जी जगाला विस्मृत करविते. चोर-

दरोडेखोर यांच्या गोष्टी पण जग विस्मृत करवितात. तुम्ही घरी गेलात आणि जेवणाला जर थोडा वेळ असेल, पाच मिनिटे असतील, तर तुम्ही वैतागून एखादे पुस्तक वाचायला घेता. नंतर थोड्या वेळाने पत्नी जेवायला हाक मारते तेव्हा तुम्ही लगेच उठत नाही. अरे, असे का? कारण तुम्ही त्या पुस्तकात एकाग्र झालात. माणसाला खाली ओढणारे संस्कार लवकर एकाग्र करतात. म्हणून तो पूर्णपणे एकाग्र होऊन जातो आणि मग उठत नाही. आता त्या वेळी पण जगाचा विसर पडलेला असतो, पण तो अधोगतीत घेऊन जातो. ते आपलीच पूंजी खर्च करवून मार खायला लावतो. आणि सामायिक, की जी मात्र उर्ध्वगामी आहे, त्यात थोडा वेळ लागतो. जगाचा विसर पडायला वेळ लागतो.

## दादा स्मृतीत तर जग विस्मृतीत

या सगळ्यांना दादा आठवत असतील का दिवसभर? आणि दादा आठवत राहिले तर काय होते? जग विस्मृत होते. काही तरी एकच आठवू शकते. जर जग आठवत असेल तर तर दादांची आठवण येणार नाही, आणि जर दादा आठवत असतील तर जग आठवणार नाही. जगाची विस्मृती होऊ लागते तेव्हापासून कर्मे कमी होऊ लागतात. लोकांना तर सामायिकमध्ये सुद्धा जगाचा विसर पडत नाही. कृपाळूदेव जग विस्मृत करायलाच सांगत असत. एक तासभर जरी जग विस्मृत झाले तरी त्याची किंमत त्यांनी खूप जास्त सांगितली आहे.

मनात जर असे असेल तर काय होणार? मनात असे असू शकते तरी पण मन आत्म्यापासून वेगळे आहे. शेठजींना पण समजते की मी सामायिकला बसलो आहे पण मन मात्र उकिरड्यावर गेले आहे. असे कुणाला समजते? त्याला त्यात गोडी वाटते म्हणून ते परत परत तिथेच धावू लागते. जिथे गोडी वाटते तिथे जाऊन वसूली करू लागते! वसूली सुरू करते!!

आता माझ्या उपस्थितीत तुम्ही सर्व काही विसरला आहात की नाही? यालाच सामायिक म्हणतात. येथे सांसारिक गोष्टी अजिबात नाहीत. इथे आत्मा आणि परमात्मा, अशा दोनच गोष्टी आहेत. हे जे

तुम्ही सर्व (जग) विसरलात ना, हीच आहे सर्वश्रेष्ठ सामायिक! दुसरे काही जमले नाही, तरी पण येथे येऊन थोडा वेळ बसत जा, निदान तासभर बसून मग निघून जा! मग पाहा खूप पापे धुतली जातील. सर्व पापे भस्मीभूत होऊन जाईल. या सामायिकमध्ये पापे भस्मीभूत होऊन जातात. ही ज्ञानी पुरुषांची विलक्षणता आहे.

## समभावाने निकाल करणे, म्हणजेच सामायिक

जैनांची सामायिक म्हणजे काय? (त्याने) समताभाव वाढतो.

तुम्ही समभावाने निकाल करण्याची आज्ञा पाळता, त्यालाच सामायिक म्हणतात. समभावात राहणे म्हणजेच सामायिक आणि विषमभावात राहणे म्हणजेच संसार, आणि या जगाची व्यावहारिक सामायिक म्हणजे काय? अठ्ठेचाळीस मिनिटे फक्त एकच विचार करणे, दुसरा कुठलाच विचार न करणे, बस हीच (त्यांची) सामायिक.

फक्त आत्म्याचेच विचार येणे आणि भौतिकचा कुठलाच विचार न येणे याला शुद्ध सामायिक म्हणतात. अठ्ठेचाळीस मिनिटांपर्यंत, याहून जास्त होत नाही. कोणाकडूनच होत नाही.

## सामायिकची यथार्थ व्याख्या

**प्रश्नकर्ता :** सामायिक शब्दाचा भावार्थ जरा नीट समजावून सांगा.

**दादाश्री :** सामायिक म्हणजे एकाग्रता नाही, पण तिथे दहा ग्लास पडून फुटले असे समजून देखील आतमध्ये समता राखणे, तराजूचे पारडे कोणत्याही एका बाजूला न झुकणे, याला सामायिक म्हणतात. सामायिक म्हणजे तराजूचे पारडे एक्झॅक्ट राहणे!

(क्रमिकची) सामायिक म्हणजे, दुसरे काही पण मध्ये आले तर त्याला काढत राहतात, हटवत राहतात, मग राहिले काय? फक्त स्वत: एकटा, अशी सामायिक करतात! मग ही सामायिक तर त्याला जमणारच नाही ना! समता तर राहणारच नाही ना!

त्याने ठाम ठरवले असेल की आज सामायिकमध्ये दुकानाची

आठवण येता कामा नये. तर डोळे मिटताच सर्वात प्रथम दुकानच समोर येऊन टपकते. याउलट आम्ही म्हणतो, 'दुकान-बिकान सगळ्यांनी यावे. सगळ्यांनी येऊन मला सामायिकमध्ये त्रास द्यावा.' असे म्हटले तर सगळे पळून जातील. त्यांना सर्वांना वाटते की हे काय झाले? काही तरी औषध वगैरे आणले असेल. आणि ते फटाके फोडतील तेव्हा काय करणार? 'दुकान, तू आठवणीत येऊ नको.' असे म्हणून घाबरतोस कशाला? 'तू ये ना' मी बसलो आहे, 'हे देवा, हे भगवंता, दुकानाची आठवण न येवो.' अरे बाबा, किती वेडा आहेस तू? जर दुकानाची आठवण आली नाही तर पत्नीची आठवण येईल, पण येईलच ना. ती पण दुकानच आहे ना! पत्नी दुकान नाही का?

**प्रश्नकर्ता :** खूप मोठे दुकान आहे.

**दादाश्री :** बघा! आता पत्नीलाही मोठे दुकान म्हणत आहेत!

सामायिकचा खरा अर्थ काय आहे की कोणत्याही कारणाने विषमभाव न होऊ देणे. जरी सम राहिला नाही तरी विषम न होऊ देणे, त्याला सामायिक म्हणतात. समजा तिथे मुलगा आईला शिव्या देत आहे, आणि त्याला (वडिलाला) ते ऐकू पण येत आहे, तरीही विषमभाव होत नाही. आतमध्ये संताप तर येतो पण त्याला सम करून टाकतो. जसे वजन करताना एक पारडे जरा वरती गेले तर लगेच त्यात थोडे टाकतो, परत जर दुसरे वरती गेले तर परत पहिल्यात थोडे टाकतो, पण दोन्ही पारडी सारख्या पातळीवर आणतो. 'बेडक्याची पाचशेरी' सारखे नसते.

## विषमता होऊ न देणे, तीच

सकाळी उठल्यावर भाजी घ्यायला जाताना जर शुद्धात्मा पाहत पाहत जाल, तर तुमच्यावर कोणी रागावणार आहे का? गाढव असे म्हणणार का की 'माझ्यात शुद्धात्मा का पाहिलास?' म्हणेल का गाढव असे? म्हणून समता ठेवा, विषमता नको. पारड्यात जरा कमी पडले तर लगेच त्यात थोडे टाकले. बेडक्याची पाचशेरी करायला जाल तर त्रासच होईल ना? मग तिथे समता राहणार नाही.

असे आहे की, तराजूत एका बाजूला पाच शेर ठेवले असेल आणि जर पाच शेराचे दहा शेर करायचे असेल, तर दुसऱ्या बाजूला पाच शेरांची दुसरी कुठली तरी वस्तू ठेवावी लागते. दगड, ढेप किंवा दुसरे काहीही, किंवा पाच शेर गहू पण चालतील. पाच शेर मोजल्यानंतर परत ह्या पारड्यात पाच शेराची वस्तू ठेवली तर दहा शेरांचे वजन करू शकतो. पाचशेर मोजण्यासाठी काय करतात? एका बाजूला पाच शेर ठेवतात आणि दुसऱ्या बाजूला ठेवायला काही मिळाले नाही म्हणून कोणीतरी बेडूक ठेवले! आता प्रथम तीन बेडूक ठेवले आणि नंतर आणखी दोन बेडूक टाकेपर्यंत पहिले तीन उड्या मारून पसार झाले. म्हणजे त्यांना पकडून-पकडून आणेपर्यंत पहिले उड्या मारून पळून जात. म्हणून पाचशेर होतच नसत. अशी या लोकांची सामायिक असते.

म्हणजेच तराजू सारखा वरती-खालती होत राहतो. लोकांची सामायिक म्हणजे बेडकांची पाचशेरी करण्यासारखे आहे, कधीच (व्यवस्थित) होऊ शकत नाही. त्यांना जर असे म्हटले तर भांडायला उठतील, म्हणतील, 'आमच्या सामायिकला बेडकांची पाचशेरी म्हणता?' अरे बाबा, नाही म्हणणार! तराजूची पारडी थोडी खालती-वरती होती, बस एवढेच म्हणतो. बाकी आहे तर बेडकांच्या पाचशेरीसारखेच ना? इथून दोन आत टाकायला गेलो की तिथून तीन उड्या मारून बाहेर पडतात. अशाने कधी पाचशेर पुरे होतील का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** म्हणजे सामायिकचा खरा अर्थ आज निघाला, एक्झॅक्ट. जो तीर्थंकराच्या हृदयात होता तो अर्थ. तो अर्थ आता प्रचलित नाही, गेली दोन हजार वर्षे (तो अर्थ) कोणी जाणतच नाही. सामायिक म्हणजे विषमता होऊ न देणे. स्वत: जवळ तर काहीच ज्ञान नाही, आणि विषमभाव होऊ द्यायचा नाही! अहाहा! हे तर खूप मोठे आश्चर्य आहे! जरी हा अर्थ आज प्रचलित नसला तरी सामायिकचा मूळ अर्थ हाच आहे.

मुलगा आपल्या आईला शिव्या देत आहे त्यावेळी वडिलांना ते सहन होत नाही पण सामायिकमध्ये बसले असल्यामुळे ते मनात असा

निश्चय करतात की, 'मी आता सामायिकमध्ये बसलो आहे म्हणून मला विषमता करायची नाही.' अशी सामायिक केली तर (मोक्षाचे) कामच होऊन जाईल ना! आपल्या महात्म्यांना सामायिक सारखी समता असते यात काही दुमत नाही.

## सामायिकमध्ये श्रावक बनतो श्रमण

**प्रश्नकर्ता :** सामायिक करताना श्रावक पण श्रमणासारखा बनतो.

**दादाश्री :** जो जास्त समताभाव ठेवतो त्याला श्रमण म्हणतात. समताधारी लोकांना श्रमण म्हणतात. म्हणजे तो श्रमणासारखाच होतो ना!

**प्रश्नकर्ता :** श्रावक म्हणजे गृहस्थी असे मी समजतो.

**दादाश्री :** हो, पण गृहस्थ श्रमणासारखा समतावाला नसतो पण तो जेव्हा सामायिक करतो तेव्हा तासाभरासाठी श्रमणासारखा होतो. जर आता सामायिकचा अगदी खरा अर्थ लावला नसता तर श्रमणासारखे होणे खूप कठीण गेले असते. कारण एकाग्रता तर येथे बाबा लोक पण करतात, कोणीही योगवाले!

## निरंतर सामायिकची तर गोष्टच वेगळी ना!

**प्रश्नकर्ता :** असे म्हणतात की अनेक प्रकारच्या सामायिक केल्या पाहिजेत. तर मग त्या सामायिकचे कोणते कोणते प्रकार आहेत?

**दादाश्री :** हो, तशी अनेक प्रकारे सामायिक करता येते. आपण जी अठ्ठेचाळीस मिनिटे करतो, तिला तर सामायिक म्हणतात परंतु जर रस्त्यात सुद्धा कोणाशी भांडण झाले तर त्यावेळी सामायिक करावी, समत्वामध्ये यावे. जिथे जिथे असे असेल तिथे समताभावात यावे. आणि आपला मार्गच हा आहे, समभाव. आपला मार्गच पूर्ण सामायिकचा आहे. सामायिकचा, आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यानाचा हा मार्ग, म्हणजे आपला हा अंतिम मार्ग आहे. आता दुसरे काही राहिले का?

**प्रश्नकर्ता :** आपण तर अठ्ठेचाळीस मिनिटवाल्यात येत नाही ना? आपल्याला तर चोवीस तास याच भावात राहायचे आहे ना?

**दादाश्री :** त्यासारखे तर काहीच नाही! ती तर गोष्टच वेगळी! अहो, आपण ही जी प्रतिक्रमणे करतो ती खूपच मौल्यवान आहेत. त्यांना तर दोन-दोन, तीन-तीन तास जगाची आठवणच येत नाही, आणि शिवाय तीन-तीन तास स्वत:चे दोषच दिसत राहतात.

जे जे दोष दिसतात, ते निघून जातात. याला जिवंत प्रतिक्रमण म्हणतात. याउलट ते तर निर्जीव प्रतिक्रमण आहे, परंतु तेही वाया जात नाही, त्यामुळे पुण्य मिळते.

## पद्मासनाची आवश्यकता किती?

एक भाऊसाहेब विचारत होते की, 'जेव्हा आम्ही सामायिक करतो, तेव्हा पद्मासन घालायला हवे की नको?' मी त्यांना म्हटले, 'या काळात पद्मासन घालून बसू नका, नाही तर मला पाय सोडवण्यासाठी जावे लागेल. हो, पण स्थिर बसा. आणि जर स्थिर बसता येत नसेल तर झोपून आडवे पडूनही करायला हरकत नाही. डोळे मिटून करा. फक्त ज्ञानी पुरुषच डोळे उघडे ठेवून सामायिक करू शकतात. इतर लोकांना ते जमणारच नाही.'

## त्यात पाहतच राहायचे आहे

**प्रश्नकर्ता :** सामायिक करते वेळी आम्ही ज्ञाता-द्रष्टा पदात असतो हे ठीक आहे, पण त्यावेळी मन-बुद्धी-चित्त आणि अहंकार यांची स्थिती कशी असते? सामायिक करते वेळी खास करून कशा कशावर लक्ष दिले पाहिजे?

**दादाश्री :** हे मन-बुद्धी-चित्त-अहंकार काय काय करत आहेत ते पाहत राहावे. समजा तुम्ही 'सुपरवायझर' (निरीक्षक) आहात आणि साहेबांनी तुम्हाला 'सुपरव्हिजन' (निरीक्षण) करायला सांगितले, तर मग तुम्ही काय कराल?

**प्रश्नकर्ता :** सर्वांसमोर पाहत राहू की ते काय करत आहेत.

**दादाश्री :** फक्त 'सुपरव्हिजन'च करायची आहे. कोणाला

थोबाडीत मारायचे नाही. त्याचप्रमाणे मन-बुद्धी-चित्त-अहंकाराला फक्त पाहतच राहायचे आहे.

सामायिकमध्ये आत्म्याला वेगळा ठेवण्याचा प्रयत्न करत राहायचा आहे. आणि आतील सर्व पाहतच राहायचे आहे. आत्मा 'पाहणे' आणि 'जाणणे' या दोनच गोष्टींचा अभ्यास (सराव) करत असतो. आत्मा इतर कोणत्याच अभ्यासात जात नाही. 'जे घडले' ते पाहत राहतो. मन कोणत्या धर्मात आहे, बुद्धी कोणत्या धर्मात आहे, हे सर्व पाहत राहतो. सर्वांना 'पाहणे', फक्त पाहतच राहणे, एवढेच करत राहायचे आहे. जसे आपण सिनेमा पाहत असतो, त्यात लोक मारामारी करत असतात, कोणी भांडत असतो पण आपण त्यात 'इमोशनल' (भावनिक) होतो का? जसा सिनेमा पाहतो तसे पाहायचे आहे! आतील पूर्ण सिनेमा पाहणे म्हणजेच सामायिक. असे अठ्ठेचाळीस मिनिटे केल्यावर तर खूप काम होईल.

**प्रश्नकर्ता :** तर मग यात भूतकाळ आठवायची गरज नाही का?

**दादाश्री :** भूतकाळ आठवायचा नाही. सामायिक करायची आहे. सामायिक म्हणजे 'आतमध्ये जे काही चालू आहे' त्याला आत्मा पाहत राहतो. त्या वेळी आत्मा पूर्ण रूपाने 'ज्ञाता-द्रष्टा' स्वरूपात राहतो.

## शुद्ध उपयोग राखण्यासाठी

**प्रश्नकर्ता :** अक्रम मार्गात सामायिकची गरज आहे का?

**दादाश्री :** दादांची (ज्ञानाची) जागृती राहत असेल, इतर जागृती राहत असेल, आज्ञा पालन जमत असेल, तर सामायिक केले नाही तरी चालेल.

बाकी, तुम्हाला तर 'अब्रह्मचर्य' किंवा असे सर्व दोष कुठे कुठे झालेत, त्यासाठी सामायिक करायची असते.

**प्रश्नकर्ता :** अशा गोष्टीत अजून रसच निर्माण झाला नाही, की सामायिक करायलाच हवी.

**दादाश्री :** 'सामायिक करा' असे कुठेही लिहून दिलेले नाही.

जर शुद्ध उपयोग राहत असेल तर मग काही हरकत नाही. शुद्ध उपयोग राखण्यासाठीच सामायिक करायची असते. सामायिकसाठी शुद्ध उपयोग राखायचा असे नाही.

## सामायिकने विकार ग्रंथीला विरघळविणे

**प्रश्नकर्ता :** आम्ही तरूण आहोत म्हणून आमची विषय विकारांची गाठ मोठी आहे. जर आमचा उपयोग सामायिकमध्ये असेल तरच ती गाठ आम्ही संपवू शकू ना?

**दादाश्री :** हो, पाहिल्यामुळे ती विरघळते.

**प्रश्नकर्ता :** हो, म्हणजे तिला सतत पाहत राहून विरघळवायची आहे, म्हणून सामायिकमध्ये बसता आले तर चांगलेच आहे ना? पण सामायिकमध्ये बसायला हवे असे वाटत नाही.

**दादाश्री :** सामायिकमध्ये बसायला जमत नसेल तर जेव्हा ती गाठ फुटते आणि विषयाचे विचार येतात, तेव्हा त्यांना ज्ञानाने शुद्ध करता आले तर त्याला जागृती म्हणता येईल. शेवटी काहीच जमत नसेल तर त्या विचारांना 'हे माझे नाहीत' असे म्हटलात तरी सुटाल. विषयाचा विचार आला आणि जर दृष्टी बिघडली तर 'हे माझे नाही' असे बोलण्याने सुटाल. विषयाचा विचार येताक्षणीच 'हा माझा नाही' असे म्हटल्यावर बंद होईल.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे यासाठी सामायिक करण्याची गरजच नाही की मग नियमाप्रमाणे आम्ही एक तास बसायलाच हवे?

**दादाश्री :** सामायिक झाली तर उत्तमच आहे. पण जर जमली नाही तर या प्रकारे, जेव्हा जेव्हा दोष उत्पन्न होतील तेव्हा तेव्हा त्यांना घालवीत राहावे. (संपवायचे).

**प्रश्नकर्ता :** आमची इच्छा असते की सामायिक करायला हवी पण तरी सामायिकसाठी बसले जात नाही, असे का होते?

**दादाश्री :** जेव्हा सगळे एकत्र असतात तेव्हा बसले पाहिजे.

एकटे बसणे जमत नाही, सगळे सोबत असले तर समोरासमोर त्याचा परिणाम होतो, तसे वातावरण उत्पन्न होते. म्हणून सर्वांनी मिळून एकत्र बसावे.

**प्रश्नकर्ता :** जास्तीत जास्त लाभ व्हावा यासाठी कशा प्रकारे आयोजन करावे?

**दादाश्री :** जर जास्त लोक एकत्र असतील तर जास्त लाभ घेता येईल. सत्संगाचा परिणाम होतो ना? सामायिक करायची असेल तर दहा-बारा जणांनी एकत्र मिळून केली तर ती चांगली होईल. एकट्याने बसून स्थिरता येत नाही, सगळे जण एकत्र जमले तर स्थिरता येते.

## यात कर्तापण नसते

**प्रश्नकर्ता :** आपण अठ्ठेचाळीस मिनिटे बसून करतो ती तर आपल्या विज्ञानाची गोष्ट आहे. तुम्ही आम्हाला या ग्रंथी विरघळवायला सांगितले होते.

**दादाश्री :** हे तर आपले अक्रम विज्ञान आहे ना! म्हणजे स्थिर बसून ग्रंथी संपवून टाकण्यासाठी (हे सामायिक आहे)! तसे याला सामायिक म्हणत नाहीत. याला दुसरे काही तरी नाव दिले पाहिजे, पण दुसरे नाव सापडत नाही म्हणून हेच नाव चालू ठेवले.

सामायिक म्हणजे अन्य काही नाही, मनात जे जे स्फुरत आहे त्याचे ज्ञाता-द्रष्टा राहणे.

**प्रश्नकर्ता :** सामायिक आणि प्रतिक्रमण यांना क्रिया म्हणतात का?

**दादाश्री :** नाही, सामायिक आणि प्रतिक्रमण या क्रिया नाहीत. या ज्ञानक्रिया आहेत. अज्ञानाने करतो त्या अज्ञानक्रिया आहेत पण आपली तर ही ज्ञानक्रिया आहे. ज्ञानक्रियेने मुक्त होतो आणि अज्ञानक्रियेचे तर फळ येते, भौतिक सुख मिळते.

**प्रश्नकर्ता :** माझा असा अनुभव आहे की सामायिक केल्यामुळे जागृती खूप वाढते.

**दादाश्री :** हो, जागृती खूप वाढते. जागृतीसाठी सामायिकसारखी उत्तम गोष्ट दुसरी कोणतीच नाही.

**प्रश्नकर्ता :** पण मी तर हिला क्रिया मानत होते.

**दादाश्री :** नाही, ही तर ज्ञानक्रिया आहे. ज्ञानक्रियेला वास्तवात क्रिया म्हणता येत नाही. व्यवहारात मात्र म्हणावे लागते की, 'मी सामायिक करतो.'

सामायिक 'करायची आहे', तर यात 'करायची आहे' असे फक्त आपण म्हणतो, एवढेच. खरे तर, सामायिकमध्येच राहायचे आहे. पूर्वीपासून असे बोलण्याची सवय झाली आहे, म्हणून असे बोलावे लागते. 'सामायिक करायची आहे', असे म्हणायचा प्रघात पडला आहे, खरे तर सामायिकमध्ये राहायचे आहे. आपल्याकडे 'करायचे' तर काहीच नाही. पण भाषा अशी आहे, प्रघात असा आहे म्हणून असे बोलावे लागते.

## सामायिकमुळे आतील शुद्धी

**प्रश्नकर्ता :** जेव्हा आम्ही सामायिक करतो, तेव्हा जर मनात वाईट विचार आले, तर त्यांचे त्याचक्षणी प्रतिक्रमण करायला हवे का?

**दादाश्री :** हो, त्याचक्षणी प्रतिक्रमण करावे, आणि ते 'आपण' करायचे नाही. 'आपण' जाणणारे आहोत आणि चंदुभाईला भान नाही, चंदुभाई कर्ता आहे. म्हणून कर्त्याला आपण असे सांगावे की, 'असे करा, तुम्ही असे का केलेत?' आपण ज्ञाता आहोत आणि तो कर्ता आहे.

जेव्हा तुम्ही दुसऱ्यांदा येथे याल तेव्हा तुम्हाला ध्यान-साधनेची जी क्रिया आहे त्याबद्दल सांगू. ती अशी एक प्रकारची सामायिक आहे की जी आयुष्यातील सर्व दोष पाहू शकते. तुम्ही तुमच्यातील सर्व दोष पाहू शकता आणि पाहिल्यामुळे ते दोष कमी होतात. अशी सामायिक तुम्ही जेव्हा पुन्हा येथे याल तेव्हा सांगू, तूर्त तर फक्त पाच आज्ञांमध्ये राहण्याचा प्रयत्न करा ना!

## सामायिकचा लाभ घ्या

**प्रश्नकर्ता :** माझे मन कमकुवत आहे म्हणून मी तुमच्या सामायिकमध्ये सामील होऊ शकत नाही.

**दादाश्री :** सगळ्यांबरोबर बसाल तर बसू शकाल, त्यामुळे समोरासमोर पर्यायी परिणाम होईल. तुम्हाला गाठींसाठी सामायिक करावयाची नाही. तुम्हाला तर मन काय करत आहे, ते सर्व पाहत राहायचे आहे. मनाचा कमकुवतपणा काय करीत आहे ते पाहत राहायचे आहे. पण कधी ना कधी तर त्या गाठी पण संपवाव्याच लागतील ना? जितक्या संपवाल तितका फायदा होईल. अगदी याच जन्मात फायदा होईल! संयमाची शक्ती खूप वाढेल. असा मार्ग, अशी संधी पुन्हा पुन्हा मिळत नाही, तेव्हा तुमचे (मोक्षाचे) काम उरकून घ्या. कशीही गाठ असो, या सामायिकने ती संपतेच. आपला हा मार्ग निरंतर समाधीचा मार्ग आहे. जेवढे आमच्या आज्ञांमध्ये राहाल, तेवढी निरंतर समाधी दशा राहील. जर आज्ञांमध्ये जास्त राहाल तर समाधीचा लाभ जास्त मिळेल.

## अक्रम मार्गात गाठी विरघळविण्यासाठी

शुद्धात्म्याचे भान झाल्यावर सामायिक करण्याची आवश्यकता नसते. शुद्धात्मा म्हणजेच सामायिक. जगातील लोक करतात तशी सामायिक आता आपल्याला करायची नाही. तरीसुद्धा इथे जी सामायिक करवून घेतली जाते ती आता का करावी लागते? तर तुम्ही 'अक्रम मार्गा'ने कर्मे संपविल्याशिवाय 'लिफ्ट' ने वरती आला आहात. त्यामुळे आतमध्ये गाठी तशाच पडल्या आहेत, म्हणून त्या गाठी विरघळविण्यासाठी हे सगळे जण सामायिक करत आहेत. जी गाठ मोठी असेल तिला ज्ञेयाप्रमाणे ठेवून, स्वत: ज्ञाताप्रमाणे राहून, जर एक तास यासाठी काढाल, तर ती गाठ तेवढ्या प्रमाणात कमी होईल. खूप मोठी गाठ असेल तर जास्त तास लागतील. रोज एक-एक तास दिला तर ती गाठ संपून जाईल. अगदी याच जन्मात हे सर्व संपून जाईल!

सामायिकमध्ये काय करतात? तर 'मन-वचन-काया यांच्या सवयी

आणि त्यांचा स्वभाव याला मी जाणतो आणि माझा स्व-स्वभाव याला पण मी जाणतो.' पण त्या स्वभावाचे काय होते? कोणाचा स्वभाव कमी गाढ असतो, तर कोणाचा जास्त गाढ असतो. आपण जेव्हा सामायिक करतो तेव्हा त्या सामायिकमध्ये जर त्या स्वभावाला पाहत राहिलो तर तो विरघळून जाईल. त्या स्वभावाचा जर 'ज्ञाता-द्रष्टा' राहिलात तर तो विरघळू लागेल.

आपली सामायिक कशी असते? 'ज्ञाता-द्रष्टा'ची सामायिक असते. मग त्यात कायोत्सर्ग पण येतो. अशी सामायिक तर कोणी करतच नाही ना? ही तर काही वेगळीच सामायिक आहे.

जो जो स्वभाव विरघळवयाचा आहे त्याला सामायिकमध्ये ठेवत जावे. त्याला जाणत राहिल्याने तो स्वभाव विरघळत जातो आणि शिवाय आत्म्याचा रसास्वादही चाखायला मिळतो, तो दुसरा फायदा! आत्मा स्थिर आहे, अचल आहे आणि शरीरालाही जर अचल केले तर स्वाद उत्पन्न होतो! बाहेर अचल केले तर आतमध्ये अचलतेचा स्वाद मिळतो. म्हणून तर ते (क्रमिक मार्गवाले) लोक सामायिक करतात. ते जेव्हा कायोत्सर्ग करतात तेव्हा आतून स्वाद येतो, त्यामुळे त्यांना समजते की बाहेर इंद्रियांचे सुख नाही, सुख आत आहे. याउलट तुम्हाला तर हे अगोदरच समजले आहे की सुख आतमध्ये आहे, मग ही सामायिक का करायची, तर स्वाद चाखण्यासाठी. आत्मरसाचा उपभोग घेण्यासाठी तुम्हाला सामायिक करायची आहे. आणि त्या लोकांना तर आत्मरसाचे भान होण्यासाठी करायची आहे.

## यात स्वभाव रस विरघळतो

'मन-वचन-काया यांच्या सवयी आणि त्यांच्या स्वभावाला 'शुद्ध चेतन' जाणतो, आणि स्वतःच्या स्व-स्वभावाला पण 'शुद्ध चेतन' जाणतो, कारण तो स्व-पर प्रकाशक आहे.'

आत्म्याचा स्वभाव मोक्षगामी आहे. ज्ञाता-द्रष्टा आहे. स्वरूप ज्ञानानंतर तुम्ही तुमचा स्वभाव पण जाणता आणि या मन-वचन-काया

यांच्या सवयी पण जाणता. मन असे आहे, वाणीची सवय अशी आहे, समोरच्याला अप्रिय वाटेल अशी आहे, खराब भाषा आहे, असे सगळे तुम्ही जाणता की नाही? तुम्ही हे पण जाणता आणि 'ते' पण जाणता, कारण तुम्ही स्व-पर प्रकाशक आहात. स्वत:ला, 'स्व'ला पण प्रकाशमान करू शकता आणि 'पर'ला पण प्रकाशमान करू शकता. अज्ञानी माणूस, फक्त 'पर'लाच प्रकाशमान करू शकतो, 'स्व'ला प्रकाशमान करू शकत नाही. त्याला एवढे निश्चित समजते की 'माझे' मन खूप वाईट आहे, पण जाणार कुठे? जिथे आहे तिथेच पडून राहावे लागते. याउलट आत्मज्ञानवाला 'वेगळा' राहू शकतो.

**प्रश्नकर्ता :** 'सवयी आणि त्यांचा स्वभाव' म्हणजे काय ते समजले नाही.

**दादाश्री :** नुसते 'मन-वचन-काया' यांच्या सवयी असे म्हटलेले नाही, तर त्याबरोबरच त्यांचा स्वभाव, असे पण म्हटले आहे. स्वभाव म्हणजे काही-काही सवयी खूप जाड (मोठ्या) असतात आणि काही काही सवयी एकदम पातळ असतात. नखाइतक्या पातळ असतात, एक किंवा दोन वेळा प्रतिक्रमण केल्यामुळे त्या संपून जातात. आणि ज्या सवयी खूप जाड असतात, त्यांचे तर खूप-खूप प्रतिक्रमण कराल, वारंवार कराल तेव्हा त्या घासून घासून संपतील.

मन-वचन-काया यांच्या ज्या सवयी आहेत, त्या तर मेल्यावरच सुटू शकतात, पण त्यांचा जो स्वभाव आहे त्याला घासले पाहिजे. कमी रुचीने बांधल्या गेलेल्या सवयी चार-पाच प्रतिक्रमणे करूनच संपुष्टात येतील. पण गाढ रुची असलेल्या सवयींसाठी पाचशे-पाचशे वेळा प्रतिक्रमणे करावी लागतात. काही गाठी, उदा. लोभाच्या गाठी तर इतक्या मोठ्या असतात की रोज दोन-दोन, तीन-तीन तास लोभासाठी प्रतिक्रमण करत राहिलात तरी पण सहा-सहा वर्षांनंतरही त्या संपत नाहीत! आणि एखाद्याची लोभाची गाठ अशी असते की एकाच दिवसात किंवा तीन-चार तासातच तो तिला संपवून टाकतो. असे वेगवेगळ्या प्रकाराचे स्वभाव-रस असतात.

म्हणजेच आपली अक्रम मार्गाची सामायिक वेगळ्या प्रकारची आहे. या ज्या सर्व गाठी आहेत, त्यांना तुम्ही सामायिकमध्ये ठेवा. लोभ असो, क्रोध असो, मान असो, अशा सर्व गाठींना सामायिकमध्ये ठेवाव्या. त्या 'ज्ञेय' आहेत आणि तुम्ही ज्ञाता आहात, या प्रकारे 48 मिनिटे सामायिक करा. 'ज्ञेय-ज्ञाता' या संबंधानेच सर्व गाठी विरघळतील. ही जी व्यवहार सामायिक करतात, ती तर फक्त एकाग्रता करण्यासाठी आहे, आणि आपली ही सामायिक तर गाठी विरघळविण्यासाठी आहे. जी गाठ जास्त त्रास देते, ज्याचे जास्त विचार येतात, ती गाठ खूप मोठी असते.

प्रतिक्रमणाच्या वेळी मन एब्सेंट (गैरहजर) असते, बाकी काही नाही. विचारांशी ज्ञाता-ज्ञेय संबंध... कारण प्रतिक्रमणाच्या वेळी विचारच येत नाहीत, विचार बंद होतात. आणि जर कोणाला विचार आले तर ते पाहावेत की 'ते ज्ञेय आहेत आणि आपण ज्ञाता आहोत.'

## विषय विकार संबंधी सामायिक

आम्ही विषयविकार संबंधित दोषांसाठी सामायिक करून घेतली होती आणि सांगितले होते की आजच्या दिवसापासून खूप खोल उतरा, आज जर तुम्ही चाळीस वर्षांचे असाल तर तुमच्या एकोणचाळीसाव्या वर्षी काय झाले होते, अडतिसाव्या वर्षी काय झाले होते, असे करत करत लोक वयाच्या दहा वर्षांपर्यंत पोहोचले होते. तेव्हा ते सर्व जण तिथपर्यंत पोहोचले होते ही गोष्ट निराळी आहे, पण त्यानंतरही आठ-आठ दिवस त्यांना ते दोष दिसणे चालूच होते, बंदच होत नव्हते. घरी असताना, जेवताना, खाताना, पिताना आतमध्ये सर्व चालूच होते, आत खणणे चालूच होते. शेवटी ते आम्हाला म्हणाले, 'आता आम्ही कंटाळलो आहोत, हे आता थांबवा.' तेव्हा मग आम्ही ते थांबवले. आतमध्ये सतत चालूच राहिले होते. आतमध्ये दोष शोधणे चालूच होते. पंचवीस वर्षांपूर्वी असे असे केले होते, ते सर्व पर्याय दिसत होते. भूतकाळात होऊन गेलेल्या पर्यायांना पाहणे हीच आपली सामायिक आहे.

या सामायिकमध्ये तर दोष धुतले जातात. आजपर्यंतचे, ज्ञान-प्राप्तीपूर्वीचे जे काही दोष झाले होते ते पाहणे हे म्हणजे सामायिक

आहे. कोणते दोष पाहायचे आहेत? ज्ञान घेण्यापूर्वी जे दोष झाले होते ते पाहिल्यामुळे ते दोष धुतले जातात. अजूनही पाहाल तर धुतले जातील. आणि आठवायला जाल तर एक पण आठवणार नाही. ज्ञानाने हे सर्व दिसतात. आत्म्याच्या उपस्थितीत सर्व काही दिसू शकते. सुरुवातीपासून ते संपूर्ण आयुष्यभराचे दिसते आणि विषयविकाराचे दोष तर...

**प्रश्नकर्ता :** विषयविकाराच्या दोषांसाठी सामायिक केली होती.

**दादाश्री :** हो, अगदी शेवटपर्यंतचे विषयाचे जे जे दोष झाले होते, ते सर्व दिसतील. दिसत-दिसत-दिसत बारा वर्षांचा होता तेव्हापर्यंतचे सर्व दिसू लागेल. जेव्हापासून विषयाची सुरुवात होते तेव्हापर्यंतचे सर्व दिसू लागेल. सुरुवातीपासून शेवटपर्यंतचे, जेवढे दिसले तेवढे सगळे संपून गेले.

## चित्रित केलेली सर्व पाने फाडत राहा

सामायिक म्हणजे काय? तुमच्या ज्या सवयी आहेत, ते भाऊ म्हणत होते की त्यांना पुस्तके वाचायची सवय आहे. मग कल्पनेने त्या पुस्तकांचा ढीग करून ठेवा, आणि मग ज्ञाता-द्रष्टा राहून ती पुस्तके फाडत राहा. तासभर तो फाडत राहील आणि 'तुम्ही' पाहत राहा. चंदुभाईला सांगा, 'सर्व पुस्तके फाडून टाका.' तर मग ती गाठ विरघळेल. जर लोभाची गाठ असेल तर ती समोर ठेवा. ग्रंथी विरघळून टाकण्याचे हे साधन आहे. आतमध्ये खूप ग्रंथी पडल्या आहेत. शेवटी निर्ग्रंथ व्हायचे आहे. निर्ग्रंथ झाल्याशिवाय गत्यंतरच नाही.

## अशी करावी सुरुवात, सामायिकची

**प्रश्नकर्ता :** मागील जन्मात आम्ही किती अतिक्रमणे केली? कशी केली? काय केले? ती तर आम्हाला माहीतच नाहीत. ते कसे समजणार?

**दादाश्री :** मागील जन्माचे आपल्याला काय करायचे आहे? सध्या आपण जेवढी अतिक्रमणे करतो, ती धुवायची आहेत.

**प्रश्नकर्ता :** या जन्मातसुद्धा जी अतिक्रमणे केली आहेत ती सगळी पण आठवत नाहीत ना?

**दादाश्री :** त्यासाठी तर तुम्ही जेव्हा सामायिकसाठी बसाल, आणि तिकडे लक्ष केंद्रित कराल की मला हे सर्व शोधून काढायचे आहे, तेव्हा सर्व काही सापडेल, अगदी तपशीलवार सापडेल.

आज एक सामायिक करा.

**प्रश्नकर्ता :** हो, कशा प्रकारे सामायिक करू?

**दादाश्री :** हो, लहानपणापासून आजपर्यंत ज्यांच्या ज्यांच्या बरोबर दोष झाले असतील, काही जीवांच्या बाबतीत हिंसेसंबंधी दोष झाले असतील, कोणाला दुःख दिले असेल, कोणाला अपशब्द बोलले असतील, कोणाशी कषाय केले असतील, असे हिंसाविषयक सर्व दोष.

मग खोट्याविषयी, चोरीविषयी, विषय-विकारांविषयी किंवा वस्तूंबद्दल ममता, त्याला काय म्हणतात? परिग्रह म्हणतात. असे जे जे दोष केले असतील, त्या दोषांना आठवून महावीर भगवंतांच्या साक्षीने किंवा श्री सीमंधर स्वामींना नमस्कार करतो, असे म्हणून माफी मागा, एवढे करा. जमेल ना एवढे?

**प्रश्नकर्ता :** जमेल. जितके आठवतील त्या सगळ्यांबद्दल प्रतिक्रमण करीन.

**दादाश्री :** जोपर्यंत आठवेल तोपर्यंत सर्व काही करा. ज्याची इच्छा आहे, जो सरळ आहे, त्याला आठवल्याशिवाय राहणार नाही. आणि भगवंतांच्या मार्गात सरळपणा, हाच मोक्षाचा सरळ रस्ता आहे, उत्तम रस्ता आहे. जर सरळ झाला नाही तर तो भगवंतांच्या मार्गातच नाही.

बस, एवढे करा. सर्व आठवून-आठवून करा आणि बरोबरच तुम्ही असे पण म्हणा की, 'प्रत्यक्ष ज्ञानी पुरुष असून आम्ही त्यांच्याबद्दल शंका व्यक्त केली, आणि ज्ञानी पुरुष कसे असतात, असे सर्व विचारले, हा पण आमचा दोषच आहे.' असेही (प्रतिक्रमण) करा.

लहानपणी मांजराला मारले असेल, माकडाला दगड मारला असेल, असे सर्व आतमध्ये पाहू शकतो. असे पूर्वीचे पर्याय आतमध्ये पाहू शकतो. पण सामायिक जास्त करत असाल तर. पहिल्यांदाच सामायिक करत असाल तर एकदम असे होणार नाही, पण पाच-दहा-पंधरा सामायिक झाल्यानंतर खूप सूक्ष्मपणा येऊ लागेल.

सर्वात प्रथम दादांचे ध्यान लावून, स्मरण करून, एखादे भक्तीपद गाऊन, आणि त्रिमंत्र म्हणून, मग 'मी शुद्धात्मा आहे' अशी स्थिरता करून घ्या. मग आजपासून लहानपणापर्यंत ज्या ज्या घटना घडल्या, विषयविकारांच्या, हिंसेच्या, खोट्यानाट्याच्या, ज्या ज्या तुम्हाला दिसतील त्या सगळ्यांसाठी तुम्ही प्रतिक्रमण करायला सुरुवात करा. आजपासून मागे-मागे जायला लागा. काल कोणाबरोबर काय केले होते, परवा काय केले होते, तेरवा काय केले होते, किंवा लहानपणापासून आठवा. जेवढे जेवढे आठवेल, त्या सगळ्यांसाठी प्रतिक्रमणे करा. ते सर्व तुम्हाला आठवेल, नैसर्गिकपणेच आठवेल. आठवले नाही तर मी काय करणार ? अशी भीती बाळगू नका. तुम्ही सुरुवात केली की मुसळधार पाऊस पडेल! वाळवंटात सुद्धा पाऊस पडेल! आणि मग जेव्हा जेव्हा हिंसेसारखे दोष केले असतील, वाणीद्वारे हिंसा केली असेल, किंवा कपट केले असेल, लोभीपणा केला असेल, मान घेतला असेल, धर्मात विराधना केली असेल, तर अशा सर्व गोष्टींचे प्रतिक्रमण करत करत पुढे जा. मग अब्रह्मचर्यासंबंधी, बिनहक्काचे विषयभोग भोगले असेल किंवा तसा विचार केला असेल, ते सर्व आठवून धूत राहा. जग ज्याची निंदा करते, जे निंदनीय आहे, अशा गोष्टींच्या फळस्वरूप नरकगतीत जावे लागते! म्हणून अशा सर्व गोष्टींचे तुम्ही प्रतिक्रमण करा.

ही चेतन वाणी आहे. ही चेतन वाणीच काम करील. तुम्ही बसून शुद्धतापूर्वक प्रतिक्रमण सुरू करा. पाच महाव्रते आहेत, त्या महाव्रतांचा कुठे कुठे भंग झाला, त्याचेच प्रतिक्रमण करायचे आहे, आणखी काही करायचे नाही. इतर गोष्टींसाठी, फिरायला गेला असाल, पान खाल्ले असेल, त्यासाठी काही करायची गरज नाही. माणसा-माणसांबरोबर समोरासमोर जर काही दोष झाले असतील तर त्यासाठी प्रतिक्रमणे

करायची आहेत. म्हणजे मिश्रचेतनाबरोबर जे काही दोष झाले असतील त्यासाठी प्रतिक्रमण करा, असे मी सांगत आहे. 'दादां'नी ही आज्ञा केली आहे, तिचे पालन करा. तसे तर रोज तुम्ही प्रतिक्रमण करतच असता. एखाद्या मिश्रचेतनासंबंधी विषयविकाराचा विचार आला असेल, काही दोष झाला असेल, त्या सर्वांचे, लहानपणापासून आजपर्यंतचे सर्व आठवून-आठवून प्रतिक्रमण करा. हे प्रतिक्रमण आज्ञापूर्वकचे आहे, म्हणून सर्व धुतले जाईल. माणसाकडून काय घडू शकत नाही? पण आज्ञांचे पालन केले तर सर्व धुतले जाईल.

**प्रश्नकर्ता :** मिश्रचेतनात काय काय येते?

**दादाश्री :** मिश्रचेतन म्हणजे जर कुत्र्याला लाथ मारून हाकलले, तर त्याच्याबरोबर शत्रुत्व बांधले असे म्हटले जाईल. रस्त्यात जर एखाद्या बाईला धक्का मारला तर तो पण मिश्रचेतनाशी दोष केला असे म्हटले जाईल. मिश्रचेतनाशी केलेले असे एकेक दोष शोधून, एकेक दोष आठवून त्यासाठी आलोचना, प्रतिक्रमण आणि प्रत्याख्यान करा. ज्ञानी पुरुषांच्या आज्ञेत राहिल्यामुळे दोषांचे ऑपरेशन होत राहते. हा तर 'लिफ्ट' मार्ग आहे. रस्त्याने जाता जाता हा मार्ग मिळाला आहे ना! म्हणून या प्रकारे आज्ञेत राहिल्यामुळे माल (दोष) स्वच्छ होत जाईल. असे करत करत मोक्षाला जाऊ शकाल.

**प्रश्नकर्ता :** चुका आठवत नसतील तर?

**दादाश्री :** मग दादांचे स्मरण करून म्हणा, 'हे दादा भगवान, आता मला आठवत नाही.' मग सर्व आठवेल. आणि जितके दोष आठवतील, तितके दोष संपतील. आता तुमच्या आत सुख सुरू झाले आहे, पण यापूर्वी मिश्रचेतनांबरोबरचे जे हिशोब शिल्लक असतील, ते तर दावा मांडतील. आणि असा मार खाऊन सरळ होण्याऐवजी मिश्रचेतनांबरोबर झालेल्या दोषांसाठी माफी मागत राहिलात तर हलके वाटू लागेल. मुले, पत्नी, आई, वडील हे सगळे मिश्रचेतनच आहेत. त्या सर्वांसाठी प्रतिक्रमणे करा. आज्ञांमागे ज्ञानी पुरुषांचे वचनबळ काम करत असते, म्हणून तुमचे काम पार पडते.

आता आजपासून पाहत-पाहत शेवटी लहानपणापर्यंत आत पाहत राहा. पाहता-पाहता या वर्षीपासून, मागच्या वर्षात, त्याच्या मागच्या वर्षात, असे करत करत शेवटपर्यंतचे सर्व दिसेल. लहानपणापासून आजपर्यंतचे पाहा किंवा आजपासून लहानपणापर्यंतचे पाहा. कुठला तरी एक अभ्यास (सराव) करत राहा. आत्म्याद्वारे आत पाहा, अडकलात तरी पण पाहत राहा, मग पुढचे दिसत जाईल. कित्येकदा अंतराय नसतात, आणि जर कोणाला असतील तर तो अडकून पडेल. ज्याचे अंतराय कमी असतील, त्याला सर्व दिसू लागेल. लहानपणापासून आजपर्यंतचे सर्व दिसेल. जे जे काही केले असेल ते सर्वच दिसेल.

## सामायिकची विधी

(ज्ञान साक्षात्कार प्राप्त झाल्यानंतर)

**नीरू बहन :** हे दादा भगवान, हे श्री सीमंधर स्वामी प्रभू, मला शुद्ध उपयोगपूर्वक, संपूर्ण आयुष्यात झालेल्या, विषयविकार संबंधित दोषांची सामायिक आणि प्रतिक्रमण करण्याची शक्ती द्या.

**दादाश्री :** दोषांना पाहण्याची शक्ती.

**नीरू बहन :** मला विषयविकार संबंधित झालेल्या दोषांना पाहण्याची शक्ती द्या.

मी मन-वचन-काया, माझ्या नावाची सर्व माया, भावकर्म-द्रव्यकर्म-नोकर्म, आपण प्रकट परमात्मा स्वरूप प्रभूंच्या श्रीचरणांशी समर्पित करीत आहे.

**दादाश्री :** मी शुद्धात्मा आहे. (5)

मी विशुद्धात्मा आहे.

मी परम ज्योती स्वरूप सिद्ध भगवान आहे.

मी मन-वचन-काया यापासून पूर्ण वेगळा असा शुद्धात्मा आहे.

मी भावकर्मांपासून मुक्त असा शुद्धात्मा आहे.

मी द्रव्यकर्मांपासून मुक्त असा शुद्धात्मा आहे.

मी नोकर्मांपासून मुक्त असा शुद्धात्मा आहे.

मी अनंत ज्ञानवाला आहे. (5)

मी अनंत दर्शनवाला आहे. (5)

मी अनंत शक्तीवाला आहे. (5)

मी अनंत सुखांचे धाम आहे. (5)

मी शुद्धात्मा आहे. (5)

आता आतमध्ये खोल जायला सुरुवात करा.

(सामायिक केल्यानंतर...)

**प्रश्नकर्ता :** सामायिक तर अतिशय उपयोगी आहे, खूप कामी येईल अशी आहे.

**दादाश्री :** एकट्याने जसे व्हायला हवे तसे होत नाही. पण मी तुमच्याकडून म्हणवून घेतो म्हणून आतमध्ये सर्व वेगळे होऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** प्रथमच ही सामायिक केली. खूप छान वाटले!

**दादाश्री :** हो, आता सर्व मार्गी लागेल. आणि आपली ही सामायिक म्हणजे तर आत्म्याला-वस्तूला प्रत्यक्ष करणे. ही आत्म्याची सामायिक आहे. याच्यात पुद्‌गलाचा काहीच संबंध नाही. पुद्‌गलाचे काहीच देणेघेणे नाही. पुद्‌गलाचे ज्ञाता राहून काम करील, अशी ही सामायिक आहे. असे कधी दिसले नव्हते ना?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** आता तर हे नवीन-नवीन आहे. कदाचित कोणाची नीट झालीही नसेल, पण हा एक उत्तम उपाय आहे.

तुम्हाला कुठपर्यंतचे दिसले?

**प्रश्नकर्ता :** लहानपणापासून ते आत्तापर्यंतचे.

**दादाश्री :** सर्व काही दिसते, अगदी फोटोसह दिसते. कोणाला चिमटा काढला असेल, तेही दिसते. कोणाला चावले असेल, तेही दिसते.

(नव्या मुमुक्षुला) तुम्ही खंत करू नका. तुम्हाला दिसणार नाही, कारण मी तुम्हाला अजून दृष्टी दिलेली नाही ना. मी तुम्हाला दृष्टी देईन मग तुम्हाला दिसू लागेल. सगळे इथे बसलेले असतील तेव्हा तुम्ही कुठे जाऊन बसाल?

**प्रश्नकर्ता :** पाहण्याचा प्रयत्न केला.

**दादाश्री :** हो, बरोबर आहे. नाही तर तुम्हाला वाटेल दादांनी मला या जंगलात आणून का बरे सोडले?

## सामायिकमध्ये तऱ्हेतऱ्हेचे अनुभव

**दादाश्री :** प्रथमच केली का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** आता अशी सामायिक दुसरे लोक किंवा कोणी साधू-संन्यासी करू शकत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** आज इथे आम्ही जी सामायिक केली ती खूप पॉवरफुल टेक्निक (शक्तीशाली वैज्ञानिक पद्धत) आहे.

**दादाश्री :** ही सामायिक नाही, हा तर आमचा शोध आहे. सामायिक म्हणजे समतेत राहणे. राग-द्वेष होऊ न देणे. ते तर तुम्हाला पूर्ण दिवस असतेच ना! तुम्हाला तर दिवसभर सामायिकच आहे. तुम्हाला राग-द्वेष होतच नाहीत, म्हणून पूर्ण दिवस, दररोज तुमची सामायिकच चालू असते.

जेव्हा तुम्ही आपल्या आतमध्ये पाहिले तेव्हा आत्मा कसा झाला! त्याची किती शक्ती आहे! त्यावेळी तुम्ही नव्हते चंदुभाई, नव्हते कोणाचे पती, नव्हते कोणाचेच कोणी, म्हणून तर सर्व दिसले. नाही तर पती होऊन बसतो, मग तो आंधळा काय बघू शकेल? त्यासाठी तर फुल लाइट (पूर्ण प्रकाश) हवा.

जर आठवायचा प्रयत्न केला तर त्यातला एक पण पर्याय आठवणार नाही. आणि यात (सामायिकमध्ये) तर तुम्ही ते सर्व पर्याय पाहिलेत

ना! नाही तर स्मृती तर इतक्या वेगाने पाहूच शकत नाही. हे तर लहानपणी असे झाले होते, नंतर थोडे-मोठे झाल्यावर असे झाले होते, नंतर या, या वयात असे झाले होते... सगळे दिसतच जाते.

आता हे जे दिसते, ते प्रत्येकाला वेगवेगळे दिसते. काही जणांना एकदम स्पष्ट दिसते. काही जणांना जरा आवरण असलेले दिसते. म्हणजे त्यात फरक असतो.

**प्रश्नकर्ता :** सामायिकमध्ये पहिल्या 15-20 मिनिटातच सर्व फिल्म संपली.

**दादाश्री :** हो, संपून जाते.

**प्रश्नकर्ता :** मग नंतर काय करावे?

**दादाश्री :** नंतर तसेच स्थिर राहावे, त्याला काही हरकत नाही, किंवा दुसऱ्या एखाद्या उपयोगात राहावे.

**प्रश्नकर्ता :** नंतर मी तीच फिल्म दोनदा पाहिली.

**दादाश्री :** त्यालाही हरकत नाही, चांगलेच आहे. जितके पाहता येईल, तितका स्वच्छ करायला वेळ मिळेल ना! हा तर शुद्ध-स्वच्छ-प्युअर आत्मा आहे.

तसे तर आपण दोषांची आठवण करू लागलो तर त्यातील काहीच आठवत नाहीत आणि सामायिकमध्ये सर्व आपोआपच दिसते म्हणजे दोष पाहणारा तो 'ज्ञाता-द्रष्टा' आत्मा होता. म्हणजे आत्मा तुम्हाला पाहतो की तुम्ही काय करत आहात.

आणखी कोणाला सामायिकचा अनुभव सांगायचा आहे का?

**प्रश्नकर्ता :** एकदम शांत वाटले. पुष्कळ दोष दिसले.

**दादाश्री :** जितके दोष दिसले, तितके गेले. अजून काही छोटे-छोटे शिल्लक असतील, तर तुम्ही पुन्हा जेव्हा असे सामायिक कराल तेव्हा तेही निघून जातील.

मग तुम्हाला काही दिसले का?

**प्रश्नकर्ता :** हो, लहानपणापासून आत्तापर्यंतचे सर्व दोष दिसले आणि आता माझी एक विशेष प्रार्थना आहे की पुन्हा कधी विषयसंबंधी असे दोष होऊ नयेत, असे काही तरी तुम्ही करा.

**दादाश्री :** हो, असे करू. पण किती वर्षापर्यंतचे दिसले?

**प्रश्नकर्ता :** लहानपणापासूनचे.

**दादाश्री :** लहानपणापासून आजपर्यंतचे सर्व दोष दिसले! हे तर फारच छान!

त्यांना पाहणारा ज्ञाता-द्रष्टा आत्मा आहे, हा आत्मा दिसला! तुम्ही जर सरळ आठवायला गेले तर एकही (दोष) आठवणार नाही. पण इथे हे सर्व दिसले. खूप झाले. चला, जेवढे दिसले तेवढे गेले, ते आता परत येणार नाहीत.

## तेव्हा मनाचे अस्तित्व नसते

**प्रश्नकर्ता :** जेव्हा (सामायिकमध्ये) स्वत:ची फिल्म पाहत असतो आणि त्यावेळी त्यात मन गुंतू लागते, चांगले वाटू लागते पण तेव्हा जर काही चुकीचे केले आहे किंवा वाईट झाले आहे असा भाव आला नाही तर ते ठीक आहे का?

**दादाश्री :** सामायिक करते वेळी मन नसतेच मुळी. मनाचे अस्तित्वच नसते. यात तर फक्त पाहायचेच होते. चांगले किंवा वाईट असे काही पाहायचे नाही, फक्त पाहायचेच होते.

**प्रश्नकर्ता :** पाहून मी माफी मागतो असे म्हणायची गरज नाही का?

**दादाश्री :** प्रतिक्रमण ही वेगळी गोष्ट आहे. पण थांबले होते, असले काही म्हणू नये. यात थांबणारे काही नसतेच. ही मनाची क्रिया नाही, ही तर आत्म्याची क्रिया आहे. ही आत्म्याची क्रिया आहे त्यामुळे असे सर्व दिसते, त्यात मनाचे काहीच देणेघेणे नाही.

## त्यात दिसते आत्म्याचे चारित्र्य

**प्रश्नकर्ता :** एकदा प्रतिक्रमण केले तरी पुन्हा येत राहील का?

**दादाश्री :** खूप मोठा (दोष) असेल तर येत राहील. खूप मोठा असेल तर शेवटपर्यंत राहील. म्हणून तर पुन्हा पुन्हा करा आणि संपेपर्यंत करतच राहा. आणि या सामायिकमध्ये तुम्हाला आत्म्याचे चारित्र्य पाहायला मिळाले ना! याला चारित्र्य असे म्हणतात, शुद्ध चारित्र्य म्हणतात!

ज्यांना ज्यांना नीट दिसले असेल त्यांनी बोट वर करा. तुम्हाला पण दिसले? पाटीदाराला सुद्धा दिसले?

**प्रश्नकर्ता :** स्पष्ट दिसले.

**दादाश्री :** साप दिसला तर त्याला मारल्याशिवाय सोडत नाहीत असे हे पाटीदार, त्यांना पण दिसले, म्हणजे पाहा, कसा आत्मा प्राप्त झाला आहे!

हे जगाचे आश्चर्य आहे! पुनिया श्रावकाची एका तासाची सामायिक, ज्यासाठी श्रेणिक राजाचे संपूर्ण राज्य फक्त दलालीतच जाते, तर मग त्या एका तासाची किंमत किती? दादांनी हे काय दिले आहे ते तुम्हाला समजले ना?

## नंतर खणणे सुरूच होते, आपोआप

तुम्ही संपूर्ण दिवस माझ्याबरोबर बसला आहात, तर काही नुकसान तर झाले नाही ना?

**प्रश्नकर्ता :** काही नुकसान झाले नाही.

**दादाश्री :** मग माझ्याबरोबरच का फिरत नाही? एरवी जगभर भटकत असता तर मग इथे भटकण्यात काय अडचण आहे?

**प्रश्नकर्ता :** त्याला तर खूप उत्तम भटकणे म्हणावे लागेल. याला भटकणे म्हणता येणार नाही.

**दादाश्री :** पूर्ण ब्रह्मांडाचे राज्य दिले आहे. जे साधू-आचार्य यांना पण दुर्लभ आहे ते तुम्हाला दिले आहे.

'मी शुद्धात्मा आहे' असे करून पतंग उडविला. या पूर्वीही इथे हिंसेसाठी सामायिक करवून घेतली होती. तेव्हा घरी गेल्यावर सुद्धा, संडासमध्ये गेल्यावर सुद्धा, सतत हिंसेचेच दोष दिसत होते, बंदच होत नव्हते. तीन दिवस चालूच होते. सतत खणणे चालूच होते. मग परत विधी करून बंद केले.

## अठ्ठेचाळीस मिनिटेच का?

**प्रश्नकर्ता :** तुमच्या गैरहजेरीत कोणाच्या आज्ञेने सामायिक करावी?

**दादाश्री :** आम्ही गैरहजर नसतोच. आम्ही तिथे हजरच असतो. तुमच्या येथे तर गैरहजर नसतोच नसतो. तुम्ही तर खूपच सावध आहात, एकदम पक्के!

**प्रश्नकर्ता :** सामायिक कमीत कमी किती वेळ करावी?

**दादाश्री :** कमीत कमी 8 मिनिटे आणि जास्तीत जास्त 50 मिनिटे.

**प्रश्नकर्ता :** ही जी सकाळी सामायिक करतो ना तेव्हा 50 मिनिटानंतर सुख उसळू लागते!

**दादाश्री :** लागणारच ना! कारण दिलेला आत्मा आहे आणि अचल आत्मा आहे. लोकांकडे तर चंचल आत्मा आहे आणि तुम्ही तर आत्मस्वरूप होऊन सामायिक करता, म्हणून आश्चर्यकारक आनंद वाटतो. जेवढे जास्त स्थैर्य उत्पन्न होते, तेवढे जास्त सुख मिळते.

**प्रश्नकर्ता :** सामायिक अठ्ठेचाळीस मिनिटांचीच का ठेवली आहे?

**दादाश्री :** हो, सत्तेचाळीस नाही, तर अठ्ठेचाळीस मिनिटे! अरे, जर एक दिवस अठ्ठेचाळीस मिनिटे सामायिक झाली तर आत्मा एकदम प्रखर झाला, फुल टेस्टेड!

आठ मिनिटांसाठी ज्याचे मन-वचन-काया बंद होतात, त्याला भगवंतांनी सामायिकची सुरुवात असे म्हटले आहे. आणि आठपासून अठ्ठेचाळीस मिनिटांपर्यंत जर असे राहिले तर त्याला सामायिक म्हटले आहे. अठ्ठेचाळीस मिनिटांहून जास्त तर कोणालाच जमू शकत नाही. आत्म्यातच राहणे म्हणजे सामायिक.

## 'अक्रम' मार्गाची सामायिक

**प्रश्नकर्ता :** सामायिकमध्ये विचार येतात आणि सोबत 'दादा भगवान यांचा असीम जय जयकार असो' असेही चालू असते, तर हे काय आहे?

**दादाश्री :** जर शेजारच्या एखाद्याच्या तेलाच्या घाणीचा आवाज येत असेल आणि तुम्ही इथे सूत कातत असाल तर तुम्ही काय कराल? तसेच हे मनाचे चक्र चालूच राहील. तुम्ही फक्त ते पाहत राहा. चांगले विचार किंवा वाईट विचार फक्त पाहत राहा. शेजाऱ्यांचे बोलणे आपल्याला बंद करता येते का? त्यापासून घाबरायचे कारण नाही. समजा तुम्ही इथे सत्संगात बसले असाल किंवा तुमच्या स्टडी रूममध्ये बसला असाल, आणि जर बाहेर हुल्लड माजली तर तिच्याशी तुमचा काय संबंध? मन ज्ञेय झाले आणि तुम्ही ज्ञाता झालात, म्हणजे मन तुमच्या ताब्यात आले. 'आम्हाला' पण मन असते, मोक्षाला जाईपर्यंत मन तर असते. पण आमचे मन कसे असते? सेकंदाच्या काट्यासारखे फिरत राहते, थांबत नाही. आमचे मन संपलेले असते. त्याचे 'ज्ञाता-द्रष्टा' झाल्यावर ते संपून जाते.

**प्रश्नकर्ता :** व्यवहार सामायिक आणि निश्चय सामायिक यात काय फरक आहे? यात हितकारी कोणती?

**दादाश्री :** निश्चय सामायिक! व्यवहार सामायिक ही मनाने होते आणि निश्चय सामायिक आत्म्याने होते. मनाला एकाग्र करणे, त्याला बाहेर धावाधाव करू न देणे, म्हणजे व्यवहार सामायिक.

**प्रश्नकर्ता :** व्यवहार सामायिकचे फळ काय?

**दादाश्री :** पुण्यानुबंधी पुण्य. निश्चय सामायिक, ती तुम्हाला तुम्ही शुद्धात्मा आहात असे पुन्हा पुन्हा ठसविते. आणि मग विषयविकारसंबंधित दोष दिसतात. मग वयाच्या 35 साव्या वर्षापासून 34, 33 असे करत करत विषयविकारांची सुरुवात झाली तेव्हापर्यंतचे सर्व दिसू लागते. मग हिंसेसंबंधित, इतर कषायांसंबंधित, यात फक्त आत्माच असतो. मन, बुद्धी, चित्त, अहंकार सर्व आयडल (निष्क्रिय) राहतात.

'पाहत राहणे' याला सामायिक म्हणतात आणि याला सामायिक प्रतिक्रमण म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** फक्त सामायिक करून धुतले जाते की प्रतिक्रमण पण करावे लागते?

**दादाश्री :** प्रतिक्रमण करावे लागते. याला सामायिक प्रतिक्रमण म्हणतात. सामायिक म्हणजे बाहेरचा व्यवहार बंद आणि प्रतिक्रमण म्हणजे आतील सुरू.

**प्रश्नकर्ता :** आम्ही सर्व एकत्र येऊन सामायिक करतो, तर त्यात प्रत्येक वेळी काय करायचे आहे?

**दादाश्री :** विषयविकारासाठी जास्त करा. प्रथम विषयासाठी प्रतिक्रमण करा. ते त्याला शेवटपर्यंत घेऊन जाईल. मग ऋणानुबंधांसाठी घ्या. ऋणानुबंध म्हणजे आपल्याला जे जे भेटले आहेत त्या सगळ्यांना आठवून प्रतिक्रमण करा. मग हिंसेसंबंधित दोष पाहा, त्यामुळे हिंसेचे परमाणू संपून जातील. ब्रह्मचर्याचे सामायिक करा, त्यामुळे अब्रह्मचर्याचे परमाणू संपून जातील.

ग्रंथी आहेत असे समजते पण प्रत्यक्ष व्यवहारात त्या समजत नाहीत. म्हणून आम्ही त्या ग्रंथीला सामायिकमध्ये पाहा असे सांगतो. एक ग्रंथी सामायिकमध्ये विरघळून घेण्यासाठी घेतो पण तोपर्यंत आतून दुसऱ्या ग्रंथी फुटतात, असे विचार येऊ लागतात की जे त्या ग्रंथीवर उपयोग राहू देत नाहीत. मग त्या वेळी जे दिसते ते पाहत राहा.

**प्रश्नकर्ता :** या सामायिक-प्रतिक्रमणात दोष पाहिले आणि त्यासाठी प्रतिक्रमण केले तरी पण त्या दोषांचे फळ तर भोगावेच लागेल ना?

**दादाश्री :** नाही, ते धुतले जातील. काही चिकट दोष असतील तर ते राहतील पण कसे, तर भिंतीला चिकटून राहतील पण त्यांना जरा असा स्पर्श करताच ते सुटतील.

**प्रश्नकर्ता :** सामायिकमध्ये जी दृश्ये दिसतात त्या वेळी त्यांचे प्रतिक्रमण कसे करावे?

**दादाश्री :** सामायिकमध्ये जी दृश्ये दिसतात त्यांचे प्रतिक्रमण करण्याची गरज नाही. जी दिसली ती तर गेली (संपली). प्रतिक्रमण तर जी दिसली नाहीत (द्रष्टा होऊन पाहिले नाही, दुसऱ्यांना दुःख दिले), अशा गोष्टींसाठी करायचे असते. जे दृश्य पाहिले ते तर गेले. पाहिले म्हणजे स्वच्छ झाले.

**प्रश्नकर्ता :** पण ते परतही दिसतात ना?

**दादाश्री :** परत दिसतात ती दुसरी असतात. जसा कांद्याचा एक थर दिसला की पाहिल्याने तो निघून जातो, पण परत कांदा कांद्यासारखाच दिसतो.

**प्रश्नकर्ता :** पण तीच तीच दृश्ये दिसतात ना?

**दादाश्री :** नाही, तीच दृश्ये दिसत नाहीत. तीच दृश्ये दोनदा दिसत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** एखाद्या जीवाशी शत्रुत्व असेल, त्याचे प्रतिक्रमण केले, तर मग परत त्याच जीवाचे प्रतिक्रमण करणे शिल्लक राहते का?

**दादाश्री :** हो, तुमचा मोठा दोष होता, प्रतिक्रमण केल्यामुळे एक थर कमी झाला. अजून तर लाखो थर आहेत, ते कमी कमी होत आहेत. म्हणजेच जोपर्यंत सर्व थर संपत नाहीत, तोपर्यंत प्रतिक्रमणे करावी लागतील. एखाद्या व्यक्तीबरोबरचा सर्व हिशोब महिना-दोन

महिने प्रतिक्रमण करून संपतो. एखाद्या व्यक्तीचा हिशोब आयुष्यभर चालत राहतो, (कारण) गाठ खूप मोठी असते. कांद्याचा एक थर काढल्यावर परत कांदा जसाच्या तसाच दिसतो ना? त्याचप्रमाणे या दोषांचे पण थर असतात, पण एकदा प्रतिक्रमण केल्याने एक थर निघूनच जातो. मग त्यासाठी तुम्हाला परत प्रतिक्रमण करावे लागत नाही. एका थरासाठी एकच वेळ प्रतिक्रमण करावे लागते.

## हजर-गैरहजर असल्याचा परिणाम

**प्रश्नकर्ता :** आम्ही ही जी सामायिक आणि प्रतिक्रमण करतो, त्यात जे अनुभव येतात, ते दादाजींची हजेरी आहे म्हणून होतात का एरवीही येऊ शकतात?

**दादाश्री :** नाही, दादाजींची हजेरी असेल तर जास्त चांगले होते. बाहेरचा कसलाच स्पर्श होत नाही आणि वातावरण खूप उच्च प्रकारचे असते! आणि मी जे करतो, 'मी शुद्धात्मा आहे' असे पाच-सहा वेळा म्हणतो त्यामुळे चांगला परिणाम होतो. आमचे शब्द खूप काम करतात.

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी नसतील तरीसुद्धा काहीतरी परिणाम होणारच ना?

**दादाश्री :** करू शकता, करू शकता, पण थोडेसे कमी जास्त होते एवढेच. दोन मिनिटांसाठी (अनुभव) झाला तरी खूप आहे! कोणाला लगेच अनुभव येतो. आपल्या इथे जी सामायिक करवून घेतात ना, तो खूप मोठा पुरुषार्थ आहे. ही सामायिक म्हणजे आत्म्याची व्हिटॅमिन आहे. जसे व्यवहारात शरीराला व्हिटॅमिन घ्यावी लागतात, तसेच हे आत्म्याचे व्हिटॅमिन आहे! आणि तुम्हाला तर संपूर्ण दिवस सामायिक, संपूर्ण आयुष्यभर सामायिकच असते. गाडी चालवताना सुद्धा सामायिक राहते की नाही? तर असे असावे. आत्मा स्वत:च सामायिक आहे. शक्ती तर अनंत आहेत, पण प्रकट झालेल्या नाहीत.

## 'वेगळेपणा'ची सामायिक

आज वेगळेपण ठेवण्यासाठी सामायिक सांगतो. चंदुभाई आणि

शुद्धात्मा यांना वेगळे ठेवण्यासाठी ही सर्वात उत्कृष्ट पद्धत आहे. त्या सामायिकमध्ये तुम्ही या प्रकारे बोलत राहा.

1. 'हे शुद्धात्मा भगवान! तुम्ही वेगळे आहात आणि चंदुभाई वेगळे आहेत.'

2. 'हे शुद्धात्मा भगवान! तुम्ही रियल आहात आणि चंदुभाई रिलेटिव्ह आहे.'

3. 'हे शुद्धात्मा भगवान! तुम्ही पर्मनन्ट आहात आणि चंदुभाई टेम्परारी आहेत.'

असे 48 मिनिटे बोलत राहावे.

'मी' आणि 'चंदुभाई' दोघेही वेगळेच आहोत, अशी वेगळे राहण्याची मला शक्ती द्या. मला तुमच्याप्रमाणे वेगळे राहण्याची शक्ती द्या, आणि चंदुभाई वेगळे राहोत. हे दादा भगवान! तुमच्या कृपेचा वर्षाव होवो. 'चंदुभाई काय करत आहेत?' ते 'पाहणे' आणि 'जाणणे' एवढेच माझे काम.

यासाठी तुम्हाला ज्या शक्ती कमी पडत असतील, त्या तुम्ही सामायिकमध्ये शुद्धात्मा भगवान यांच्याकडून मागू शकता. यामुळे आत सर्व एकदम वेगळेच होऊन जाईल. दिवसभरात जेव्हा जेव्हा आठवण येईल तेव्हा तेव्हा ही तीन वाक्ये पाच-पंचवीस वेळा म्हणालात तरी लगेच आत सगळे वेगळे होईल आणि सर्व क्लियर (स्वच्छ) होईल.

## आरसा सामायिक

आरशात चंदुभाई दिसतात. त्यात एक आत्मा आहे आणि समोर जे उभे आहेत ते चंदुभाई आहेत. तुम्ही म्हणावे, 'चंदुभाई, किती दिवस अशा चुका करत राहाल?' 'तुम्हाला जरा रागावयालाच हवे.' असेही म्हणावे.

तुम्ही कधी आरशात पाहून चंदुभाईला रागावता का? तुम्ही चंदुभाईंना आरशासमोर बसवून म्हणावे की, 'तुम्ही पुस्तके छापून घेतली,

ज्ञानदान केले, हे तर खूप चांगले काम केले, पण त्याशिवाय तुम्ही असे करता, तसे करता, असे कशासाठी करता?' असे तुम्हीच तुम्हाला सांगावे लागेल की नाही? का फक्त दादाच वारंवार सांगत राहणार? त्याऐवजी तुम्ही पण सांगाल तर तो जास्त ऐकणार, तुमचे जास्त ऐकणार! मी सांगितले तर तुम्हाला काय वाटेल? की दादा माझ्या आसपासच्या लोकांना तर काहीच सांगत नाहीत, फक्त मलाच का बोलतात? म्हणून तुम्हीच तुम्हाला रागवायला हवे.

दुसऱ्यांच्या चुका काढणे तर पुष्कळ जमते पण स्वत:ची एक पण चूक काढायला जमत नाही. आणि तुम्हाला तर चुका काढायच्या नाहीत, तुम्हाला फक्त 'चंदुभाई'ला जरा रागवायचे आहे. 'तुम्ही' तर 'चंदुभाई'च्या सर्व चुका जाणता. म्हणून आता 'तुम्ही' 'चंदुभाई'ला रागे भरायचे आहे, तसे तर 'चंदुभाई' 'मानी' पण तितकेच आहेत, सर्व तऱ्हेने 'मानवाले' आहेत. म्हणून त्यांना जरा पटवले तर सर्व काम पार पडेल.

आता हा रागावण्याचा अभ्यास (सराव) कधी करू शकता? तुम्ही घरी एक-दोन जण रागावणारे ठेवू शकता पण ते काही खरोखर रागावणारे नसतात ना! खरोखर रागावणारे असतील तरच परिणाम होईल. नाही तर खोटे, बनावट रागावणारा असेल तर परिणाम होणार नाही. तुम्हाला कोणी रागावणारा असेल तर तुम्ही त्याचा लाभ घेतला पाहिजे. पण असे आयोजन करता येत नाही ना?

**प्रश्नकर्ता :** रागावणारे असतील ते तर आम्हाला आवडत नाहीत.

**दादाश्री :** ते आवडत नाहीत, परंतु जर रोज रागावणारे भेटले तर आपल्याला निकाल करता यायला हवा ना, की ही तर रोजचीच कटकट आहे. असे कसे चालेल? त्याऐवजी आपण आपल्या 'गुहेत' (आत्म्यात)च शिरावे ना!

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता की, 'मी जीव नाही, पण शिव आहे.' पण असे वेगळेपण होत नाही ना?

**दादाश्री :** पुद्‌गल आपला भाव सोडत नाही ना! ते आपले हक्क

का सोडील? म्हणून त्याला समजावून-उमजावून, पटवून-पटवून, आपण आपले काम करून घ्यायला हवे. कारण पुद्‌गल तर भोळे आहे. 'पुद्‌गलाचा' स्वभाव कसा आहे? भोळा आहे. या प्रकारे गोडी गुलाबीने ते आपल्या ताब्यात येईल. 'जीवभाव' आणि 'शिवभाव' दोन्ही वेगळेच आहेत ना! आता जेव्हा जीवभावात येईल तेव्हा ते बटाटेवडे वगैरे सर्व खाईल आणि शिवभावात येईल तेव्हा दर्शन करील!

**प्रश्नकर्ता :** पण जीवाचे मन स्वतंत्र आहे का?

**दादाश्री :** हो, बिलकुल स्वतंत्र आहे. कधी मन तुमचा विरोध करते असे तुम्ही अनुभवले आहे की नाही? अरे, मन जर 'माझे' असेल तर ते माझ्या विरोधात कसे जाईल? ते जेव्हा विरोध करील, तेव्हा लक्षात येईल की ते स्वतंत्र आहे की नाही!

**प्रश्नकर्ता :** वाणीवर कंट्रोल नाही म्हणून मनावर पण कंट्रोल नाही.

**दादाश्री :** जे जे विरोध करतात त्यांच्यावर आपला कंट्रोल नाही. पूर्वी तर तुम्ही 'मी जीव आहे' असे मानत होता. आता तो अभिप्राय गेला आहे, आणि 'मी शिव आहे' हे समजले आहे. पण तरीही जीव आपला भाव सोडणार नाही, त्याचा हक्क वगैरे तो अजिबात सोडणार नाही. पण त्याला पटवले तर तो सर्व काही सोडून देईल असे आहे. ज्या प्रकारे कुसंगाच्या प्रभावाने कुसंगी होतो आणि सत्संगाच्या प्रभावाने सत्संगी होतो, त्याच प्रकारे जर त्याला समजावले तर सर्व काही सोडून देईल, असा तो समजदारही आहे. आता तुम्ही काय करायला हवे की, चंदुभाईला बसवून, चंदुभाईबरोबर वार्तलाप करावा लागेल की वयाच्या 67 व्या वर्षी सुद्धा तुम्ही रोज सत्संगात येता, ते व्यवस्थित लक्षात ठेवून येता ही खूप चांगली गोष्ट आहे!' पण त्याचबरोबर त्यांना तुम्ही हे पण समजवावे, सल्ला द्यावा की, 'शरीराकडे इतके लक्ष का देता? शरीरात असे होते, तसे होते, तर होऊ द्या ना. तुम्ही आमच्याबरोबर या टेबलावर या ना. आमच्याजवळ अपार सुख आहे.' असे तुम्ही चंदुभाईला सांगायला

हवे. चंदुभाईला जर असे आरशासमोर बसवले तर चंदुभाई 'एक्झॅक्ट' दिसतील की नाही?

**प्रश्नकर्ता :** आतमध्ये तर मी तासन्‌तास वार्तालाप करतो.

**दादाश्री :** पण आत वार्तालाप करता-करता, ते अन्य फोन पण घेतात. म्हणून त्यांना समोर बसवून मोठ्याने त्यांच्याशी वार्तालाप करायला हवा. म्हणजे ते इतर फोन घेणारच नाहीत!

**प्रश्नकर्ता :** स्वत:ला समोर कसे बसवावे?

**दादाश्री :** तुम्ही जर 'चंदुभाईला' समोर बसवून त्याच्यावर रागावलात, तर 'चंदुभाई' खूप समजदार होतील. तुम्ही स्वत:च जर रागावलात की, 'चंदुभाई, असे असते का? तुम्ही हे काय चालविले आहे? आणि केलेत तर केलेत, आता तरी सरळ वागा ना?' असे तुम्ही म्हटलेत तर त्यात काय वाईट आहे? दुसरे कोणी रागावले तर चांगले वाटेल का? म्हणून आम्ही तुम्हाला 'चंदुभाई'ला रागावयास सांगतो, नाही तर पूर्ण अंधारच चालू राहील! हे पुद्‌गल काय म्हणते, 'तुम्ही शुद्धात्मा झालात, पण आमचे काय?' ते दावा करते की त्याला पण पूर्ण हक्क आहे. त्याची पण इच्छा असते की 'आम्हाला पण काहीतरी हवे आहे.' म्हणून त्याला समजून सांगायला हवे. पुद्‌गल तर भोळे आहे. भोळे असे की मूर्खाची संगत मिळाली की मूर्ख बनते आणि समजदाराची संगत मिळाली की समजदार होते. चोराची संगत मिळाली की चोर होते! जसा संग, तसा रंग! पण तरी ते आपला हक्क सोडून देईल, असे नसते.

तुम्ही 'चंदुभाई'ला समोर बसवून असा प्रयोग करायला हवा. आरशात तर चेहरा वगैरे सर्व दिसते. मग आपण 'चंदुभाई'ला म्हणायला हवे की 'तुम्ही असे का केलेत? तुम्ही असे करता कामा नये. बायकोबरोबर सारखे मतभेद का होतात? मग तुम्ही लग्नच का केलेत? लग्न केल्यानंतर असे वागणे बरोबर आहे का?' असे सगळे बोलायला हवे. आरशासमोर बसून जर तासभर अशी खरडपट्टी काढलीत, तर खूप

शक्ती वाढेल. ही खूप मोठी सामायिक आहे. तुम्हाला 'चंदुभाई'च्या सर्व चुका समजतात ना? जेवढ्या चुका दिसल्या तेवढ्या चुका 'चंदुभाई'ला आरशासमोर एक तासभर बसवून सांगितल्यात तर ती खूप मोठी सामायिक!

**प्रश्नकर्ता :** आम्ही आरशासमोर न बसता असाच एकांतात बसून मनाशी वार्तालाप केला तर हे होऊ शकणार नाही का?

**दादाश्री :** नाही, तसे होणार नाही. यासाठी तर आरशात तुम्हाला 'चंदुभाई' दिसायला हवेत. एकटे-एकटे मनातल्या मनात केलेत तर करता येणार नाही. एकटे-एकटे करणे हे 'ज्ञानी पुरुषां'चे काम आहे. पण तुम्हाला तर असे बालभाषेत शिकवायला हवे ना? आणि हा जो आरसा आहे तो चांगला आहे, नाही तर लाख रुपयांचा आरसा विकत आणावा लागला असता. हे तर स्वस्त आरसे आहेत! ऋषभदेव भगवंतांच्या वेळी तर फक्त भरत चक्रवर्ती महाराजांनीच आरसाभवन (काचेचा महल) बांधले होते! आणि आता तर मोठेमोठे आरसे सर्वत्रच पाहायला मिळतात!

ही सगळी परमाणूंची थियरी आहे. जर आरशासमोर बसून केलेत तर तुमचे पुष्कळसे काम होऊ शकते. पण कोणी करत नाही ना? जेव्हा आम्ही म्हणतो, तेव्हा एक-दोन वेळा करतात आणि नंतर परत विसरून जातात.

भरत राजाला ऋषभदेव भगवंतांनी 'अक्रम ज्ञान' दिले. पण शेवटी जेव्हा त्यांनी आरसाभवनाचा आसरा घेतला तेव्हा कुठे त्यांचे काम झाले. आरसाभवनमध्ये एका बोटाची अंगठी निघाली होती ते त्यांना समजले आणि जेव्हा एक बोट रिकामे दिसले तेव्हा त्यांच्या लक्षात आले की इतर बोटे अशी दिसतात आणि हे एकच बोट वेगळे का दिसते? मग त्यांना समजले की या बोटातील अंगठी निघाल्यामुळे असे दिसत आहे. अंगठीमुळे बोट किती सुंदर दिसत होते. मग आत खूप मोठे (विचारांचे) वादळ सुरू झाले! ते थेट 'केवलज्ञान' होईपर्यंत थांबले नाही! खोल

विचारात शिरले की अंगठीमुळे बोट सुंदर दिसत होते? माझ्यामुळे नाही? मग उत्तर मिळाले की तुझ्यामुळे कसे काय? आणि नंतर 'हे माझे नाही, हे माझे नाही, हे माझे नाही' असे करत करत 'केवलज्ञान' प्राप्त झाले!!! म्हणून आपण आरसाभवनचा फायदा घ्यायला हवा. आपले 'हे' अक्रम विज्ञान आहे. जो कोणी याचा फायदा घेईल, त्याचे कार्य सिद्ध होईल. पण याची कोणाला माहितीच नाही ना? जरी तो आत्मा जाणत नसला तरीही आरसाभवनची सामायिक मात्र फार उत्तम होऊ शकते.

## ठपका सामायिक

आपल्या खोलीत जाऊन 'चंदुभाई, तू स्वत:ला काय समजतोस? तुझ्या डाव्या हाताने उजव्या गालावर थप्पड मार.' असे आपण म्हणावे. एका मुलाचा क्रोध कमी होत नव्हता. तेव्हा मी त्याला म्हटले, 'खरडपट्टी काढ, संपूर्ण दिवस बिचारा प्रतिक्रमण करत होता पण त्याचा काहीच उपयोग होत नव्हता, तो मुलगा जसाच्या तसा! काही फरक नाही.' मग मी त्याला म्हटले, 'चांगले रागाव.' तो म्हणाला 'कसे रागावू?' मी म्हटले, 'गच्चीवर जा आणि खूप खरडपट्टी काढ.' मग त्याने फाइल नं 1 ला असे काही झाडले, स्वतः शुद्धात्मा आणि फाइल नं 1 ला असे झाडले 'अरे, कोण समजतोस, तू स्वत:ला?' शेवटी तो रडू लागला. स्वत:च झाडणारा आणि स्वत:च रडणारा, मग आत्मा वेगळा झाला! खरडपट्टी काढल्यामुळे आत्मा वेगळा होतो.

म्हणून तू खोलीत बसून रागावत जा. आणि तुम्ही पण चांगलेच रागवा. ही ठपका सामायिक आमची आज्ञा घेऊनच करायची असते. तेव्हाच प्रज्ञा हजर होईल नाही तर दुसरेच काही तरी येऊन चिकटेल आणि परिस्थिती बिघडेल.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही जे प्रयोग करायला सांगता ना की, आरशासमोर बसून सामायिक करायची, मग प्रकृतीबरोबर वार्तालाप करायचा, तर जेव्हा तुम्ही ते प्रयोग सांगता तेव्हा छान वाटते, नंतर दोन-तीन दिवस चांगले चालते. मग त्यात थोडी उणीव भासू लागते.

**दादाश्री :** जेव्हा उणीव आली असे वाटते, तेव्हा परत नव्याने सुरू करा. जुने झाल्यावर उणीवा येतातच. तो पुद्‌गलाचा स्वभाव आहे, जुने झाले की बिघडत जाते. मग परत नव्याने करावे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे त्या प्रयोगाद्वारे जे कार्य सिद्ध व्हायला हवे ते होत नाही आणि तो प्रयोग मध्येच अपूर्ण राहतो.

**दादाश्री :** असे करत-करतच तो प्रयोग सिद्धीला जातो, ताबडतोब तर होतच नाही.

**प्रश्नकर्ता :** तो प्रयोग अपूर्ण राहिला म्हणून परत दुसरा प्रयोग करतो. तो अर्धवट ठेवून तिसरा करतो, अजूनही अपूर्णच आहे. म्हणजे सगळे प्रयोग अपूर्णच राहतात.

**दादाश्री :** तुम्ही ते सर्व प्रयोग परत हळूहळू पूर्ण करा. अजून पण प्रयोग पूर्ण झाला नाही का?

## सामायिक, 'होत नाही, होत नाही' यासाठी

**प्रश्नकर्ता :** माझ्याकडून सामायिक कधीच होत नाही.

**दादाश्री :** मग तुम्ही 'होत नाही, होत नाही', यासाठी सामायिक करा.

तुम्ही एका ध्यानात होता की दोन ध्यानात होता, एवढेच भगवंत विचारतात. हो, ते दोन ध्यानात नव्हते. एकाने 'होत नाही' असे ध्यान केले तर दुसऱ्याने 'होत आहे' असे ध्यान केले. यात दुसरे काही नाही. ही तर एकच गोष्ट आहे, इकडून पाहिले तरी आणि तिकडून पाहिले तरी. आपण या बाजूला वळलात तर पाठ या बाजूला आहे असे म्हटले जाईल आणि विरुद्ध बाजूला वळलात तर पाठ पलीकडच्या बाजूला आहे असे म्हटले जाईल. आम्ही तर 'होत नाही' असे उलट चालवतो. त्याच्या जागी जर मी असतो तर मी केव्हाच बसलो असतो. 'होत नाही, होत नाही' (म्हणून), त्यामुळे मग अंतराय वगैरे सगळे निघून जातील. अंतराय म्हणतील, 'यांना काही जिंकता येणार नाही.' हे तर उलटेच

फिरून बसले आहेत. ही दिशा उलटी पडली म्हणून आम्ही असे फिरलो. मग त्या दिशेने जेव्हा पुढे जाऊ तेव्हा हे उलटे होईल. तेव्हा मग त्या (उलट) बाजूला वळावे. दिशा बदलत राहतील. अर्थात हे सर्व एकच एक आहे. पण त्यात दोन होता कामा नये. तेव्हा घर आठवते असे होता कामा नये. 'होत नाही, होत नाही' याचेच ध्यान व्हायला हवे. कोणाला ध्यानामध्ये दादांचे सर्व केस पांढरे दिसतात, तर कोणाला दादांचे सर्व केस काळे दिसतात. त्याने काही बिघडत नाही. आपले काम काय आहे? तर ध्यानात एकाग्रता होती की नव्हती? ध्यान झाले असे कधी म्हणायचे? जर एकाग्रता झाली तर ते ध्यानच आहे. आणि हे सर्व राम-राम म्हणतात ते ध्यान नाही. याउलट या ध्यानाला तर दादाई ध्यान म्हणतात. हे तर आश्चर्यच आहे!

ध्यान करणारे 'चंदुभाई', ध्यानाचा अनुभव घेणारे 'चंदुभाई' आणि जाणणारा आत्मा, म्हणून तुम्ही जाणता की ठीक प्रकारे ध्यान 'होत नाही, होत नाही' आणि तो जाणतो की 'होत आहे, होत आहे.'

म्हणजेच सर्व मार्ग मोकळे आहेत. जर ज्ञान असेल तर सर्व मार्ग मोकळे आहेत आणि ज्ञान नसेल तर एकच मार्ग मोकळा आहे. जर दुसऱ्या मार्गाने गेला तर भ्रष्टाचार होईल.

## यात 'पाहणाऱ्याला' 'पाहिले'

सामायिकमध्ये 'तुम्ही' 'पाहणाऱ्या'ला पाहिले! अशा सामायिकमध्ये सर्व दोष धुतले जातात! सामायिकमध्ये तुम्ही स्वतः आत्मा आणि या पाहणाऱ्याला पण तुम्ही पाहिलेत, आतून! नाही तर सामान्य माणसांमध्ये इतकी आठवण करण्याची शक्ती नसतेच ना! आणि यात तर एकेक थर पाहून घेतो.

तुम्हाला आत असा थोडाफार आभास झाला की नाही? असे होय? काय सांगता! खूपच छान! आणि तुम्हाला आतमध्ये कसे वाटत आहे? थोडेसे मार्गावर आले होते का? हा तुम्हाला सामायिकचा लाभ मिळाला. कारण या सामायिकला तर आत्म-सामायिक म्हणतात. आणि

व्यवहार सामायिक म्हणजे काय? इतर सर्वजण जी सामायिक करतात ती मन स्थिर करायची सामायिक आहे. ती पण जर मन पूर्णपणे स्थिर झाले तर उत्तम, याउलट इथे तर मनाचा संबंधच नाही ना! ह्या सर्व तर पुनिया श्रावकाच्या सामायिक!

**प्रश्नकर्ता :** तुम्ही आता म्हणालात की या सामायिकमध्ये तो पाहणाऱ्याला पाहतो, ते जरा समजले नाही.

**दादाश्री :** आत्म्याशिवाय बुद्धीची पण शक्ती असते म्हणून ती बाहेरच्या गोष्टी पाहू शकते, संसारी गोष्टी पाहू शकते. आणि या सर्व दोषांना 'तो' पाहतो. म्हणजे ही जाणण्याची शक्ती आत्म्याची आहे. आत्मा स्व-पर प्रकाशक आहे, म्हणून तो पाहू शकतो. स्वत:ला पण पाहू शकतो आणि दुसऱ्यांना पण पाहू शकतो. स्व-पर प्रकाशक म्हणजे जगाला पण प्रकाशित करू शकतो आणि स्वत:ला पण प्रकाशित करू शकतो. दोन्ही गोष्टी पाहू शकतो.

**प्रश्नकर्ता :** पण तुम्ही तर म्हणालात की तो पाहणाऱ्याला पाहतो.

**दादाश्री :** हो, म्हणजे वास्तवात तिथे मूळ आत्माच काम करत असतो. म्हणून आम्ही वेगळे केले. जो स्व-पर प्रकाशक आहे तोच काम करत आहे. म्हणजे तुम्हाला आता खात्री पटली की आतमध्ये स्व-पर प्रकाशक आहे आणि तोच काम करत आहे, ते तुम्ही पाहिले. पाहणाऱ्याला पाहिले. पाहणाऱ्याला पाहण्यात दुसरा अभ्यास होत नाही. पण इथे तुमची खात्री पटली की हे कोणी पाहिले? आपण कोणाला शोधत आहोत? तर पाहणाऱ्याला. म्हणूनच म्हटले की तुम्ही त्या पाहणाऱ्याला पाहिलेत!

**प्रश्नकर्ता :** तुम्हाला चोवीस तास सामायिकच असते ना?

**दादाश्री :** हो, सामायिक तर असतेच. सामायिक तर स्वाभाविकच आहे ना! कारण आत्मा हाच सम आहे आणि तो स्वत:च सामायिक आहे. आत्मा स्वभावात आला तर ती सामायिक आहे. पण ज्ञानी पुरुष

तर सामायिकच्याही पुढे आहे. त्यांच्यात दुसरे बरेच गुण प्रकट असतात. स्वाभाविक गुण असतात.

## आत्मा, म्हणजेच सामायिक

सामायिकचे कर्ता तुम्ही नाही, प्रतिक्रमणाचे कर्ता तुम्ही नाही. हे सर्व उदयकर्म करवीत आहे. मात्र हे लोक, सर्व साधू अज्ञानतेमुळे असे म्हणातत, 'मी केले, मी करत आहे.' असे सर्व अज्ञान घुसले आहे.

**प्रश्नकर्ता :** समभाव म्हणजेच सामायिक. मग जर समभावात राहता आले, तरीही ही सामायिक करायला हवी?

**दादाश्री :** अरे, आत्माच सामायिक आहे. तुम्हाला हे ज्ञान प्राप्त झाले आणि जर तुम्ही पूर्ण दिवस माझ्या आज्ञांमध्ये राहिलात तर संपूर्ण दिवस सामायिकच आहे.

आणि दुसरी गोष्ट, ही सामायिक करायची नसते. ही तर फक्त मागील दोष धुण्यासाठी केलेले एक प्रकारचे मोठे प्रतिक्रमण आहे! पूर्वी जे दोष झाले आहेत, ते सर्व धुणे, यालाच हे लोक सामायिक म्हणतात. नाही तर, आत्माच सामायिक आहे आणि आत्मा प्राप्त झाल्यानंतर पूर्ण दिवस तुम्ही सामायिकमध्येच राहू शकता!

**जय सच्चिदानंद**

# मूळ गुजराती शब्दांचे समानार्थी शब्द

| | |
|---|---|
| *लक्ष* | : जागृती |
| *पुद्गल* | : जे पूरण आणि गलन होते |
| *निर्जरा* | : आत्मप्रदेशापासून कर्मांचे वेगळे होणे |
| *उपाधी* | : बाहेरून येणारे दुःख |
| *बेभानपणे* | : बेशुद्धपणे |
| *गुंठाणा* | : 48 मिनिटे, गुणस्थानक |
| *चीकट* | : गाढ |
| *निकाल* | : निपटारा |
| *उपरी* | : बॉस, वरिष्ठ, मालक |
| *अटकण* | : जी पुढे जाऊ देत नाही, अडकवून ठेवते |
| *संवर* | : नवीन कर्मे बांधणे बंद होणे |
| *पूरण* | : चार्ज होणे, भरणे |
| *गलन* | : डिस्चार्ज होणे, रिकामी होणे |
| *ठपका* | : रागावणे |
| *जाथु* | : एकत्र, थोक प्रमाणात |
| *चलण* | : वर्चस्व, सत्ता, इतरांना स्वत:च्या मर्जीनुसार चालवणे |
| *चीकट फाइल* | : गाढ ऋणानुंबध असलेली व्यक्ती किंवा संयोग |

# रत्नकणिका

❁ जग कोणत्या आधारावर टिकून आहे? अतिक्रमण दोषांमुळे. क्रमणात काही समस्या नाही, पण अतिक्रमण झाले तर त्यासाठी 'प्रतिक्रमण' करायला हवे.

❁ 'अतिक्रमण' होणे स्वाभाविक आहे 'प्रतिक्रमण करणे' पुरुषार्थ आहे.

❁ जी व्यक्ती कोणत्याही क्रियेनंतर पश्चात्ताप करते, ती एक ना एक दिवस शुद्ध होणार, हे निश्चित आहे.

❁ घर्षणानंतर प्रतिक्रमण केले तर घर्षण संपून जाते. जर परत घर्षण केले तर आलेली शक्ती परत निघून जाते.

❁ माणसाकडून दोष होणे स्वाभाविक आहे. त्यातून मुक्त व्हायचा मार्ग कोणता? फक्त 'ज्ञानी पुरुष'च तो (मार्ग) दाखवितात, प्रतिक्रमण.

❁ जगातील लोक माफी मागतात, त्याने काही प्रतिक्रमण होत नाही. ते तर येता-जाता 'सॉरी' 'थँक यू' असे म्हटल्यासारखे आहे. त्याला फार महत्व नाही. 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान याला महत्व आहे.

❁ 'प्रतिक्रमण' जर ताबडतोब नगद झाले, तर भगवान पदात येऊ शकता!

❁ आठवण करायची नसेल तरी येत असेल तर त्याचे कारण 'दोषांचे प्रतिक्रमण' करणे बाकी आहे.

❁ जेव्हा घरातील लोक निर्दोष दिसू लागतील आणि स्वत:चे दोष दिसू लागतील तेव्हा यथार्थ 'प्रतिक्रमणे' होतील.

❁ आपण जे शब्द बोलतो ते बोलायचे नसतात तरी बोलले जातात. 'प्रकृती' नाचते आणि असे 'वादळ' उत्पन्न होते. त्यासाठी किती तरी 'प्रतिक्रमणे' व्हावी लागतात. तेव्हा कुठे प्रकृती शांत होते!

❁ प्रतिक्रमण केल्यामुळे काय होते? आपण जी 'ढवळाढवळ' केली होती, त्याचीच ही रिॲक्शन (प्रतिक्रिया) होत असते. त्यावर पुन्हा ढवळाढवळ करायची आपल्याला इच्छा होत नाही.

❁ ज्याचे 'आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान' यथार्थ आहेत, त्याला आत्मा प्राप्त झाल्याशिवाय राहतच नाही.

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन** : 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | : 9810098564 | **बेंगलूर** | : 9590979099 |
| **कोलकता** | : 9830080820 | **हैदराबाद** | : 9885058771 |
| **चेन्नई** | : 7200740000 | **पूणे** | : 7218473468 |
| **जयपुर** | : 8890357990 | **जलंधर** | : 9814063043 |
| **भोपाल** | : 6354602399 | **चंडीगढ** | : 9780732237 |
| **इन्दौर** | : 6354602400 | **कानपुर** | : 9452525981 |
| **रायपुर** | : 9329644433 | **सांगली** | : 9423870798 |
| **पटना** | : 7352723132 | **भुवनेश्वर** | : 8763073111 |
| **अमरावती** | : 9422915064 | **वाराणसी** | : 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229

**www.dadabhagwan.org**

## प्रतिक्रमण

प्रत्यक्ष 'दादा भगवानांच्या' साक्षीने देहधारी ..... ( ज्याच्या प्रती दोष झाला असेल त्या व्यक्तीचे नाव )च्या मन-वचन-कायेचे योग, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्म यापासून भिन्न असे हे शुद्धात्मा भगवान, आपल्या साक्षीने, आजच्या दिवसापर्यंत जे जे '' दोष झाले आहेत, त्यासाठी माफी मागत आहे, हृदयपूर्वक खूप पश्चात्ताप करीत आहे. आलोचना, प्रतिक्रमण, प्रत्याख्यान करीत आहे, आणि असे दोष पुन्हा कधीही करणार नाही, असा दृढ निश्चय करीत आहे, मला क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा.

हे दादा भगवान! मला असे कोणतेही दोष न करण्याची शक्ती द्या, शक्ती द्या, शक्ती द्या.

'' जे जे दोष झाले असतील, ते सर्व दोष मनात आठवावे.

( तुम्ही शुद्धात्मा आहात आणि जो दोष करतो त्याच्याकडून प्रतिक्रमण करवून घ्यावे, चंदुभाऊकडून प्रतिक्रमण करवून घ्यावे. )

( वाचकांनी चंदुभाऊच्या जागी स्वत:चे नाव समजावे. )






Printed in India

Price ₹ 200

dadabhagwan.org